दादा भगवान प्ररूपित

# आप्तवाणी

## श्रेणी-2

मूल गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

मराठी अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशन समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद – 380009,
Gujarat, India.
**फोन :** +91 93 2866 1166 / 93 2866 1177



**प्रथम आवृत्ती** : 500 प्रती, नोव्हेंबर, 2020

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि 'मी काहीच जाणत नाही' हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 200 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
B-99, इलेक्ट्रॉनिक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25,
गांधीनगर-382044.
**फोन :** (079) 39830341

# त्रिमंत्र






नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलम्  ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद





# दादा भगवान कोण?

जून 1958 संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रुपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरुपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवत आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशाप्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातच्या चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर ए.एम. पटेल आहेत. आम्ही ज्ञानीपुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोक'चे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रूपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही, कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवित असत.

# निवेदन

आत्मविज्ञानी श्री अंबालाल मुळजीभाई पटेल, ज्यांना लोक 'दादा भगवान' या नावानेही ओळखतात, त्यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहार ज्ञानासंबंधी जी वाणी निघाली, ती रेकॉर्ड करून, संकलन व संपादन करून पुस्तकांच्या रुपात प्रकाशित केली जात आहे. त्याच साक्षात सरस्वतीचे अद्‌भूत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे आम्हा सर्वांसाठी वरदानरुप ठरेल.

प्रस्तुत अनुवादाची वाक्यरचना मराठी व्याकरणाच्या मापदंडावर कदाचित खरी ठरणार नाही, परंतु दादाश्रींच्या गुजराती वाणीचे शब्दश: मराठी अनुवाद करण्याचा प्रयत्न केला गेला आहे, की जेणे करून वाचकांना असा अनुभव व्हावा की दादाजींचीच वाणी ऐकली जात आहे. पण तरीसुद्धा दादाश्रींच्या आत्मज्ञानाचे अचूक आशय, जसे आहे तसे तर तुम्हाला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म जाणायचे असेल, त्यांनी या हेतूने गुजराती भाषा शिकावी अशी आमची नम्र विनंती आहे.

अनुवादातील त्रूटींसाठी आपली क्षमा प्रार्थितो.

## वाचकांना...

❖ 'आप्तवाणी'मध्ये मुद्रित पाठ्यसामग्री मूळत: 'आप्तवाणी श्रेणी-2' या गुजराती पुस्तकाचे मराठी अनुवाद आहे.

❖ जिथे-जिथे 'चंदुभाऊ' या नावाचा उल्लेख केला आहे, तिथे वाचकांनी स्वत:चे नाव समजून वाचन करावे.

❖ पुस्तकातील कोणतीही गोष्ट जर तुम्हाला समजली नाही, तर प्रत्यक्ष सत्संगात येऊन त्याचे समाधान मिळवावे अशी नम्र विनंती.

❖ दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही गुजराती शब्द जसेच्या तसे *'इटालिक्स'* मध्ये ठेवले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठीमध्ये तसेच कोणतेही शब्द उपलब्ध नाहीत की ज्यामुळे त्याचा अर्थ पूर्णपणे समजता येईल. पण तरीही त्या शब्दाचे समानार्थी शब्द ( ) कंसात लिहिलेले आहेत.

## समर्पण

आधी, व्याधी आणि उपाधीच्या या कलियुगी त्रिविध तापात प्रचंडपणे तापत राहिलेल्या आणि एकमात्र आत्मसमाधी सुखासाठी तहानलेल्यांच्या परम तृप्तीसाठी प्रकट परमात्मा स्वरूपात स्थित वात्सल्यमूर्ती 'दादा भगवान' यांच्या जगत् कल्याण यज्ञात परम ऋणीय भावाने समर्पित.

## आप्त विज्ञापन

हे सूज्ञजन ! हे तुझेच 'स्वरूप', आज मी तुझ्या करकमलात येत आहे. कृपा करून त्याचा परम विनय बाळग. त्यामुळे तू आपोआपच 'स्व' प्रति परम विनयात राहून केवळ स्व-सुखाने भरलेल्या, पराधीन नसलेल्या, अशा स्वतंत्र आप्ततेचा अनुभव घेशील.

हीच आहे सनातन आप्तता, अलौकिक पुरुषाच्या आप्तवाणीची.

हाच आहे सनातन धर्म, अलौकिक आप्ततेचा.

**जय सच्चिदानंद**

# संपादकीय

ज्यांच्या एकेका शब्दाने अनंतकाळाच्या संसार रोगाचे निर्मूलन होते, ज्यांच्या एका गर्जनेने जिज्ञासूंचा अनंतकाळाचा सुषुप्त आत्मा जागृत होतो, ज्यांच्या सुचरणांशी काळ, कर्म आणि माया विसावतात. अशा परम पूज्य दादाश्रींच्या प्रकट सरस्वतीस्वरूप वाणीचे या ग्रंथात संकलन केले गेले आहे. ही अशी वीतराग वाणी आहे की जिच्याद्वारे जो 'या प्रकृतीचे पारायण पूर्ण करील' तो वीतराग होऊन जाईल! 'आप्तवाणी' असल्यामुळे हिचे कोणत्याच काळात कोणीच खंडन करू शकणार नाही. कारण या स्याद्वाद वाणीमुळे कोणत्याही जीवाचे प्रमाण दुखावले जात नाही. प्रकट परमात्म्याला स्पर्श करून निघालेली ही सहज कल्याणमयी वाणी द्रव्य, क्षेत्र, काळ, भाव आणि प्रसंगांच्या निमित्ताने निघालेली असते. अशा या वाणीचे संकलन करणे हे अतिशय कठीण आहे. नम्र भावाने या ज्ञानग्रंथातील उणीवांबद्दल मी क्षमा मागते.

हा ज्ञानग्रंथ किंवा धर्मग्रंथ नाही परंतु विज्ञानग्रंथ आहे, यात दादाश्रींच्या श्रीमुखातून प्रकट झालेल्या आंतरिक विज्ञानाचा, वीतराग विज्ञानाचा अर्क प्रस्तुत करण्याचा एक प्रयत्न केलेला आहे. बाकी, 'जसेच्या तसे' तर त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनानेच प्राप्त होईल असे आहे. तरीही जोपर्यंत जगाच्या कोणत्याही कोपऱ्यात त्यांची उपस्थिती असेल तोपर्यंत हा ज्ञानग्रंथ यथार्थ फळ देईल. हा ज्ञानग्रंथ तत्त्वचिंतक, विचारक तसेच खऱ्या जिज्ञांसूना अत्यंत उपयोगी पडेल. भाषा अत्यंत साधी आणि एकदम सरळ असल्यामुळे सर्वसामान्य लोकांनादेखील हा ग्रंथ संपूर्ण फळ देईल. सूज्ञ वाचक जर या महान ग्रंथाचे सखोल चिंतन आणि मनन करतील तर अवश्य समकित प्राप्त करतील. त्यासाठी सर्व शासन रक्षक देवी-देवता सहाय्यक होवोत हीच प्रार्थना.

**डॉ. नीरूबहन अमीनचे जय सच्चिदानंद!**

# उपोद्घात

❒ अनंत काळापासून या जगाच्या स्वरूपाबद्दल जी भ्रांती चालत आलेली आहे तिचे स्पष्टीकरण सर्वज्ञांशिवाय अन्य कोणीही करू शकणार नाही. हजारो वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या सर्वज्ञ पुरुषांनी असे स्पष्टीकरण पूर्वी दिलेही आहे, पण आज या भयंकर कलियुगाच्या घोर प्रभावामुळे हे सत्य झाकले गेले आहे. याचे स्पष्टीकरण फक्त जे सर्वज्ञ झाले आहेत तेच आज पुन्हा देऊ शकतात. आणि आज आता या महादूषमकाळात, कलियुगाचा घोर दुष्परिणाम टोकावर पोहोचला आहे तेव्हा अनंतकाळाचे आश्चर्य प्रकट झाले आहे, आणि ते आहे सर्वज्ञ श्री 'दादा भगवान'यांचे प्रकट होणे. त्यांनी संपूर्ण जगाचे स्वरूप उत्पत्ति, व्यय आणि संचालन, यांच्याबाबतीत असलेल्या वेगवेगळ्या तर्क-वितर्कांचे संपूर्ण समाधान एका वाक्यात दिले! आणि ते आहे,

'दि वर्ल्ड इज दि पजल इटसेल्फ.' – **दादाश्री**

अर्थात 'जग स्वत:च एक कोडे आहे, त्याला बनविणारा कोणी बाप जन्माला आला नाही.' हे संपूर्ण जग कसे चालते? तर केवळ 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सेस्'मुळे चालते. आता हे 'वैज्ञानिक सांयोगिक पुरावे' स्थूलतमापासून ते सूक्ष्मतमापर्यंतचे आहेत. त्या सर्वांचा जो ज्ञाता-दृष्टा असेल तोच सर्वज्ञ आहे. आणि तोच 'पुरुष' जगाच्या स्वरूपाचे यथार्थ दर्शन करवू शकतो. म्हणूनच नरसिंह मेहतांनी म्हटले आहे की,

सृष्टी मंडाण छे सर्व एणी पेरे जोगी जोगेश्वरा कोक जाणे...

(या जगाची उत्पत्ति समजण्यापलीकडे आहे, क्वचितच कुणी योगी-योगेश्वर त्यास जाणातात.)

येथे नरसिंह भगत यांचे 'योगी-योगेश्वर' म्हणण्याचे तात्पर्य हेच आहे की आत्मयोगी किंवा आत्मयोगेश्वर असा किंचित एखादा विरळाच या सृष्टीची रचना समजू शकतो. अन्य देहयोगी, वचनयोगी किंवा मनोयोगी, यांच्यापैकी कोणीही हे जाणू शकत नाही. ही दोन वाक्ये की

जी इंग्रजीतून दादाजींच्या श्रीमुखातून निघाली आहेत ती ईश्वराला जगत् कर्त्याच्या पदावरून पदच्युत करीत आहेत. जी भ्रांती ईश्वरावर, भगवंतावर, अल्लाहवर किंवा गॉडवर जगत् कर्त्याचा चुकीचा आरोप लावते त्या भ्रांतीला पूर्णपणे समाप्त करतात!

❒ या जगाची अधिकरण क्रिया काय आहे? 'मी चंदुलाल आहे' या आरोपित दर्शनाने, ज्ञानाने किंवा चारित्र्याने जे जे काही करण्यात येते त्यामुळे जगाची अधिकरण क्रिया होत आहे. याच प्रतिष्ठेने नवीन प्रतिष्ठित आत्म्याची निर्मिती होत आहे. तेच जगाचे अधिष्ठान आहे. दादाश्री यांनीच तर सर्वप्रथम 'प्रतिष्ठित आत्म्याचे' स्पष्ट विवरण दिले आहे.

❒ धर्म कशाला म्हणतात? जो परिणाम घडवतो तोच धर्म. ज्या धर्माने क्रोध, मान, माया, लोभ कमी होत होत निर्मूल होतात त्यालाच धर्म म्हणतात. आयुष्यभर देव दर्शन, प्रवचन, सामायिक आणि प्रतिक्रमण करूनही जर एकही दोष कमी होत नसेल तर त्याला धर्म कसे म्हणता येईल?

धर्म दोन प्रकारचे आहेत : एक रिलेटिव्ह धर्म आणि दुसरा रियल धर्म. रिलेटिव्ह धर्म म्हणजे मनाचा धर्म, वाणीचा धर्म आणि देहाचा धर्म. आणि दुसरा रियल धर्म, म्हणजे स्वधर्म, आत्मधर्म. जैन, वैष्णव, ख्रिश्चन, मुस्लिम, वगैरे सर्व धर्म हे रिलेटिव्ह धर्म म्हटले जातात आणि रियल धर्म, आत्मधर्म फक्त 'ज्ञानी पुरुषां'च्या हृदयातच सामावलेला असतो. तो इतर कुठेही असू शकत नाही.

श्रीमद् राजचंद्र सांगून गेले आहेत, 'अन्य काही शोधू नकोस, फक्त एका सत्पुरुषाला शोधून त्यांच्या चरणीं सर्वभाव अर्पण करून वागत जा, तरी जर मोक्ष मिळाला नाही तर माझ्याकडून घेऊन जा.'

ज्यांचा आत्मा संपूर्ण प्रकाशमान झाला आहे, त्यांच्यापाशीच आत्मधर्म मिळू शकतो. इतर सगळीकडे धर्म तर आहेत परंतु त्यास प्राकृत धर्म म्हणतात. जप, तप, त्याग, व्याख्यान, प्रवचन, सामायिक आणि प्रतिक्रमण वगैरे सर्व प्राकृतिक धर्म आहेत. जिथे संपूर्ण आत्मधर्म आहे

तिथे केवळ ज्ञानक्रिया आणि केवळ दर्शनक्रिया आहे, ज्याचा परिणाम केवळ चारित्र्य आहे!

'जेव्हा धर्म पूर्णपणे परिणमित होतो तेव्हा 'स्वत:'च धर्मस्वरूप होऊन जातो!' – **दादाश्री**

रियल धर्म ही सायंटिफिक (वैज्ञानिक) गोष्ट आहे. ती काय नुसती थाप नाही. ते तर विज्ञान आहे. सर्वसामान्यपणे लोक ज्याला धर्म समजतात तो खरा धर्म नाही.

वस्तू (द्रव्य, तत्व) स्व-गुणधर्मात परिणमित होते, तोच खरा धर्म होय. – **दादाश्री**

वैज्ञानिक रित्या समजावून सांगायचे तर सोने जेव्हा सोन्याच्या गुणधर्मात असेल तेव्हाच त्याला सोने म्हणता येईल. पितळाला बफींग केले तरी पितळ कधीही सोने होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे कोणतीही वस्तू जेव्हा त्याच्या स्व-गुणधर्मात, स्व-स्वभावात परिणमित होते तेव्हाच ती वस्तू आपल्या मूळ गुणधर्मात आहे, स्वत:च्या गुणधर्मात आहे, असे म्हटले जाते. आणि वस्तू स्वत:च्या गुणधर्माहून कधीही वेगळी होऊ शकत नाही. आत्मा जेव्हा स्वत:च्या गुणधर्मात राहील, स्वत:च्या स्वभावात येऊन स्व-स्वभावात स्थित होईल तेव्हाच आत्मा आत्मधर्मात आहे असे म्हणता येईल. यालाच सर्वज्ञ भगवंतानी स्वधर्म, आत्मधर्म, रियल धर्म, असे म्हटले आहे.

आत्मधर्म नशा उतरवते आणि प्राकृत धर्म नशा चढवते. स्वत: जेव्हा संपूर्ण निष्पक्षपाती होतो, अरे, 'स्वत:' स्वत:साठी सुद्धा संपूर्ण निष्पक्षपाती होऊन स्वत:चे प्रत्येक दोष, अगदी सूक्ष्मतम दोषसुद्धा पाहू शकतो तेव्हाच त्याला रियल धर्मात आला असे म्हणता येईल.

❒ संसाराचे स्वरूप काय आहे? संसार ही रिलेटिव्ह वस्तू आहे, टेम्परररी आहे. सारा संसार धोकाच आहे. इथे कोणीही आपल्या नात्याचा नाही. सगळ्या शास्त्रांपैकी जवळजवळ पंच्याहत्तर टक्के शास्त्र संसारापासून वैराग्य उत्पन्न व्हावे यासाठी लिहिलेले आहे. याउलट 'ज्ञानी पुरुषां'ची

चारच वाक्ये भल्याभल्या संसारी लोकांच्या मनात वैराग्य उत्पन्न करण्यास पुरेशी होतात.

अरे भाऊ, तुम्ही कधी तिरडी पाहिली नाही का? तिरडी निघते तेव्हा बायको, मुले, मोटार, बंगला जे जे कमावले ते सगळेच जप्त होते की नाही? आणि सोबत काय येते? तर इथे जितकी कलमे लागू केली, (कर्माचे हिशोब निर्माण केले) 420 चे कलम, 344 चे कलम, ती सगळी कलमे सोबत येतात आणि मग पुढील जन्मात पुन्हा नव्याने कमाई करून ही सगळी उधारी चुकवावी लागते! – **दादाश्री**

दादाश्री सहज विनोदाने परंतु गहन ज्ञानपूर्ण पद्धतीने वैराग्य उत्पन्न होईल अशा गोष्टी नेहमी करत.

**दादाश्री :** ताई, तुम्हाला किती मुले आहेत?

**प्रश्नकर्ता :** चार.

**दादाश्री :** मग तुमच्या मागच्या जन्मातील मुले आता कुठे आहेत?

❒ संसार हा शब्द मूळ संसरण या शब्दावरून आला आहे, जो निरंतर परिवर्तनशील आहे त्याचे नाव संसार. प्रत्येक जीव या संसरण मार्गावर सतत चालत राहतो आणि उर्ध्वगती प्राप्त करतो. फक्त मनुष्यगतीत आल्यानंतर त्याला वक्रगती प्राप्त होते. कारण या मनुष्य जन्मात कर्ताभाव, अमर्यादित मन, बुद्धी उत्पन्न होते. आणि जोडीला मोक्ष किंवा मुक्ती मिळविण्यासाठी संधीसुद्धा फक्त या मनुष्य जन्मातच मिळू शकते.

संसाराचे वर्णन 'ज्ञानी पुरुष' अगदी साध्या, सुंदर भाषेत दृष्टांत देऊन समजावतात. ते म्हणतात संसार हा घोड्यासारखा आहे. संसारी लोक घोड्यावर स्वार झालेल्या माणसासारखे आहेत. स्वार घोड्याला दुर्बल समजून गवताचा भारा स्वत:च्या डोक्यावर ठेवून घाबरत घाबरत घोड्यावर बसतो. परंतु शेवटी सगळा भार घोड्यावरच पडतो. त्याचप्रमाणे तुम्ही सुद्धा तुमचे ओझे संसाररूपी घोड्यावरच टाका. स्वत:वर घेऊ नका. शेवटी ते ओझे घोड्यावरच पडणार आहे.

❐ संसारवृक्षाचे निर्मूलन करण्याचे सामर्थ्य फक्त 'ज्ञानी पुरुषां'नाच असते. ते कसे? तर अन्य कुठल्याही वस्तूला अजिबात स्पर्श न करता 'ज्ञानी पुरुष' संसारवृक्षाच्या मुख्य मुळात चिमुटभर औषध टाकतात, जेणे करून संसारवृक्ष आपोआपच वाळत जाऊन निर्मूळ होतो.

❐ सत्देव कोण? मंदिरात किंवा जिनालयात (जैन मंदिरात) मूर्तीरूपात ठेवले आहेत ते? नाही. आतमध्ये म्हणजे 'स्वत:मध्ये' विराजमान असलेले परमात्माच सत्देव आहेत. जोपर्यंत त्या परमात्म्याचे दर्शन होत नाही तोपर्यंत मंदिर किंवा जिनालयातील सत्देवालाच मान्य करावे.

सद्गुरु कोण? अंतिम गुरु म्हणजे 'ज्ञानी पुरुष,' परंतु जोपर्यंत ज्ञानी पुरुषाची भेट होत नाही तोपर्यंत आपल्यापेक्षा उच्च पायरीवर असलेले, अगदी दोन डिग्री ने सुद्धा का होईना पण जे उंचावर असतील, ते आपले गुरु.

सत्धर्म म्हणजे काय? 'ज्ञानी पुरुषांची' आज्ञा तोच सत्धर्म. ज्ञानी पुरुषांच्या श्रीमुखातून निघालेली वचने, तोच सत्धर्म. शास्त्र हे सत्धर्म नव्हे. ते रिलेटिव्ह धर्म आहेत, रियल नाहीत. परंतु जोपर्यंत खरे मोती मिळत नाहीत तोपर्यंत कल्चर्ड मोती वापरावेच लागतील ना?

सत्देव, सद्गुरु आणि सत्धर्मानेच मोक्ष प्राप्त होतो.

❐ मूर्तीधर्म म्हणजे काय? अमूर्तधर्म म्हणजे काय?

दादाश्रींनी मूर्तीधर्म आणि अमूर्तधर्म, यांचे सुंदर विवेचन केले आहे. काही लोक अज्ञानतेमुळे भगवंतांच्या मूर्तीला मानत नाहीत, तिचा धिक्कार करतात. तसे करणे म्हणजे भयंकर मोठी चूक आहे. जोपर्यंत अमूर्तधर्म, आत्मधर्म आणि आत्मज्ञान प्राप्त झाले नाही तोपर्यंत मूर्तीची उपासना केली पाहिजे. जोपर्यंत आत्म्याचे ज्ञान प्राप्त झालेले नाही तोपर्यंत चित्त एकाग्र करण्यासाठी कोणते तरी साधन लागतेच ना! हजारो लोकांनी ज्या वीतराग भगवंतांची, त्यांच्या मूर्तीची वर्षानुवर्षे स्थापना केली आहे त्या मूर्तीचा आपण तिरस्कार कसे काय करू शकतो? आणि जे यथार्थ आत्मज्ञानी आहेत ते तिरस्कार तर करत नाहीत पण मन, वचन, कायेने कोणत्याही जीवाला किंचितमात्रही दु:ख देत नाहीत.

❒ मूर्तीधर्म हे तर भारताचे विज्ञान आहे. विशिष्ट स्टँडर्ड(पातळी)पर्यंत पोहोचलेल्या लोकांसाठी धर्माचे एक अवलंबन आहे. त्या अवलंबनाला आपण चुकीचे कसे म्हणू शकतो? आणि ज्यांना या मूर्तीधर्माची गरज नाही, जे या स्टँडर्डहून पुढे गेले आहेत, संपूर्ण आत्मज्ञानी, सर्व प्रकारच्या कलुषित भावांपासून मुक्त होऊन पुढे गेलेले आहेत, आणि केवळ अमूर्तातच रमलेले आहेत त्यांनी मूर्तीधर्म स्वीकारला नाही तर ते योग्य आहे. पण मग जे या पातळीवर पोहोचले आहेत त्यांच्यासाठी जगात स्वीकारण्यासारखे किंवा नाकारण्यासारखे काहीच नसते. ते सगळ्यांचाच दृष्टीकोन समजून घेतात आणि कोणाचेही धर्म-प्रमाण दुखावणार नाही अशा प्रकारे वागतात.

मूर्तीत यथार्थ प्राणप्रतिष्ठा कोण करू शकतो? फक्त 'ज्ञानी पुरुष'च यथार्थ प्राणप्रतिष्ठा करू शकतात.

❒ मोक्ष प्राप्तीचे दोन मार्ग आहेत : एक क्रमिक मार्ग आणि दुसरा अक्रम मार्ग. हा अक्रम मार्ग म्हणजे अपवादात्मक मार्ग आहे, आश्चर्यकारक मार्ग आहे. दहा लाख वर्षातून एखादे वेळीच प्रकट होतो असा हा मार्ग आहे. ऋषभदेव भगवंतांकडून फक्त भरत चक्रवर्तींनाच जो प्राप्त झाला होता तोच हा अक्रम मार्ग आज दादाश्रींपाशी प्रकट झाला आहे आणि (त्यांच्या द्वारे) अनेक पुण्याशाली व्यक्तींना प्राप्त झाला आहे. याला अक्रम का म्हणायचे? तर जे आत्मज्ञान प्राप्त करण्यासाठी चक्रवर्तींसारख्या सम्राटांनासुद्धा राज्य-सिहांसन, बायको-मुले सगळ्यांना सोडून सद्‌गुरूंच्या मागे जंगलात जावे लागत असे आणि तरी देखील त्यांना ते प्राप्त होईलच अशी खात्री नसे. अशा अत्यंत कष्टदायी क्रमिक मार्गासारखा हा मार्ग नाही. हा तर अक्रम मार्ग! ज्याला 'ज्ञानी पुरुषां'ची कृपादृष्टी प्राप्त होते त्याला एका तासातच संपूर्ण आत्मज्ञान प्राप्त होते!! आणि त्यानंतर ग्रहण-त्याग करण्याचा प्रश्नच राहत नाही. अशा ग्रहण-त्यागरूपी साधनांची गरज, साध्य वस्तू अर्थात आत्मज्ञान प्राप्त केल्यानंतर उरतच नाही. मग फक्त ज्ञानींची आज्ञा तोच धर्म आणि आज्ञा तेच तप. महावीर भगवंतांनी सुद्धा तेच सांगितले आहे 'आणाए धम्मो आणाए तप्पो' ('आज्ञा हाच धर्म आणि आज्ञा हेच तप') अक्रम मार्गात तर फक्त पाच आज्ञा आहेत आणि

त्या संसार व्यवहाराला अजिबात बाधक होणार नाहीत, अशा आहेत. उलट त्या संसार-व्यवहारात अत्यंत उपयोगी अशा 'मास्टर की' (गुरु किल्ली) सारख्या बनून जातात, या जगात असे कोणतेही कुलूप नाही की जे या 'मास्टर की' ने उघडता येणार नाही.

ही गोष्ट अविश्वसनीय वाटेल पण तरीही ती वस्तुस्थिती आहे, या बद्दल दुमत नाही. कारण अनेक पुण्यशाली व्यक्तींनी तासाभरातच दादाश्रींकडून स्वरूपज्ञानाची प्राप्ती केली आहे आणि अनुभव घेतला आहे. त्यानंतर ते एक क्षणभरदेखील 'स्वत:'च्या स्वरूपाचे लक्ष्य यापासून विचलित होत नाहीत. असा अनेकांचा अनुभव आहे. 'दिस इज दि ओन्ली कॅशबँक इन द वर्ल्ड! (या जगातील ही एकमेव रोख बँक आहे) या बँकेत ज्याला जसा हवा तसा चेक टाकू शकतो परंतु पूर्णपणे समजून टाकावा! कारण अगदी मोक्षापर्यंतचा चेक पास होऊ शकेल असे आहे. फक्त जगातील विनाशी वस्तूत मूर्छित होऊन स्वत:चे अविनाशी पद गमावता कामा नये.

❒ 'प्रकृती' विज्ञान संपूर्णपणे कोण समजावू शकतात? जे स्वत: 'पुरुष' झालेले आहेत आणि प्रकृतीला निरंतर भिन्न 'पाहतात' त्यांनाच प्रकृतीचे संपूर्ण विज्ञान समजते आणि तेच प्रकृतीचे संपूर्ण विज्ञान समजावू शकतात. जे स्वत: पुरुष झालेले नाहीत, जे स्वत:च अजून प्रकृतीस्वरूपात आहेत त्यांना प्रकृती कशी समजणार? आणि ते कशी समजावू शकणार? ते तर फक्त 'ज्ञानी पुरुषां'चेच काम आहे. 'आत्मे' अनंत आहेत आणि प्रकृत्या पण अनंत आहेत. जोपर्यंत स्वत: पुरुष होत नाही तोपर्यंत तो प्रकृती नाचवेल तसे नाचतो.

क्रमिक मार्गात प्रकृती क्रमाक्रमाने सहज होत जाते आणि अखेरीस सहज आत्मा प्राप्त होतो. याउलट अक्रम मार्गात 'ज्ञानी पुरुष' आत्म्याला सरळपणे सहज स्वभावात आणतात आणि त्यानंतर प्रकृतीला सहज करणे बाकी राहते. आणि प्रकृती सहज कशी बनते? 'प्रकृती' समोर ज्या ज्या फाइली उभ्या राहतात त्यांचा समभावाने निकाल केला की त्या 'फाइल'पासून मुक्ती मिळते आणि त्यानंतर सहज प्रकृती बाकी राहते.

मोक्षाला जाण्यास कोणालाही मनाई केलेली नाही. फक्त स्वत:ला स्वत:चे भान झाले पाहिजे. कोणाची त्यागाची प्रकृती असते, कोणाची तपाची प्रकृती असते, कोणाची विलासी प्रकृती असते. कशीही प्रकृती असो, मोक्ष प्राप्तीसाठी प्रकृती संपवावी लागते.

'प्रकृती पूरण-गलन स्वभावाची आहे आणि स्वत: अपूरण-अगलन स्वभावाचा आहे.' - **दादाश्री**

वीतरागी निरंतर स्वत:च्या प्रकृतीलाच पाहत असत. प्रकृतीचा 'ज्ञाता-दृष्टा' राहिल्याने प्रकृती विलय पावते.

'केवलज्ञानाची अंतिम निशाणी हीच आहे की स्वत:च्याच प्रकृतीला पाहत राहणे.' - **दादाश्री**

प्रकृतीचा स्वभाव कसा आहे ? प्रकृती ही लहान मुलासारखी आहे. प्रकृतीकडून काम करवून घ्यायचे असेल तर लहान मुलाप्रमाणे समजावून, चुचकारून तिच्याकडून काम करवून घ्यावे लागते. मुलाला समजावणे सोपे आहे पण त्याच्या विरोधात गेलात तर मात्र त्याला ताब्यात ठेवणे कठीण जाते. म्हणून काहीही करून शेवटी 'लॉलीपॉप' देऊनही तिला पटवून आपले काम करून घ्यायचे आहे.

काही लोक आत्म्याला 'निर्गुण' म्हणतात. पण ते यथार्थ नाही. प्रकृतीच्या गुणांशी तुलना करता आत्मा 'निर्गुण' आहे. स्वत:च्या गुणाने पाहता आत्मा अनंत गुणांने युक्त आहे. आत्म्याचे अनंत गुण आहेत.

दादाजींचे सूत्र आहे की, ''प्रकृतीचा एकही गुणधर्म 'शुद्ध चेतनामध्ये' नाही आणि 'शुद्ध चेतनाचा' (आत्म्याचा) एकही गुणधर्म प्रकृतीमध्ये नाही.'' - **दादाश्री**

❒ 'प्रकृती सहज होते तेव्हा आत्मा सहज होतो आणि आत्मा सहज होतो तेव्हा प्रकृती सहज होते.' - **दादाश्री**

अंबामाता, दुर्गामाता, या सर्व माता आद्यशक्ती आहेत, आणि त्या सहज प्रकृतीच्या शक्तिसूचक आहेत. प्रत्येक देवीचे नियम आहेत आणि

ते-ते नियम पाळणाऱ्यावर ती देवी प्रसन्न होते. अंबामाता प्रकृतीचा सहजपणा सूचित करते. तुमची प्रकृती सहज राहील तर अंबामाता प्रसन्न राहील. सरस्वतीदेवीला प्रसन्न करायचे असेल तर कोणते नियम पाळायला हवेत? वाणीचा कधीही दुरुपयोग करू नये, खोटे बोलू नये, कावेबाजी करू नये. वाणीचा कुठल्याही प्रकारे अपव्यय करू नये, हे नियम पाळले तर सरस्वती प्रसन्न होते. परिणामी आश्चर्यकारक वचनबल प्राप्त होते! 'ज्ञानी पुरुषां'ची वाणी साक्षात सरस्वती मानली जाते, कारण ती प्रकट आत्म्याला स्पर्श करून निघत असते.

'लक्ष्मीदेवीचे' नियम काय आहेत? 'वाणी-विचार आणि वर्तन या तीनही प्रकारे चोरी करू नये.' लक्ष्मीदेवीचा हाच एक मोठा नियम आहे. लक्ष्मीच्या मागे लागू नये, तिला अडवून ठेवू नये आणि तिचा तिरस्कार देखील करू नये. 'ज्ञानी पुरुष' 'लक्ष्मीदेवी' समोर आली तरी तिचे हारतुरे घालून स्वागत करतात आणि लक्ष्मी निघू लागली तरी तिला हारतुरे घालून निरोप देतात. जे लक्ष्मीची वाट पाहतात त्यांच्याकडे लक्ष्मी उशीरा जाते आणि जे इच्छा करत नाहीत त्यांच्याकडे लक्ष्मी वेळेवर पोहोचते.

'लक्ष्मी' कशी मिळते? कष्ट करून? बुद्धीने? नाही. ती केवळ पुण्याद्वारे मिळविता येते. ज्याला हे रहस्य कळत नाही, त्याला जेव्हा पैसे मिळतात तेव्हा तो म्हणतो 'मी मिळविले, माझ्या हुशारीने मिळविले.' हा खोटा अहंकार आहे. मनातील भाव सुधारले तर लक्ष्मी येते. व्यभिचारी विचारांनी खरी लक्ष्मी कधीच येत नाही. खरी लक्ष्मीच शांती देते. भ्रष्टाचाराने मिळवलेला काळा पैसा टिकत तर नाहीच, पण जाता जाता रोमारोमात शंभर विंचू एकदम चावावेत अशा वेदना देऊन जातो. लक्ष्मीचे येणे आणि जाणे हे परसत्तेत आहे. मनुष्याने तर फक्त नैमित्तिक क्रियाच करायची असते. प्रयत्न करायचे असतात. लक्ष्मीसाठी नि:स्पृह होता कामा नये. आणि तिचा तिरस्कारही करता कामा नये. तिरस्कार केला तर कित्येक जन्म प्रयत्न करून देखील लक्ष्मी मिळणार नाही.

❒ दादा भगवान जगाला एक नवीन सूत्र देत आहेत. जुनी सूत्रे लोक कोळून प्याले आहेत.

'डिसऑनेस्टी इज दि बेस्ट फूलिशनेस.'

(अप्रमाणिकता हा सर्वात मोठा मूर्खपणा आहे.) – **दादाश्री**

ज्याला मोक्ष हवा आहे, त्याने नो लॉ–लॉ. (कुठलाच नियम नाही हाच नियम.) हे समजून घेतले पाहिजे. जो नो लॉ–लॉ, मध्ये आला तो सहज प्रकृतीमध्ये आला असे समजता येईल. जिथे जिथे कायदा लागू करून कंट्रोल करायचा प्रयत्न होतो तिथेच त्या कायद्याचा द्वेष निर्माण होतो. कायदा मोडण्याकडे कल जातो. प्रकृती बंड करते आणि नियम मोडला जातो.

या जगाला एक ना एक दिवस सर्व नियम काढून टाकावे लागतील. विना नियमवाला सर्वात प्रथम आम्ही केला आहे. सरकारला सांगू, 'या बघा, आमच्याकडेच विना नियमाचे संचालन.' – **दादाश्री**

नियम लादले की मनोभाव बिघडतात आणि मग वर्तन बिघडते. नियम आले की संकल्प–विकल्प उभे राहतात. आत्मा सहज आहे आणि नियम म्हणजे बंधने आहेत. ती स्वत:ला असहज करतात.

❒ यथार्थ धर्मध्यान कशाला म्हणतात?

पूजा, जप, तप, सामायिक, प्रतिक्रमण, प्रवचन ऐकणे याला धर्मध्यान म्हणतात का? नाही. या सर्व गोष्टी म्हणजे स्थूल कर्मकांडे आहेत. परंतु स्थूल क्रिया करताना तुमचे ध्यान कुठे आहे त्याची नोंद घेतली जाते. भगवंताचे दर्शन घेत असताना तुमचे ध्यान भगवंतांच्या मूर्तीबरोबरच दुकानावर असेल किंवा बाहेर ठेवलेल्या तुमच्या चपलांवर असेल तर त्याला धर्मध्यान कसे म्हणणार? ईश्वर क्रिया पाहत नाही. तुमचे ध्यान कुठे आहे ते पाहतो. आता होणारी क्रिया तर मागच्या जन्मी केलेल्या ध्यानाचे रूपक आहे, ती मागच्या जन्मीचा पुरुषार्थ सूचित करते. आणि तुम्ही आज जे ध्यान करत आहात तो तुमचा पुढच्या जन्मीचा पुरुषार्थ आहे. पुढच्या जन्मीचे साधन आहे!

आता, धर्मध्यान म्हणजे काय? आर्तध्यान आणि रौद्रध्यान उत्पन्न होतात. तेव्हा त्यांना बदलण्यासाठी जो पुरुषार्थ करावा लागतो तो म्हणजे

धर्मध्यान. या धर्मध्यानात आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान, यांचा समावेश होतो. परंतु आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान स्वत:च्या समजुतीनुसार नसावेत तर 'ज्ञानी पुरुषां'नी सांगितल्याप्रमाणे असावेत.

आर्तध्यान आणि रौद्रध्यानाला बदलायचे कसे? आर्तध्यान आणि रौद्रध्यान उत्पन्न झाले ते माझ्याच कर्मफलाच्या उदयामुळे झाले, त्यात समोरच्याचा किंचितमात्र दोष नाही. उलट माझ्या निमित्ताने समोरच्या व्यक्तीला दु:ख सहन करावे लागले त्याचा पश्चाताप करावा आणि पुन्हा मी असे करणार नाही, असा दृढ निर्णय, निश्चय करावा. म्हणजेच प्रतिक्रमण, प्रत्याख्यान आहेत. आणि ते आर्तध्यान, रौद्रध्यान होताक्षणीच शूट ऑन साइट केले पाहिजे. प्रतिक्रमण रोख, अगदी त्याचक्षणीच झाले तरच दोष नष्ट होतात. खरे धर्मध्यान समजले तर ते ताबडतोब वर्तनात येते.

दादाश्रींनी रोजच्या व्यवहारात वारंवार उपयोगी पडतील अशा प्रसंगांची उदाहरणे देऊन आर्तध्यान आणि रौद्रध्यान यांना उलटवून धर्मध्यानात कसे राहावे हे फार सोपे करून सांगितले आहे आणि प्रत्येकाला ते आपापल्या परीने करता येईल असे आहे.

❒ ज्याचे सर्व कलुषित भाव संपतात त्याला भगवंतपद प्राप्त होते. ज याला स्वत:ला कलुषित भाव उत्पन्न होत नाहीत एवढेच नाही तर ज्याच्या निमित्ताने समोरच्या व्यक्तीलाही कलुषित भाव उत्पन्न होत नाहीत, फक्त अशी व्यक्तीच लोकपूज्य बनू शकते. नाहीतर 'ज्ञानी पुरुष' की जे स्वत: र्निविशेषपदात असतात त्यांना 'भगवंत' असे विशेषण देणे, म्हणजे त्यांना त्यांच्या अनुपम अशा उच्च पदावरून खाली ओढण्यासारखे आहे! तरी पण ओळखण्यासाठी लोक त्यांना 'भगवंत' सर्वज्ञ, वगैरे म्हणतात. 'सर्वज्ञ' म्हणजे काय? जे सर्व 'ज्ञेयांना' जाणतात ते सर्वज्ञ. सर्वज्ञ दोन प्रकारचे असतात. एक 'कारण सर्वज्ञ' आणि दुसरे 'कार्य सर्वज्ञ.' भगवंतांनी होत असलेल्या क्रियांना होऊन गेलेल्या क्रिया असे मानले आहे.

उदाहरणार्थ एखादी व्यक्ती बडोद्याला जाण्यासाठी घरून निघाली असेल आणि पाच-दहा मिनिटांनी जर कोणी तुम्हाला विचारले 'भाईसाहेब' कुठे गेले?' तर तुम्ही काय उत्तर द्याल? तुम्ही म्हणाल की 'ते तर

बडोद्याला गेले.' आता भाऊसाहेब तर जेमतेम स्टेशनपर्यंतच पोहोचले असतील. तरी पण क्रियावंत झालेल्या क्रियेला महावीर भगवंतांनी क्रिया झालेली आहे असे मानले आहे! तसेच ज्यांच्यात सर्वज्ञ होण्याच्या कारणांचे सेवन होत आहे त्यांना कारण सर्वज्ञ असेच म्हटले जाते. 'दादा भगवान' हे कारण सर्वज्ञ आहेत.

❒ जगाचा नियम आहे की ज्याची चूक दिसून येते त्याचीच चूक, पण निसर्गाचा नियम असा आहे की 'जो भोगतो त्याचीच चूक.'

जर कोणाला आपल्यामुळे किंचितमात्रही दु:ख झाले तर ती आपलीच चूक आहे असे समजावे. – **दादाश्री**

'भोगतो त्याची चूक' या नियमाच्या आधारे जो वागेल त्याला या जगात काहीच सोसावे लागत नाही, कोणाच्याही निमित्ताने किंचितमात्र दु:ख होत नाही. आपण आपल्याच चुकांमुळे बंधनात अडकलेलो आहोत आणि जो स्वत:च्या सर्व चुका मिटवून टाकतो तो स्वत:च परमात्मा आहे! वीतरागी स्वत:च्या सर्व चुका संपवून मोक्षात गेले. आपल्याला पण तसेच करून मोक्षात जायचे आहे. 'वीतराग' ध्येयस्वरूप आहेत आणि प्रकट ज्ञानी पुरुष मूळ उपादान संयोगी आहेत. माझी चूक नाही असे म्हणणे हीच सर्वात मोठी चूक आहे. त्यामुळे त्या चुकीवर आणखी गाढ आवरण बसते. कृपाळुदेव म्हणतात,

*'हुं तो दोष अनंतनुं भाजन छुं करुणाळ'*
(हे करुणामय, मी तर अनंत दोषांनी भरलेला आहे.)

अनंत दोषांनी भरलेले आहोत, आणि पदोपदी चुकाच होत आहेत. अरे, या जगात विद्यमान आहोत हीच केवढी मोठी चूक आहे, नाही का? मुळात स्वत:च चुकांनी भरलेला आहे, तेव्हा दुसऱ्यांना काय दोष द्यायचा? दुसऱ्यांना दोष देणे याहून जास्त मोठे मिथ्यात्व या जगात आणखी दुसरे कुठलेच नाही.

'जो स्वत:ची एक जरी चूक संपवेल, त्याला भगवंत म्हटले जाईल.' – **दादाश्री**

‘या जगात तुम्हाला *उपरी* (वरिष्ठ, मालक) कोणीच नाही.’ याची मी तुम्हाला गॅरंटी देतो. कोणीही बाप तुमचा *उपरी* नाही. तुमच्या चुका त्याच तुमच्या *उपरी* आहेत. – **दादाश्री**

तुम्ही स्वतः कोण आहात हे जाणले की सर्व चुका संपवण्याचा मार्ग मोकळा होतो आणि अखेर तुम्ही परमात्मा होता.

❒ जगाचा नियम कसा आहे की, कोणी तुम्हाला जर वाईट शब्द बोलले किंवा तुमचे जर कोणी वाईट केले तर तुम्ही समोरच्या व्यक्तीला दोषी मानता, त्याची चूक समजता आणि ‘मला असे का बोलला?’ असे म्हणून स्वतःवर अन्याय झाला असे मानता. खरे म्हणजे न्याय पाहायचाच नसतो. तुम्हाला ज्या काही अनुकूल किंवा प्रतिकूल गोष्टी प्राप्त होतात, त्या तुम्ही सोबत आणलेल्या व्यवहाराच्या हिशोबाने प्राप्त होतात, मग अशा प्रसंगी ‘न्याय’ पाहायचा प्रश्न उरतोच कुठे? प्रत्येक व्यक्तीचा व्यवहार, तो जसा सोबत घेऊन आलेला आहे तसातसा उलगडत जातो आणि जो व्यवहार मिळतो तोसुद्धा हिशोबाप्रमाणेच मिळतो. त्यात जो ‘न्याय’ शोधायला जातो किंवा निसर्गाच्या न्यायाला अमान्य करतो, त्याला त्याचा त्रास झाल्याशिवाय कसा राहील?

‘ही माझी चूक आहे’ अशी समज ज्याला येते, या पायरीपर्यंत जो पोहोचला आहे, त्याच्यासाठी हा ‘न्याय’ आहे आणि ‘मी चुकत नाही’ असे जो मानतो त्याला समजण्यासाठी व्यवहार आहे.

❒ सामान्यपणे व्यवहारात ज्याला आपण सुखे आणि दुःखे असे समजतो ती खरे म्हणजे सुखे आणि दुःखे नाहीत, ती तर शाता (सुखकारक परिणाम) आणि अशाता (दुःखकारक परिणाम) अशी वेदनीय कर्मे आहेत, असे भगवंतांनी सांगितले. ही शाता आणि अशाता वेदनीय कर्मे ठराविक कालावधीची असतात, टेम्परी असतात, कारण त्या फक्त अवस्था असतात. अवस्था याचा अर्थच टेम्परी – तात्पुरती. आता सामान्य समजुतीप्रमाणे या वेदनीय कर्माला कायमचे मानून मोठे स्वरूप दिले तर स्वतःला खूप सहन करावे लागते. संसारातील सर्व सुख-दुःखांचा अंत

असतो. त्यांना शेवट असतो. फक्त स्वत:चे 'स्वसुख' मात्र अनंत असते आणि तेच प्राप्त करण्यायोग्य आहे.

❒ सामान्य समजुतीनुसार सुख-दु:खाची कल्पना करून भयंकर अशी कर्मबंधने बांधली जातात. त्या कल्पना मोडीत काढून त्या जागी दादाश्रींनी अतिशय सुंदर आणि सहज सोप्या पद्धतीने यथार्थ 'ज्ञान दर्शन' प्रदान केले आहे आणि ते लगेच समजता येईल इतके सोपे केले आहे. एकदा नीट समजले की मग व्यावहारिक सुखे-दु:खे स्पर्श करू शकत नाहीत.

❒ 'कंटाळा,' म्हणजे काटेरी गादीवर झोपल्यावर जी दशा होते, ती!

– **दादाश्री**

आता या कंटाळ्याचा अनुभव आला नाही असा भाग्यशाली कोणी असू शकतो का? मोठमोठे महाराज, आचार्य, साधू, संन्यासी आणि मोठमोठे महात्मा, यांना सुद्धा कंटाळा येतोच. फक्त 'ज्ञानी पुरुषां'नाच कंटाळ्यासारख्या गोष्टींचा अनुभव सहन करावा लागत नाही. आता ज्याला कंटाळा येतो त्याने तो समभावाने सहन केला पाहिजे, याऐवजी इथे तर कंटाळा दूर करण्याचे उपाय योजिले जातात. अरे सिनेमा, नाटक किंवा त्याहूनही अधिक निकृष्ट उपाय केले जातात. पण खरी गोष्ट अशी आहे की त्यामुळे कंटाळा दूर होत नाही. त्याने फक्त कंटाळा पुढे ढकलला जातो. मग पुन्हा दुप्पट जोराने हजर होतो. कारण उदयकर्मापासून सुटका नाही, त्यास भोगल्याशिवाय गत्यंतर नाही.

❒ राग-द्वेष याबाबत सामान्य लोकांची समज आणि वीतरागींची यथार्थ समज, यात ताका-दुधाएवढा फरक आहे. 'मी चंदुलाल आहे' हाच राग (मोह, आसक्ती) आहे. जिथे स्वत: नाही तिथे आपण आहोत असे मानणे हाच राग आणि 'मी शुद्धात्मा आहे' हे लक्ष्य ज्याला निरंतर आहे त्याचा राग (आसक्ती) संपते.

माझे याच्यावर प्रेम आहे अशी जी सामान्य समजूत आहे तीच अयथार्थ आहे (चुकीची आहे). खरे म्हणजे आत्म्यापाशी राग नावाचा गुणच नाही. हा जो राग वाटतो तो तर परमाणूंचे आकर्षण आहे. ही

सगळी पुद्‌गलाची किमया आहे. त्याला 'स्वत:लाच' 'राग-द्वेष' होतात असे मानून तो आत्म्याला 'रागी-द्वेषी' असे ठरवतो. आत्मा वीतरागीच आहे, आणि वीतरागीच राहणार.

'अज्ञाना'वर प्रेम म्हणजे राग आणि ज्ञानावर प्रेम म्हणजे वीतराग.

– **दादाश्री**

❒ वैर हा जगाचा आधारस्तंभ आहे. जर वैर निर्मूल झाले तर संसार सहजपणे निर्मूल होतो. वैरातून सुटण्याचा एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे 'फाइलींचा समभावाने निकाल (निपटारा) करा.' या 'शस्त्राचा आधार' या काळात आश्चर्यकारक आहे. हे 'शस्त्र' दादाजींनी सर्वांना उपलब्ध करून दिले आहे. हे शस्त्र हातात घेऊन जो रणांगणावर जातो तोच खरा शूरवीर. संसार म्हणजे एक संग्रामच आहे ना? या संग्रामात फाइलींचा समभावाने निकाल करा. दादाजींचे हे शस्त्र घेऊन रणांगणावर उतरतो तो अवश्य विजयी होतो. आणि विजयानंतर काय मिळणार? मोक्ष! प्राप्त मन, वचन, काया यांना दादाजींनी 'फाइल' म्हटले आहे आणि हे ज्याच्या दर्शनात आले त्याचा अध्यात्मविजय झाला.

❒ चार्ज झालेल्या एका परमाणूचा सुद्धा जिथे परिणाम होतो, तिथे अनंत परमाणूंनी भरलेल्या भाजनांच्या (व्यक्तींच्या) संगतीचा परिणाम झाल्याशिवाय कसे राहणार. मग तो सहवास जरी सुसंग असो किंवा कुसंग असो, तरी परिणाम हा होणारच. फक्त 'सत्संग'च असा आहे की तो या सर्व संगांपासून असंग करतो. सामान्य लोक ज्याला सत्संग म्हणतात तसा हा सत्संग नाही. जे सर्व प्रकारच्या व्यक्तींच्या संगतीत राहून देखील निरंतर असंग असतात, अशा ज्ञानी पुरुषांचा सत्संग जर प्राप्त झाला तर कोणत्याही जीवाला 'असंगपद' प्राप्त होऊ शकते. अशा ज्ञानी पुरुषांचा सत्संग रोज नवीन, नवीन आणि नवीनच वाटतो.

सत्संगामुळे कुसंगाचे परमाणू निघून जातात आणि नवीन शुद्ध परमाणू प्रवेश करतात.

'एखाद्या पातेल्याला हिंगाचा वास लागला आहे तर सहा महिन्यानंतर देखील त्या पातेल्यात खीर केली तरी ती नासते. साध्या हिंगाच्या वासाचा

परिणाम देखील सहा महिने राहतो तर कुसंगाची साथ लागली तर काय होईल ? ती तर अनंतकाळापर्यंत तुमचे सर्व बिघडविते.' – **दादाश्री**

❒ मंत्र हे विज्ञान आहे, थाप नाही. त्यातही 'त्रिमंत्र' हा तर संसारविघ्नहर्ता आहे. त्रिमंत्र हा निष्पक्षपाती मंत्र आहे. तो सर्व धर्म समभाव सुचवितो. सर्व धर्मांचे रक्षक देवी-देवता त्यामुळे प्रसन्न होतात. मंत्राचा परिणाम केव्हा होतो ? ज्ञानी पुरुषांच्या हातून जर विधीपूर्वक दिला गेला असेल तर तो विलक्षण परिणाम करतो! जोपर्यंत व्यवहार शिल्लक आहे तोपर्यंत तिन्ही मंत्र – 'नवकार मंत्र, ॐ नमो भगवते वासुदेवाय आणि ॐ नम:शिवाय,' असे एकत्र म्हणायचे आहेत. फक्त नवकार मंत्र हा संन्यस्त मंत्र आहे. जोपर्यंत यथार्थ संन्यासीपणा प्राप्त होत नाही तोपर्यंत तिन्ही मंत्र एकत्र म्हणायचे. संन्यास म्हणजे फक्त वेष बदलणे नव्हे, तर आत्मज्ञान प्राप्त होणे.

❒ आज जगाची दशा कशी झाली आहे त्या निमित्तानी दादाश्री समजावत आहेत. दादाश्री म्हणतात की 1942 पासून सगळे जग हळूहळू मेंटल हॉस्पिटलमध्ये (वेड्यांचा दवाखान्यात) परिवर्तीत होत चालले आहे, असे मी सांगत आलो आहे.

जिथे पाहाल, तिथे निव्वळ वेडेपणाच चालू आहे. तुम्ही विचारता एक आणि समोरचा उत्तर देतो दुसरेच. एकाचा दुसऱ्याशी काहीच मेळ बसत नाही. अगदी लहानसहान गोष्टींसाठी मोठमोठी भांडणे करतात, अशा लोकांना वेडे म्हणायचे नाही तर काय म्हणायचे ?

आजच्या नव्या पिढीतील तरुण-तरुणींबद्दल लोक खूप वाईट बोलतात, पण दादाश्री म्हणतात – 'हीच तरुण पिढी हिंदुस्तानचे नाव उज्जवल करेल.' दादाश्रींच्या सहज वाणीतून असे शब्द निघाले आहेत की '2005 साली हिंदुस्तान साऱ्या जगाचे केंद्र बनले असेल.' आणि आता असे होऊ लागले आहे.

31 वर्षानंतर परदेशातील लोक जीवन कसे जगावे, काय खावे, किती खावे, कसे खावे, कसे राहावे, कसे झोपावे वगैरे गोष्टी शिकण्यासाठी हिंदुस्तानात येतील.

❒ जगात 'शुद्धात्मा' आणि संयोग, या दोनच गोष्टी आहेत. – **दादाश्री**

'शुद्धात्मा' शाश्वत आहे आणि संयोग सतत बदलतच असतात.

'स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग आणि वाणीचे संयोग हे सर्व पर आहेत आणि पराधीन आहेत.' – **दादाश्री**

पंचेद्रिंयांच्या द्वारे ज्यांचा अनुभव येतो असे सर्व संयोग स्थूल संयोग आहेत. मनाचे, बुद्धीचे, चित्ताचे आणि अहंकाराचे संयोग, हे सर्व सूक्ष्म संयोग आहेत आणि वाणीचे संयोग की जे स्थूल आणि सूक्ष्म आहेत, ते सर्व पर आहेत आणि पराधीन आहेत. वाणी म्हणजे रेकॉर्ड आहे. फिजिकल आहे. आत्मा आणि वाणी यांचा काहीही संबंध नाही. आत्मा अवाच्य आहे. हो, मात्र वाणी कशी निघते, कुठे चुकते, या सर्व गोष्टींचा आत्मा ज्ञाता-दृष्टा आहे. संयोग हे विनाशी आहेत. या संयोगातच मुक्काम केला तर स्वत: विनाशी आहे आणि अविनाशी अशा आत्म्यात मुक्काम केला तर स्वत: अविनाशीच आहे. महावीर भगवंतानी आत्म्याखेरीज इतर सर्व गोष्टी, संयोग विज्ञान आहेत असे म्हटले आहे. या सर्व संयोगांच्या संगतीपासून मुक्त, असा स्वत: असंग शुद्धात्मा आहे.

❒ 'तपे' दोन प्रकारची असतात – एक बाह्य तप आणि दुसरे आंतरतप. बाह्य तप म्हणजे जे दुसऱ्यांना कळते, पण आंतरतपाचा दुसऱ्या कोणाला पत्ता लागत नाही. स्वत:च आतल्या आत तप करत असतो. बाह्य तपाचे फळ संसार आहे आणि आंतरतपाचे फळ मोक्ष आहे. बाह्य तप तर सगळ्यांनाच ठाऊक आहे परंतु आंतर तप फक्त 'ज्ञानी पुरुषां'कडूनच प्राप्त होऊ शकते.

'आत्मा आणि अनात्म्याला जोडून एक होऊ देत नाही, तेच खरे तप.' – **दादाश्री**

होम डिपार्टमेंट म्हणजे स्वत:मध्ये, स्वमध्ये, म्हणजे आत्म्यामध्ये राहणे आणि फॉरेन डिपार्टमेंट म्हणजे आत्माशिवाय अन्य ठिकाणी राहणे – पुद्‌गलात राहणे. आणि पुद्‌गलात न राहण्यासाठी जे तप करावे लागते ते म्हणजे आंतर तप. हे जे बाह्यतप केले जाते त्यात कर्तापण येते. तो

अहंकार आहे. भगवंतानी प्राप्त तपाला समतापूर्वक सहन करा असे सांगितले आहे. ओढाताण करून, अहंकार करून तप करा असे मुळीच सांगितले नाही. आजकाल जे स्थूल तप केले जाते ते सगळे प्रकृती करवून घेते. त्यात कसला पुरुषार्थ ? पुरुषार्थ तर, आंतर तपात 'पुरुष' बनल्यानंतरच सुरू होतो. प्रकृती जबरदस्तीने तप करवून घेते आणि माणूस अहंकार करतो 'मी तप केले'. जे काही तप केले जाते ते प्रकृतीच्या आधीन असते. त्यात तुम्ही 'स्वत:' काहीच करत नाही. असा विचार जर सतत लक्षात राहिला तर मग केलेल्या तपाच्या रिॲक्शन (प्रतिक्रिये) ने जो अहंकार निर्माण होतो तो निर्माण होणार नाही. नाही तर तपाचे रिॲक्शन म्हणजे क्रोध, मान आणि अहंकार.

❐ त्याग कशाला म्हणता येईल ? सहज वर्तनात (आचरणात) येतो तो त्याग. बाकी सर्व त्याग अहंकार करून केलेले त्याग असे म्हटले जाते. 'त्यागे सो आगे.' म्हणजे अहंकार करून ज्या ज्या गोष्टींचा त्याग केला असेल, त्याच गोष्टी शंभर पट होऊन नंतर आपल्या वाट्याला येतात. मोक्ष मार्गात त्याग करा अशीही अट नाही आणि त्याग करू नका, अशीही अट नाही. शास्त्रे स्वत:च असे सांगतात की ज्ञानींना त्यागात्याग संभव नसतो. जे प्रकृतीमध्ये रममाण असतात त्यांच्याकडून जो काही त्याग होतो तो प्रकृतीनेच घडवून आणलेला असतो आणि ते मात्र असा अहंकार करतात 'मी त्याग केला!' जे निरंतर आत्म्यातच रममाण असतात, त्यांच्यासाठी त्यागात्याग संभवच नाही. आत्म्याचा स्वभाव त्याग किंवा ग्रहण करण्याचा नाहीच. तसे असते तर सिद्धक्षेत्री विराजमान सिद्ध भगवंत सुद्धा काही ग्रहण किंवा त्याग करत राहिले असते, मग त्याला मोक्ष म्हणायचेच कसे ? इथे तर पुद्‌गल त्याग करते आणि पुद्‌गलच ग्रहण करते आणि स्वत: मात्र अहंकार करतो. भगवंतानी वस्तूंचा त्याग करायला सांगितलेला नाही, पण वस्तूंच्या मूर्च्छेचा त्याग करायला सांगितले आहे.

तादात्म्य अध्यास तोच राग आणि तादात्म्य अध्यास नाही तो त्याग.

– **दादाश्री**

अहिंसेचा अगदी सूक्ष्माहूनही सूक्ष्म असा अर्थ कोणी सांगू शकत असतील तर ते फक्त वीतरागीच सांगू शकतात. या जगात कुठल्याही

जीवाला किंचितमात्रही दु:ख देऊ नये असा भाव ज्यांच्यात निरंतर असतो आणि त्यानुसारच ज्यांचे वर्तन असते तेच वीतरागी आहेत! कोणताही जीव कुठल्याही जीवाला मारू शकत नाही, तसेच कोणताही जीव कुठल्याही जीवाला वाचवूही शकत नाही. चंदुभाईने कुणा जीवाला मारण्याचा भाव केलेला होता आणि जेव्हा एखाद्या जीवाचा मरणकाळ येतो तेव्हा तो जीव चंदुभाईच्या निमित्ताने मरतो. मरणकाळ आल्याखेरीज कोणताही जीव मरू शकतच नाही. मारण्याचा भाव मनात आणतो त्यामुळे भाव मरण होते. भगवंतानी स्थूल हिंसा करू नका असे सांगितले नाही, 'भाव हिंसा करू नका' असे सांगितले आहे. त्यामुळे आपोआपच त्यात सर्व प्रकारची अहिंसा आली. एखाद्या जीवाला वाचविण्यासाठी दया राखणे आवश्यक नाही पण जीवाला मारण्याचा जो भाव केला त्या भावमरणासाठी दया राखणे जरूरी आहे!

❒ योग दोन प्रकाराचे आहेत – एक ज्ञानयोग म्हणजे आत्मयोग आणि दुसरा अज्ञानयोग म्हणजे अनात्मयोग. अनात्मयोगात मनोयोग, देहयोग आणि वाणीयोग यांचा समावेश होतो. योग कोणाशी होईल? जी गोष्ट माहीत आहे तिच्याशी होईल की माहीत नसलेल्या गोष्टीशी होईल? जोपर्यंत आत्म्याची ओळख झालेली नाही तोपर्यंत आत्मयोग कसा होईल? देहाची ओळख आहे त्यामुळे देहयोगच म्हटले जाईल. मात्र निर्विकल्प समाधी देहयोगाने कधीही प्राप्त होऊ शकत नाही. विकल्पी, निर्विकल्पी कधीही होऊ शकत नाही. जेव्हा आत्मज्ञानी सर्वज्ञपुरुष निर्विकल्प दशेपर्यंत पोहोचवतात तेव्हाच विकल्पी, निर्विकल्पी होऊ शकतो. प्रकट दिवाच इतर दिव्यांना प्रज्वलित करू शकतो.

❒ एकाग्रता म्हणजे काय? ती का करावी लागते? ज्याला व्यग्रतेचा रोग जडला आहे तोच एकाग्रता करतो, त्यात आत्म्यावर कसला उपकार? या मजुरांना एकाग्रता करण्याची गरज पडते का? आणि 'ज्ञानी पुरुष'ही एकाग्रता करत नाहीत. व्यग्रतेच्या रोगावर एकाग्रता हे औषध चोपडावे लागते पण त्यामुळे आत्म्याला काय फायदा?

ध्यान करायचे, ते कशाचे करायचे? ध्येय जाणल्याशिवाय ध्यान कशाचे करायचे? स्वत:च्या कल्पनेनेच ध्येय ठरवून ध्यान केल्याने काय निष्पन्न होणार?

समाधी कशाला म्हणतात? नाक दाबून किंवा हठयोगाने समाधी करतात तिला? नाही, ती तर हॅन्डल समाधी झाली. जोपर्यंत हॅन्डल मारतो तोपर्यंत समाधी राहते, नंतर समाधी संपते. अशा समाधीमुळे मोक्ष थोडाच मिळेल? समाधी तर तिलाच म्हणायचे की जी चालता, फिरता, बोलता, लढता, झगडता देखील जात नाही, त्याचे नाव यथार्थ समाधी. जिथे आधी, व्याधी आणि उपाधी होत नाही तिला यथार्थ समाधी म्हणतात.

❒ मन काय आहे? फक्त ज्ञानी पुरुषच मनाला ओळखू शकतात. जे मनापासून सतत वेगळे राहून त्याचे 'ज्ञाता - दृष्टा' राहतात, अशा पूज्य दादाश्री यांनी मनोविज्ञान यथार्थपणे उघड केले आहे. मन हे गाठींचे बनलेले आहे. जेव्हा बाहेरून किंवा आतून संयोग मिळतात तेव्हा मनाची गाठ फुटते. जेव्हा कोंब फुटतो, रूपकात येतो त्या अवस्थेला विचार म्हणतात. विचार येतात आणि जातात. आत्मा स्वत: त्याचा ज्ञाता आणि दृष्टा आहे. 'मन हे ज्ञेय आहे आणि आत्मा हा ज्ञाता आहे. काही लोक म्हणतात 'माझे मन काढून टाका'. मन काढून टाकले तर तुम्ही ॲबसेन्ट माइंडेड व्हाल. मोक्षात जाण्यासाठी मन आवश्यक आहे. 'मन' तर नाव आहे. या मनरूपी नावेखेरीज संसारसागर पार करून मोक्षाचा किनारा कसा गाठता येईल? कोणी म्हणतात 'मन भटकत असते.' मन या शरीराच्या बाहेर कधीही जात नाही, जे भटकते ते तर चित्त आहे.

बुद्धी हा परप्रकाश आहे. इन्‌डायरेक्ट (अप्रत्यक्ष) प्रकाश आहे. आत्म्याचा डायरेक्ट (प्रत्यक्ष) प्रकाश आहे. आत्मा स्व-पर प्रकाशक आहे. बुद्धीची व्याख्या काय?

साऱ्या जगातील सर्व विषय जाणले ते सुद्धा बुद्धीत सामावतात, कारण ते सर्व अहंकारी ज्ञान आहे आणि निरंहकारी ज्ञान, तेच खरे ज्ञान.

– **दादाश्री**

जिथे ज्ञानसूर्य प्रकाशमान असतो, तिथे बुद्धीरूपी दिव्याची काय गरज? बुद्धीचा स्वभाव संताप करविण्याचा आहे. ज्ञानी हे अबुध असतात, त्यांच्यात बुद्धी नावालासुद्धा नसते. बुद्धी पूर्णपणे संपते तेव्हा 'सर्वज्ञपद' हारतुरे घेऊन हजर होते.

जे बिन तिकीटाने भटकत असते ते चित्त आहे. इथे बसल्याबसल्या कुठल्याही जागेचा हुबेहूब फोटो दाखवते ते चित्त आहे. शुद्ध ज्ञान + शुद्ध दर्शन = शुद्ध चित्त, म्हणजे स्वतः शुद्धात्मा. अशुद्ध ज्ञान + अशुद्ध दर्शन = अशुद्ध चित्त. जग अनंत चित्तांत बुडलेले आहे. साधू 'अनेक चित्ताच्या' स्थितीत असतात. ज्ञानी पुरुष आणि सत् पुरुष मात्र 'एकचित्त' स्थितीत असतात.

अशुद्ध चित्त अशुद्ध का आहे? कारण ते 'स्व'ला पाहू शकत नाही, फक्त 'पर'लाच पाहू शकते. याउलट शुद्ध चित्त 'स्व' आणि 'पर' दोघांना पाहू शकते – **दादाश्री**

ज्यांचे चित्त जेवण जेवताना तिथे हजर नसते त्यांना हार्टफेल, बल्डप्रेशर असे रोग होतात. जेवताना जर चित्त हजर असेल तर कोणताही रोग होणार नाही.

अनाहत नाद, कुंडलिनी, या सर्व गोष्टी चित्तचमत्कार आहेत आणि त्या पौद्‌गलिक आहेत.

कोणी म्हणतात 'मला आतमध्ये श्रीकृष्ण दिसतात.' तो आत्मा नव्हे. तो तर चित्तचमत्कार आहे. त्या कृष्णाला पाहाणारा आत्मा आहे. शेवटी दृष्टी दृष्ट्यामध्ये टाकायची आहे. इथे दृष्टी दृश्यात टाकतात.

– **दादाश्री**

श्रीकृष्ण दिसतो, ते तर दृश्य आहे आणि त्याला पाहणारा 'स्वतः' दृष्टा आहे, आत्मा आहे, स्वयं 'कृष्ण' आहे.

'मी चंदुलाल आहे' हाच मूळ अहंकार आहे. तो गेला तर निरंहकारी पद प्राप्त होते. नंतर जो शिल्लक राहतो तो फक्त डिस्चार्ज अहंकार, म्हणजे नाटकी अहंकार आहे. अहंकार दोन प्रकारचे असतात, एक सुंदर आणि दुसरा कुरूप. अहंकारानेच सर्व बिघडविले आहे. तो आपल्याला स्वतःचे स्वसुख चाखायला देत नाही. अहंकार विलय करण्याचा एकमेव साधन जगात आहे, आणि तो आहे ज्ञानी पुरुषांच्या चरणाचा अंगठा!

अंत:करणाचे चार भाग आहेत : मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार. याचे काम पार्लमेंटरी पद्धतीने चालते. मन पॅम्फ्लेट दाखविते, चित्त फोटो दाखविते, बुद्धी यांतील एकाशी सहमत होते आणि प्रधानमंत्र्याप्रमाणे निर्णय देते. मग अहंकार राष्ट्रपतींसारखा (निर्णयावर) सही करतो तेव्हा ते कार्य रूपकात येते.

❒ अणुव्रत, महाव्रत म्हणजे जे वर्तत असते (आपणहून आचरणात येते) ते, त्याग नाही. त्याग करणे आणि वर्तणे यात खूप फरक आहे. जे वर्तते ते व्रत. वर्तते म्हणजे कशाचा त्याग केला ते आठवतही नाही. त्याला सहज त्याग म्हणतात. ज्याचे विडी ओढण्याचे सहजपणे सुटले असेल, त्याला विडीची आठवणही येत नाही आणि ज्याने अहंकारपूर्वक विडीचा त्याग केला असेल त्याला 'मी विडीचा त्याग केलेला आहे' हे सतत आठवत राहते.

परिग्रहाच्या समुद्रात असूनदेखील ज्याला त्यातील एका बिंदूचाही स्पर्श होत नाही, तो खरा अपरिग्रही! परिग्रहांच्या चुळूकभर पाण्यात तोंड बुडवून जो बुडत असेल त्याला अपरिग्रही कसे म्हणणार? यथार्थ अपरिग्रही फक्त 'ज्ञानी पुरुष'च असू शकतात!

❒ योगेश्वर कृष्णाचे यथार्थ रूप कोण ओळखू शकेल? फक्त 'ज्ञानी पुरुष' की जे स्वत: 'तद्रूप' झाले आहेत तेच योगेश्वर कृष्णाचे यथार्थ स्वरूप ओळखू शकतात आणि कृष्णाला काय सांगायचे होते ते यथार्थपणे सांगू शकतात, कारण एक ज्ञानी दुसऱ्या ज्ञानीहून केव्हाही वेगळे असू शकत नाहीत, अभेद असतात!

जेव्हा चारही वेद पूर्ण होतात तेव्हा वेद स्वत:च काय म्हणतात? 'दिस इज नॉट दॅट, दिस इज नॉट दॅट,' (हे ते नव्हे, हे ते नव्हे) तू ज्या आत्म्याला शोधत आहेस तो यात नाही. सगळे वेद वाचले, धारण केले, पण शेवटी काय? तर 'नेति, नेति.' पुस्तकात आत्मा कसा काय समाविष्ट होऊ शकेल? अवर्णनीय, अवाच्य, दुर्गम' अशा आत्म्याचे भान 'ज्ञानी पुरुष' संज्ञेने करवितात. 'ज्ञानी पुरुषांजवळ' तासाभरातच 'दिस इज दॅट', (हे ते आहे) असे होऊन जाते.

❒ आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान योग्य प्रकारे केले तर केलेले दोष यथार्थपणे धुतले जातात आणि त्यामुळे स्वत: तितका निर्मळ होतो. पण तो दोष झाला की ऑन दी मोमेन्ट – तत्क्षणी हा विधी झाला तरच तो या काळात कामाला येतो.

❒ वीतराग-विज्ञान वीतरागच उघड करू शकतात. काळाला अनुरूप अशा स्याद्वाद वाणीद्वारे वीतरागींचा अंतरआशय 'ज्ञानी पुरुष'च अनावृत्त करू शकतात, आणि ते प्राप्त झाल्यावर सामान्य व्यक्ती पण निरंतर यथार्थ धर्मध्यानात राहू शकते! इच्छा करण्यायोगी गोष्ट फक्त मोक्ष हीच आहे.

'ज्याला फक्त मोक्षाचीच एकमेव तीव्र इच्छा आहे, त्याला कोणीही अडवू शकत नाही! 'ज्ञानी' त्याच्या घरी जातील!'

ज्याला मोक्षाची इच्छा आहे, त्याला पुद्‌गलाची मालकी राहत नाही. ज्याला पुद्‌गलाची मालकी आहे त्याला मोक्षाची इच्छाच होत नाही.

❒ भक्त आणि भगवंत वेगळे असतात! याउलट 'ज्ञानींमध्ये' तो भेद नसतो.

भक्ती कधीपर्यंत करायची? जोपर्यंत ज्ञानींची भेट होत नाही तोपर्यंत, आणि ज्ञानी पुरुषांची भेट झाली तर त्यांच्याकडून मोक्ष मागून घ्यावा. वीतरागांची भक्ती मुक्ती देते.

'भगवंत म्हणजे काय?' त्याचे स्पष्टीकरण दादाश्री देतात.

भगवंत शब्द नाव आहे की विशेषण? जर तो शब्द नाव असता तर त्याला आपल्याला भगवंतदास असे म्हणावे लागले असते. भगवंत हे खरे म्हणजे विशेषण आहे. जसे भाग्य हा शब्दावरून भाग्यवान शब्द बनला तसेच भगवत् शब्दावरून भगवंत शब्द बनला आहे. हे भगवत् गुण जो कोणी मनुष्य प्राप्त करतो त्याला 'भगवंत' हे विशेषण लागते.

– **दादाश्री**

सगळ्यात श्रेष्ठ भक्ती कुठली?

'केवलज्ञान स्वरूपी आत्म्याचे लक्ष्य बसल्यानंतर त्याच्या जागृतीरूपी ज्ञानात राहणे हीच सर्वश्रेष्ठ आणि अंतिम भक्ती आहे.'

''ज्ञानींचा 'प्रतिष्ठित आत्मा' भक्तीत आहे आणि ज्ञान ज्ञानात आहे. स्वत: शुद्धात्म्यात राहतात आणि प्रतिष्ठित आत्म्याकडून आपल्या स्वत:च्या शुद्धात्म्याची आणि या दादांची भक्ती करवितात! हीच सगळ्यात श्रेष्ठ आणि अंतिम भक्ती आहे!'' – **दादाश्री**

❒ मोक्ष म्हणजे काय?

मोक्ष म्हणजे मुक्त भाव, सर्व बंधनातून मुक्ती, सर्व दु:खांपासून मुक्ती. आणि त्याचा अनुभव इथेच येतो, त्यानंतर त्या सिद्ध भगवंतांचा मोक्ष मिळतो. कष्ट करून कधीही मोक्ष प्राप्त होत नाही. आत्म्याचा स्वत:चा स्वभावच मोक्षस्वरूप आहे. फक्त त्याची जाणीव नाही, त्यामुळे बंधनात असल्याचा अनुभव येतो. त्या मुक्त भावाचा अनुभव कधी येतो? तर जेव्हा 'ज्ञानी पुरुष' स्वत:च्या अनंत शक्तीद्वारे, अनंत सिद्धीद्वारे आपल्या आत्म्याला हिसके देऊन जागे करतात तेव्हाच. जे स्वत:च मुक्त आहेत तेच इतरांना मुक्ती देऊ शकतात. ज्ञानी पुरुष स्वत:च मूर्तामूर्त मोक्षस्वरूप आहेत आणि ते आपल्याला तासाभरात स्वरूपाचे ज्ञान, म्हणजेच आत्मानुभूती करवितात! हीच अक्रम मार्गाची सिद्धी आहे!

कित्येक असे मानून बसले आहेत की या काळात मोक्षमार्ग बंद आहे आणि असे मानून बसून राहिले आहेत! खरे म्हणजे मोक्षमार्ग तर आजदेखील मोकळा आहे. थेट मोक्षाच्या दरवाज्यापर्यंत पोहोचता येईल असे शक्य आहे, आणि ते प्रमाणित झाले आहे. मात्र या काळात एक लाखाचा चेक प्राप्त होत नाही पण दादाश्री नव्याण्णव हजार, नऊशे नव्याण्णव रुपये आणि नव्याण्णव पैशांचा चेक देतात आणि तो अनेकांनी प्राप्त केला आहे. यात असे कितीसे नुकसान आहे? फक्त एका पैशाचेच ना? या बदल्यात एक लाखाचे सुटे पैसे तर मिळतात ना?

'मोक्षमार्ग मोकळा आहे, फक्त शोधण्याचीच खोटी आहे.'

'ज्याला मुक्त व्हायचे आहे त्याला कुणीही बांधू शकत नाही आणि ज्याला बंधनातच राहायचे आहे त्याला कुणीही सोडवू शकत नाही.'

– **दादाश्री**

बंधन कशामुळे आहे? अज्ञानामुळे बांधला जातो आणि ज्ञानामुळेच सुटू शकतो. बंधनाचे मूळ कारण अज्ञान आहे.

दादाश्रींनी यथार्थ मोक्षमार्ग मोकळा केला आहे. जिथे 'ज्ञानी पुरुष' प्रत्यक्ष हजर असतात तिथे कोणत्याही शास्त्राची किंवा क्रियेची गरज नसते. तिथे तर ज्ञानींची आज्ञा हाच धर्म आणि आज्ञा हेच तप. महावीर भगवंतानी म्हटलेच आहे, 'आणाए धम्मो, आणाए तप्पो!'

भगवंतानी असेही म्हटले आहे की पंचवीसशे वर्षे पूर्ण झाल्यानंतर भस्मक ग्रहाचा परिणाम संपेल आणि त्यानंतर पुन्हा यथार्थ वीतराग धर्माचा उदय होईल, आणि ती पंचवीसशे वर्षे आता पूर्ण होत आहेत. 'ज्ञानी पुरुष' जिथे प्रत्यक्ष प्रकट झाले आहेत तिथे आता वीतराग धर्माला कसली आच येणार? जेव्हा स्वत: निष्पक्षपाती होतो, स्वत:च्या बाबतीत देखील निष्पक्षपाती होतो, तेव्हा मोक्ष समोर येतो.

❒ रममाणता दोन प्रकारची : एक पौद्‌गलिक रममाणता आणि दुसरी आत्मरममाणता. ज्याची एक परमाणू इतकी देखील पौद्‌गलिक रममाणता नसेल, त्याला आत्म-रममाणता प्राप्त होईलच. जोपर्यंत किंचितदेखील पौद्‌गलिक रममाणता शिल्लक असते तोपर्यंत आत्मज्ञान प्राप्त होऊ शकत नाही. मनुष्य जन्माला येतो तेव्हापासून मरेपर्यंत पौद्‌गलिक रमणतेतच असतो. अरे, शास्त्रे वाचली, माळ जपली, सामायिक केले, प्रतिक्रमण केले की व्याख्यान दिले, तरी या सर्व गोष्टी पौद्‌गलिक रमणतेतच मोडतात. जेव्हा 'स्व'मध्ये, रममाणता असेल तेव्हाच मोक्ष प्राप्त होईल! ज्याला स्व-रममाणता, (आत्म रममाणता) उत्पन्न झाली, तो सर्व परिग्रहांच्या संगतीत असूनसुद्धा संपूर्ण अपरिग्रही-असंग आहे! आणि ज्याला स्व-रममाणता प्राप्त झाली नाही, त्याने जरी सर्व परिग्रहाचा त्याग केला असेल, तरी पण तो संपूर्ण परिग्रही आहे, कारण त्याची रममाणता कुठे आहे? तर पुद्‌गलामध्येच आहे.

'या प्रकृतिचे पारायण पूर्ण झाले की झाला वीतराग!' - **दादाश्री**

- **डॉ. नीरूबहन अमीन**

# अनुक्रमणिका

❖❖❖❖❖

# आप्तवाणी

## श्रेणी - 2

### जगाचे स्वरूप

जग म्हणजे काय? जग कोणी बनवले? का बनवले? जग चालविणारा कोण आहे?

इंग्रज म्हणतात 'गॉड इज क्रिएटर ऑफ दीस वर्ल्ड' (ईश्वर या जगाचा निर्माता आहे.) मुस्लिम म्हणतात, 'अल्लाह या जगाचा निर्माता आहे.' हिंदू म्हणतात, 'हे जग देवाने बनवले आहे.' काही जैन देखील म्हणतात, 'हे जग देवाने बनवले आहे.' जगाला क्रिएट (निर्माण) करणारा जर कोणी क्रिएटर असता तर त्याला क्रिएटर म्हटले असते आणि क्रिएटर म्हणजे कुंभार. देवाला हे का करावे लागले? देवाची मुले काय बिन लग्नाची राहिली होती की त्याला हे सगळे करावे लागले? हे मोठमोठे मिलचे मालकसुद्धा सेक्रेटरी वर काम सोपवून निवांतपणे झोपतात, किंचितदेखील मेहनत करत नाहीत, तर मग देव एवढे कष्ट करत असेल का? कष्ट करतात त्यांना आपण मजूर म्हणतो. मग देव काय मजूर आहे? देव असा मजूर नाही आणि त्याला प्रत्येक गोष्टीत हस्तक्षेप करण्याचेही काही कारण नाही. लोकांची लग्ने लाव, म्हशीच्या पोटात बसून तिच्या रेडक्याला वाढव, असे करायला देव काही वेडा नाही. या जगाचा जर खरोखरच कोणी क्रिएटर असता तर लोकांनी केव्हाच त्याला पकडून ठार मारले असते. त्याला कसेही करून पकडले असते. कारण ह्या जगाचा क्रिएटर असा कसा की त्याच्या या जगात सगळेच दु:खी, सुखी कोणीच नाही! म्हणून 'पकडा त्याला' असे म्हणून सी.आई.डी खात्याने त्याला केव्हाच पकडले असते. पण असा कोणी असेल तर पकडणार ना?

जगाचा क्रिएटर कोणीच नाही. दीस वर्ल्ड इज दी पझल इट सेल्फ. (हे जग स्वत:च एक कोडे आहे.) कोड्यासारखे झाले आहे म्हणून त्याला कोडे म्हणावे लागत आहे. तेव्हा हे कोडे जो सोडवितो त्याला परमात्मपदाची डिग्री मिळते आणि ज्यांना सोडवता आले नाही ते सगळे त्या कोड्यातच विरघळून गेले. मोठमोठे महात्मा, साधू महाराज, आचार्य, बाबा वगैरे सगळेच त्या कोड्यात विरघळून गेले आहेत. पाण्यात जशी साखर विरघळते तसे, आणि कोणी विचारले की, यात साखर कुठे आहे? दिसत का नाही? तर मग आपण म्हणतो अरे भाऊ, साखर पाण्यात आहे तर खरी, पण ती विरघळली आहे. त्याचप्रमाणे या सगळ्यांच्यात 'चेतन' आहे, पण ते 'निश्चेतन-चेतन' आहे. 'शुद्ध चेतन' स्वरूप होईल तेव्हा कोडे सुटेल.

## पचनक्रियेत किती सावधगिरी?

एका मोठ्या कॅमिकल कंपनीचे सेवानिवृत्त चीफ इंजिनियर माझ्याकडे आले होते. ते मला म्हणाले, 'दादा, मी नसलो तर माझी कंपनी चालणारच नाही.'

मी त्यांना विचारले, 'का भाऊ, तुमच्यात असे काय विशेष आहे?' तेव्हा ते म्हणाले, 'मी फार ॲलर्ट (सावध) असतो. मी जर एक दिवस गेलो नाही तर सगळी कामे अडकून पडतात.' तेव्हा मी त्यांना म्हटले, 'जेव्हा तुम्ही रात्री हांडवा (एक गुजराती खाद्य) खाऊन झोपता तेव्हा रात्री उठून पचनक्रिया कशी चालू आहे ते तुम्हाला तपासून पाहावे लागते का? किती पित्त रस पडला? किती पाचकरस पडले? सकाळी त्या हांडव्यामधून रक्ताच्या जागी रक्त, लघवीच्या जागी लघवी आणि संडासाच्या जागी संडास कसे पोहोचते त्याची काळजी घेता का तुम्ही? त्यात ॲलर्ट राहता का तुम्ही? तुमच्या स्वत:च्या आतल्या बाबतीतच तुम्ही काही करू शकत नाही, तर दुसऱ्या कोणाच्या बाबतीत तुम्ही काय करू शकणार? मोठमोठे बादशहा होऊन गेले, चक्रवती होऊन गेले तरी राज्ये चालत राहिली, तर मग

तुमच्याशिवाय काय थांबणार आहे? मोठे आले सावध राहणारे? तुमच्या तुलनेत तर 'ज्ञानी पुरुषांचे' जोडे पण जास्त ॲलर्ट असतात! कारण ते जोडे हे महात्मा स्वतः पुसतात! तुम्ही ॲलर्ट कशास म्हणता? जन्म झाल्यावर दात येतील की नाही, याची काळजी करावी लागते का? उद्या सूर्य उगवला नाही तर काय होईल याची काळजी करावी लागते का?'

## जगाचा निर्माता कोण?

'दीस वर्ल्ड इज दी पझल इट सेल्फ.' (जग स्वतःच एक कोडे आहे.) इंग्रज लोक देवाला क्रिएटर म्हणतात. मुस्लिम आणि हिंदू लोक देखील 'जग देवाने निर्मिले' असे म्हणतात. त्यांच्या दृष्टिकोनातून ते बरोबर आहे, पण वस्तुतः ते चुकीचे आहे. जर वास्तविक जाणायचे असेल तर माझ्याकडे या. मी गॅरंटीने सांगतो की हे जग कोणीही बनविलेले नाही. कोणीही बाप वर *उपरी* (वरिष्ठ, मालक) म्हणून नाही की जो रिकामटेकडा बसल्या बसल्या जग चालवत आहे. हे जग कसे चालते, कोण चालविते हे फक्त 'मला'च ठाऊक आहे. या जगात मी फिरलेलो नाही असा एकही परमाणू नाही. 'आम्ही' या ब्रह्मांडाच्या आत राहून आणि ब्रह्मांडाच्या बाहेर राहून सर्व बाजूंनी डायरेक्ट आणि पर्स्पेक्टिव-(प्रत्यक्ष आणि भासमान) सर्व दृष्टीने पाहून हे सांगतो की वर असा कोणी देव नाही की जो हे सर्व चालवितो!

हे जग कसे चालते, हे तुम्हाला आम्ही थोडक्यात, एका वाक्यात सांगतो. सविस्तर नंतर समजून घ्या. हे जग फक्त सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सच्यामुळे चालते, कोणी चालवत नाही. पूर्ण जग निमित्त भावाने चालते. स्वतंत्र कर्ता कोणीच नाही. आणि त्यातसुद्धा ईश्वर कर्ता असू शकतच नाही. जर ईश्वर कर्ता झाला तर त्यालाही कर्मबंधन होईल. आणि म्हणून त्याला भोक्ताही व्हावे लागणार. जर ईश्वरालासुद्धा कर्ता-भोक्तापद असेल, त्यालाही कर्मबंधन होत असेल तर मग त्याला ईश्वर कसे म्हणता येईल? मग त्याच्यात आणि तुमच्यात काय फरक?

ही सगळी थापेबाजी चालली आहे. लोक स्वत:ला समजेल तसे स्वेच्छेने वागतात. त्यांना वाटते की या जगाला काही अंतच नाही, त्यामुळे आपण काहीही थाप मारली तरी चालेल. पण हे जग म्हणजे थाप नाही! जग म्हणजे एक फॅक्ट आहे, वास्तव आहे. पण रिलेटिव्ह फॅक्ट (सापेक्ष वास्तव) आहे आणि 'स्वत:' रियल फॅक्ट आहे. ज्ञानी पुरुष रियल फॅक्टमध्ये बसवतील तेव्हा आपले मुक्तीधाम मिळालेच समजा! लोक जगाला थाप मानतात. त्यांना वाटते की मनाला येईल तसे वागा, उपभोग घ्या, कोण बाप विचारणार आहे? अहो, असे नाही. यु आर होल ॲन्ड सोल रिस्पोन्सिबल फॉर योर सेल्फ! (तुम्ही स्वत:च तुमच्यासाठी जबाबदार आहात). मागच्या जन्मांसाठी आणि पुढच्या जन्मांसाठी तुम्ही स्वत:च जबाबदार आहात. एक छोटीशी चूक देखील तुम्ही करू नका. देव यात अजिबात हस्तक्षेप करत नाहीत.

हे जग म्हणजे काय, ते समजायला तर हवे ना? ही सगळी थापेबाजी कुठपर्यंत चालवायची? हे कोडे सोडवायला तर हवेच ना? या कोड्यात अजून किती दिवस गुंतून राहायचे आहे?

## विश्वाच्या कोड्याचे एकमेव उत्तर

दीस वर्ल्ड इज दी पझल इट सेल्फ, देर आर टु व्ह्यू पॉइंटस् टु सॉल्व दीस पझल. म्हणजे हे कोडे सोडवण्याचे दोन व्ह्यू पॉइंटस् (दृष्टीकोन) आहेत. एक रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट आणि दुसरा रियल व्ह्यू पॉइंट. रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंटने पाहता तुम्ही 'चंदुलाल' आहात आणि रियल व्ह्यू पॉइंटने पाहता तुम्ही 'शुद्धात्मा' आहात. या दोन दृष्टीकोनातून जगाकडे पाहत राहिलात तर सगळी कोडी सुटतील. हेच दिव्यचक्षु आहेत. परंतु जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' तुमची अनंतकाळाची पापे भस्मसात करत नाहीत, तुमच्या 'स्वरूपाचे' भान तुम्हाला करून देत नाहीत तोपर्यंत काहीही निष्पन्न होऊ शकत नाही. प्रत्यक्ष प्रकट पुरुषांखेरीज हे काम होऊच शकत नाही.

## ब्रह्मा, विष्णू आणि महेश

**दादाश्री :** हे जग कोणी बनवले असेल?

**प्रश्नकर्ता :** ब्रह्मा, विष्णू आणि महेश, या तिघांनी मिळून हे जग बनवले आहे. ब्रह्मा क्रिएटर (निर्माता) आहे विष्णू एडमिनिस्ट्रेटर (प्रशासक) आहे आणि महेश डिस्ट्रॉयर (विनाश कर्ता) आहे.

**दादाश्री :** मग ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांचे आई-वडील कोण?

**प्रश्नकर्ता :** शंकर स्वत:च वडील आहेत.

**दादाश्री :** मग आई कोण?

**प्रश्नकर्ता :** आई पण शंकरच.

**दादाश्री :** तर मग फक्त तीनच का आले? पाच का नाही?

**प्रश्नकर्ता :** गुण तीनच आहेत म्हणून तीन आहेत.

**दादाश्री :** ब्रह्मा, विष्णू आणि महेश अशा नावाचे कोणीच नाही. ही तर तीन गुणांना दिलेली नावे आहेत. हे तीन गुण चांगल्या तऱ्हेने समजावयास गेले पण त्याचा दुरुपयोग झाला आणि त्यांच्या मूर्त्या बनवल्या गेल्या! त्यांना असे सांगायचे होते की प्रकृतीच्या ह्या तीन गुणांना जर तू तुझ्यातून काढून निर्मळ झालास तर तू परमात्मा होशील!

**प्रश्नकर्ता :** या तीन गुणांना काढून टाकून?

**दादाश्री :** हो. हे ब्रह्मा, विष्णू आणि महेश, यांचे जे रूपकगुण (सत्व, रज, आणि तम) आहेत त्यांना काढून टाकून. सुख तर तुमच्याजवळ आहेच, पण ते मिळत का नाही? कारण अंतराय (विघ्ने) आहेत. हे अंतराय कुणी निर्माण केले? देवाने निर्माण केले? नाही. ते तूच निर्माण केले आहेस. मिळत असताना तू फेकून देतोस अशा गोष्टी म्हणजे अंतराय. नाही तर तू स्वत: परमात्माच आहेस. पण तू स्वत:च अंतराय निर्माण केले आहेस. इतर कोणीही यात ढवळाढवळ केलेली नाही. हे

तर आपणच निर्माण केलेले वादळ आहे. दुसरा कुणी जर हे करत असता ना, तर हे लोक काय कमी नाहीत, त्याला केव्हाच पकडून त्याची भाजी करून टाकली असती.

## यमराज नाही, नियमराज

कित्येक लोक यमराजाला घाबरतात. लोकांनी त्याचे वर्णन पण कसे केले आहे ? मोठेमोठे दात, डोक्याला शिंग आणि रेड्यावर बसलेला! मग तुम्ही घाबरणारच ना ? कुत्रा रडू लागला तर तुम्ही म्हणता यमराज आला आहे. अरे, यमराज असा कोणी प्राणी अस्तित्वातच नाही. तो यमराज नाही पण नियमराज आहे. सगळे काही पद्धतशीर आहे, नियमानुसारच आहे. नियमानुसारच मृत्यू येतो. हे सगळे नियमराज आहे असे आम्ही म्हणतो मग तुम्हाला घाबरण्याचे काय कारण आहे ?

❖❖❖❖❖

# या जगाची अधिकरण क्रिया

या जगाचे अधिष्ठान काय आहे? याची अधिकरण क्रिया कोणत्या आधारावर चालत आहे? जगापुढे हे एक गहन कोडे उभे राहिले आहे. जगाला खरे अधिष्ठान आज आमच्या माध्यमाद्वारा नैसर्गिक रित्या मिळत आहे.

'प्रतिष्ठित आत्मा,' हे जगाचे सगळ्यात मोठे अधिष्ठान आहे!

या 'प्रतिष्ठित आत्म्याची' अधिकरण क्रिया कोणती? अज्ञानशक्तीमुळे ही अधिकरण क्रिया चालते. 'मी चंदुलाल आहे' असे जे भ्रांतीने बोलतो तर त्याच्या बिलिफमध्ये आणि त्याच्या वर्तनातसुद्धा 'मी चंदुलाल आहे' असेच असते. हीच या जगाची अधिकरण क्रिया आहे. जिथे स्वत: नाही तिथे आरोपण करतो की 'मी चंदुलाल आहे,' आणि त्या आरोपित भावातूनच सगळे करत राहतो आणि स्वत:लाच 'मी कर्ता आहे' असे मानतो. यामुळे अधिकरण क्रिया चालू आहे. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर 'मी चंदुलाल आहे, हे माझे शरीर आहे, जे काही होत आहे ते सर्व मी केले,' अशी प्रतिष्ठा झाली. मागील जन्मी जी जी कर्मे केली, जी जी प्रतिष्ठा केली त्यामुळे या जन्मीचा 'प्रतिष्ठित आत्मा' निर्माण झाला. आता या जन्मात हा 'प्रतिष्ठित आत्मा' डिस्चार्ज होत आहे तेव्हाही ही भ्रांती चालूच असते. म्हणून अधिकरण क्रिया चालूच राहते आणि त्यामुळे पुढच्या जन्माचा 'प्रतिष्ठित आत्मा' निर्माण होतच राहतो. जे जे 'चार्ज' केले ते ते डिस्चार्ज तर अवश्य होणारच. त्यात तर कोणी किंचितदेखील बदल करू शकत नाही. कारण तो इफेक्ट (परिणाम) आहे आणि इफेक्ट कोणीच थांबवू शकत नाही.

आता, हा 'प्रतिष्ठित आत्मा' 'शुद्धात्म्यापासून' पूर्णपणे वेगळाच आहे. 'प्रतिष्ठित आत्मा' आणि 'शुद्धात्मा' यांचा संबंध ज्ञेय–ज्ञाता असा आहे. जेव्हा हा ज्ञेय–ज्ञाताचा संबंध उत्पन्न होतो, 'शुद्धात्मा' ज्ञाता–दृष्टा पदात राहतो आणि 'प्रतिष्ठित आत्मा' केवळ डिस्चार्ज स्वरूपात राहतो तेव्हा नवीन (कर्म) चार्ज होतच नाही. अर्थात तेव्हा ही अधिकरण क्रिया पूर्णतः बंद होते आणि पुढच्या जन्मासाठी 'प्रतिष्ठित आत्मा' तयारच होत नाही; नंतर मागच्या दोषांमुळे जो 'प्रतिष्ठित आत्मा' सोबत घेऊन आलो आहोत त्याचा समभावाने निकाल करणे फक्त शिल्लक राहते. नवीन चार्ज होतच नाही त्यामुळे डिस्चार्ज होण्याची वेळच येत नाही.

फक्त ज्ञानी पुरुषच या अधिकरण क्रियेला सील लावू शकतात. ज्ञानी पुरुष भ्रांतीरस दूर करून 'प्रतिष्ठित आत्मा' आणि 'शुद्धात्मा' या दोघांना वेगळे करून देतात. या दोघांमध्ये एक लाईन ऑफ डिमार्केशन (सीमारेषा) आखून देतात. त्यामुळे ते दोघे निरंतर वेगळेच राहतात. ज्ञेय–ज्ञाता संबंधातच राहतात. ह्या 'प्रतिष्ठित आत्म्याला जो ज्ञेय स्वरूप जाणतो तो 'शुद्धात्मा' आहे. शुद्धात्मा स्व–पर प्रकाशक आहे आणि 'प्रतिष्ठित आत्मा' पर प्रकाशक आहे. इंद्रियगम्य ज्ञान म्हणजे 'प्रतिष्ठित आत्मा' आणि अतींद्रियगम्य ज्ञान म्हणजे 'शुद्धात्मा.' डोळ्यांना दिसणाऱ्या सर्व क्रिया 'प्रतिष्ठित आत्म्याच्या' आहेत. शुद्धात्म्याची त्यात कोणतीच क्रिया नाही. 'शुद्धात्म्याच्या' फक्त ज्ञानक्रिया आणि दर्शनक्रिया आहेत आणि परमानंद हा तर त्याचा मूळ स्वभावच आहे.

'हा मी आहे' आणि 'हे माझे आहे,' अशी जी प्रतिष्ठा सतत होत राहते त्यातून 'प्रतिष्ठित आत्मा' तयार होत असतो. 'मी' आणि 'माझे' गेले की प्रतिष्ठित आत्म्याची नवीन प्रतिष्ठा होत नाही, नवीन कॉजेस (कारणे) उत्पन्न होत नाहीत. नवीन 'प्रतिष्ठित आत्मा' निर्माण होत नाही. त्यानंतर जे उरते ते सगळे इफेक्टस् (परिणाम) आहेत आणि ते सर्व इफेक्टस् इफेक्टस् स्वरूपात भोगले की मग बाकी काय उरते? 'केवळ आत्मा'!

❖❖❖❖❖

# धर्माचे स्वरूप

धर्म कशाला म्हणातात?

जो धर्माच्या रूपात परिणमित होतो तोच धर्म. अर्थात जो आत परिणाम घडवून कषाय भाव (क्रोध-मान-माया-लोभ) कमी करतो तो धर्म.

कषाय भाव आपोआप कमी होत जातील असे नसतात, उलट वाढतील असेच असतात. ते स्व:त कमी केल्याने कमी होत नाहीत पण ते धर्मानेच कमी होतात. धर्म कुठून प्राप्त झाला पाहिजे? तर 'ज्ञानी पुरुषां'कडून, त्यांचा सही-शिक्का (आज्ञापूर्वकचा) असलेला धर्म हवा. त्यानंतर 'ज्ञानी पुरुषां'चे असे दोनच शब्द की जे वचनबळ असलेले असतात, आतील बळ देणारे असतात, जागृती कायम ठेवणारे असतात, ते शब्द, आवरणे तोडून आतील शक्ती प्रकट करतात.

परिणाम घडवून आणतो तो धर्म आणि परिणाम घडवून आणत नाही तो अधर्म.

परिणाम घडतो म्हणजे काय? तर कषाय भाव हलके होतात, कमी होतात, त्यांचा जोर कमी होतो आणि जसेजसे कषायभाव कमी होतात तशीतशी स्वत:ची शक्ती आणि आनंद वाढत जातो. स्वत:च्या सर्व शक्तींची जाणीव होते आणि वाटते की, अहाहा! आपल्या आत तर किती शक्ती आहेत! एवढ्या साऱ्या शक्ती आपल्यात आल्या तरी

कुठून? म्हणजे याला धर्म म्हणतात. नाही तर हा भोवरा जसाच्या तसा राहतो. जन्माला आल्यापासून थेट तिरडी निघेपर्यंत त्यात बदलच होत नाही. मग याला धर्म कसे म्हणणार?

धर्म परिणमित झाल्यावर काय परिणाम मिळवायचा आहे? व्रत, नियम, तप करायला शिकायचे, हा? नाही. हा परिणाम नाही. क्रोध, मान, माया आणि लोभाचे, म्हणजे कषायांचे निवारण करणे याला धर्म म्हणतात. आणि अधर्म तर कषाय वाढवितात. कित्येक जण म्हणतात ना की आम्ही रोज सामायिक, प्रवचन, ध्यान वगैरे करतो, मग हा धर्म नाही का? भगवंत म्हणतात 'नाही, हा धर्म नाही.' भगवंत म्हणतात, तुम्ही जरा त्यांना विचारा की इतरांबरोबर, शिष्यांबरोबर काही कषाय होतात की नाही? आणि आपण त्यांना विचारले की, 'महाराज शिष्यांबरोबर काही कषाय होतात का?' तेव्हा महाराज म्हणतात, 'एक जण जरी सामायिक करत नसेल तरी मला आतल्याआत खूप संताप होतो.' तर मग तू जे केलेस, त्याला धर्म कसे म्हणणार? उलट हे तर कषाय वाढवत आहेत.

धर्म सामायिक वगैरे कशातच नाही, धर्म तर परिणमित होण्यात आहे. धर्म तोच की जो कषाय भावांचे निवारण करतो. कषाय भाव दाबून ठेवल्याने दबून राहत नाहीत, त्यांना सोलून किंवा त्यांच्यावर रंधा मारून देखील ते नष्ट होत नाहीत.

धर्म जेव्हा पूर्णपणे परिणमित होतो, तेव्हा 'स्व:तच' धर्म स्वरूप होऊन जातो!

❖❖❖❖❖

## रियल धर्म : रिलेटिव्ह धर्म

धर्म दोन प्रकारचे असतात : एक रिलेटिव्ह धर्म आणि दुसरा रियल धर्म.

रिलेटिव्ह धर्म म्हणजे मनोधर्म, देहधर्म आणि वाणीधर्म आणि ते सगळे परधर्म आहेत. जप करणे हा वाणीचा धर्म आहे, ध्यान करणे हा मनाचा धर्म आहे आणि शरीराला अंघोळ घालणे, पूजापाठ करणे, हे सगळे देहाचे धर्म आहेत.

प्रत्येक वस्तू त्याच्या धर्मातच असते. मन मनाच्या धर्मात असते, बुद्धी बुद्धीच्या धर्मात, चित्त चित्ताच्या धर्मात, अहंकार अहंकाराच्या धर्मात, कान कानाच्या धर्मात असतात. कान आहेत ते ऐकण्याचे काम करतात, ते थोडेच पाहण्याचे काम करणार? डोळे पाहण्याचे काम करतात, ऐकण्याचे नाही. नाक वास घेण्याच्या धर्मात असते, जीभ चव घेण्याच्या धर्मात आणि त्वचा स्पर्शेंद्रिय स्पर्शाच्या धर्मातच असते. प्रत्येक इंद्रिय आपापल्या विषयांच्या धर्मातच असतात.

मन मनाच्या धर्मात असते तेव्हा वाईट विचार येतात आणि चांगले विचार पण येतात, पण ते त्याच्या धर्मातच आहे. चांगला विचार आला तर स्वत: म्हणतो की माझे विचार चांगले आहेत परंतु भ्रांतीमुळे तो त्यात तन्मयाकार होतो. आणि जेव्हा वाईट विचार येतात तेव्हा मात्र स्वत:ला त्या विचारांपासून वेगळे ठेवतो, तेव्हा म्हणतो माझी अशी इच्छा नाही तरी पण असे वाईट विचार येत आहेत! अंत:करणात सगळ्यांचे

धर्म वेगवेगळे आहेत मनाचा धर्म वेगळा, बुद्धीचा धर्म वेगळा, चित्ताचा धर्म वेगळा आणि अहंकाराचा धर्म वेगळा, असे सगळ्यांचे धर्म वेगवेगळे आहेत. पण त्यात स्वत: ढवळाढवळ करून गोंधळ निर्माण करतो, त्यात तन्मयाकार होऊन जातो हीच भ्रांती आहे. आता तन्मयाकार होण्याचे केव्हा थांबते? तर जेव्हा 'ज्ञानी पुरुष' स्वत:च्या स्वरूपाचे ज्ञान देतात त्यानंतर तन्मयाकार होणे थांबते. स्वत: आत्मा झाल्यानंतर निष्पक्षपाती बनतो. त्यानंतर मन-बुद्धी-चित्त आणि अहंकाराच्या, वाणीच्या आणि देहाच्या बाबतीत पक्षपात राहत नाही. हे तर आरोपित भाव केल्यामुळे अहंकाराने तन्मयाकार होत असतो. आत्मा झाल्यानंतर या सगळ्यांना 'स्वत:' वेगळे राहून पाहतो आणि जाणतो.

सर्व जग रिलेटिव्ह धर्माचेच पालन करते. देहाचे धर्म, वाणीचे धर्म आणि मनाचे धर्म, याचेच पालन करते. देहाचे धर्म हेच 'स्वत:चे' धर्म असे मानते. पण (हे सर्व) रिलेटिव्ह धर्म आहेत आणि 'आत्मा हाच धर्म' आहे असे मानणे यालाच आत्मधर्म म्हणतात. आत्मधर्म हाच रियल धर्म आहे, तोच स्वधर्म आहे आणि तोच मोक्ष आहे. तेव्हा स्वत:चे स्वरूप जाणून घ्यायचे आहे. आत्म्याचा धर्म हाच स्वधर्म आहे, बाकी सगळे परधर्म आहेत.

तुमच्या आत 'दादा भगवान' बसलेले आहेत, तेच 'चैतन्यप्रभू' आहेत. तेच परमात्मा आहेत. तेच आमच्यातही प्रकट झाले आहेत आणि तुमच्यात अजून प्रकट व्हायचे बाकी राहिले आहेत. म्हणजे हा धर्म नाही. इथे तर आपले (मोक्षाचे) काम पूर्ण करून घ्यायचे आहे. अजून किती दिवस धर्मशाळेत बसून राहणार? स्वत:चे काम साधून घ्यायचे म्हणजे काय? तर 'ज्ञानी पुरुषां'कडून स्वत:चे स्वरूप जाणून घ्यायचे. 'ज्ञानी पुरुषां'चा दिवा प्रज्वलित झाला आहे त्या दिव्याला तुमचा दिवा लावा म्हणजे तुमचा दिवासुद्धा प्रज्वलित होईल. 'ज्ञानी पुरुष' तर कधी काळीच प्रकट होतात, दहा लाख वर्षातून अक्रम 'ज्ञानावतार'चा अवतरण होतो. तेव्हा फक्त तासाभरातच तुमचा आत्मा प्रकट होऊ शकतो. म्हणूनच 'आम्ही' म्हणतो, तुमचे काम साधून घ्या. हा देह तर बुडबुडा आहे.

तो कधी फुटेल ते सांगता येणार नाही. या देहात बसलेत ते 'दादा भगवान' आहेत. खूपच आश्चर्यकारक रित्या प्रकट झाले आहेत. परमात्मा प्रकट झाले आहेत. पण जोपर्यंत हा बुडबुडा असेल, हा देह असेल तोपर्यंतच लोकांचे कल्याण होऊ शकेल. कारण आत प्रकट झालेले 'दादा भगवान' आम्हाला वश आहेत. तिन्ही लोकांचे स्वामी आम्हाला वश झाले आहेत! त्यांना स्वत:ला वाणी नाही, हातपाय नाहीत म्हणून ते आम्हाला वश झाले आहेत आणि त्यांनी आम्हाला कल्याणासाठी निमित्त बनवले आहे! म्हणून 'आम्ही' म्हणतो की जोपर्यंत हा बुडबुडा आहे तोपर्यंत (मोक्षाचे) काम साधून घ्या.

इथे आमच्याकडे तर आत्मा तोच धर्म आहे. इथे तर अविरोधाभासी असा रियल मार्ग आहे. जगात रिलेटिव्ह मार्ग चालू आहे. जिथे स्वत: नाही तिथे *पोतापणाचा* (मी आहे आणि माझे आहे असे आरोपण, माझेपण), आरोपण करणे, स्वत: चंदुलाल आहे असे मानून शुभाशुभाच्या मार्गाने चालणे, मग जरी संपूर्ण आयुष्य सर्वांवर उपकार करण्यात घालविले तरी पण त्याला रिलेटिव्ह धर्म पाळला असे म्हटले जाईल. आणि रियल धर्म क्षणभर जरी पाळला तरी तो मोक्षच आहे. भगवंत म्हणतात, 'एकदा आत्मा होऊन आत्मा बोललात तर तुमचे काम पूर्ण होईल. नाही तर 'मी आत्मा आहे आणि हे देहादि जंजाळ माझे नाही.' असे जरी लाखो जन्म बोलत राहिलात तरी काहीही निष्पन्न होणार नाही! भगवंत काय म्हणतात? तुझी श्रद्धा 'मी चंदुलाल आहे' अशीच आहे, ती श्रद्धा मिटली नाही, ते ज्ञान मिटले नाही, ते चारित्र्यही मिटले नाही, आणि तू फक्त बोलतो की 'मी शुद्धात्मा आहे' तर मग मोक्ष कधीच मिळणार नाही. 'मी चंदुलाल आहे' अशा आरोपित भावात राहून 'मी शुद्धात्मा आहे' असे तुम्ही कसे बोलू शकता? ज्ञान दर्शनाचे आरोपित भाव तुटतात, तेव्हा तो सम्यक् भावात येतो, तेव्हाच मोक्ष होतो.

रिलेटिव्ह धर्म काय सांगतात? चांगले करा आणि वाईट करू नका. चांगले केले की पुण्य मिळते आणि वाईट केले की पाप लागले. आयुष्यभराचे वहीखाते फक्त पुण्यानेच भरत नाही. कोणाला शिवीगाळ

केली तर पाच रुपयांची उधारी पण होते आणि पुण्य केले तर शंभर रुपये खात्यात जमा पण होतात. पण पाप–पुण्य यांची बेरीज–वजाबाकी होत नाही. असे जर असते तर करोडपती लोकांनी स्वत:च्या खात्यात पाप जमा होऊच दिले नसते. पैसे खर्च करून उधारी उडवून टाकली असती. पण इथे तर अस्सल न्याय आहे. त्यात तर ज्यावेळी ज्याचा उदय होतो ते सहन करावे लागते. पुण्यामुळे सुख मिळते आणि पाप कर्मांचा उदय झाला तर कष्ट सहन करावे लागतात. फळे तर दोघांची चाखावीच लागतात. भगवंत काय म्हणतात की, तुम्हाला जर ही फळे खाणे आवडत असेल तर तसे बी पेरा. सुख आवडत असेल तर पुण्याचे आणि दु:ख आवडत असेल तर पापाचे बी पेरा. पण हे दोन्हीही रिलेटिव्ह धर्मच आहेत, रियल धर्म नाहीत. रियल धर्मात, आत्मधर्मात तर पाप आणि पुण्य दोन्हीपासून मुक्ती हवी आहे. रिलेटिव्ह धर्म पाळल्यामुळे भौतिक सुखे मिळतात आणि मोक्षाच्या दिशेने प्रयाण होते. याउलट रियल धर्मामुळे मोक्ष मिळतो. इथे 'आमच्याकडे' रियल धर्म आहे. त्यामुळे सरळ मोक्ष मिळतो. इथेच मोक्षसुख अनुभवास येते. इथेच आधी, व्याधी आणि उपाधी यातून मुक्ती मिळते आणि निरंतर समाधीची अवस्था प्राप्त होते. निराकुळता उत्पन्न होते. इथे तर आत्मा आणि परमात्म्याच्या गोष्टी होतात.

## पुरुष झाल्याशिवाय पुरुषार्थ कसा होईल?

एक खूप मोठे प्रोफेसर माझ्याकडे आले होते. त्यांना मनात जरा कैफ होता की 'मी बरेच काही जाणतो' आणि 'मी बराच पुरुषार्थ करतो.' मी त्यांना विचारले 'तुम्ही काय करता? कुठला पुरुषार्थ करता?' तर ते म्हणाले 'आत्मा प्राप्त करण्यासाठीच सगळा पुरुषार्थ करतो.' तेव्हा मी विचारले: 'पण पुरुष न होताच पुरुषार्थ कसा करता येईल?' जशी प्रकृती नाचवते तसे तुम्ही नाचता आणि म्हणता, 'मी नाचलो.'

मी साऱ्या जगाला चेलेंज देतो की, तुम्ही जे काही करता ती तुमची 'स्वत:'ची शक्ती नाही. अरे, शौचाला जाण्याची सत्ता (शक्ती) पण तुमच्या हातात नाही. बडोद्याच्या मोठमोठ्या डॉक्टरांना गोळा करून

मी विचारले, तुम्ही म्हणता की आम्ही भल्याभल्यांकडून शौचक्रिया करवून घेतो, पण ते तुमच्या हातात थोडेच आहे? तेव्हा ते म्हणाले, 'हो आम्हीच हे करवून आणतो ना?' तेव्हा मी त्यांना म्हणालो, 'तुमच्यातच शौचाला जाण्याची स्वतंत्र शक्ती नाही तर तुम्ही हे दुसऱ्यांना कसे काय करवून देणार? ते तर जेव्हा तुमचे संडास अडेल तेव्हा तुम्हाला कळेल की ती तुमची शक्ती नव्हती. हे सगळे प्रकृती घडवून आणते आणि अहंकारी अहंकार करतात की, 'मी केले!'

## जे नशा आणते, ते प्राकृत ज्ञान

मोठमोठे पंडित, शास्त्र वाचणारे शास्त्रज्ञ, मोठमोठे साधू महाराज, आचार्य हे सगळे जे जाणतात ते प्राकृतज्ञान आहे, ते आत्मज्ञान नाही, तर प्राकृतिक ज्ञान आहे. प्राकृतिक ज्ञान आणि आत्मज्ञान यात ताक आणि दुधाइतका फरक आहे. हे सगळे प्राकृतज्ञान काय करते? प्रकृतीने प्रकृतीला धुते. प्रकृतीने प्रकृतीला धुतल्यामुळे ती थोडीशी हलकी होते. पुन्हा एक जन्म प्रकृतीला हलकी करण्यात जातो आणि जर का कुसंग मिळाला तर प्रकृती पुन्हा मजबूत होते! म्हणून भगवंतांनी याला गजस्नानावत् (हत्तीच्या अंघोळीची) उपमा दिली आहे. गजस्नानावत् म्हणजे हत्ती अंघोळ करतो आणि बाहेर पडला की पुन्हा आपल्या शरीरावर धूळ उडवतो, तशीच परिस्थिती या माणसांची आहे! आत्मज्ञान ही फार दुर्लभ गोष्ट आहे, अतिशय दुर्लभ, दुर्लभ आहे. मोक्षाचे फक्त नाव घेतात तेवढेच, बोलतात तेवढेच. बाकी, मोक्ष प्राप्त होणे हे सोपे नसते. प्रकृती ज्ञान असणारे लोक मनात काय म्हणतात, 'मला सगळे समजले आहे.' अरे बाबा, तुम्हाला तर फक्त प्रकृती ज्ञानच समजले आहे! आत्मज्ञान अजून समजायचे आहे. कित्येक जन्मांपासून तेच ते प्रकृतीज्ञान समजत आला आहात ना, आणखी काय केले? करते प्रकृती आणि 'मी केले' असे तुम्ही म्हणता. प्रकृती त्याला नाचवते, उठवते, आणि तो म्हणतो, 'मी उठलो.' प्रकृतीच झोपवते, झोपायचे असते तरीही झोप येत नाही आणि जेव्हा प्रकृती झोपवते तेव्हा म्हणतो 'मी झोपलो!'

मी अगदी खात्रीपूर्वक सांगतो की सर्व जग फक्त प्रकृतज्ञानातच

आहे. कुणी जरी शास्त्र वाचत असेल, किंवा महावीरांचे सर्व पंचेचाळीस आगम कोळून प्यायला असेल, किंवा चारही वेद कोळून प्यायला असेल तरी आम्ही त्याला असेच म्हणतो की अजूनही तू प्राकृतज्ञानातच आहेस! आत्मज्ञान आणि प्राकृतज्ञानात दूध आणि ताक एवढा फरक आहे. दूध आणि ताक दोन्ही सफेद दिसतात. (पण) प्राकृतज्ञान नशा चढवते आणि आत्मज्ञान नशा उतरविते. ज्या ज्या प्रकारची नशा असेल त्या सर्व प्रकारांची नशा आत्मज्ञान उतरविते. नशा कमी होत जाते, हीच आत्मज्ञानाची खुण आहे.

**प्रश्नकर्ता :** शास्त्र शिकून देखील अहंकार वाढतो का?

**दादाश्री :** हो, कारण ते प्राकृतज्ञान आहे म्हणून सगळ्यांची नशा चढते की 'मी जाणतो, मी सर्व जाणतो.' अरे, काय जाणलेस तू? तुझी बेचैनी-अशांती तर गेलेली नाही. ग्लास फुटला तर लगेच तुझा आत्मा फुटतो! आणि 'ज्ञानी पुरुषां'चे हिरे हरवले तरी त्यांना काही होत नाही. म्हणजे याचे ज्ञान केवढे! तर 'मला सर्वकाही समजते' एवढेच.

या काळात तर मोठमोठे साधू महाराज, आचार्य सगळे धुंदीतच असतात. 'मी सर्व जाणतो' असे ते स्वत:च्या जोखीमदारीवर बोलत आहेत ना! आपली जोखीमदारी थोडीच आहे त्यात? आपापल्या जोखीमदारीवर बोलत आहेत. ते सगळे मार्ग चुकलेत, मग काय होणार? त्यात त्यांचा दोष नाही. त्यांना पण मोक्षाला जाण्याचीच इच्छा आहे. भगवंतांच्या आज्ञेत राहण्याचीच इच्छा आहे. पण काळच विचित्र आला आहे, म्हणून खरी समज नसल्यामुळे गुंता निर्माण झाला आहे. हे सगळे प्राकृतज्ञान आहे. त्याची नशा वाढत जाते आणि आत्मज्ञानामुळे नशा उतरते. म्हणून स्वत:ला आत्मज्ञान नाही एवढी जाणीव जरी सतत ठेवली तरी खूप चांगले होईल. पण हे तर स्वत:ची नशा लपवून ठेवतात. कोणी डिवचले तर लगेच फणा उभारतात. जेव्हा नशारहित होशील तेव्हा या जगाची मालकी तुझी आहे. साऱ्या जगाचा मालक तू आहेस! पूर्ण ब्रह्मांडाचा तू स्वत:च स्वामी आहेस! म्हणून आत्मज्ञानाच्या बाबतीत 'मी काहीच जाणत नाही' असे जरी बोललास तरी देखील लवकर मार्ग सापडेल.

जाणलेले प्रकृतीज्ञान उपयोगी पडते का? नाही, कारण मोक्ष मिळविण्यासाठी फक्त आत्मज्ञानाची गरज असते. आत्मज्ञान पुस्तकात नसते, शास्त्रात नसते. ते तर 'ज्ञानी पुरुषां'कडेच असते. ज्यांना जगात समजण्यासारखे काहीच उरले नाही, अशा माणसांचेच ते काम, इतर कुणालाच ते जमणार नाही. 'ज्ञानी पुरुष' कोण? तर ज्यांना समजण्यासारखे काहीच शिल्लक नसते, ज्यांना पुस्तक वाचण्याची गरज नसते, ज्यांना माळ जपण्याची गरज नसते, आणि जर ते स्वतःच अजून पुस्तक वाचत असतील, माळ जपत असतील तर आपल्याला समजते ना की ते अजून स्टँडर्डमध्ये आहेत? जे स्वतःच अजून शिकत आहेत ते आपले भले कसे काय करणार? तेव्हा जे संपूर्ण झाले आहेत तेच फक्त आपल्या कामी लागतील. हे जे सगळे रिलेटिव्ह धर्म आहेत, ते वेगवेगळे स्टँडर्ड (इयत्ता) आहेत. प्रत्येकाच्या डेव्हलपमेंट अनुसार त्याच्या स्टँडर्डचा धर्म त्याला मिळतो. आणि रियल धर्मासाठी, आत्मधर्मासाठी तर आउट ऑफ स्टँडर्ड जावे लागते. सगळ्या स्टँडर्डमधून पास होऊन, आणि सगळ्या स्टँडर्डना मान्य करून मगच तो परमात्म स्वरूप होऊ शकतो.

## पक्षवादात पडलेल्यांना मोक्ष कसा मिळेल?

जैन, वैष्णव, शिव, स्वामिनारायण, मुस्लिम, ख्रिश्चन हे सगळे रिलेटिव्ह धर्म आहेत, स्टँडर्डवाले धर्म आहेत. व्ह्यू पॉइंटचे (दृष्टीकोन असलेले) धर्म आहेत. व्ह्यू पॉइंटने ज्याला जे दिसले तेच खरे मानून बसले आणि त्याच पक्षात पडले. मोक्ष केव्हा होतो? केवळ दर्शन केव्हा होते? खरे समकित, सम्यक्दर्शन केव्हा होते? साऱ्या जगात कुठेही, कोणाशीही मतभेद राहत नाहीत, किंवा कोणाच्या बाजूने पक्षपातीपणा राहत नाही तेव्हा घडते! पक्षात अडकलेल्यांचा मोक्ष होत नाही. पक्ष कशासाठी बनतात? अहंकारी लोक आपला अहंकार पोसण्यासाठी पक्ष बनवितात आणि निरहंकारी 'ज्ञानी पुरुष' सगळ्यांना एकत्र आणतात. 'ज्ञानी पुरुष' निष्पक्षपाती असतात. 'वीतरागी' निष्पक्षपाती असतात. कुठल्याच जातीची-पंथाची ते बाजू घेत नाहीत. संपूर्ण निष्पक्षपाती. प्रत्येक माणसाबरोबर अभेदता! अरे, अगदी लहानाहून लहान जीवाशी देखील 'वीतरागीं'ची अभेदता असते.

ही सगळी फक्त पॅकिंग (वेष्टने) आहेत. अनेक प्रकारची पॅकिंग आहेत आणि आत आत्मा आहे, मटिरियल (माल) आहे. मटिरियल सगळ्यातच सारखे आहे पण पॅकिंग वेगवेगळी असल्यामुळे भेदबुद्धी निर्माण झाली आहे. 'ज्ञानी पुरुष' पॅकिंग पाहत नाहीत. ते सतत आतील मटिरियल पाहतात, समोरच्याचा फक्त आत्माच ते पाहतात. त्यांना आत्मदृष्टीच असते. या पॅकिंग दृष्टीने पाहिल्यामुळे पक्षपात होतो आणि त्यामुळेच हे जग चालू आहे. पक्षात राहून पक्षाचा पाया मजबूत करत राहतात. अरे, तुला मोक्ष हवा आहे की पक्षातच पडून राहायचे आहे? मोक्ष आणि पक्ष, हे दोन्ही परस्परविरुद्ध आहेत. भगवंत निष्पक्षपाती आहेत आणि ही माणसे मात्र पक्षात पडलेली आहेत! जैन म्हणतात, हे एवढे आमचे आहे आणि हे आमचे नाही, ते तर वैष्णवांचे आहे. मुस्लिमसुद्धा म्हणतात हे आमचे आहे, ते आमचे नाही, ते हिंदूंचे आहे. अशा प्रकारे सगळे धर्मवाले पक्षापक्षात पडले आहेत. इथे सगळ्या धर्मांचा खुलासा होतो. प्रत्येक धर्माच्या व्यक्तीला इथे आपलाच धर्म आहे असे वाटते. कारण आम्ही निष्पक्षपाती आहोत. म्हणजे त्या सर्व धर्मांचा संगम इथेच आहे!

लोक पक्षापक्षात पडले, त्यामुळे तर भगवंत दूर गेले. त्यात एकाच धर्मातसुद्धा किती गच्छ (गट) झाले आहेत. या जैन धर्मातसुद्धा 84 गच्छ आहेत. आणि वेदांती धर्मात देखील अनेक पंथ झाले आहेत. जैन धर्म कशास म्हटले जाते की तो स्वत: कुठल्याच पक्षात पडत नाही आणि समोरचा जर पक्षात पडत असेल तर त्याच्याकडे जाऊन त्याला समजावून सांगेल. स्वत: जाऊन सविस्तर सगळे समजावून मतभेद मिटवेल. समोरच्याचे म्हणणे जरी अगदीच खोटे असेल आणि स्वत:चे पूर्ण खरे असेल, तरी देखील तो (जैनधर्मी) स्वत:हून समोरच्याकडे जाईल. कित्येकांना वाटते 'असे कधी होत असते का?' तुम्ही बरोबर आहात मग तुम्ही का जात आहात? तरी जैनधर्मी म्हणेल, 'मी जैन आहे, म्हणून मलाच समोरुन गेले पाहिजे.' जैन निराग्रही असतात. जैन कुणाला म्हणतात, की जो सगळ्यांचे ऐकतो, कुणाचे ऐकणार नाही असा नसतोच. सर्वांचे ऐकतो आणि आवरण आणत नाही. तुझे खोटे आणि

माझे खरे असे कपट करत नाही. आत्मा मान्य करील अशी गोष्ट असेल तर ती ऐकलीच पाहिजे ना?

महावीर भगवंत कसे होते, तर कुणी विधर्मी व्यक्ती काही बोलण्यासाठी आली तरी ते त्याचे ऐकत असत. आता तर महावीरांच्या धर्माचेच किती तरी पक्ष पडले आहेत!

आज तर साधू महाराज देखील पक्षात पडलेले आहेत. संप्रदायाचे साधू आणि भगवंतांचे, वीतरागांचे साधू, यात काय फरक आहे? संप्रदायाचे साधू पक्षपाती असतात, भांडणारे असतात. संसारी लोकात भाऊ-भाऊ जसे भांडतात तसेच हे भांडतात. याउलट वीतरागी साधू तर निष्पक्षपाती असतात. ढवळाढवळ करतच नाहीत. एकाही पक्षात पडलेले नाहीत अशा 'वीतरागांच्या' साधूंना आपला नमस्कार! मग ते दिगंबर संप्रदायाचे असोत की श्वेतांबर संप्रदायाचे असोत. इथे तर एका संप्रदायाच्या महाराजांचे म्हणणे दुसऱ्या संप्रदायाचे लोक ऐकत नाहीत. असा पक्षपात करून मोक्ष कसा होईल? खरी गोष्ट, मग ती कोणाच्याही घराची का असे ना, ती स्वीकारली पाहिजे. पण आज खरी गोष्ट राहिलीच कुठे आहे?

भगवंताची मूर्ती नग्न ठेवायची की कपडे घालायचे, यासाठी काही संप्रदायात भांडणे झाली. नग्न ठेवण्याचे का सांगितले? भगवंताची आंगी करणे (कपडे-श्रृंगार करणे) हा तर बालधर्म झाला. भगवंताच्या आंगीच्या नावावर का होईना, लोक भगवंतांचे दर्शन तर करतील ना! उलट याच्यापुढची गोष्ट ज्ञान-जीवांसाठी आहे. पण आजकाल तर विषयच पूर्ण बदलला आहे. एका संप्रदायाचे महाराज मला भेटले होते. ते मला म्हणाले 'मोक्ष तर आमचाच होणार ना!' त्यावर मी विचारले 'असे कशा वरून म्हणता?' तर ते म्हणाले, भगवंतांनीच म्हटले आहे 'नग्गाए मोक्ख मग्गा' मी म्हटले ''तुम्ही म्हणता ते बरोबर आहे. भगवंतांनी सांगितले आहे ते खरे आहे, 'नग्गाए मोक्ख मग्गा' पण तुम्ही चुकीचे समजले आहात. भगवंतांनी आत्मा नग्न करायला सांगितले आहे, देह नाही.''

म्हणजे ही चुकीची समज उत्पन्न झाली आहे. आत्म्यावर मनाचे, वाणीचे आणि शरीराचे, असे तीन कपडे आहेत, ते कपडे काढायचे आहेत. जो हे कपडे काढेल आणि आत्म्याला नग्न करेल तोच खरा दिगंबर. मन–वचन–कायारूपी कपडे काढायचे आहेत. तोच सगळ्यात मोठा परिग्रह आहे, म्हणून तो दूर करायचा आहे.

हा पक्षपात कसा आहे, सांगू का? स्वतः स्वतःला सुंदर समजत नाही, असे कधी असते का? नाही, नाही तर आरशाबरोबर कधी जमलेच नसते ना! पण आरशाबरोबर जमते याचे कारण स्वतः पक्षपाती आहे! रूप कशास म्हणतात की ज्याची आठवण येत राहते, त्याला रूप म्हणतात. पण हे तर पक्षपाती आहेत. निष्पक्षपाती असतील तर जवळ असणाऱ्यांनाही त्याचा सुगंध येईल. आणि पक्षपाती लोक तर जिथे जातील तिथे दुर्गंध पसरतो, घरात तर केवळ दुर्गंधी!

काही लोक आम्हाला विचारतात, 'तुम्ही जैन आहात का?' कोणी म्हणतात 'तुम्ही वैष्णव आहात का?' 'अहो, आम्ही कसले जैन आणि कसले वैष्णव? आम्ही तर वीतराग आहोत. यात सगळेच धर्म सामावून जातात!' जो आम्हाला जैन किंवा वैष्णव समजतो तो स्वतःसाठी अंतराय निर्माण करतो. तो आम्हाला पक्षपाती समजतो. पण एकदा आम्हाला श्रीरामांचे दर्शन घेताना बघ तरी! एकदा जर का त्याने आम्हाला श्रीरामांचे दर्शन घेताना पाहिले तर त्याच्या सगळ्या मान्यता गळून पडतील. पण त्याचे तसे पुण्य उदयास यायला हवे ना!

❖❖❖❖❖

## संसार स्वरूप : वैराग्य स्वरूप

सारा संसार धोकाच आहे. इथे कोणीही आपले नाही. या संसाराचे असे हे भयंकर विकराल रूप जर एकदा समजले तर मोक्षाची इच्छा तीव्र होईल. संसाराचे हे विकराल रूप मोक्षासाठी काउंटर वेट आहे.

आज भयंकर विकराल वाटते तरी देखील हा मूर्ख मूर्च्छेमुळे मार खातो. पुन्हा वाटते की, असो, उद्या स्थिती सुधारेल. पितळ सुधारून कधी सोने होईल का? नाही, ते तर कधीच सोने होणार नाही. म्हणून संसाराचे हे भयंकर विकराल रूप समजून घ्यायला हवे. हा तर असेच समजतो की मी यातून काही तरी सुख मिळवत आहे. असे करीन तर त्यायोगे मला काही तरी सुख मिळेल. पण तिथे देखील मार खातो.

जर 'ज्ञानी पुरुषां'नी या यातनामय संसाराच्या विकरालतेचे नुसते वर्णन जरी केले तरी त्याला नक्कीच वाटेल की, खरेच संसार इतका कठीण आहे का? यातून सुटता येईल असा हा संसार नाहीच. म्हणून ही संपूर्ण केस बाजूला सारा, आणि 'हो बाबा, हो बाबा!' असे म्हणत म्हणत यातून सुटका करून घ्यायची आहे. 'समभावे निकाल' करण्यासारखे हे जग आहे!

ही आमची सूक्ष्म गोष्ट आहे. स्थूल गोष्टींमुळे तर संसार चालू आहे.

दह्याने भरलेले भांडे असेल, त्याचे तोंड लहान असेल आणि जर ते जमिनीवर ठेवले असेल तर मांजराला त्याचा वास येतो. भांडे हलवून-हलवून मांजर दही खाते. जर तळाला अजून किंचितदेखील दही

शिल्लक असेल तर मांजर तोंड जोरात आत खुपसते आणि मग त्याचे तोंड आत अडकते. मग आत तर अंधारच अंधार. मग मांजर इकडे धावते, तिकडे धावते. आता अशा संकटात सापडल्यावर त्यातून सुटणार कसे? याच प्रकारे हे सगळे जग अडकून पडले आहे! आणि स्वत:च स्वत:पासून सुटणार तरी कसे? मांजराला सुटायचे असेल तर कुणी दुसरा सोडवील तेव्हाच ते सुटेल. याच प्रकारे या जगाच्या अडवणूकीतून फक्त 'ज्ञानी पुरुष'च सोडवू शकतात, अन्य कोणीही सोडवू शकत नाही. स्वत: आपणहून तर कधीच सुटू शकणार नाही, उलट अधिकच अडकत जाईल.

लहानपणी मी मांजराचे असे निरीक्षण केले होते. मी स्वत:च दह्याचे भांडे खाली ठेवून चुपचाप पाहत असे. दही वाया जाईल याची मला काळजी नसे. पण बघायला आणि समजायला तर मिळणार ना! अशी प्रत्यक्ष फसगत आहे हे जाणल्यानंतरही परत फसेल असा कोण मूर्ख असेल? या मांजराचे कसे असते की पुन्हा दुधाचे भांडे दिसले की त्याला मागचे आठवत नाही आणि परत दुधाच्या भांड्यात तोंड अडकवून फसते. मग त्याला खूप पश्चाताप होतो. पण फसल्यानंतर काय होणार? एकदा फसल्यानंतर पुन्हा असे करता कामा नये हे त्याच्या लक्षात राहते का? मुळीच नाही. त्याला शिक्षा दिली असेल, मारले असेल तरी ते विसरते. ही माणसे सुद्धा विसरतात तर मग जनावरांचे काय होणार? हे शरीर आपले होऊ शकत नाही तरीही सगळे जण म्हणतात 'हे माझे, हे माझे.' अरे, हे शरीरच तुझे नाही तर बाकी कोणी तुझे कसे होऊ शकतील?

आपल्याला कलकत्त्याहून येताना चांगले आंबे दिसले, आणि तिथे हमाल मिळाला नाही, टोपली मिळाली नाही, तरी देखील आपण ते सांभाळून इथे घेऊन येतो. इथे आल्यानंतर आपण ते आंबे खातो आणि आंबे खाल्यावर कोयी आणि साली फेकून देतो. अरे, एवढे कष्ट उपसलेत आणि तरी देखील फेकून दिलेत? तर म्हणतो हो, फक्त रसाचीच गरज. तसेच जेव्हा या माणसांच्या देखील फक्त कोयी आणि साली शिल्लक राहतात, रस राहत नाही तेव्हा मुले पण त्यांना लाथा मारतात!

आमच्या शेजारी एक आंधळी म्हातारी आणि तिचा मुलगा राहत होता. ती म्हातारी दिवसभर घर सांभाळत असे आणि कामेही करत असे. त्या मुलाकडे एक दिवस त्याचे साहेब आले. हा घरचा साहेब आणि ते ऑफिसचे साहेब! दोन्ही साहेब घरी आले. मुलाला वाटले, साहेबांनी जर माझ्या आंधळ्या आईला पाहिले तर माझी अब्रू जाईल. म्हणून त्याने साहेबांसमोर आईला म्हटले, 'ए आंधळे उठ, माझे साहेब आले आहेत!' आणि शिवाय आईला लाथ पण मारली. अशी साहेबांसमोर आपली अब्रू झाकली! जसा काही मोठा साहेबच लागून गेला! आला मोठा अब्रूदार! आईची अब्रू सांभाळायची की साहेबांची?

हे आंबे का आणता? तर म्हणतात रसासाठी, चवीसाठी, म्हणजे असे हे स्वार्थी जग! म्हणून आपल्या आतील भगवंत फक्त खरे, मोक्ष मिळवलात तर काम झाले. नाही तर लोक 'अगं उठ आंधळे', असेच म्हणतील.

मग कोणी म्हणते मला मुले नाहीत. मुले घेऊन काय करायचे आहे? सतत त्रास देणारी मुले असतील तर त्यांचा काय उपयोग? यापेक्षा ही शेरभर माती (मुले) नसली तर उत्तम, आणि कुठल्या जन्मात तुझ्याकडे ही शेरभर माती नव्हती? कुत्रा, मांजर, गाढव, गाय, म्हैस या सगळ्याच जन्मात मुलांनाच कवटाळत राहिलास ना? मोठ्या मुश्किलीने हा मानव जन्म मिळाला आहे. इथे तरी सरळ हो ना! मोक्षप्राप्तीचा काही मार्ग शोध, आणि तुझे कल्याण करून घे. मुलांनी त्रास दिला तर म्हातारी म्हणेल, 'जळो हा संसार! कडू विषच आहे जणू.' तेव्हा आपण म्हणू 'आजी, आधी हा संसार कडू नव्हता का?' तो नेहमीच कडू होता. पण मोहामुळे, मुर्च्छेमुळे तो गोड लागत होता. मुलगा त्रास देतो तेवढ्यापुरती मुर्च्छा उडून जाते आणि संसार कडू लागतो. पण परत मुर्च्छा येते आणि सर्वकाही विसरतो! अज्ञानी तर घरी गेला की एका क्षणात सगळे विसरतो. पण 'ज्ञानी'नां तर ॲट ए ग्लांस (एकाच नजरेत) सगळे हजरच असते. त्यांना तर निरंतर हे जग जसे आहे तसेच दिसत असते. मग मोह राहिलच कसा? अज्ञानीला याचे भान नसल्यामुळे तो मार खातो.

जेव्हा सासूकडून काम होईनासे होते, तेव्हा सून सासूला म्हणते एका बाजूला बसा. नाही तर सासूला जात्यावर दळायला बसवते. सासूला म्हणते, तुम्ही दळत बसा, म्हणजे मध्ये–मध्ये येणार नाही. उलट आईला वाटते मुलगा मोठा झाला की मग माझी सेवा करील. पण तो सेवा करील की दु:ख देईल ते नंतर कळते! तुम्ही बांधलेले असाल तर मुक्त होऊ शकत नाही, आणि मुक्त असाल तर तुम्हाला कोणी बांधू शकत नाही! 'स्वरूपा'चे ज्ञान मिळाले तर या बंधनातून सुटका होऊ शकते.

लहानपणी मी स्वत: आपल्या डोळ्यांनी पाहिले, ते मी तुम्हाला सांगतो. एक आंधळे वृद्ध गृहस्थ होते. ते जेव्हा जेवायला बसत तेव्हा मुले त्यांच्या ताटात खडे टाकत तेव्हा ते त्रासत आणि ओरडत. मग मुलांना गंमत वाटे आणि ते आणखी खडे टाकत! असे आहे हे जग! आणि असे आणखी किती जन्म मिळणार आहेत याचा काही नेम नाही! मोक्षाचा शिक्का लागला असेल तर दोन तीन जन्मात काम होईल. पण असा शिक्का तर लागलेला नाही, तरी लोकांना या जगाचा केवढा मोह आहे!

मांजर लोभामुळे भांड्यात जोरात तोंड खुपसते मग तोंड काही निघत नाही. ते तोंड का घालते? स्वार्थ आणि लोभामुळेच ना? हा स्वार्थ आणि लोभ म्हणजेच अज्ञान! म्हणून आपल्याला हे समजून घ्यायची गरज आहे की,

मी कोण आहे?

याच्याशी माझे काय देणेघेणे आहे?

हे माझे होतील की नाही?

पासष्ठ वर्षे हे दात घासत आहोत, तरी पण ते साफ होत नाहीत. जळो! मग आपल्याला हे कळायला नको का की खरे काय आणि खोटे काय? आयुष्यभर ही जीभ साफ करत आलो पण मेली साफच झाली नाही! दातांना रोज किती सांभाळले, घासले पण तरी देखील शेवटी ते आपले झालेच नाहीत ना! आज ही दाढ दुखायला लागलीच ना! असे

आहे हे जग! हा संसार असा आहे की ऐन वेळी कोणी आपला सोयरा होत नाही. सून रोज सासूचे पाय चेपत असेल तरी जेव्हा सूनेच्या पोटात दुखते तेव्हा सासू म्हणते, जा ओवा खा. असे तर सगळेच म्हणतील. पण सासू सूनेचे दु:ख घेऊ शकेल का? अरे! नवरा किंवा मुले घेऊ शकतील का? बैल लंगडा होईपर्यंत त्याच्याकडून काम करवून घेते, असे हे जग आहे. पण जेव्हा त्याला चालता येईनासे होते तेव्हा त्याला कसाईखान्यात सोडून येतात. जोपर्यंत वडील पैसे मिळवतात, काम करतात तोपर्यंत वडील चांगले वाटतात, पण जेव्हा ते काम बंद करतात तेव्हा घरचे सगळे म्हणतात, 'तुम्ही आता असे इकडे बसा. तुम्हाला अक्कलच नाही!' असे आहे हे जग. हा संसार म्हणजे धोका आहे! ही नाती-गोती जरी थोडीदेखील खरी असती तरी या 'दादां'नी तुम्हाला सांगितले असते की एवढे नाते खरे आहे. पण इथे तर पूर्णपणे धोकाच आहे. जिवंत भोवरा चैनच पडू देत नाही. अरे, इथे सत्संगात यायचे असेल, फक्त दर्शन करण्यासाठी यायचे असेल तरी येऊ देत नाही. पण आता हे येऊ देतो ते मात्र खूप चांगले आहे.

## शुद्धात्मा हाच आपला खरा सोयरा

**दादाश्री :** रात्री दोन वाजता तुम्ही उठता तेव्हा प्रथम तुमच्या लक्षात काय येते?

**प्रश्नकर्ता :** 'मी शुद्धात्मा' आहे हे येते आणि मग 'दादा' दिसू लागतात.

**दादाश्री :** 'आम्ही' तुम्हाला स्वरूपाचे ज्ञान दिल्यानंतर शुद्धत्म्याचे लक्ष्य दिवसभरात किती वेळ राहते?

**प्रश्नकर्ता :** निरंतर राहते, दादा.

**दादाश्री :** हे जे 'शुद्धात्म्याचे' लक्ष्य राहते त्यासच आपले म्हणायचे आहे. तेच आपली काळजी घेते. रात्री दुसरे कोणी आपली काळजी घेत नाही. आपण पाणी मागितले तरी कोणी उठत नाही. स्वत:च जावे लागते. आपण पाणी प्यायला मागितले आणि तो जर झोपला असेल

तर उठेलही, पण जागा असला तर मात्र उठत नाही. हा सगळा हिशोब आम्हाला ॲट–ए–टाईम (तत्क्षणी) दिसतच असतो. हा संसार म्हणजे निव्वळ धोकाच आहे. तो कधीच आपला होत नाही.

**दादाश्री :** ताई, तुम्हाला किती मुले आहेत?

**प्रश्नकर्ता :** चार मुले आहेत.

**दादाश्री :** मग मागच्या जन्मीची मुले आता कुठे आहेत?

**प्रश्नकर्ता :** ते कसे कळणार, दादाजी!

**दादाश्री :** प्रत्येक जन्मात भयंकर यातना भोगल्या. पण मागच्या जन्मीच्या यातना विसरतो आणि नवीन यातना सोसू लागतो. मागच्या जन्मीची मुले सोडून येतो आणि या जन्मी नवीन मुलांना कवटाळतो.

'स्वत:'ची गोष्ट असेल तर ती लुटली जाणार नाही आणि जी लुटली जाते ती 'स्वत:'ची नाहीच. एकुलता एक मुलगा असेल तरी पण तो राहणार नाही.

या जगात कुठली व्यक्ती मोह करण्यायोग्य आहे? यांना तर 'वास' मारतो. यांच्या वर काय मोह करायचा? दुर्गंधी येणाऱ्या आंब्यांचा कुणाला मोह होतो का? सुगंधी लोक तर पूर्वी सत्युगात होते. पण सत्युगाचा कोंडा (कचरा) द्वापारात आला, द्वापाराचा कोंडा त्रेतायुगात पोहोचला आणि त्रेतायुगाचा या कलियुगात आला. म्हणजे निव्वळ खडेच (चाळून उरला सुरला कचरा)या काळात राहिले. त्यांचे खाणेही तसेच, बुद्धीही तशीच आणि विचारही तसेच! यांच्यापासून काय सुख मिळणार? याऐवजी 'स्वत:च्या आत्म्याच्या गुहेत' शिर ना! आणि बाहेर नाटकी वागत जा! इथे तर सगळ्या गोष्टीतून दुर्गंधच येत आहे. यात काय सुख मिळणार आहे? 'स्वरूपाचे ज्ञान' नसेल तर सर्वत्र उकाडाच उकाडा आहे, आणि स्वरूपाचे ज्ञान प्राप्त झाले तर स्वत:च्या गुहेत बसून रहायचे आणि व्यवहारात वरकरणी वागायचे! जे चांगले असतील ते आपल्याला खाली घसरवतील. (मोहात पाडतील.) चहा–नाश्ता देतील, फिरायला घेऊन जातील. काहीच देणेघेणे नसूनही आपल्याला खाली घसरवतील!

हे सगळे वहीखात्याच्या हिशोबाप्रमाणे भेटतात. एका झाडावर पक्षी बसले आणि उडून गेले, तसे आहे हे सर्व! हे सर्व कधी ना कधी सोडायचेच तर आहे. चक्रवर्ती राजा, तेराशे राण्या, सिंहासन आणि सगळे वैभव सोडून 'ज्ञानी पुरुषां'च्या मागे लागले होते. आणि आज तर इथे एका राणीला देखील सोडायला कुणी तयार नाही. आणि या कलियुगातील राणी तर कशी की रोज सकाळी सकाळी ऐकवणार 'इतक्या सकाळी चहा ढोसलाच पाहिजे का?'

ही सगळी भट्टी आहे. रताळी भाजायची भट्टीच जणू, असा आहे हा संसार!

यात जर सुख असते तर वर्तमानपत्रात आले असते की अमके अमके शेठ सुखी आहेत! पण कुणीच सुखी नाही. भट्टीत रताळे भाजते तसे सगळेजण भाजले जात आहेत. या शेठानीचाही विमा नाही, आणि कितीतरी बंगले नष्ट झाले. कशात सुख आहे? जर लक्ष्मीत सुख असते तर हे शेठ लोक रात्री पलंगावर या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत पडले नसते. पलंगसुद्धा चूं-चूं आवाज करत राहतो. यात काय सुख आहे? चक्रवर्ती राजाला देखील तेराशे राण्या होत्या. पण त्यातल्या कित्येक जणींची तोंडे रोज फुगलेलीच असायची!

एक वाणी गृहस्थ होते. रोज माझ्याबरोबर उठणारे बसणारे. त्यांना मी विचारले, 'तुमचे तुमच्या पत्नीबरोबर ठीक चालले आहे ना? जर ती मेली तर तुमचे कसे होईल?'

तेव्हा ते म्हणाले, 'मी पत्नीला सांगितले आहे की, मी विधुर होईन पण तुला विधवा होऊ देणार नाही.' 'अरेच्या! हे वाणी लोक तर फार बिलंदर. या बोलण्यामुळे पत्नीलाही छान वाटते ना की पती जास्त जगणार!' बायकोला म्हणणार, तू सौभाग्यवती म्हणून जा, मी विधुर झालो तरी चालेल. हे सगळे नियम पुरुषांनी बनविले आहेत म्हणून ते पक्षपाती आहेत. स्त्री आणि पुरुष यात जो नैसर्गिक फरक आहे तोच फरक. बाकी तर त्या पण 'शुद्धात्मा'च आहेत ना?

एक वाणी गृहस्थ तर असे शूर होते की गल्लीच्या नाक्यावर

चोऱ्या होत होत्या, तिथे आरडाओरडा चालू होता. त्यांना कळले की चोर गल्लीत आले आहेत, म्हणून ते बायकोला म्हणाले, 'तू माझ्यावर खूप पांघरुणे घाल!' असे बहादूर लोक आहेत!

लग्न केले, लग्नाची फळे चाखली, आता 'वीतराग' राहायचे आहे. आंब्याची फळे चाखली, आंबट आहेत हे कळले तरी त्याच आंब्याच्या झाडाखाली पुढच्या वर्षी गोड फळे मिळतील या आशेने बसून राहायचे का? नाही, ती फळे कायम आंबटच असणार. तसेच हा संसार पण आंबटच आहे, पण मोहामुळे ते लक्षात राहत नाही. यातना सोसून देखील परत परत मोह होतोच. हाच भुल-भुलैया (चक्रव्यूह) आहे. जर स्वरूपाचे अज्ञान गेले आणि स्वरूपज्ञान मिळाले तर मग हा भुल-भुलैया त्रास देत नाही. 'ज्ञानी पुरुषां'नी आत्मज्ञान दिले की हा भुल-भुलैया कायमचा सुटतो आणि मोक्षाचा शिक्का लागतो.

इथे तर मरणासन्न अवस्थेत खाटेवर पडलेला असतो आणि छोट्या मुलीचे लग्न करायचे राहिले याची काळजी करत बसतो. या काळजीतच मरण पावतो. परिणामी पशुयोनीत जन्माला येतो. पशुयोनीचा जन्म तिरस्कार युक्त आहे. पण मनुष्य जन्मातही सरळ वागत नाही, मग काय होणार? 'ज्ञानी पुरुष' म्हणत असतात, 'माग, मागशील ते देतो.' पण धड मागताही येत नाही.

स्टीमर बुडू लागली तर अगोदरच हे समजू लागते. म्हणून सगळ्यांना स्टीमरमधून उतरवितात, तेव्हा देखील म्हातारी माणसे घाई करतात. अरे, तू तर मरायलाच टेकला आहेस, तर प्रथम मुला-बाळांना उतरू दे ना!

लोकांना वाटते ही दुनिया खूप सुंदर आहे. पण नाही, अहो, हे जग तर मृत्यूचा कारखाना आहे! ही वांगी (माणसे) म्हातारी झाली की मरणारच आहेत. तोपर्यंत जमेल तेवढे आत्म्याचे काम साध्य करून घ्या.

(मुंबईला निघाला आहे) आणि पालघर स्टेशन आल्यावर जर कोणी गादी पसरू लागला तर लोक काय म्हणतील? वेडाच म्हणणार

ना? अरे, मुंबई जवळ आली तर आता काय गादी घालतो आहेस? त्याला मूर्खच म्हणायचे. काही जण तर बोरीवली आली की पत्ते खेळायला बसतात. अरे ऊठ, आता स्टेशन आले आता गादी आवर, सावध हो. जितका लवकर सावध होशील तेवढे तुझेच भले.

निव्वळ भयावह हे जग आहे! घाबरवून सोडणारे हे जग, आणि हे सतत असेच आहे. अशा या जगात लोकांना राग (मोह) कसा होतो तेही एक आश्चर्यच आहे!

## हा मोह आहे की त्रास?

हा मोह कशावर? खोट्या सोन्यावर? खरे सोने असेल तर मोह करणे ठीक आहे. पण हा तर ग्राहक आणि व्यापारी असा संबंध आहे. माल चांगला असेल तर गिऱ्हाईक पैसे देतो, असा हा संबंध. इथे तर तासभरच पती-पत्नीचे भांडण झाले तरी संबंध तुटतात, अशा संबंधाचा मोह का ठेवायचा?

शेठजी म्हणतात आम्ही काय करणार? आम्हाला तर सगळी संपत्ती मुलाला द्यायची आहे. शेठजींनी चारशेवीसीपणा (फसवेगिरी) करून संपत्ती कमावली, तीसुद्धा परदेशात कमावली आणि ती परत मुलाला देणार? मुलगा तर रिलेशनवाला आहे, म्हणजे रिलेटिव्ह संबंध आहे आणि परत अहंकारीही आहे. त्याच्याशी साक्षात संबंध असेल, रियल संबंध असेल आणि तो कमाई करून देत असेल तर ठीक आहे. इथे तर संबंध आहेत ते केवळ समाजाला घाबरून. त्यात देखील कधी कधी बाप-लेक लढतात, भांडतात आणि कोर्टात दावा पण लावतात. काही मुले तर असेही म्हणतात की, बापाला वृद्धाश्रमात सोडणार आहे! या बैलांना नाही का गौशाळेत ठेऊन येत. तसे हे वृद्धांचे घर, वृद्धाश्रम! किती सुंदर नाव दिले आहे! या नाते-बंधनात का अडकून राहिला आहात तेच मला समजत नाही. या रिलेटिव्ह संबंधात जर अहंकार नसेल तर चालवून घेण्यासारखा संबंध आहे. तुम्हाला हे माहीतच आहे की पूर्वी वडिलांना तुरुंगात टाकून सिंहासन मिळविले गेले होते!

सर्व जग घाण्यासारखे आहे. पुरुष बैलाच्या ठिकाणी आहे आणि स्त्रिया तेलीच्या ठिकाणी आहेत. तिथे तेली गातात आणि इथे बायका गातात, आणि पुरुष डोळ्यावर पट्टी बांधून आपल्याच मस्तीत चाललेला असतो. त्याला वाटते की आतापर्यंत मी काशीला पोहोचलो असेन! जेव्हा डोळ्यावरची पट्टी काढून पाहतो तर बापडा तिथल्या तिथेच! जेव्हा तेली बैलाला पेंडीचा तुकडा देतो तेव्हा बैल खुश होतो. तसेच बायको जेव्हा हांडव्याचा तुकडा देते तेव्हा नवरा खुश होऊन आरामात झोपतो!

हॉस्पिटलमध्ये गेला तरी त्याचा मोह उतरेल. पण तो ध्यानी धरत नाही. नाही तर मोह कधीच उतरला असता. तोंडावर एक पुटकुळी जरी आली तरी चेहरा पाहावासा वाटत नाही. फिरायला जायचे म्हटले तर लगेच विचार करेल, लोक बघतील तर काय म्हणतील? हे सगळे आंबेच आहेत ना? सुरकुत्या पडल्या तर चांगले दिसतात का? या लोकांना मी आंबेच म्हणतो, कारण हे सडतात, ज्यांना सुरकुत्या पडतात ते सगळे आंबेच आहेत! या आंब्यावर जर सुरकुत्या आल्या नाहीत तर ते आंबे कामाचे. पण इथे तर आंबे आणल्याआणल्या त्यांना सुरकुत्या पडू लागतात. हे काका–काकू, नुकतेच लग्न झाले होते तेव्हा ते किती सुंदर दिसत होते पण आता म्हातारे झाल्यावर अजिबात आवडत नाहीत, पण करणार काय? हा तर इंडिया आहे! आंबा ताजा असेल तर सर्व अंग–उपांग सुंदर दिसतात. पण सुरकुत्या पडल्यावर कसा दिसतो? अबुध व्यक्तीला हे चालेल पण बुद्धीमान व्यक्तीची दशा काय होईल? ही तर निव्वळ फसगत आहे! लग्नाच्या वेळी त्याला 'ती' चांगली वाटते पण सुरकुत्या पडल्यावर आवडत नाही, पण हा इंडिया आहे, त्यामुळे निभावून घ्यावे लागते.

ह्या शरीराचे काय आहे? लहानपणी हे जितका आनंद देत होते तेवढेच म्हातारपणी दुःख देते. म्हणतात काय की हे शरीर माझे स्वतःचे, पण स्वतःचे असून सुद्धा दुःख देते. दाताला घासून रोज चमकावितो, रोज मालिश करतो, तरी ते दुखतातच. हे डोळे दुःख देतात, कान दुःख

देतात, सगळे अवयव दु:ख देतात. जे आपले स्वत:चे आहेत तेच दु:ख देतात, असा आहे हा संसार!

## सब सबकी संभालो...

अतिशय फसवणुकीचे हे जग आहे, आणि त्यात तिळभरदेखील स्वत:चे नाही. आपले घर असेल त्याचे भाडे दिले तर ते माझे स्वत:चे घर होऊन जाते. या घरात चिमणी राहत असेल तर काय तिला हे माहीत असते की ह्या घराची मालकी कुणाची आहे? नाही, ती तिथे राहते म्हणून ती तिच्याच मालकीची जागा आहे. त्याच प्रमाणे घरात जर पाल राहत असेल तर तिला पण असेच वाटते की मी माझ्याच मालकीच्या जागेत राहते. हे जग प्रत्येकाच्याच मालकीचे आहे!

भगवंत काय म्हणालेत की, 'सब सबकी संभालो, मैं मेरी फोडता हूं!' काही माणसांची एक टोळी होती. ते सगळे जण आपापली खिचडी शिजवून खात असत. ते सर्वजण एका मैदानात थांबले होते. सगळ्यांनी 3-3 दगड लावून आपापली खिचडी आपापल्या हंडीत शिजायला ठेवली. मग सगळेजण व्यापार करायला गावात निघून गेले. एका माणसाला त्यांनी लक्ष ठेवण्यासाठी मागे ठेवले. संध्याकाळी सगळे जण परत आले. त्यांच्यापैकी एकाला त्याची हंडी सापडेना, त्याला कळेना की ही माझी की ती माझी? या झाडाखालची की त्या झाडाखालची? त्याला वाटले की मी जर दुसऱ्यांची हंडी घेतली तर लोक मला वेडा म्हणतील. म्हणून त्याने एक युक्ती केली. एक मोठा दगड घेतला आणि मोठ्याने ओरडला, *'मैं मेरी हाँडी फोडता हूं, सब सबकी संभालो!'* ('मी माझी हंडी फोडत आहे, सगळ्यांनी आपापली हंडी सांभाळावी.') मग सगळेजण आपली आपली हंडी घ्यायला धावले आणि त्याला त्याची हंडी मिळाली!

म्हणजे स्वत:ची हंडी सांभाळून चालण्यासारखे आहे. हे तर होडीत जमलेले लोक आहेत, आपले आपले गाव आले की ते उतरतील. आणि हा तर म्हणतो, 'माझे यांच्याशिवाय चालणार नाही'. यांच्याशिवाय चालणार नाही. असे कसे? हे तर ऋणानुबंध आहेत. असे कुठपर्यंत

चालेल? ही कसली भानगड? देणे नाही, घेणे नाही, चिमुटभर खाणे आणि उगीचच सगळा गाव डोक्यावर घेऊन हिंडणे! पाय दुखतात तेव्हा कुणी विचारायला सुद्धा येत नाही. आपले पाय आपल्यालाच चोळत बसावे लागतात. हे सगळे रिलेटिव्ह संबंध आहेत हे काय तुम्हाला माहीत नव्हते? रियल असतील तर आपण सर्व काही करू. पण हे तर रिलेटिव्ह संबंध केव्हा फ्रॅक्चर होतील ते सांगता येत नाही. जर रियल संबंध असतील तर वडील गेले, आई गेली तर मुलगा पण त्यांच्याबरोबरच मरेल. पण मुंबईत असे कोणी करते का? नाही, कोणीही मरत नाही. मग आपण आधीच हे सगळे रिलेटिव्ह संबंध आहेत असे समजून घ्यायला नको का? आणि या रिलेटिव्ह संबंधात आग्रह ठेवता कामा नये. रियल असतील तर आम्हीच पकडून बसून राहू. पण जे घटकाभरात तुटणार आहेत अशा संबंधात आग्रह कशासाठी? म्हणून हे सगळे रिलेटिव्ह आहे हे प्रथमच समजून घ्या आणि मग 'मी माझी हंडी फोडतो' असे करा.

ज्याचा विनाश होतो, त्यांना कपडे म्हणतात. हे कपडे आपण दुसऱ्या दिवशी बदलतो आणि 'ते' कपडे साठ-सत्तर वर्षांनी बदलतो. ह्या कपड्यातच 'मी पणा' मानला त्याचेच सारे दु:ख आहे. स्वत:ला स्व:चे 'ज्ञान' झाले नाही म्हणून परक्या वस्तूत भटकत राहिला. 'मी चंदुलाल' आहे असे मानून चंदुलालच्या नावावर व्यापार केला जातो आणि अंतिम स्टेशन आले की स्वत:ला जावे लागते आणि चंदुलाल तर इथेच राहतो! स्वत: केलेला गुंता मात्र सोबत घेऊन जातो. आत्मा प्राप्त करण्याचा मार्ग अतिशय दुर्लभ आहे.

या संसारात तर आतूनच धडाका होतो. 2-2 लाखाच्या फ्लॅटमध्ये राहतात तरी क्षणभरही शांती नाही. कसे जगतात तेच मोठे आश्चर्य आहे. नाही का? पण काय करणार? समुद्रात बुडून मरायचे का? तो पण सरकारी गुन्हाच आहे. सहन केल्याशिवाय पर्यायच नाही ना? रताळी जशी भट्टीत भाजून निघतात तसे सगळे रात्रंदिवस लोक चारीबाजूंने भाजून निघत आहेत. या भट्टीतून पळून जाणार तरी कुठे? 'ज्ञानी पुरुषां'चे

जवळ बसून आग शांत होते, आणि ध्येय साध्य होते. संसार म्हणजे प्रत्यक्ष आग आहे. या आगीत कुणी जळतो तर कुणाला धग लागते! यात कधी सुख असते का? यात जर सुख असते तर चक्रवर्ती राजे तेराशे राण्यांना सोडून पळाले नसते! त्यांचाच तर त्यांना खूप त्रास होता. म्हणून तर ते राज्य, सिंहासन वगैरे सर्व सोडून पळून गेले.

## देवांना पण दुःख?

देवांना लहानपण नसते, आईच्या कुशीतून त्यांना जन्म घ्यावा लागत नाही. तशी दुःखे नसतात, लहानपणची दुःखेही त्यांना नसतात. त्यांना शौचाला जावे लागत नाही. वैराग्य यावे असे कोणतेच कारण त्यांना नसते. त्यांना जन्मापासूनच तारुण्य आणि मरण पण तारुण्यातच! मग त्यांना दुःख कसले असणार? पण देवांनाही स्पर्धेचे खूप दुःख असते. याच्याहून हा मोठा आणि त्याच्याहून तो मोठा! या स्पर्धेतून राग-द्वेष निर्माण होतात. त्याचा त्यांना खूप त्रास असतो, म्हणून तर त्यांना 'ज्ञानी पुरुष' कधी भेटतील अशी तळमळ असते! पण त्यांना मध्येच मृत्यू येत नाही, आयुष्य मध्येच संपत नाही. त्यांना इंद्रिय सुख भरपूर मिळतात, तरी पण त्यांना तेथे तुरुंगवास असल्यासारखे वाटते! तिथे बेचैनी, अशांती, अशी दुःखे असतात.

## कलियुगातील वाळवंटात बागेसारखे सुख

सुख फक्त मोक्षातच असते आणि मोक्षासाठी राग-द्वेष नाही तर अज्ञान दूर करण्याची गरज असते. ज्या फळात सुखाचा रसच नाही, रस आहे पण *शाता-अशाता* (सुख परिणाम, दुःख परिणाम) याचाच रस आहे, आणि त्यात देखील अशाताचाच अपार रस आहे. त्यात सुख कसे असणार? दिवसभर कडू रस पाजतात आणि मग एक पाव शेर गोड रस देतात, त्याऐवजी तर आपण सगळे कडूच प्यावे, नाही का? हे तर आपल्याला मूर्ख बनवतात, हे कसे जमणार? अर्धे सुख असेल आणि अर्धे दुःख असेल, पन्नास-पन्नास टक्के असेल तरी चालेल. तरी आपण इथपर्यंत सांगितले की पंचावन्न टक्के दुःख आणि पंचेचाळीस टक्के

सुख असेल तरीही चालेल. पण इतके म्हटल्यावर दु:ख तर वाढू लागले आणि पाच टक्के सुख व पंच्याण्णव टक्के दु:ख झाले, म्हणजे चटणीएवढेच सुख मिळते. अशा मोहाला आम्ही बळी पडणार नाही. आतमध्ये तर सुख खच्चून भरलेले आहे. जर बाहेरची कसलीही आठवण आली नाही तर हे 'आतील सुख' वर्ततच राहील. या बाहेरच्या आठवणीच सुख हिरावून नेतात.

हा काळच विचित्र आहे. कारले गोड झाले असा हा काळ आहे. इथे तर प्रत्येकात भगवंताचे दर्शन करून पॅकिंगपासून दूर राहणेच इष्ट आहे. जरी कितीही सडलेले पॅकिंग असो पण त्यात भगवंताचे दर्शन करून दूर राहणेच योग्य आहे. हिऱ्याचे पॅकिंग असेल तरी तो देखील उद्या चितेच्या आगीत जळणार आहे. लोक म्हणतात हा देवमाणूस आहे पण तोही एक दिवस चितेतच जळणार आहे. कदाचित त्याला जाळण्यासाठी चंदनाची लाकडे वापरतील. पण मेल्यानंतर त्या देवमाणसाजवळ झोप म्हटले तर कोणी झोपेल का? आत भगवंत बसले होते, ते स्व–पर–प्रकाशक आहेत आणि त्यानेच त्यांचे सौंदर्य होते.

या स्त्रिया केसात फुले का माळत असतील तर शरीराचा दुर्गंध येऊ नये म्हणून. या कलियुगात डोके, शरीर सगळ्यांना वास मारतो, म्हणून त्या फुले घालतात, त्यांचा सुगंध येतो. पूर्वी पद्मिनी स्त्रिया असायच्या, त्या स्वयंपाक घरात जेवण बनवीत असत तर इथे बसल्या त्यांचा सुगंध दरवळत असे. त्याही जेवत होत्या आणि हेही जेवतात. पूर्वी पुरुषांना सुगंध येत नसे पण दुर्गंध तर येतच नसे. आज तर सगळे बांद्र्याच्या खाडीसारखे झाले आहे! जास्तीत जास्त सेंट आणि अत्तर उडवले जात आहे. म्हणजे हे कशासारखे आहे की घाण वास येणारा आंबा सुगंध चोपडून खाण्यासारखे आहे, लोक असे झाले आहेत! भगवंतांनी याला 'अभोग्य भोक्ता' म्हटले आहे. अर्थात जे भोगणे आत्म्यासाठी अयोग्य आहे, त्याचाच तू भोक्ता झालास. भोगण्यासाठी स्वत: जवळ अनंत सुख आहे पण ते तो भोगत नाही. कसे भोगणार?

ही तर सगळीकडे काव-काव चालू आहे, कावळे चारीबाजूंनी ओरडत आहेत आणि दुसरीकडे कोंबडे पण बोलत आहेत.

जो विचारवंत आहे तो तर ध्यानात घेतो की हा संसार मार्ग आराधना करण्यायोग्य आहे की नाही? आराधना करण्यायोग्य नसेल तर ज्ञानी पुरुषांना शोधून त्यांच्याकडून मोक्षमार्ग मिळवून घे. डोक्यावर जेवढे केस आहेत तितके अन्य मार्ग आहेत! पण त्यात मोक्षाची एकच पायवाट आहे आणि फक्त समर्थ ज्ञानी पुरुषच ती पायवाट दाखवू शकतात. मोक्षमार्ग ऑर्नामेंटल नसतो. इतर सर्व मार्ग ऑर्नामेंटल असतात आणि त्या मार्गावर मोठी-मोठी गगनचुंबी हॉटेल्स असतात.

❖❖❖❖❖

# संसरण मार्ग

संसार हा तर संसरण (प्रवाहित होत असलेला) मार्ग आहे. त्यात तर दर मैलावर, दर फर्लांगावर रूपे बदलत असतात. त्या रूपात मनुष्य तन्मयाकार होतो म्हणून त्रास सोसतो. सारा संसार सहजमार्गी आहे, फक्त मनुष्य जन्मातच त्याला दु:खे भोगावी लागतात. हे कावळे, कबुतरे, मासे यांचे कुठे दवाखाने असतात का? त्यांना अंघोळ, धुणे असते का? तरी पण किती सुंदर दिसतात! ते काही साठवतात का? ते सगळे तर देवाचे आश्रित आहेत. केवळ मनुष्य एकटाच निराश्रित आहे. सगळेच, मग ते साधू असोत, संन्यासी असोत किंवा अन्य कोणी असोत. ज्यांना कधी ना कधी असे वाटते की माझे कसे होणार, ते सर्व निराश्रित! जे देवाचा आश्रय घेत नाहीत आणि संग्रह करत राहतात ते सगळे निराश्रित, आणि म्हणून त्यांच्या मागे चिंता-उपाधी असतात.

हा संसार म्हणजे अनंत जन्मांची भटकंती आहे. कुठल्याच जीवाला बंधन आवडत नाही, प्रत्येकालाच मुक्तीची इच्छा असते, पण मुक्तीचा मार्ग सापडलाच नाही तर काय करणार? कोणत्या जन्मात साधू झाले नव्हते? वैष्णव होता तेव्हा आणि जैन होता तेव्हाही साधू झाला होतास, आणि मग साधूपणाचा वीट येतो तेव्हा वाटते यापेक्षा संसारी झालो असतो तर बरे झाले असते! मग पुढच्या जन्मी संसारी बनतो आणि संसारी बनल्यावर बायका-मुलांपासून कंटाळून परत विचार करतो की यापेक्षा तर साधू होणे चांगले! मग पुढच्या जन्मी परत साधू होतो. अशी अनंत जन्म ही भटकंती चालूच आहे! परंतु जर स्वरूपाचे

ज्ञान मिळाले तर मुक्ती मिळेल. पण 'ज्ञानी पुरुष' भेटतील आणि ते सर्व पापे भस्मसात करून देतील, त्यानंतर शुद्ध करतील तेव्हाच 'मी शुद्धात्मा' आहे असे बोलू शकतो. शुद्धात्मा न होताच 'मी शुद्धात्मा आहे' असे बोलू शकत नाही. ते तर केवळ शब्दज्ञान आहे, त्यामुळे उलट दोषच लागेल.

हे अनंत जन्माचे सार आहे. तरी पण अनुभव वाया जात नाहीत. ते कधीना कधी उपयोगी पडतात. एकदा खड्ड्यात पडल्यानंतर जर पुन्हा खड्डा दिसला तर तो अनुभव लगेच सावध करतो. अनुभव उपदेश देऊनच जातो.

यातूनच संधी साधून मोक्ष मिळवायचा आहे. हा देहच जर आपला झाला नाही तर दुसरे कोणी आपले कसे होऊ शकेल? हा देह जर 'ज्ञानीं'च्या कामी आला तर तो आपला, आणि संसाराच्या कामात पडला तर तो धोका आहे! हे सगळे देहाचे नातेवाईक आहेत. आत्म्याचे नातेवाईक कुणीच नाहीत. आत्म्याला नातेवाईक नसतातच. म्हणून ही गोष्ट (प्रथम) समजून घ्यायची आहे. 'वीतरागीं'ना हे समजून चुकले होते की यात 'आपले' काम नाही. त्यांना हा धोका-बिका पसंत नाही. आपल्यालाही हे पूर्ण समजून घेऊन आपले (मोक्षाचे) काम करून घेतले पाहिजे.

जग सहा मूलभूत तत्वांपासून बनले आहे. जग हे सहा तत्वांचे प्रदर्शन आहे. या तत्वांचे निरंतर परिवर्तन होत असते. आणि या तत्वांचे मीलन झाल्यामुळे हा संसार आहे. तत्वे सत् स्वरूपात आहेत. 'सत्' म्हणजे गुण आणि अवस्थासहित असते, ह्या आपल्याला ज्या दिसतात त्या विभाविक अवस्था आहेत, प्राकृत अवस्था उत्पन्न झाल्या आहेत. या विभाविक अवस्थांमुळे भ्रांती उत्पन्न झाली आहे की हा 'मी आहे.' त्यामुळेच हे सर्व उभे राहिले आहे. दुसरे काहीच बिघडले नाही. तत्वांचे मीलन झाल्यामुळे उत्पन्न झाले आहे. जड आणि चेतनच्या संयोग संबंधामुळेच हे सर्व चालत आहे. मात्र जड आणि चेतन हे मिश्रण स्वरूपात आहेत. कंपाउंड स्वरूप झालेले नाहीत.

## ओझे डोक्यावर की घोड्यावर?

एक दिवस मी अचानक एका मित्राकडे गेलो होतो. तो आपल्या बायकोशी बोलत होता. त्याने बायकोला विचारले, 'कोणती भाजी आणली?' बायको म्हणाली 'भेंडी.' मित्राने विचारले, केवढ्याला आणलीस? बायको म्हणाली 'बारा आणे किलो.' मित्र म्हणाला 'एवढी महाग भाजी कशाला आणली? तुला काही अक्कल-बिक्कल आहे की नाही?' मला हे सगळे ऐकू आले. मी त्याला म्हणालो, 'कशाला डोक्यावर दोन मणाचे ओझे घेऊन फिरत आहेस?' एरंडेल तेल प्यायलासारखे तुझे तोंड झाले आहे! एवढे कशासाठी? बारा आण्याची भाजी घेतली त्याचे संसाराचे ओझे संसाररूपी घोड्यावरच ठेवायचे असते ते डोक्यावर कशाला घेतोस? डोक्यावर घेतले तरी ते शेवटी घोड्यावरच जाणार आहे. आपण डोक्यावर घेऊ नये. आपण त्यास डोक्यावर घेतो म्हणूनच आपले तोंड एरंडेल प्यायल्यासारखे दिसते. आणि घोड्याचे तोंडही एरंडेल प्यायल्यासारखे दिसते.

एक भाऊ होते. ते आपल्या तट्टूवर बसून चालले होते. ते तट्टू होते बिचारे लहान आणि कमजोर आणि हे भाऊ चांगले वजनदार, त्यामुळे त्या बिचाऱ्याची कमर त्यांच्या वजनामुळे वाकली होती. असेच चालता-चालता त्यांना वाटेत खानसाहेब भेटले. ते म्हणाले हे छान हिरवे गवत आहे ते तुमच्या घोड्यासाठी घेऊन जा ना! यांना मोह सुटला. फुकटात चांगले मणभर गवत मिळत आहे! पण मग त्यांना वाटले या आपल्या घोड्याला हे वजन कसे काय झेपणार? पण त्यांची बुद्धी बेताचीच होती. त्यांनी विचार केला की मी गवत माझ्या डोक्यावर घेईन मग त्या घोड्याला थोडेच उचलावे लागणार आहे! म्हणून त्यांनी गवत डोक्यावर घेतले आणि ते घोड्यावर बसून चालू लागले! वाटेत एका वाण्याने त्यांना बघितले. तो त्यांना म्हणाला, 'अरे बाबा, तू गवत डोक्यावर घेतले आहेस खरे पण त्याचा भार शेवटी घोड्यावरच पडत आहे. म्हणून तुम्हा दोघांची तोंडे एरंडेल प्यायल्यासारखी झाली आहेत!'

संसार हा असा घोड्यासारखा आहे. संसारी माणूस हा घोडेस्वारासारखा आहे. घोड्याला कमजोर समजून स्वार घाबरत घाबरत घोड्यावर बसतो, घोड्याला त्रास कमी व्हावा म्हणून. पण हे गणित चुकीचे आहे. शेवटी सगळा भार घोड्यावरच पडत आहे. त्याच प्रमाणे तुम्ही तुमचा सगळा भार संसाररूपी घोड्यावरच टाका. त्या घोड्यावर बसताना घाबरत-घाबरत बसू नका. घाबरत-घाबरत जगू नका. 'स्वतः क्षेत्रज्ञ पुरुष' आहे पण तो 'पर क्षेत्रात' बसला आहे! सगळे जगच मूर्खासारखे वागत आहे. फक्त 'वीतरागीं'नाच समजते की सांसारिक चिंतेचा बोजा डोक्यावर का घ्यायचा? तो तर शेवटी घोड्यावरच जातो. वीतरागांना गणित पक्के समजते! (मोक्षाचे गणित छान समजते) म्हणून त्यांना हे जमले आणि साधे अंकगणित जाणणारे भटकत राहिले.

❖❖❖❖❖

# संसारवृक्ष

कवी काय गातात : 'अहा! अक्रम ज्ञान कदी ना सुणियुं, एणे खोदियुं, धोरी वृक्ष मुळीयुं!'

(अक्रम ज्ञान यापूर्वी कधीच ऐकले नव्हते, त्याने उपटून टाकले संसार वृक्षाचे मुख्य मूळ!)

हा संसार म्हणजे एक वृक्ष आहे. अनंतकाळापासून हा वृक्ष वाळत नाही, लोक पाने कापून झाडाला वाळवायचे प्रयत्न करतात. पण नवीन पाने परत परत फुटतात. काही धर्मवाले म्हणतात की पाने कापून टाकू म्हणजे मग वृक्ष वाळत जाईल पण पाने तर परत उगवतातच. कित्येक म्हणतात की मोठ्या मोठ्या फांद्या कापून टाकल्या तर वृक्ष वाळत जाईल. पण तसे केले तरी वृक्ष वाळत नाही. फांद्या पुन्हा उगवतात. काही लोक तर म्हणतात हा बुंधाच कापून टाकू. तसे केले तरी पण बुंध्यातून परत झाड उगवते. संसाररूपी वृक्षाला निर्मूळ करण्याचा हा खरा उपाय नाही. हा संसारवृक्ष कशामुळे उत्पन्न झाला आहे? या झाडाला भरपूर मुळे असतात पण ती सगळी मुळे झाडाला जमिनीवर धरून ठेवण्यासाठी असतात पण एक मूळ असे असते की जे आहार-पाणी घेण्यासाठी असते, त्याला मुख्य मूळ म्हणतात. फक्त ज्ञानी पुरुषांनाच संसारवृक्षाच्या या मुख्य मुळाची ओळख असते. ते त्या मुळात एक भोक पाडून त्यात औषध टाकतात! बस, ज्ञानी पुरुष फक्त एवढेच करतात. बाकी काहीच करत नाहीत. पानांना, फांद्यांना, बुंध्याला की अन्य मुळांना हात सुद्धा

लावत नाहीत. फक्त एका मुख्य मुळात औषध घट्ट ठासून भरतात त्यामुळे मग संसारवृक्ष आपोआप वाळायला लागतो. नंतर मात्र नवीन पान फुटत नाही.

संसार अगदी उद्धटपणे वापरण्यासाठी नाही. परंतु त्याचा हिशोब ठेवायला हवा. हिशोबात कोणत्या खात्यात तोटा आहे कोणत्या खात्यात संसारसुख आहे, ते पण शोधले पाहिजे. व्यापारात खातेवही ठेवतात पण संसारात ठेवत नाहीत.

❖❖❖❖❖

# सत्‌देवः सद्‌गुरु आणि सत्‌धर्म

सत्‌देव, सद्‌गुरु आणि सत्‌धर्म

सत्‌देव, सद्‌गुरु आणि सत्‌धर्म असे म्हटले जाते, तर वास्तवात ते कोण आहेत?

सत्‌देव म्हणजे कोण? सत्‌देव म्हणजे जिनालयात किंवा देवळात असतात ते नाही, ते तुमच्या आतच असतात. परंतु जोपर्यंत हे 'आतील' सत्‌देव भेटत नाहीत तोपर्यंत या जिनालय किंवा देवळातील मूर्ती याच सत्‌देव.

सद्‌गुरु म्हणजे कोण? अंतिम गुरु ते 'ज्ञानी पुरुष' आहेत परंतु जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' भेटत नाहीत तोपर्यंत जे कोणी जप-तप करायला सांगतात, थोडे फार समजावतात, ते सद्‌गुरु. आणि आपल्या इथे, 'या' मार्गात सत्‌देव, सद्‌गुरु आणि सत्‌धर्म हे वेगळेच आहेत. सत्‌देव तर 'आतील' जे सत् आहे तेच सत्‌देव. ते तात्काळ फळ देतात, एकदम कॅश (रोख), उधार नाही. आयुष्यभर धर्म केला पण जरा सुद्धा चैन मिळाले नाही की मन:शांती लाभली नाही. आतमध्ये अंतरदाह होतच राहतो. पण आमच्याकडे मात्र वेगळाच प्रकार आहे. जितके पिता येईल तितका लाभ होईल.

धर्म तर पुष्कळ मिळू शकतात पण ज्ञानी मिळत नाहीत आणि तोपर्यंत सुटका होत नाही, भटकतच राहावे लागते. सत्‌धर्म आणि सद्‌गुरु

जोपर्यंत भेटत नाहीत तोपर्यंत सत्‌देव हजर होत नाहीत, आणि तोपर्यंत कषाय दु:ख देतच राहतात.

संसाराचा मार्ग रिलेटिव्ह आहे. त्यात व्यवहार आणि फक्त व्यवहारच असतो. भ्रांतीत असलेल्या लोकांना भगवंतांनी सांगितले की 'सत्‌देव, सद्‌गुरु आणि सत्‌धर्म यांची स्थापना करा.' जोपर्यंत ज्ञानी पुरुष भेटत नाहीत तोपर्यंत व्यवहार आहे. तोपर्यंत या रिलेटिव्ह सत्‌देवाची स्थापन करावी लागते.

**प्रश्नकर्ता :** रिलेटिव्ह सत्‌देव म्हणजे काय? मूर्ती?

**दादाश्री :** हो, मूर्तीची स्थापना म्हणजे आरोपित भाव. म्हणजे आपणही आरोपित, ते पण आरोपित आणि धर्मही आरोपित! तिन्ही आरोपित. आपल्याकडे 'आत्मा' तोच दरअसल (खरा, अस्सल) सत्‌देव आहे. 'ज्ञानी पुरुष' यांची जी वाणी निघाली आहे तो दरअसल सत्‌धर्म आहे आणि 'ज्ञानी पुरुष' हेच दरअसल सद्‌गुरु आहेत. हे तिघेही दरअसल आहेत, याउलट ते तिन्ही लौकिक आहेत. लौकिकाचे फळ काय? तर त्यामुळे पुण्य मिळते आणि हळूहळू पुढे जातो. आणि ही खरी वस्तू, अलौकिक सत्‌देव, सद्‌गुरु आणि सत्‌धर्म, त्यामुळे मोक्ष मिळतो. नाही तर सत्‌देव भेटल्यानंतर भटकायला का लागावे? मग खरी गोष्ट काय आहे? तर सत्‌देव भेटलेत पण ते आरोपित सत्‌देव भेटले आहेत खरे सत्‌देव भेटले नाहीत. आरोपितचा अर्थ काय? तर महावीर आहेत पण ते मूर्तीवाले आरोपित आहेत. उलट खरे सत्‌देव तर आतील 'शुद्धात्मा'च आहेत. 'शुद्धात्मा' तेच सत्‌देव आहेत. शुद्धात्मा हेच यथार्थ महावीर आहेत. पण 'शुद्धात्म्या'चे लक्ष्य तर बसले परंतु जोपर्यंत ते अनुभवात येत नाही तोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' हाच स्वत:चा आत्मा आहे.

सत्‌धर्म, तो शास्त्रातील नसावा, ज्ञानी पुरुषांच्या मुखाने सांगितलेला असावा. सत्‌धर्म, सत्‌देव आणि सद्‌गुरु, हे खरे असतील तेव्हाच मोक्ष होईल. पण दरअसल मिळाले नाहीत तर नकली ठेवा. खरे मोती मिळाले नाहीत तर कल्चर्ड मोती वापरा, पण मोती वापरा!

वीतरागीं सत्देव, सद्गुरु आणि सत्धर्म असे म्हटले, म्हणून आपले आचार्य, महाराज वगैरे सर्वांनी असेच मानून घेतले की महावीर देव, तेच सत्देव आहेत आणि शास्त्रानुसार आपण जे काही करतो, तोच सत्धर्म आहे. पण त्यांच्या हे लक्षात येत नाही की मूर्ती तर आरोपित आहे, खरे महावीर नव्हेत! आणि महाराज, तुम्ही देखील आरोपित आहात. म्हणजे गुरु पण आरोपित, देव पण आरोपित आणि धर्म पण आरोपित! पुस्तकात लिहिल्यानंतर त्यास आरोपित धर्म म्हटला जातो आणि 'ज्ञानी पुरुषांचे' प्रत्यक्ष ऐकतो त्यास सत्धर्म म्हटला जातो. 'ज्ञानी पुरुषांना'च सद्गुरु म्हटले जाते आणि ते कसे असतात? तर समोरच्या व्यक्तीला त्याचा 'शुद्धात्मा' प्राप्त करवून देतात, असे असतात. आणि शुद्धात्म्यालाच सत्देव म्हणतात आणि 'ज्ञानी पुरुषां'च्या तोंडून जी वाक्ये निघतात तेवढी वाक्ये म्हणजे सत्धर्म! जो मोक्ष देतो तोच सत्धर्म! बाकी सगळे तर आरोपित धर्म म्हटले जातात. सत्धर्म कसा असतो? तो सत् आणि असत् यांना कायम वेगळेच ठेवतो. आरोपित धर्मात तर शुभाशुभ असते. असे करा, व तसे करा, जप करा, तप करा, अमुक करा, तमुक करा वगैरे. आम्ही जर विचारले की, 'आरोपित कशासाठी करवून घेता? आत्म्याचे करवून घ्या की.' त्यावर ते म्हणतात, 'आत्म्याचे तर आत्मा प्राप्त झाल्यानंतरच करायचे असते. सध्या तर हेच करा.' असे म्हणतात.

तर आपण विचारावे, 'हे सत्देव आहेत का?' अरे बाबा, हे सत्देव नव्हेतच. हे सगळे जण या आरोपित देवालाच सत्देव मानून चाललेत! पूर्ण गोष्टच आरोपित आहे.

सच्चे सत्देव, सत्धर्म आणि सद्गुरु मिळाले की काम झालेच समजा! फक्त एक तास जरी लाभले तरी काम होऊन जाईल. एक तास जर सत्देव, सद्गुरु आणि सत्धर्म ह्या तिन्ही वस्तू मिळाल्या तर थेट मोक्षापर्यंतचे काम होऊन जाते.

❖❖❖❖❖

## मूर्ती धर्म : अमूर्त धर्म

**प्रश्नकर्ता :** आत्मा जागृत करण्यासाठी मूर्तीची गरज आहे का?

**दादाश्री :** मूर्तीची खूपच गरज आहे. भगवंतांनी स्पष्ट म्हटले आहे की, सत्‌देव, सत्‌धर्म आणि सद्‌गुरूंची गरज आहे. परंतु जोपर्यंत समकित प्राप्त झाले नाही, खरे सत्‌देव, सत्‌धर्म आणि सद्‌गुरु प्राप्त झाले नाहीत तोपर्यंत व्यवहारीक देवाची आवश्यकता आहे. 'स्वरूप ज्ञान' झाल्यानंतर निश्चयाच्या देवाची गरज आहे. मग जर कोणी म्हणाला की देवाची गरज नाही, तर ते बरोबर नाही. व्यवहाराचे देव मूर्तीस्वरूप आहेत, निश्चयाचे देव अमूर्त आहेत.

**प्रश्नकर्ता :** मूर्ती आत्म्याचे कल्याण करू शकत नाही का?

**दादाश्री :** जोपर्यंत आत्म्याचे भान झाले नाही, तोपर्यंत मूर्तीच्या मागे लागा. ती मूर्ती समकितपर्यंत घेऊन जाईल. मूर्तीची हेटाळणी करू नका. कारण त्या वीतरागींच्या नावावर आहेत. त्यात वीतारागींची स्थापना केलेली आहे आणि त्या मूर्तीच्या मागे शासन देवी-देवतांचे सामर्थ्य आहे.

एका संप्रदायाचे महाराज मला भेटले होते. त्यांना मी म्हणालो 'महाराज, एक गोष्ट विचारू का? तुम्हाला आवडेल? तुम्हाला आवडणार नाही असे विचारलेले चालेल का? तुम्ही त्यागी झाला आहात तर नावडती गोष्ट ऐकण्याची शक्ती तुमच्यात निर्माण झाली आहे ना?' तेव्हा महाराज म्हणाले, 'विचारा ना, विचारायला काहीच हरकत नाही.' मग मी त्यांना विचारले, 'महाराज ही मुहपत्ती (मुखपट्टी) कशासाठी ठेवली आहे? ही

कषाय संपल्या नंतरची क्रिया आहे, आणि ही तर सहज क्रिया आहे. आणि कषाय गेल्यावर तर तुम्ही मूर्ती पण सोडू शकता. तुम्ही मूर्तीला जड म्हणता. पण मूर्तीला जड म्हणू शकत नाही. तुम्ही सर्व देखील जडच आहात ना? चेतन जाणले नाही, चेतन ओळखले नाही. तर मग राहिले काय? तुम्ही चेतन कुठे पाहिले आहे? ते तुम्ही मला सांगा. अमूर्ताला जोपर्यंत तुम्ही ओळखत नाही तोपर्यंत तुम्ही पण मूर्तीच आहात! हा नवकार मंत्र पण मूर्तीच आहे आणि तुम्ही पण मूर्तीच आहात.' हे बोलत आहात ते मूर्तीच आहे आणि तुम्ही सुद्धा मूर्तीच आहात.

मूर्ती हे परोक्ष प्रमाण आहे. परोक्ष भक्ती आहे. जोपर्यंत तुम्ही मूर्तीतच बसला आहात तोपर्यंत मूर्तीचीच पूजा करा. अमूर्त प्राप्त झालेले नाही तोपर्यंत मूर्तीला जड म्हणू शकत नाही. मूर्तीला जड म्हणणारा अजून या जगात कोणी जन्माला आलेलाच नाही. फक्त मुस्लिमच असे म्हणू शकतात, पण ते देखील पैगंबर साहेब किंवा दुसऱ्या सगळ्या कबरींची पूजा करतात. कबर ही पण एक मूर्तीच आहे ना? कबरींना पण मूर्तीच म्हणावे लागेल. ज्या ज्या गोष्टी डोळ्यांना दिसतात त्या सर्व गोष्टी म्हणजे मूर्तीच. मुस्लिम मूर्ती ठेवत नाहीत पण गवाक्ष ठेवतात, ती पण मूर्तीच आहे ना! जगात जे मूर्त आहे ते सर्व डोळ्यांना दिसते. अमूर्त दिसत नाही.

महाराजांना विचारले, 'तुम्हाला चेतन कुठे दिसते की तुम्ही या मूर्तीला जड म्हणता? तुम्हाला माझ्या बोलण्याचा राग येत असेल तर मी थांबतो.' तेव्हा महाराज म्हणाले, 'नाही, राग येत नाही. पण आमचा सिद्धांत आम्ही हा असा ठेवला आहे!' तेव्हा मी म्हणालो 'महाराज, तुमचा सिद्धांत तुमच्या जवळ ठेवा, पण लोकांना असा उपदेश का देता? तुमचा सिद्धांत आहे तर तो तुम्ही स्वतंत्रपणे तुमच्याजवळ ठेवा, पण लोकांना उपदेश का देता? लोकांना योग्य मार्गाला लागू द्या. अनंत चौविश्या (चोवीस तीर्थंकर) होऊन गेल्या तरी पण मूर्त्या ठेवल्याच होत्या, प्रथम पासूनच. कारण बालजीव कोठे जातील? मूर्ती बालजीवांसाठी आहे. ज्यांना समज नाही अशा बालजीवांसाठी आहे, ज्ञानजीवांसाठी

नाही. मूर्तीमुळे तर चित्त एकाग्र होते. मूर्ती वीतराग भगवंतांची आहे आणि ती लोकमान्य आहे. शिवाय त्यांच्या मागे त्यांच्या शासन देवतांचे जबरदस्त बळ आहे. त्या शासन देवता रक्षणकर्ता आहेत. त्यामुळे त्यांना नावे ठेवण्यासारखे नाही. त्यांच्यात भगवंतांची स्थापना केली आहे.' मग जरी एखाद्याने महावीरांचे नाव घेतले तरी खूप आहे. कारण शेवटी ते वीतराग भगवंतांचे नाव आहे. एखाद्या माणसाचे नाव घेण्यापेक्षा भगवंतांचे नाव घेणे हे चांगलेच आहे ना? नावाबरोबर भगवंत कोण आहेत, कसे आहेत ते पण त्याला समजते. पूर्वीच्या विचित्र काळामुळे लोकांचे गुरुंप्रति महात्म्य कमी होत चालले होते आणि मूर्तीचे महात्म्य वाढत चालले होते. म्हणून एक आचार्य महाराज गुरुंचे महात्म्य पटविण्यासाठी लोकांना समजावू लागले की ज्या लोकांची मूर्तीमध्ये एकाग्रता साधू लागली आहे ते (मूर्ती) स्थापनेत राहिले तरी चालेल पण त्यांनी गुरुंपाशी येऊन राहावे. परंतु इथे तर मूर्तीपूजा पूर्णपणे गायबच झाली आणि फक्त गुरु पूजनेचाच धार्मिक पंथ तयार झाला.

'अरे बघा! यांनी जडाची (मूर्तीची) शोभायात्रा काढली,' असे म्हणणे योग्य आहे का? ज्या मूर्तीवर लोकांचा जबरदस्त पूज्यभाव आहे त्या मूर्तीचा तिरस्कार करणे योग्य आहे का? गुरुंप्रती जागृती राहावी म्हणून तुम्हाला मूर्ती बाजूला करावी लागली. पण ज्यांची अजून मूर्तीवर सुद्धा एकाग्रता झाली नाही त्यांच्यासाठी तर मूर्तीच योग्य आहे. ज्यानी अमूर्त अजून जाणलेच नाही, अमूर्त पाहिलेच नाही, अमूर्त ऐकलेही नाही, अमूर्तचे ज्यांना भानही नाही असे लोक कुठे जातील? ते बालजीव कुठे जातील?

महाराज, आपण या मूर्तीला जड असे म्हणता, मग तुम्ही पाहिले असेल असे एक तरी चेतन मला दाखवा. तुम्ही चेतन कुठे पाहिले आहे की तुम्ही मूर्तीला जड म्हणत आहात? तुम्ही स्वत:च जड आहात ना? तुम्ही स्वत:च मेकॅनिकल आत्मा आहात!

महाराज म्हणाले : गुरु, त्यांना तर चेतनच म्हणायचे ना?

मी म्हणालो : नाही, या पंचेंद्रियांद्वारे जे काही दिसते, जे ऐकू

येते, ते सगळे अचेतनच आहे. तुम्ही नवकार मंत्र म्हणता तो मंत्र पण मूर्तीच आहे ना? या वीतराग भगवंतांच्या मूर्तीवर तर लोकांचा फार उत्कट भाव आहे! म्हणून मूर्तीकडे द्वेषाने पाहू नका.

महाराज म्हणाले : पण आमचा सिद्धांत मूर्तीला मानत नाही.

मी म्हणालो, महाराज जरा विचार करा. माझे बोलणे चुकत असेल तर मी ते स्वीकारतो. माझ्या बोलण्यामुळे तुम्हाला दुःख होत असेल तर मी तुमचे प्रतिक्रमण करतो, पण जरा तरी विचार करा. या बालजीवांना आता तरी मोकळे सोडा. तुम्हाला जसे योग्य वाटते तसे तुम्ही करा. स्थानकवासी कोणाला म्हणायचे? तर ज्याला 'इथे' (दोन भुवयांच्या मध्यभागी) मूर्ती धारण झालेली असेल, मानसिक धारणा झालेली असेल तरच त्याला स्थानकवासी म्हणायचे!

महाराज म्हणाले : 'तुम्ही म्हणता ते मला मान्य नाही.'

मी म्हणालो : 'महाराज, माझे म्हणणे तुम्हाला कसे काय मान्य होईल? माझे बोलणे चुकीचे आहे असे तुम्हाला वाटते हे मी पण कबूल करतो. कारण एखादी व्यक्ती जी गोष्ट करत असते ती गोष्ट त्याला योग्यच वाटते. खाटिकाला देखील तो जे करतो त्यात पाप आहे असे वाटत नाही. कारण जे कार्य करतो त्याचे आवरण येते आणि त्यात सत्-असत्चा विवेक राहत नाही. मग काय होणार? एकदा सत्-असत् याचा विवेक निघून गेला की मग काहीही केले तरी, लाखो जन्मानंतर देखील सत्य समजणार नाही.' या संप्रदायाच्या महाराजांना मी विनंती करून सांगतो की, 'महाराज, तुम्हाला वाईट वाटले तर मला शिव्या द्या, पण तुम्ही मोक्ष मिळवण्यासाठी हे तप करत आहात का?'

महाराज : हो अर्थातच, नाही तर कशासाठी?

मी म्हणालो : 'भगवंतांनी म्हटले आहे की मोक्षाला जाण्यासाठी केलेले तप हे अदीठ (न दिसणारे) तप असते, ते कोणाला दिसू शकत नाही. तुमचे तप तर व्यायामशाळेसारखे आहे. तर काय तुम्ही व्यायाम करता का? मोक्षाला जाण्यासाठी अशा तपाची गरज नाही.' भगवंतानी असे तप

करण्यास मनाई केली आहे. भगवंतांनी म्हटले आहे, जोपर्यंत देह सहज होत नाही तोपर्यंत सहज आत्मा मिळू शकत नाही. जेव्हा देह सहज होईल किंवा आत्मा सहज होईल, म्हणजेच देह आणि आत्मा या दोघांपैकी एक जेव्हा सहज होईल तेव्हा दोन्ही पण सहज होतील, तेव्हा काम होईल.

या लोकांनी मूर्ती का नाकारली? तर मूर्तीपूजा केल्यामुळे *प्रमाद* (तन्मयता, अजागृतपणा) येतो. कारण मूर्ती रागावत नाही ना? मूर्ती असे विचारत नाही की तुम्ही सामायिक का केले नाही? आणि गुरु तर रागावतीलसुद्धा. पण इथे तर अनर्थ झाला आणि हे मूर्तीला जड म्हणू लागले! मूर्ती, देऊळ सगळ्यांचीच गरज आहे. जोपर्यंत अमूर्त मिळत नाही तोपर्यंत ही दोरी सोडायची नसते. हे तर भारताचे सायन्स आहे. मूर्ती असली की देऊळ बनते आणि देऊळ बनले की त्याला पुजारी-बिजारी सर्व काही मिळते.

भगवंतांनी म्हटले आहे जोपर्यंत रौद्रध्यान आणि आर्तध्यान होत असेल तोपर्यंत मूर्तीचे दर्शन करा. कारण तोपर्यंत अमूर्ताचे दर्शन होऊ शकत नाही. अमूर्त अशा भगवंताचे दर्शन, शुद्धात्म्याचे दर्शन तोपर्यंत होऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण ही मूर्ती तर दगड आहे, त्याचे दर्शन घेऊन काय मिळणार?

**दादाश्री :** पण इतर लोकांसाठी तर ती कामाची आहे ना? भगवंतांनी एकांतिक दृष्टी ठेवू नका असे म्हटले आहे. सामुदायिक दृष्टी ठेवा. अनेकांत दृष्टी म्हणजे एखादा लहान मुलगा जर नागडा फिरत असेल तर त्याला कोणी रागावणार नाही पण पन्नास वर्षाचा माणूस जर नागडा हिंडू लागला तर लोक त्याला रागावतील. अशा वेळी तो पन्नास वर्षाचा माणूस जर म्हणाला की, 'मला का रागावतात? त्या मुलाला का रागवत नाही?' तेव्हा आम्ही त्याला म्हणू 'अरे बाबा, तुमचे वय जास्त आहे. ह्या लहान मुलाच्या वयाप्रमाणे त्याचा धर्म (वागणे) ठीक आहे. पण तुमच्या वयानुसार तुमचा धर्म चुकीचा आहे.' अशाप्रकारे सगळ्यांना सामुदायिकपणे पाहाणे आवश्यक आहे.

कबीर साहेब मुस्लिम मोहल्ल्यात मशिदीजवळ राहत होते. तिथे मुस्लिम लोक बांग देत असत, कानात असे बोटे घालून हाक मारतात की नाही? त्याला काय म्हणतात? बांग. आता कबीर साहेब तर फार जागृत होते. ते त्या लोकांना म्हणाले, 'अरे अल्लाह काय बहिरा आहे का? मग इतक्या जोरजोरात ओरडायची काय गरज आहे? त्याला सगळेच ऐकू येते. मुंगीच्या पायाला घुंगरू बांधले तरी त्याला ऐकू येईल. मग तुम्ही एवढ्या मोठ्याने का किंचाळता? माझ्या कानांना खूप त्रास होतो.' मग 'आमच्या देवावर, आमच्या धर्मावर टीका का करतोस?' असे म्हणत मुस्लिम लोकांनी कबीर साहेबांना खूप मारले.

आता कबीर साहेबांनी जर मला विचारले असते, की, 'हे तर चुकीचे करत आहेत, आणि तरी मलाच का मारत आहेत?' तर मी सांगितले असते की, ते करत आहेत ते बरोबर आहे. चूक तुमचीच आहे. समोरच्याचा व्ह्यू पॉइंट (दृष्टीकोन) समजून त्याच्याशी बोला. समोरच्याच्या व्ह्यू पॉइंट समजल्याशिवाय बोलणे आणि सगळ्यांना एकच मापदंड लावणे हा भयंकर गुन्हा आहे. सर्वांना समान दृष्टीने मानणे म्हणजे जशी माझी दृष्टी आहे तशीच त्यांची असेल, असे मानणे, हा गुन्हा आहे. मग मी कबीर साहेबांना समजावले असते, की हे लोक जेवढ्या मोठ्याने बोलतील तेवढ्या प्रमाणात (त्यांचा) आतील पडदा फाटेल आणि मग आतमधील अल्लाह ऐकतील. त्यांचे आवरण खूपच जाड आहे आणि तुमचे एकदम पातळ तलम कापडासारखे आहे. म्हणून तुम्ही मनात बोललात तरी (अल्लाहला) पोहचते. आणि यांचे आवरण इतके जाड आहे की त्यांनी जेवढ्या मोठ्याने बोलता येईल तेवढे त्यांनी बोलले पाहिजे. हे सगळे त्यांच्यासाठी बरोबर आहे, करेक्ट आहे. आणि जर ख्रिश्चन लोकांनी अशी बांग दिली तर त्यांचे सगळे बिघडेल. त्यांना तर एकदम शांती हवी असते. अजिबात बोलायचे नाही, एक शब्द पण नाही. प्रत्येकाची भाषा वेगवेगळी असते. म्हणजे ते आपापल्या भाषेत बोलत असतात आणि आपण त्यांना काही सांगितले तर आमची पण दशा कबीर साहेबांसारखीच होईल! ज्यांना अनेकांतवाद समजत नाही त्यांची दशा कबीर साहेबांसारखी होते. स्वत:, स्वत:च्या चुकांमुळे मार खातात.

कबीर साहेब खूप जागृत व्यक्ती होते. भक्त तर खूप होऊन गेले आहेत, पण त्यात कबीरजी अतिशय जागृत होते. असे पाच-सात भक्तच झाले असतील की जे कबीर साहेबांएवढे जागृत होते, अत्यंत जागृत होते. कबीर मोक्षाच्या अगदी जवळ होते, पण त्यांना फक्त मोक्षमार्ग मिळाला नाही, म्हणून ते अडकून राहिले. त्यांना मार्ग मिळाला नाही, त्यांना जर मार्ग मिळाला असता तर त्यांनी महान आश्चर्य घडवून आणले असते! असे होते ते!

कबीरांच्या वेळी गावात ब्राह्मण यज्ञ करीत होते. त्यांनी यज्ञात बळी द्यायला बकरा आणला होता. कबीरांनी ते पाहिले आणि ते ब्राह्मणाला म्हणाले, 'तुम्ही हा बकरा इथे का उभा केला आहे?' तेव्हा ब्राह्मण कबीरांना म्हणाले, 'तू इथे कशाला आला आहेस? चालता हो इथून. तुला त्याचे काय करायचे आहे?' तेव्हा इथे काय चालले आहे ते कबीर समजून गेले आणि ते म्हणाले, 'हा बकरा चांगला आहे, जिवंत आहे, त्याला तुम्ही बळी का बरे देत आहात? त्याला किती यातना होतील?' तेव्हा ब्राह्मण म्हणाले, 'याला यज्ञात बळी दिले की, तो स्वर्गात जाईल!' तेव्हा कबीर फटकन् म्हणाले, 'या बकऱ्याला का स्वर्गात पाठवीत आहात? त्याऐवजी तुमचे वडील तर म्हातारेच झाले आहेत, मग त्यांनाच यज्ञात बळी द्या ना, म्हणजे त्यांना स्वर्ग मिळेल!' किती डोके भडकवणारे वाक्य आहे हे! त्या ब्राह्मणांनी त्यांना खूप मारले, म्हणजे ते जिथे जात तिथे मार खात. भगवंतांचा अनेकांतवाद न समजता बोलतात ते सगळीकडे मारच खातात! एरवी पाहता कबीरांसारखा भक्त तर कुणी झालाच नाही! अतिशय श्रेष्ठ! ज्यांनी जगाची स्पृहाच सोडली होती. जगातील कोणत्याच गोष्टींची त्यांना स्पृहा उरली नव्हती, असे निस्पृह झाले होते.

इंग्रज चर्चमध्ये शांत उभे राहतात ते पण करेक्ट (बरोबर) आहे. मुस्लिम मोठ्याने बांग देतात ते पण करेक्ट आहे. हिंदू मनातल्या मनात हळूहळू बोलतात ते सुद्धा करेक्ट आहे. एखादा हिंदू अजिबात बोलत नसेल, जडासारखा असेल तर त्याला म्हणावे, 'की जरा जोरात बोल.'

जैन पण जडासारखा असेल तर त्याला म्हणावे 'अरे, नवकार मंत्र मनातल्या मनात काय म्हणतो आहेस? जरा जोरात बोल म्हणजे इकडे पण आवाज येईल. आत घंटा वाजेल असे बोल.' म्हणजे प्रत्येकाचे औषध निरनिराळे असते. प्रत्येक माणसाला वेगवेगळे रोग असतात आणि त्यासाठी निरनिराळी औषधे असतात. जीवमात्राला वेगवेगळे रोग असतात. तुम्ही म्हणाल 'दादा, या सगळ्यांना ओकारीचे औषध द्या,' तर तसे कसे चालेल? अर्थात जग हे असे आहे, म्हणून भगवंतांनी अनेकांत सांगितला आहे, स्याद्‌वाद की ज्यामुळे कोणत्याही जीवाशी मतभेद राहत नाही.

**प्रश्नकर्ता :** मंदिरात घंटा ठेवण्याचा उद्देश काय?

**दादाश्री :** मूर्तीला घंटेची आवश्यकता नाही. दर्शन करायला आलेल्या व्यक्तीचे चित्त एकाग्र होण्यासाठी घंटा आहे. बाहेरचा कोलाहल ऐकू येऊ नये हा उद्देश आहे. धूप, अगरबत्ती वगैरे गोष्टीसुद्धा एकध्यान होण्यासाठीच असतात.

## जिनमुद्रा

वीतरागी काय म्हणतात? आम्ही काहीच स्वीकार करत नाही आणि तू जे देशील ते तुलाच रिटर्न वीथ थॅन्कस (साभार परत). तू चार आणे टाकशील तर त्याच्या अनेक पटीने तुला मिळेल. फुले वाहलीस तर त्याच्या अनेक पट फुले तुला मिळतील. आणि शिव्या देशील तर त्यासुद्धा तुला अनेक पटीने मिळतील. तू एकदा वीतरागींसाठी मन-वचन-कायेची एकता करून खर्च करून बघ तरी! या वीतरागींचीच मूर्ती फक्त अशी असते, बाकी कोणाची अशी मूर्ती पाहिली आहे का? ही तर वीतरागमुद्रा म्हटली जाते. जशी ज्यांची मूर्ती तशी त्यांची डेव्हलपमेंट (प्रगती)!

वीतराग भगवंतांची मूर्ती काय सांगते? तुला जर मोक्ष हवा असेल तर हा एक जन्म असा हात-पाय बांधून बसून रहा, म्हणजे सगळी मशिनरी बंद करून बसून रहा, तरी पण तुझे सर्व काही सुरळीत चालेल असे आहे!

मूर्तीत पाहण्यासारखे काय आहे? दगड पाहण्यासारखा आहे? डोळे पाहण्यासारखे आहेत? हे तर आंतरिक भाव बसवण्यासाठी आहे की, ही महावीर भगवंतांची मूर्ती आहे! कसे होते ते महावीर! कसे वीतरागी! सध्या तर आंतरिक भाव होत नाहीत म्हणून मग मूर्तीवर आंगी (श्रृंगार) करतात. त्या सुंदर आंगीमुळेच चित्त एकाग्र होते. तरी देखील चित्त एकाग्र झाले नाही तर घंटा वाजवतात, त्यामुळे बाहेर कुणी गाणी गात असेल किंवा भांडत असेल, तरी तिथे चित्त जात नाही. आणि मग धूप करतात, त्या सुगंधात तन्मयाकार राहतात. कुठल्या ना कुठल्या प्रकारे पंचेंद्रियांना एकाग्र ठेवतात. अगदी सेकंदाचा लहानाहून लहान भाग जरी एकाग्र राहता आले तरी पण तेवढी कमाई तर झालीच ना!

जरा थोडीशी कुठे बोलाचाली झाली, अरे कुणी जराशी धूळ जरी उडवली की लगेच लोक गोळा होतात! कशासाठी? कारण कोणाचेच चित्त कुठेही एकाग्र होत नाही, म्हणून काहीतरी नवीन पाहण्यासारखे दिसले की चित्त तिथे एकाग्र होते. इथे तर भगवंताच्या मूर्तीजवळ देखील चित्त एकाग्र होत नाही, तर मग आणखी कुठे एकाग्र होणार? आत अपार जळजळ आहे म्हणून कुठेही चित्त एकाग्र होत नाही. हे तर *अटकणी* (नाठाळ) घोड्याजवळ बंदुकीचा बार उडवावा तसेच या माणसांचेही झाले आहे! करुणा करण्यायोग्य माणसे आहेत. म्हणून यांच्यावर फक्त करुणाच राखावी!

## मूर्तीत प्राण घालतात ज्ञानी

**प्रश्नकर्ता :** देवळातील मूर्तीत प्राणप्रतिष्ठा केली तर मूर्तीची शक्ती वाढते का?

**दादाश्री :** हो, वाढते ना. हुक्क्यात प्राणप्रतिष्ठा केली तर (त्याची) पण शक्ती वाढते आणि मूर्तीत तर सर्वांचे आरोपित भाव आहेत. त्यामुळे मूर्तीत प्राणप्रतिष्ठा केली तर फळ मिळते. पण या काळात खरी प्राणप्रतिष्ठा होते कुठे? 'आम्ही' खरी प्राणप्रतिष्ठा करतो, पण उदयाशिवाय 'आम्ही' काही करत नाही. लोकांचे कल्याण होवो यासाठी आम्ही प्रतिष्ठा करतो.

लोकांची जेवढी शक्ती असेल त्यानुसार ते प्राणप्रतिष्ठा करतात. आणि ती प्रतिष्ठा ते कुठल्या भावाने करतात? कलुषित भावाने. त्यांच्यातले कलुषित भाव निघालेले नसतात आणि तरी प्राणप्रतिष्ठा करतात. आत तर पराकोटीचे कलुषित भाव आहेत. जरा कोणी डिवचले तर लगेच फणा उभारतात, मग अशी प्रतिष्ठा केल्याने काय फळ मिळणार? प्राणप्रतिष्ठा करायचा अधिकार कुणाला आहे? ज्यांचे कलुषित भाव पूर्णपणे नष्ट झाले आहेत एवढेच नव्हे, तर ज्यांच्या निमित्ताने कोणामध्येच कलुषित भाव उत्पन्न होत नाहीत अशांना. त्यांची गणना तर पंच परमेष्टींमध्ये केली जाते. अशा व्यक्तींच्या हातून प्राणप्रतिष्ठा झाली पाहिजे. असे कोणी नसेल तर मग जे असतील त्यांना चालवून घ्यायचे. नाही तर प्रतिष्ठा तर अशी झाली पाहिजे की मूर्ती हसेल, मूर्ती बोलेल! आम्ही जिथे जिथे प्राणप्रतिष्ठा करतो तिथे तिथे मूर्ती बोलू लागते, हसू लागते! आमची तर खूप इच्छा आहे की सगळ्या मंदिरात योग्य प्राणप्रतिष्ठा व्हावी, पण ती आमची सत्ता नाही ना? 'व्यवस्थित शक्ती'च्या हातात आहे हे सर्व, म्हणून आम्ही उदयानुसार करतो.

ही तुमच्या आत देखील आम्हीच प्रतिष्ठा केली आहे. म्हणून तर 'मी शुद्धात्मा' आहे असे तुम्ही बोलू शकता. मूर्तीमध्ये प्रतिष्ठा तर 'ज्ञानी पुरुष' करतात. जड मूर्तीत ज्ञानी पुरुष प्रतिष्ठा करतात तेव्हा त्या मूर्तीदेखील फळ देतात, मग जिवंत मूर्तीत प्रतिष्ठा केली तर फळ का नाही मिळणार?

हे सगळे जण तर टाळ्या वाजवणार आणि भगवंतांना 'तू' आणि 'मी' असे गाणार, आणि जर मूर्तीला भजशील तर मूर्तीच मिळणार. शरीर चांगले मिळेल, मोटार, बंगला मिळेल, परंतु जोपर्यंत अमूर्ताचे दर्शन होत नाही, 'ज्ञानी पुरुष' अमूर्ताचे दर्शन करवित नाहीत तोपर्यंत मूर्तीचीच उपासना कर, आणि जेव्हा अमूर्ताची उपासना करशील तेव्हा मोक्ष मिळेल. मूर्तीची उपासना तर अनंत जन्म करतच आलो आहोत ना? 'ज्ञानी पुरुषात' अमूर्त पण आहेत आणि मूर्ती पण आहेत. 'ज्ञानी पुरुष' मूर्तामूर्त आहेत, म्हणून त्यांची उपासना केल्याने मोक्ष मिळतो.

❖❖❖❖❖

# अक्रम मार्ग : अकरावे आश्चर्य

मोक्षप्राप्तीसाठी दोन मार्ग आहेत :

पहिला 'क्रमिक मार्ग.' यात क्रमाक्रमाने त्याग करत करत पुढे जायचे, पायरी-पायरीने वर चढायचे असते. दुसरा मार्ग 'अक्रम मार्ग.' 'हा' दहा लाख वर्षातून (एकदाच) प्रकट होतो, जो जगातील खूप मोठे आश्चर्य आहे! लिफ्टमध्ये बसून मोक्षाला जाता येते. यात ग्रहण किंवा त्याग असे काहीच नसते. हा बिनकष्टाचा मोक्षमार्ग आहे. लिफ्ट मार्ग आहे. जे महापुण्यशाली आहेत त्यांच्यासाठी 'हा' मार्ग आहे. तिथे ज्ञानी पुरुषांनी शिक्का मोर्तब केला की मोक्ष मिळून जातो. हा नगद मार्ग आहे, उधार काहीच ठेवायचे नाही, रोख हवे. तसा 'हा' रोख मार्ग प्रकट झाला आहे. दिस इज दि ओन्ली कॅश बँक इन दि वर्ल्ड! (या जगात ही एकमेव रोकड बँक आहे!)

'क्रमिक मार्गात' सत्संग लाभला तर पाचशे पायऱ्या चढतो पण एखादा कुसंग लाभला तर हजार पायऱ्या खाली पण उतरू शकतो, काहीच भरवसा नाही. शिवाय अत्यंत कष्ट पडतात आणि हा 'अक्रम मार्ग' तर सेफ साईड (सुरक्षित) मार्ग आहे. लिफ्टमधून पडू अशी भीतीच नाही आणि संसारात राहूनसुद्धा मोक्षाला जाता येते. जसे चक्रवर्ती भरत राजा गेले तसे, लढाई करत करत, राज्याचा उपभोग घेत घेत मोक्षाला गेले!

ऋषभदेव भगवंतांना शंभर पुत्र होते, त्यातील नव्याण्णव पुत्रांना

त्यांनी दीक्षा देऊन मोक्ष दिला. सर्वात मोठा मुलगा तो होता भरत चक्रवर्ती. त्याच्यावर राज्याची जबाबदारी सोपवली. भरत राजे तर लढाया लढत–लढत, आणि महालात तेराशे राण्यांबरोबर संसार करत करत कंटाळून गेले. म्हणून ते ऋषभदेव भगवंताकडे गेले आणि त्यांनीही दीक्षा मागितली आणि मोक्ष मागितला. भगवंत म्हणाले, 'तू पण सिंहासन सोडलेस तर राज्य कोण सांभाळणार? म्हणून तुला राज्य सांभाळावेच लागेल. पण त्याबरोबरच मी तुला असे 'अक्रम ज्ञान' देईन की त्यामुळे लढाया लढूनही, राज्याचा उपभोग घेऊनही आणि तेराशे राण्यांसोबत राहूनही तुझा मोक्ष जाणार नाही.' तर असे अद्‌भुत ज्ञान त्यांनी भरत राजाला दिले! तेच हे 'अक्रम ज्ञान.' ऋषभदेवांनी दिलेले हेच ज्ञान 'आम्ही' तुम्हाला तासाभरातच रोख देतो. नंतर तुम्ही तुमचा संसार–व्यवहार चालवा. मुलांची लग्ने लावा, सर्वकाही करा. म्हणजे जुने काही सोडायचे नाही आणि नवीन काही ग्रहण करायचे नाही. सोडायचे काय आहे ते आम्ही तुमच्याकडून सोडवून घेतो, अहंकार आणि ममता सोडवतो आणि 'शुद्धात्मा' ग्रहण करवितो. त्यानंतर काहीही ग्रहण–त्याग करण्याचे शिल्लक राहत नाही. 'मी चंदुलाल आहे' हा अहंकार उचलून घेतो, आणि 'मी शुद्धात्मा आहे' हे ग्रहण करवितो. बस, ग्रहण–त्याग सगळे ह्यातच आले!

भरत राजाला चौवीस तास नोकर ठेवावे लागत. दर पंधरा मिनिटांनी नोकर घंटा वाजवत आणि भरत राजाला म्हणत 'भरत, सावध हो, सावध हो, सावध हो,' जेणे करून भरत राजा गाफील झाले असतील तर ते ऐकून परत जागृत होत. आता तुम्ही तर जेमतेम दीडशे रुपयांची नोकरी करता, मग तुम्हाला असे नोकर ठेवणे कसे परवडणार? म्हणून 'आम्ही' तुमच्या आतच चौवीस तास काम करणारा नोकर बसवून देतो! तो तुम्हाला क्षणोक्षणी सावध करत राहतो! आम्ही तुमच्यात अशी प्रज्ञा बसवून देतो की जी सतत ज्ञान आणि अज्ञानाला वेगळे करत राहते!

'मी कोण आहे' हे समजत नाही. अस्तित्वाचे भान आहे पण वस्तुत्वाचे भान नाही की, 'मी कोण आहे.' परंतु जर वस्तुत्वाचे एक

अंश जरी भान झाले तरी त्यातून पूर्णत्वाकडे पोहोचता येते. वस्तू सहज आहे. मार्ग सरळ आहे. पण ज्ञानासाठी 'ज्ञानी पुरुषां'चे निमित्त मिळणे आवश्यक आहे आणि तेव्हाच ज्ञान प्राप्त होते. 'ज्ञानी' स्वतः सुटलेले (मुक्त) असतात आणि दुसऱ्यांना सोडवण्यासाठी समर्थ असतात. त्यांना तरणतारण म्हणतात. या काळात खूपच नैसर्गिकपणे हा अद्‌भुत 'अक्रम मार्ग' प्रकट झाला आहे! हा तर लिफ्ट मार्ग निघाला आहे! म्हणून भजी-जिलेबी खात-खात, कुठलेही तप त्याग न करता निरंतर मोक्षसुखातच राहता येते. क्रमिक मार्गात क्रमाक्रमाने तप-त्याग करत-करत, अहंकार शुद्ध करत-करत पुढे जायचे असते. अहंकार इतका शुद्ध करायचा की कोणी मान दिला तरी तो शिवणार नाही. जेव्हा अहंकार एवढा शुद्ध होतो तेव्हा आत्मा प्राप्त होतो. अहंकार शुद्ध करत-करत इतका अधिकाधिक शुद्ध होतो की शुद्ध अहंकार आणि शुद्ध आत्मा, दोन्ही एकाकार होतात! मान आणि अहंकार या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. स्वक्षेत्रात, म्हणजे 'स्वत:' जिथे आहे तिथे स्वत:ला मानणे, हा अहंकार नाही. याउलट जिथे स्वत:चे अस्तित्व नाही तिथे 'मी' आहे असे मानणे तो अहंकार आहे. जेव्हा क्रोध-मान-माया-लोभ हे अजिबात शिल्लक राहत नाहीत तेव्हा अहंकार संपूर्ण शुद्ध होतो. 'क्रमिक मार्गात' त्याग करत-करत पुढील पदाचे उपादान (प्राप्ती) करतात, आणि मागच्या पदाचा त्याग करतात. या दोन्ही गोष्टी क्रमिक मार्गात एकत्र असतात, आणि त्याग केला तरीही अहंकार मात्र शिल्लकच राहतो. उलट मी त्याग केला याचा कैफ चढतो. सर्व जग ज्या मार्गाने चालले आहे तो क्रमिक मार्ग आहे. यात स्टेप बाय स्टेप (पायरी-पायरीने) जायचे. यात काही गोष्टींचा त्याग करत जायचे असते आणि काही गोष्टींचे ग्रहण करायचे असते. आणि जर कुसंगी मिळाला तर तो कॅन्टीनमध्ये (कुसंगात) घेऊन जातो आणि म्हणतो 'चला, पैसे मी खर्च करतो.' स्वत:चे पैसे खर्च करून कॅन्टीनमध्ये घेऊन जातो. 'क्रमिक मार्ग' असा धोकादायक आहे. म्हणून तर माणसे अनंत जन्म भटकतच राहिले आहेत.

आपण इथे सर्व महात्म्यांमध्ये अहंकार पाहतो, पण तो ड्रॅमॅटिक (नाटकी) अहंकार आहे, कारण 'फाइल्स' अजून शिल्लक आहेत,

त्यांचा निकाल करावा लागतो. म्हणून चंदुलालला नाटक करावे लागते. मग फायदा झाला तरी त्याचा परिणाम होत नाही आणि नुकसान झाले तरीही त्याचा परिणाम होत नाही, मात्र चंदुलालचे नाटक समभावाने पूर्ण करून सुटून जायचे.

'क्रमिक मार्गा'त आरंभ आणि परिग्रह, अहंकार आणि ममता, कमी कमी करत जायचे असते. त्याग केला तर परिग्रह कमी होतो आणि त्यामुळे ममता कमी होत जाते. अशा तऱ्हेने पुढे प्रगती करत राहायची आणि जर शेवटपर्यंत कुसंग प्राप्त झाला नाही, तर थेट मोक्षापर्यंत पोहोचू शकतो! नाही तर एकच कुसंग देखील खूप पायऱ्या मागे नेतो! 'क्रमिक मार्गात' शेवटच्या जन्मापर्यंत आरंभ-परिग्रह कायम असतो पण ज्या प्रमाणात आरंभ-परिग्रह कमी होत जातो त्या प्रमाणात क्रोध-मान-माया-लोभ कमी होत जातात. तरी पण मनात बैचेनी वाटत राहते, अगदी शेवटपर्यंत राहते. आणि 'अक्रम मार्गा'त क्रोध-मान-माया-लोभ राहतच नाहीत, आणि तरीही जो परिणाम जाणवतो तो क्रोध नसून प्रकृतीच्या उग्रतेचा गुण आहे! त्यात जर आत्मा 'तन्मयाकार' झाला तर त्यास क्रोध म्हटला जातो. दोन्ही एकत्र झाले की मग पेटते. आणि आम्ही तुम्हाला आत्मा दिला आहे तो वेगळाच राहतो. म्हणजे उग्रतेचे वादळ वगैरे होते पण त्याचा तंत (सातत्य) राहत नाही. ज्यात तंत राहत नाही त्याला क्रोध म्हणत नाहीत.

लोभ, हा परमाणूंचा आकर्षण आणि विकर्षणाचा गुण आहे, प्रकृतीचा आकर्षण आणि विकर्षणचा गुण आहे. या आकर्षण-विकर्षणात जर आत्मा तन्मयाकार झाला तर राग-द्वेष निर्माण होतात, आणि जर आत्मा तन्मयाकार झाला नाही, वेगळा राहिला तर काहीही देणेघेणे नाही! आपल्या शरीरात इलेक्ट्रिकल बॉडी आहे, त्यामुळे चुंबकत्व निर्माण होते आणि त्या चुंबकत्वामुळे हे शरीर ओढले जाते. त्यास तो म्हणतो, 'मी ओढलो गेलो.' पण तुझी इच्छा नाही तरीपण तू कसा काय ओढला जातोस?

'आम्ही' स्वरूपाचे ज्ञान दिल्यावर क्रोध-मान-माया-लोभ राहतच

नाहीत. पण तुम्ही हे सर्व नीट स्पष्टपणे ओळखून घेतले पाहिजे! कारण आम्ही तुम्हाला जो निर्मळ आत्मा दिला आहे तो कधीच तन्मयाकार होत नाही. पण स्वत:ला ही समज नसल्यामुळे, स्वत:चे व्यक्तीत्व सोडल्यामुळे थोडीशी ढवळाढवळ केली जाते आणि गोंधळ निर्माण होतो. स्वत:ची 'जागा' सोडल्यामुळेच हा गोंधळ होतो. 'स्वत:ची जागा' सोडता कामा नये. 'स्वत:ची जागा' सोडल्यामुळे नुकसान किती आहे? तर त्यामुळे स्वत:चे सुख थांबते आणि म्हणून गोंधळ निर्माण झाल्यासारखे वाटते पण प्रत्यक्षात आम्ही दिलेला आत्मा जरा देखील इकडे-तिकडे होत नाही. प्रतीतीरूपाने तो तसाच्या तसाच राहतो.

हे ज्ञान दिल्यानंतर तंत गेला. तंतालाच क्रोध-मान-माया-लोभ म्हणतात. ज्याचा तंत गेला त्याचे क्रोध-मान-माया-लोभ सगळे काही गेले! कारण आम्ही त्यांचा आधारच काढून टाकतो. त्यामुळे ते सगळे निराधार होतात. भगवंत काय म्हणतात की, 'जग कशाच्या आधारावर उभे आहे?' जग अज्ञानाच्या आधारावर उभे आहे. क्रिया चांगली आहेत की वाईट? त्यावर भगवंत म्हणतात, 'क्रिया चांगल्या पण नाहीत आणि वाईट पण नाहीत.' परंतु एकदा अज्ञान दूर झाले की बाकीचे सर्व आपोआप गळून पडेल. तू चांगल्या सवयी ठेवण्याचा प्रयत्न करणार आणि वाईट सवयी घालवायचा प्रयत्न करणार. पण त्या चांगल्या आणि वाईट सवयी त्यांच्या स्वत:च्या आधारावर उभ्याच नाहीत, म्हणून त्यांचा आधारच काढून टाक की त्या चांगल्या आणि वाईट सवयी आपोआप गळून पडतील. जगातील लोक चांगल्या सवयींना आधार देत राहतात आणि वाईट सवयींचा नाश करायचा प्रयत्न करतात, म्हणजेच आधार देणे तर चालूच आहे. आणि जोपर्यंत हा आधार देणे चालू आहे तोपर्यंत संसार आहे. या संसारात अनंत वस्तू आहेत. जोपर्यंत 'स्वत:' त्या सगळ्यांपासून दूर होत नाही तोपर्यंत एक एक वस्तू किती वेळ दूर करत बसणार? परंतु आधार गेला की सगळेच गेले. बारा माणसांच्या कुटुंबातील कमावती व्यक्ती गेली तर लोक आमचा आधार गेला असे म्हणतात. या 'निश्चयात' सुद्धा असेच आहे. या संसारात एक-एक करत सगळे केस उपटून लूंचन केले तरी त्याचा काहीही उपयोग नाही. अनंत

गोष्टी आहेत. त्या सोडण्याऐवजी तूच तिथून दूर हो ना! मग डोक्यावर केस असले काय, नसले काय, त्याने काय फरक पडतो?

या 'अक्रम मार्गात' सर्वप्रथम अज्ञानालाच निराधार केले जाते. म्हणून मी तुम्हाला कसलाही त्याग करायला सांगत नाही. 'क्रमिक मार्गात' 'ज्ञानी पुरुष' आयुष्यभरात दोन शिष्यांकडून त्याग करून घेऊ शकतात आणि त्यांच्याबरोबर त्यांना स्वत:ला देखील तसाच त्याग करावा लागतो. नवीन पायरी ग्रहण करायची आणि जुनी सोडायची. आणि या 'अक्रम मार्गात' तर आत्मा ग्रहण करायचा होता तो ग्रहण झाला आणि अहंकार ममतेचा त्याग पण झाला, सगळेच काम पूर्ण झाले. नाही केश लुंचन, नाही तप-त्याग, की नाही उपवास! 'क्रमिक मार्गात' स्वत:च तपाचा आधार बनतो! आणि त्यात 'मी' आणि 'शुद्धात्मा' हे वेगळे असतात. त्यांच्या शास्त्रांची पाने जर कोणी फाडली तर त्यांना आतल्या आत दु:ख वाटते की याने माझी पुस्तके फाडली! वरकरणी तो सगळ्यांसमोर ज्ञानी असल्याचा देखावा करतो पण आतमध्ये सूक्ष्म रूपात 'मी' पणा वर्तत (चालू)च राहतो. त्यांच्यात 'मी' आणि 'शुद्धात्मा' वेगळे असतात. त्यांना शेवटपर्यंत 'मी' पणा राहतोच. क्रमिक मार्ग म्हणजे काय? तर अहंकार शुद्ध करणे. त्यांना विभाविक अहंकार शुद्ध करावा लागतो.

स्वत: मुक्तच आहे पण त्याला याचे भान होत नाही. पण राँग बिलीफ (चुकीच्या मान्यता) आणि राँग ज्ञान आहे त्यामुळे राँग वर्तन होत असते. राईट ज्ञान-दर्शन आपोआप होत नाही आणि त्यातही राँग बिलीफ तर कधीच, कुठल्याही प्रकारे नष्ट होत नाही. त्यासाठी तर सायंटिस्ट पाहिजे, 'ज्ञानी पुरुष' पाहिजे आणि ते सुद्धा संपूर्ण 'ज्ञानी पुरुष' असले पाहिजे तरच आपले काम साध्य होऊ शकेल.

वीतराग भगवंतांनी ज्यांना शॉर्ट (छोटा) मार्ग हवा आहे त्यांना तसा शॉर्ट मार्ग दाखवला आहे आणि ज्यांना लाँग (लांबचा) मार्ग हवा आहे त्यांना लाँग मार्ग दाखविला आहे आणि ज्यांना देवगती हवी आहे त्यांना तसा मार्ग दाखविला आहे. मोक्षाचा मार्ग तर खिचडी बनविण्यापेक्षाही

सोपा आहे. जर कठीण असेल, कष्टदायी असेल तर तो मोक्षाचा मार्ग नाही. तो अन्य मार्ग आहे. 'ज्ञानी पुरुष' भेटले तरच मोक्षमार्ग एकदम सोपा आणि सरळ बनतो. अगदी खिचडी बनवण्याहून सोपा. करोडो मैल लांब, करोडो जन्मात पण प्राप्त होणार नाही असा मोक्षमार्ग एकदम शॉर्टकटच्या स्वरूपात प्रकट झाला आहे! हे ज्ञान तर त्याच वीतरागींचे आहे, सर्वज्ञांचे आहे. फक्त पद्धत 'अक्रम' आहे. संपूर्ण दृष्टीच बदलून जाते. तासाभरातच शुद्धात्म्याचे लक्ष्य बसते. नाही तर क्रमिकमार्गात कोणी शेवटपर्यंत लक्ष्य प्राप्त करू शकत नाही. आत्म्याचे लक्ष्य प्राप्त करण्यासाठी पूर्वी लोकांनी कसले कसले पुरुषार्थ केले आहेत! क्षणभरासाठीही आत्म्याचे लक्ष्य प्राप्त करण्यासाठी लोकांनी केवढी प्रचंड तपे केली आहेत. क्रमिक मार्गातील ज्ञानींना 'शुद्धात्म्याचे' लक्ष्य शेवटपर्यंत बसत नाही, पण जागृती मात्र खूपच असते. याउलट इथे आता तुमच्यासाठी हे किती सोपे झाले आहे की तासाभरातच तुम्हाला आत्मा दिला, त्यानंतर लक्ष्य कधीच चुकत नाही आणि आत्मा निरंतर लक्ष्यातच राहतो.

आजी, तुम्ही रात्री दोन वाजता झोपेतून उठता, तेव्हा सर्व प्रथम कोणती गोष्ट आठवते?

**प्रश्नकर्ता :** 'मी शुद्धात्मा आहे' हेच आठवते.

**दादाश्री :** नाही तर लोकांना तर जगातील सर्वात जास्त आवडती वस्तूच प्रथम आठवते पण तुम्हाला तर प्रथम 'शुद्धात्मा'च आठवतो. अलखचे लक्ष्य कधीच बसत नाही म्हणून तर आत्म्याला अलख निरंजन म्हटले आहे! पण इथे तर तुम्हाला आत्म्याचे लक्ष्य फक्त एका तासातच प्राप्त होते! 'अक्रम ज्ञानीं'ची सर्व सिद्धी-रिद्धी, देवी-देवतांची कृपा, या सर्व कारणांमुळे एका तासात तुम्हाला हे अद्‌भुत पद प्राप्त होत आहे!

खरा मोक्ष मार्ग प्रकट झाला आहे पण तो समजून घेतला तर काम होईल, आणि समजला नाही तर भटकंती चालूच राहणार!

ते 'क्रमिक विज्ञान' आहे आणि हे 'अक्रम विज्ञान' आहे. हे ज्ञान तर 'वीतरागीं'चेच आहे. 'ज्ञानात' फरक नाही. 'आम्ही' ज्ञान देतो,

त्यानंतर तुम्हाला आत्मानुभव होतो. मग काय बाकी राहते? तर 'ज्ञानी पुरुषां'च्या आज्ञांचे पालन करणे. आज्ञा हाच धर्म आणि आज्ञा हेच तप. आणि 'आमच्या' आज्ञा तुम्हाला संसारात कुठेही बाधक ठरत नाहीत. संसारात राहून देखील संसार शिवत नाही असे हे अक्रम विज्ञान आहे.

आपल्या इथे हा अक्रम मार्ग अतिशय सोपा, सरळ आणि छोटा आहे, आणि त्यात भगवंतांचा शब्दन् शब्द सामावलेला आहे! रोख मोक्षमार्ग आहे म्हणून तुम्ही या मागे जितके लागाल तितके कमीच आहे, हे समजून घ्या. नाहीतर, मनाच्या गाठी विरघळतील असा मार्ग कुठेही असू शकतो का? मनाला स्थिर करण्याचे मार्ग जगात असतात पण मन विरघळत नाही. मन स्थिर करण्याचे औषध एकाग्रता आहे, परंतु त्यामुळे अहंकार वाढतो. याउलट आपल्या इथे मन स्थिर तर होतेच, मनाच्या गाठी संपूर्ण विरघळतात आणि त्यात अहंकाराचीही लुडबुड नसते ना! जणू अहंकाराला पेन्शन देऊन निवृत करून टाकले असेल, असे!

'क्रमिक मार्गात' एखादा आवडता पदार्थ जास्त खाल्ला गेला तरी उपाधी वाटते पण आपल्याला मात्र अशी काहीच उपाधी नाही! आपल्याला तर धर्म, धर्म होऊन परिणमित होतो आणि आत सुख उसळत असते.

आपल्या येथे गुरु आणि शिष्य असा भेदच ठेवला नाही. आम्ही तुम्हाला आमच्या सोबतच बसवले आहे. निश्चयाने आम्ही तुम्हाला बाराव्या गुणस्थानकावर आमच्या सोबतच बसवले आहे आणि तेसुद्धा शुक्लध्यानात! निश्चयाने आपला हा बारावा गुणस्थानक असे कोणत्या आधारावर म्हटले जाते? कारण शुक्लध्यान प्राप्त झाले आहे! शुद्धात्म्याचे लक्ष्य बसले आहे! शुद्धात्म्याचे लक्ष्य प्राप्त होणे आणि 'मी शुद्धात्मा आहे' याची सतत प्रतीती असणे यालाच शुक्लध्यान म्हणतात. 'क्रमिक मार्गा'त प्रतीतीची जाळी बनतात आणि थोडी प्रतीती बसते. प्रतीती बसते आणि ती जेव्हा पूर्ण होते तेव्हा क्षायक समकित प्राप्त होते आणि तेव्हा शुद्धात्म्याचे लक्ष्य बसते. आणि ह्या अक्रम मार्गात तर 'शुद्धात्म्याचे' लक्ष्य प्रथमच बसवले जाते आणि त्यानंतर प्रतीती तर (निरंतर) राहतेच!

हा अक्रम मार्ग आहे ना, त्यामुळे लक्ष्य प्रथमच बसते. क्रमिक मार्गात ज्याला प्रतीती बसली असेल त्यालासुद्धा शुक्लध्यान प्राप्त होत नाही. कारण या काळात क्रमिक मार्गात कोणीही सातच्या गुणस्थानकापुढे जाऊ शकत नाही.

'अक्रम मार्गा'त 'ज्ञानी पुरुष' क्षायक समकितचा तंत जोडून देतात त्यामुळे कषायांचा तंत राहत नाही. 'हा' (समकितचा) तंत असेल तर तो (कषायांचा) तंत राहत नाही, आणि तो असेल तर हा राहत नाही!

क्रमिक मार्गात प्रथम गाढ समकित, शुद्ध समकित होते आणि त्यानंतर दोन भाग होतात. दर्शन मोहनीय बंद होऊन जाते आणि मग व्यवसाय वगैरे सर्व चालू राहतो. म्हणजे चारित्र्य मोहनीय राहते. मग त्या चारित्र्य मोहनीयला संपवत राहतो. पण सध्या हे लोक काय करतात? दर्शन मोहनीय न काढताच चारित्र्य मोहनीयला मारून (जबरदस्तीने) दूर करायला मागतात. पण ते कसे शक्य आहे?

येथे अक्रम मार्गात आपण चारित्र्य मोहनीयचा निकाल करत आहोत. आम्ही 'ज्ञान' देतो तेव्हा दर्शन मोहनीय उडवून टाकतो आणि चारित्र्य मोहनीयला नीरस करून टाकतो, त्यामधून नवीन रस उत्पन्न होत नाही आणि नवीन दर्शन मोह राहतच नाही. रस उत्पन्न होत असतो म्हणून तर दर्शन मोहनीय उभे आहे, नीरस केल्यामुळे चार्ज होणे बंद होऊन जाते.

क्रमिक मार्गावाल्यांना चारित्र्य मोहनीय नीरस करावे लागते आणि म्हणून प्रचंड तप-त्याग करावे लागतात. त्यामुळे चारित्र्य मोहनीय नीरस होते. त्यासाठी 'क्रमिक मार्ग'वाल्यांना बाह्यतपे करावी लागतात. याउलट आपल्या येथे 'अक्रम मार्गात' आंतरिक तप असते. त्यामुळे हृदय तापून 80 डिग्री, 85 डिग्री, 90 डिग्री, 95 डिग्रीपर्यंत पोहोचते, आणि आम्हाला हे माहीत आहे की 99 डिग्रीपेक्षा जास्त तापणार नाही. कारण पेटायला हे निखारे थोडेच आहेत? आणि मग ते हळूहळू थंड होऊ लागते. तापणे सुरू झाल्यापासून थंड होईपर्यंतच्या सर्व अवस्था आपल्याला

जाणायच्या आहेत. म्हणून हे आपले आंतर तप आहे. त्यामुळे आपल्या चारित्र्य मोहनीयचा निकाल होऊन जातो. (चारित्र्य मोहनीय संपते.)

ह्या 'अक्रम मार्गाने' एकावतारी होता येते, इतकी सत्ता यात आहे. या जन्मानंतर एकच जन्म बाकी राहतो. आणि पंधराहून जास्त सोळावा जन्म घ्यावा लागत नाही, या ज्ञानानंतर! मी तर म्हणतो जरी दहा जन्म लागले तरीही काय हरकत आहे. आणि ते जन्म खूप वैभवशाली असतील! असे त्रासदायक नसतील! या सत्संगात आला आणि ज्ञानी पुरुषांच्या कृपेने मोक्षाचा शिक्का लागला तर पुढचे सर्व जन्म किती वैभवशाली असतील. आणि हा जन्म सुद्धा वैभवात व्यतीत होईल, असा हा 'अक्रम मार्ग' आहे?

दोनच मार्ग आहेत, एक संसार मार्ग आणि दुसरा अध्यात्म मार्ग. संसार मार्गात डॉक्टरचे प्रश्न वकीलाला विचारू शकत नाही आणि वकीलाचे प्रश्न डॉक्टरला विचारू शकत नाही. परंतु इथे तर अध्यात्मिक मार्ग आहे, म्हणून आमच्याकडे तुम्ही कुठलाही प्रश्न विचारू शकता. इथे तुम्हाला जे काही विचारायचे असेल ते तुम्ही विचारू शकता आणि येथे सगळ्या प्रश्नांचे खुलासे मिळतील. तुम्ही सांगायचे, 'आम्ही तुमच्याजवळ आलो आहोत आणि तुमच्याजवळ जे आहे ते आम्हाला मिळाले नाही तर काय उपयोग?' संसारातून निस्पृह होऊन जे एकमात्र सत्याच्या शोधात निघाले असतील त्यांना 'आमच्याकडून' सर्व काही मिळेल. तुम्ही मागा, मागाल ते द्यायला आम्ही तयार आहोत! पण तुम्हाला धड मागताही येत नाही. असे मागा की जे कधीही तुमच्याकडून जाणार नाही. परमनन्ट वस्तू मागा. टेम्पररी (नाशवंत) मागाल तर ते किती दिवस टिकेल? असे काही मागा की ज्यामुळे तुम्हाला कायम शांती मिळेल, चिंता-उपाधी यातून कायम सुटका होईल असे काही मागा. इथे तर मोक्ष मिळतो. तुम्ही जर इथे बुद्धीच्या आहारी गेला नाहीत तर 'हे' प्राप्त कराल. आमचा सत्संग गेली दहा वर्षे चालू आहे. यात वाद होतो पण विवाद होत नाही. ही एकच अशी जागा आहे की जिथे बुद्धी काम करत नाही.

हा अक्रम मार्ग आहे. इथे सर्व उघडउघड आहे, सर्व गोष्टींचा लगेच खुलासा मिळतो. याउलट 'क्रमिक मार्गात' कसे असते? जरीकाम करणारे जरी विणतात ना, त्यात एक मण कापसाच्या सुतामध्ये एक तोळे सोने विणतात. तसेच महावीर भगवंतांनी जे सांगितले ते सगळे गौतम स्वामींनी सूत्रात विणले. पण आजकालचे लोक एक मण सुतामधून एक तोळे सोने कसे काढणार? अशी कोणाची पात्रताच नाही ना. 'आम्ही' तर तुम्हाला सरळ सोनेच दिले आहे. 'आम्ही' अज्ञानापासून केवलज्ञानापर्यंतचे सर्वच स्पष्टीकरण दिले आहे. (कर्म) चार्ज कसे होते? डिस्चार्ज कसा होतो? हे जग कसे चालते? कोण चालवतो? तुम्ही कोण आहात? हे सगळे कोण आहेत? या सर्व गोष्टींची उत्तरे आम्ही इथे देतो.

हे श्रुतज्ञान कसे आहे? अपूर्व! पूर्वी कधीच ऐकले नव्हते असे अपूर्व! हे श्रृतज्ञान वीतरागींचे नाही का? होय, त्यांचेच तर आहे. वीतरागी ज्या स्टेशनवर घेऊन जात होते त्याच स्टेशनवर 'हे' ज्ञान पण घेऊन जाते, पण रस्ता वेगळा आहे! तो 'क्रमिक मार्ग' आणि हा 'अक्रम मार्ग'. 'ही' तर तुमचे काम साधून घेण्याची जागा आहे. 'हे' काही धर्माचे स्थळ नाही. इथे स्वत:चे सर्व प्रकारचे काम पूर्ण होते. मोक्ष हातात येतो तिथे सर्व काम पूर्ण होते. इथे सर्व समाधानकारी ज्ञान आहे की जे कोणत्याही परिस्थितीत, कुठल्याही संयोगात समाधान देते. समाधान व्हायलाच पाहिजे. या ज्ञानामुळे जर समाधान होत नसेल तर याचा अर्थ तुम्हाला समाधान करता येत नाही. नाही तर समाधान अवश्य झालेच पाहिजे. आमच्या आज्ञा पाळल्यात तर समाधान होणारच. येथे हुशारीचा, बिनहुशारीचा प्रश्नच नाही. हुशार माणसाला आपल्या हुशारीची खुमारी असते. पंडितांना पांडित्याची खुमारी असते, त्यागींना त्यागाची खुमारी असते, तपस्वींना तपाची खुमारी असते. तोच तर मोठा रोग आहे, महारोग आहे! हे महारोगी दुसऱ्यांचा रोग काढायला गेले तर रोग कसा काय काढू शकतील? ह्या डायरेक्ट वीतरागींनी सांगितलेल्या गोष्टी आहेत. इथे एकही शब्द इनडायरेक्ट नाही! सर्व चौवीस तीर्थंकरानी सांगितलेल्या गोष्टी आम्ही सांगतो. हा उपदेश सर्वकाळाला अनुसरून

निघत असतो, म्हणजे हा सर्व चौवीस तीर्थंकरांचा एकत्रित उपदेश आहे. साधू-संन्यासी यांना खुमारी असते, तो तर एक क्रॉनिक रोग आहे. अशा कष्टसाध्य रोगाला औषधच नसते. अशा वेळी आम्हाला कडक शब्दात ऑपरेशन करावे लागते. परंतु इथे कोणाला वाईट वाटत नाही. कारण इथे सर्व समभावाने निकाल करणारे महात्मा आहेत, आणि 10-12 वर्षांपासून ते इथे आहेत. पण सगळ्यांचे एकच मत आणि एकच अभिप्राय. मतभेद कधीच नाहीत. यात्रेला गेलो तरी पण एकही मतभेद नाही. सगळे एकत्र-अविभक्त! 'आम्ही' औरंगाबादला सत्संगाला जातो तेव्हा एकाच घरात 80 ते 100 माणसे असतात, तरी पण त्यांच्यात कधीच विसंवाद होत नाही, मतभेद होत नाहीत. सगळे जण एकत्र खातात-पितात पण घरात किती माणसे आहेत याचा (बाहेर) पत्ता देखील लागत नाही! आणि सगळे फार छान चालते, अगदी नियमित. असे तर कधी पाहिलेच नसेल ना! जगात कुठेच असे ठिकाण पाहायला मिळणार नाही! असे स्थूलभावाने पाहायला मिळाले तरी कल्याण होईल. शिवाय एक पण लॉ (कायदा) नाही. जिथे लॉ आहे तिथे 'वीतरागी ज्ञान' नसते. जिथे लॉ आहे तिथे संपूर्ण 'वीतरागी ज्ञान' नसते तरी पण इथे सर्व काही संपूर्ण विनयपूर्वक चालत असते. ज्याला पैसे खर्च करायची इच्छा असते ते पैसे खर्च करतात, पण कोणालाही असे वाटत नाही की हा मोठा आहे आणि हा छोटा आहे, सर्वांना समानता वाटते. हा तर अजब मार्ग आहे, आश्चर्य मार्ग आहे. म्हणून तुम्ही तुमचे (मोक्षाचे) काम साधून घ्या. इथे दहा वर्षांपासून आमची वाणी लिहिली जात आहे तरी पण इथे कुठले ऑफिस नाही, सेक्रेटरी नाही की कायदाही नाही. आम्ही जरी कुठल्याही जागी बोललो असू तरी ते सर्वच लिहिले जाते आणि ते सर्व व्यवस्थित सांभाळलेही जाते! या उलट एखाद्या ऑफिसवाल्याचे कागद तर अस्ताव्यस्त पडलेले असतात.

क्रमिक मार्गाच्या ज्ञानींचा नियम असा असतो की जो 80 टक्केपर्यंत पोहचला असेल तो 78 टक्केपर्यंत पोहचलेल्या ज्ञानीच्या पाया पडत नाही, तो फक्त 82 टक्के असलेल्या ज्ञानीच्याच पाया पडतो. याउलट 'अक्रम मार्गा'तील ज्ञानी पुरुषांचे कसे असते? तर आम्ही 100 टक्केवाले

आहोत पण आम्ही 5 टक्के वाल्यांच्या सुद्धा पाया पडतो. ज्याचा कैफ उतरला आहे त्याला कसली अडचण असणार? आमची तर आत्मदृष्टीच असते. आम्ही कमी टक्केवाल्यांच्या पाया का पडतो? त्यांना शहाणे करण्यासाठी, की 'अहो महाराज, हे तुमचे खरे नाही.' आम्हाला तर कैफ चढत नाही, पण त्यांचा कैफ वाढतो म्हणून आम्ही कारणाशिवाय जात नाही. नाही तर त्यांचा रोग वाढेल.

ऋषभदेव भगवंतापासून आतापर्यंत क्रमिक मार्गाचे ज्ञानी असत, त्यांच्याजवळ दोन किंवा तीन शिष्यच असत. ते त्या तीन शिष्यांना सांभाळत आणि स्वत: तप-त्याग करीत व शिष्यांकडूनही करवून घेत. तीनपेक्षा जास्त शिष्य नसत असेच आपल्याला इतिहासात दिसते. याउलट इथे तर या पुण्यानुबंधी पुण्यशाली लोकांसाठी दहा लाख वर्षांनंतर सुद्धा हा असा मार्ग निघतो ना! प्रत्यक्ष ज्ञानींच्या हजेरीशिवाय काहीच शक्य नाही. वीतराग विज्ञान प्रत्यक्ष ज्ञानींशिवाय कामी लागत नाही! आणि हे तर 'अक्रम विज्ञान', यात तर कॅश (रोख) डिपार्टमेंट, कॅश बँक आणि क्रमिक मार्गात तर त्याग करूनही कॅश फळ मिळत नाही. आणि इथे तर कॅश फळ!

साडे-तीन अब्ज लोकसंख्येत असे ज्ञान कोणाला नको असेल? सगळ्यांनाच हवे आहे. पण हे ज्ञान सगळ्यांसाठी नसते. हे तर महापुण्यशाली लोकांसाठी आहे. हे अक्रमज्ञान प्रकट झाले त्यामागे लोकांचे पुण्य तर असेलच ना? फक्त भगवंतांच्या आश्रयावर भटकणाऱ्या भक्तांसाठी आणि ज्यांचे पुण्य असेल अशा व्यक्तींसाठी 'हा' मार्ग प्रकट झाला आहे. हा तर खूप पुण्यशालींसाठीच आहे आणि जे इथे सहज येतात आणि मनापासून मागतात त्यांना आम्ही हे ज्ञान देतो. पण यासाठी लोकांना सांगायला जायचे नसते. हे 'दादा' आणि त्यांच्या महात्म्यांच्या हवेनेच जगाचे कल्याण होईल. मी निमित्त आहे, कर्ता नाही. इथे तर ज्यांची भावना असेल, आणि त्यांनी दादांचे दर्शन घेतले तर ते दर्शन 'थेट' (आत्म्या)पर्यंत पोहोचते. 'दादा', ह्या देहाच्या जवळच्या शेजाऱ्याप्रमाणे राहतात. आणि हे जे बोलत आहे ते टेपरेकॉर्ड आहे. हे

'अक्रम ज्ञान' तर काही अतिपुण्यशाली लोकांसाठीच आहे. इतर सर्वांसाठी 'अक्रम मोक्ष' नाही. इतर सर्वांना तर आम्ही त्यांच्या 'क्रमिक मार्गाचा' बोध देऊन तो जे करत असेल त्यातच त्याला सुगम मार्ग दाखवू. त्या मार्गाने तो थेट मोक्षापर्यंत पोहोचेल! येथे तर जे सहज येतात आणि येताना सोबत पुण्याचा पासपोर्ट आणतात त्यांना आम्ही हे ज्ञान देतो, ज्यांनी 'दादांची कृपा' मिळवली त्याचे तर कामच झाले!

इथे आलेली सर्व माणसे परिणाम झालेली असतात. कोणाला 5 टक्के तर कोणाला 25 टक्के, पण सगळ्यांना एकाच प्रकारचा परिणाम आहे. पण सोबत पुण्य किती सुंदर घेऊन आले आहेत! 'दादां'च्या लिफ्टमध्ये बसून मोक्षाला जायचे! कोटी जन्मांचे पुण्य जमा असेल तेव्हाच दादांची भेट होते! मग जरी कितीही डिप्रेशन असो ते निघून जाईल. डिप्रेशन दूर करण्याचेच हे स्थान आहे. डिप्रेशनवाल्यांसाठी, सर्वप्रकारे पेचात पडलेल्या लोकांसाठी 'हे' योग्य स्थान आहे. इथे सर्व प्रकारचे क्रॉनिक रोग मिटले आहेत.

पाचशे वर्षानंतरही या अक्रम ज्ञानाची गाणी गायली जातील. या कवि नवनीतच्या भक्तीगीतांचे अफाट कौतुक होईल! सध्या तर लोक आकाशपाळण्यात बसले आहेत. परंतु नंतर ते मार्ग शोधतील. आकाशपाळण्यात बसलेल्या लोकांना वस्तू कशा दिसतात? अशा लोकांना जर आम्ही 'अक्रम मार्ग' दाखवू तर ते म्हणतील 'हे सगळे तर मला माहीतच आहे.' त्यांना जर विचारले की 'तुम्हाला चिंता-काळजी वाटत नाही का?' तर ते म्हणतील चिंता-काळजी तर सगळ्यांनाच वाटत असते ना! जर चिंता-काळजी होत आहे, तर मग तुला समजले तरी काय? जाणणे म्हणजे प्रकाश. प्रकाशात कोणाला ठेच लागते का? इथे तर पदोपदी ठेच लागत आहे आणि तरी म्हणतो 'मी सर्वकाही जाणतो' मग तुझी सुटका कशी होईल? ज्ञानी पुरुषांसमोर देखील कुणी उद्धटपणे 'मी सर्वकाही जाणतो' असा कैफ घेऊन आला तर आम्ही म्हणू 'अरे बाबा, तुझे भांडे अगोदरच पूर्ण भरलेले आहे. त्यात आमचे अमृत ओतून काय फायदा? ओतले तरी ते सांडून जाईल. तुझे भांडे रिकामे करून

आलास तर मी त्यात थोडे अमृत ओतेन आणि मग त्याचा तुला उपयोग होऊ शकेल.'

**प्रश्नकर्ता :** दादा, आपल्या नंतर हा 'अक्रम मार्ग' चालू राहील का?

**दादाश्री :** 'अक्रम मार्ग' तर आमच्यानंतर एक-दोन पिढ्यांपर्यंत चालू राहील. त्यांनतर मात्र परत पूर्वीसारखेच (क्रमिक मार्गप्रमाणे) असेल. पण आमच्या निमित्ताने 'क्रमिक मार्ग' नवीन उंची गाठेल. नवीनच शास्त्रे, आणि सर्वकाही नवीनच असेल. सध्या जसे सगळे बिघडले आहे तसे राहणार नाही.

हा 'अक्रम मार्ग' आहे. म्हणून ज्ञानी फक्त एका तासातच जगनिष्ठा मिटवून ब्रह्मामध्ये बसवतात. म्हणून तर कवींनी लिहिले आहे ना की,

*''दस लाख वर्षमां आवां ज्ञान नथी थयां,*
*निश्चय ते विस्मय आवां ज्ञान अकथ्यां.''*

(दहा लाख वर्षात असे ज्ञान कधी प्रकट झाले नाही. निश्चितच अकथ्य असे हे विस्मयकारक ज्ञान आहे.)

असे कधी घडलेच नाही! म्हणून तर आश्चर्य आहे ना! आणि त्यात देखील मोक्षाचे तिकीट मिळाले तर मग त्याचे कामच झाले ना! 'हे' पुण्यशाली लोकांसाठी आहे. आता तर सासूचा मार खाईल, नवऱ्याचा मार खाईल, तरी पण मार्ग सापडणार नाही. मोक्ष इतका सोपा नाही. हे तर तुम्हाला 'ज्ञानी पुरुष' लाभले आहेत म्हणून तो खिचडी बनविण्यापेक्षाही सोपा झाला आहे. मोक्षदाता 'ज्ञानी पुरुषां'च्या निमित्ताची शास्त्रकारांनी देखील स्तुती केली आहे.

'आम्ही' जगत् कल्याणाचे स्वामी नाही, आम्ही फक्त निमित्त आहोत. जे पुण्यशाली आहेत ते घरबसल्या लाभ घेऊ शकतात! 'अक्रम मार्ग' हा पुण्यशाली लोकांच्या पुण्याचे फळ आहे! नाही तर अक्रम मार्ग आला असता का? हे तर नंतर जेव्हा इतिहास लिहिला जाईल,

तेव्हा लोकांना पश्चाताप होईल आणि त्यांना वाटेल, अरे! आपण त्या काळात होतो की नव्हतो? मग हिशोब करतील तेव्हा त्यांना कळेल की त्या वेळी ते 35 मजल्यावरील फ्लॅटचे काम करण्यात गुंतले होते! सगळे संयोग मिळतील पण हा 'अक्रम मार्गा'चा संयोग मिळेलच असे नाही. इथे 'सत्' संयोग आहे. हे ज्ञान मिळाल्यानंतर दुसऱ्याच दिवशी त्याला स्वत:लाच अनुभव येतो, आणि तेव्हाच हे समजते!

महावीर भगवंताच्या निर्वाणाला आता 2500 वर्ष पूर्ण होत आहेत. तेव्हा साधनेसुद्धा किती आश्चर्यकारक प्रकट होऊ लागली आहेत! नाही तर 'अक्रम मार्ग' कधी असू शकेल का? भगवंतांचे 2500 वर्ष पूर्ण होतील तेव्हा साधने पण मिळतील आणि हे परिवर्तन होईल. महावीर भगवंतांना लोकांनी सांगितले होते की 'भस्मक ग्रहाच्या' दुष्परिणामापासून लोकांना वाचविण्याकरिता भगवंतांनी आपले आयुष्य थोडेसे वाढवावे. तेव्हा भगवंत म्हणाले, 'नाही, लोक ते निवांतपणे भोगतील आणि पराकाष्ठेचा भ्रष्टाचार करण्यापर्यंत त्यांची मजल जाईल. आणि ते जेव्हा पूर्ण होईल तेव्हा त्याचे पण फळ मिळेल!' तो विषम काळ आता संपत आला आहे. त्याचे फळ म्हणजे हा 'अक्रम मार्ग' आहे! नाही तर तो प्रकट झाला असता का?

क्वचितच कधी दहा-लाख वर्षानंतर असे अजब पुरुष प्रकट होतात आणि तेव्हा त्यांना स्वत:लाच ते जाहीर करावे लागते. मी हे गॅरंटीपूर्वक सांगतो की तुमच्या वर कोणी *उपरी* (वरिष्ठ, बॉस, मालक) नाही. आणि वरती कोणी बापसुद्धा नाही. मग कसली भीती!

ज्याची आकुलता-व्याकुलता संपली, त्याला अंतरंग प्रत्याखानच आहे. क्रमिक मार्गाच्या ज्ञानींमध्ये आकुलता-व्याकुलता चालूच राहते. क्रमिक मार्ग आकुलता-व्याकुलतेचा कारखानाच आहे! हा मात्र अक्रम मार्ग आहे. म्हणून येथे जो या मार्गाचा उपयोग करेल त्याला लगेच त्याचे रोख फळ मिळेल!

आता मात्र नवीन अनुभव येतील! ज्या हिलवर (टेकडीवर)

चढला आहात त्याचा अजून एक कोपरा देखील नीट पूर्ण पाहिलेला नाही, आता टेकडीच्या चारी बाजूला फिरून मुक्तपणे पाहा, किती अद्‌भुत आहे! जेवढा लाभ मिळवायचा असेल तेवढा मिळवून घ्या. स्वत:ची योग्यता आणि स्वत:च्या समजेनुसार लाभ मिळवतात. त्याला डोक्यावर उचलता येत नसेल तर आम्ही त्याच्या डोक्यावर ठेवायला मदत करतो. 'हे' तर अतिशय असामान्य घडले आहे. आणि एकमेव विज्ञान आहे. म्हणून आपले काम साध्य करून घ्यावे.

*'सकल ब्रम्हांड झंखे ते ज्ञान वर्षा ने असह्य उनाळे.'* - नवनीत

( सारे ब्रह्मांड ज्याची आतुरतेने वाट पाहत होते, तो ज्ञानाचा पाऊस आता पडत आहे, आणि तोसुद्धा असह्य उन्हाळ्यात!) - नवनीत

सारे ब्रह्मांड ज्या 'ज्ञाना'च्या पावसाची वाट पाहत होते त्या 'ज्ञानाचा' पाऊस तर पडलाच आणि विशेष म्हणजे भयंकर उन्हाळ्यात पडला! भयंकर दूषमकाळात 'ज्ञानवर्षा' झाली. जिथे मनुष्यमात्र, साधू, आचार्य, बाबा, सगळेच तडफडत आहेत, अशा काळात! पावसाळ्यात पाऊस पडला तर तो नियमानुसार म्हटला जातो. पण हा तर दूषमकाळाच्या उन्हाळ्यात, जे शक्य नाही ते घडले आहे. न पडणारा पाऊस पडला आहे, तेव्हा (मोक्षाचे) काम साध्य करून घ्यावे.

वीतरागींचे दोन प्रकारचे ज्ञान : एक 'क्रमिक' आणि दुसरे 'अक्रमिक', की जे आज इथे 'आमच्याकडे' प्रकट झाले आहे!

❖❖❖❖❖

# प्रकृती

एका आत्म्यात अनंत शक्ती आहे! अनंत आत्मे आहेत आणि अनंत प्रकृती आहेत!

प्रत्येकाच्या आत दोन वस्तू आहेत; वस्तू 'पुरुष' आहे आणि अवस्तू 'प्रकृती' आहे. प्रकृतीत राहतो म्हणून 'तो' अबला (स्त्री) आहे. आणि जर स्वतः पुरुष झाला तर 'स्वत:'च परमात्मा आहे. पूर्ण पुरुषाला ओळखत नाही म्हणून क्रोध-मान-माया-लोभ, या सर्व निर्बलता घेरतात!

आपण सर्व आत्मस्वरूपात एकाच स्वभावाचे आहोत पण प्रकृतीने वेगवेगळे आहोत. खारट, तिखट, आंबट, फिकट हे सगळे प्राकृतिक दोष आहेत. ही प्रकृती त्याग करवून घेते तेव्हा त्याग होतो आणि ग्रहण करविते तेव्हा ग्रहण होते. प्रकृती नाचवते तसे नाचतो आणि म्हणतो मात्र 'मी नाचलो.' यालाच तर भ्रांती म्हणतात ना? हेही आश्चर्यच आहे ना? उदयकर्मानुसार घडले तेव्हा म्हणतो की 'मी केले, हे 'मी केले.' याचेच नाव भ्रांती. जोपर्यंत 'स्वत:' पुरुष होत नाही तोपर्यंत भोवरा म्हटला जातो. 'स्वत:चे' भान झालेले नाही तोपर्यंत 'मी केले' असे कसे म्हणू शकतो? करणारा कोण? तू कोण? हे तर माहीतच नाही. मग 'मी केले' असे कसे म्हटले जाऊ शकते? इथे तर प्रकृती रडवते तेव्हा म्हणतो, 'मी रडतो' आणि प्रकृती हसवते तेव्हा म्हणतो, 'मी हसतो.' प्रकृती रागवायला लावते तेव्हा म्हणतो 'मी रागावलो.' हे सगळे

प्रकृती जबरदस्तीने करवून घेते, तेव्हा मग 'मी करत आहे' असे कसे काय म्हणता येईल? तरी पण लोक असेच म्हणतात. हेही आश्चर्यच आहे ना?

प्रकृतीच्या सर्व अवस्था टेम्परारी तात्पुरत्या असतात. या पंचेंद्रियांनी ज्या ज्या अवस्था दिसतात त्या सगळ्या प्राकृत अवस्था आहेत. या जगात जी तत्वे आहेत, ती सर्व आपापल्या गुणधर्मांसहित आहेत आणि अवस्थासहित पण आहेत. तत्वे परमनन्ट आहेत. मात्र प्राकृत अवस्था टेम्परारी आहेत.

प्रकृती प्रसवधर्मी स्वभावाची आहे, त्यामुळे अनंतपटीने उत्पन्न होत असते!

**प्रश्नकर्ता :** प्रकृती प्रसवधर्मी आहे म्हणजे काय?

**दादाश्री :** मी तुम्हाला समजावून सांगतो. समजा या खोलीत सगळ्या बाजूंनी आरसे लावले तर तुम्हाला आरशातून शंभर-दीडशे माणसे दिसतील. पण शंभर-दीडशे कोणी बनविली का? एकातून अनंत उभे राहतात तसे आहे. त्यामुळे दु:ख सोसतात हे सगळे स्पंदनस्वरूप आहे. तू एक स्पंदन पाठविले तर त्यातून नवीन स्पंदने निर्माण होतात. परंतु जर तू स्पंदन पाठविणे थांबवलेस तर मग तुला किती स्पंदने परत येतील? ती तर मग बंदच होऊन जातील.

प्रकृतीचे गुण हे 'पर' गुण आहेत. आत्म्याचे नाहीत. जग 'पर'च्या गुणांना 'स्व' गुण मानते. लोक म्हणतात, 'हा माणूस, चांगला आहे'. पण त्याला ताप आला आणि तापात सन्निपात झाला तर सगळेच म्हणतील की, 'हा माणूस चांगला नाही.' अरे, प्राकृत गुण तर एका तासात लुप्त होतील. भगवंत काय म्हणतात की, 'संसारात जरी कितीही उच्च गुण प्राप्त केले असतील, क्षमाशील असेल, रागवत नसेल तरी पण हे सर्व प्रकृतीचे गुण आहेत. ते कधी बदलतील सांगता येणार नाही.' प्रकृतीच मुळात पित्त, कफ, वायू यांनी बनली आहे. हे तिन्ही गुण बिघडले तर सन्निपात होईल, आणि तेव्हा तो काय बोलेल त्याची त्याला शुद्ध राहणार नाही. म्हणून भगवंत म्हणतात 'तुम्ही तुमच्या स्वत:च्या गुणधर्मात राहा.'

इथे तर कढी जराशी जास्त खाल्ली तरी पित्त वाढते. हे परके गुण केव्हा बदलतील ते सांगता येणार नाही. पण तुमचे 'स्वतः'चे गुणधर्म मात्र कधीच बदलत नाहीत.

या प्रकृतीचे सायन्स गजबच आहे! समजण्यासारखे आहे. एका वैद्याने एका रोग्याला सांगितले होते की, 'केळी खाऊ नका, थंड पडतील.' दुसरा कोणीतरी हे ऐकून घरी जाऊन सांगेल, 'केळी खाऊ नका, थंड पडतील.' लोकांना काही समज नाही, कुठची गोष्ट कुठे नेतात! त्या रोग्यासाठी केळी न खाणे हे खूप लाभदायी असते पण दुसऱ्यांसाठी केळी खाणे चांगले असू शकते. पण तो दुसऱ्यांनाही उलट शिकवतो. हे ज्ञान कुठून आणलेस? तर सांगेल, 'ते वैद्य म्हणत होते!' अरे, ते त्या व्यक्तीच्या प्रकृतीला ते मानवत नाही पण ते तू का धरून चालला आहेस? तुझ्यासाठी तर केळे चांगले होते.

प्रत्येक गोष्टीत प्लस–मायनस (अधिक–उणे) असते, म्हणून एखादी गोष्ट एखाद्याला बाधते, आणि एखाद्याला बाधत नाही, पण ते ज्ञान दुसऱ्या कोणाला सांगायचे नसते.

तुम्ही चहा पिता का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** चहा का पीत नाही?

**प्रश्नकर्ता :** चहा मला आवडत नाही, मला कॉफी आवडते. म्हणून मी कॉफी पितो.

**दादाश्री :** चहा आवडत नाही त्याला कारण आहे. तुला चहा दिला तर तुझ्या प्रकृतीला ते मानवत नाही, म्हणून प्रकृतीसमोर चहा आला तर तो तुला आवडत नाही. कॉफी तुझ्या प्रकृतीला मानवते म्हणून तू कॉफी पितोस. प्रकृतीला मानवते तेव्हा म्हणतो, 'मला आवडते.' आणि मानवत नाही तेव्हा म्हणतो 'मला आवडत नाही.' आपण जर विचारले हे सर्व तू जाणले तर आहेस पण हे तर 'रिलेटिव्ह'मध्ये जाणले आहेस.

मग वास्तविक काय आहे?' तर म्हणेल 'ते तर मला माहीत नाही.' वास्तविक काय आहे? तर 'तोच आत्मा' आहे. रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट (दृष्टीकोन) तर सगळेच जाणतात पण रियल व्ह्यू पॉइंट समजला पाहिजे ना? (रियल आणि रिलेटिव्ह) दोन्ही व्ह्यू पॉइंट जाणणे हे प्रज्ञेच्या क्षेत्रात येते आणि फक्त रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट जाणणे हे बुद्धीच्या क्षेत्रात येते.

जो बायका-मुलांना सोडून पळून जातो तो काय 'स्वत:' सोडून जात नाही, पण प्रकृती त्याला जबरदस्तीने सोडायला लावते. प्रकृती त्याग करून घेते. तेव्हा स्वत: अहंकार करतो की 'मी त्याग केला,' 'मी तप केले.' 'मी सामायिक केली' जोपर्यंत स्वत: 'पुरुष' झाला नाही तोपर्यंत त्याला प्रकृतीच चालविते. शास्त्र वाचतात, ध्यान करतात, सामायिक करतात ते सगळेच प्राकृत ज्ञान आहे, 'आत्मज्ञान' नव्हे. जगात सर्वत्र प्राकृत ज्ञानच आहे. मोठे-मोठे साधू, संन्यासी आचार्य-बिचार्य सगळे प्राकृत ज्ञानातच गुंतले आहेत. त्यांच्याकडे आत्मज्ञानाची गोष्ट नसते. ते जे काही जाणतात ते सर्व प्राकृतज्ञान आहे. आत्मज्ञान ते जाणत नाहीत. तुला जर 'आत्मा' हवा असेल तर 'ज्ञानी पुरुषांकडे' जा. ज्ञान फक्त 'ज्ञानी पुरुषांजवळच' असते, इतर कुठेही नसते.

हे लोक तर प्रकृतीचे गुण सोडवून देण्याच्या मागे असतात. अरे, ते कधी जमणार? आम्ही तर म्हणतो, चांगल्या सवयी आणि वाईट सवयी यापासून शुद्ध चेतन सदैव मुक्तच आहे. आपण सर्व तर या दुकानातून बाहेर पडलो आणि म्हणालो की, 'हे दुकान माझे नाही!' दुकानातील एकेक वस्तू काढत राहिलो तर याचा कधी अंत येईल? त्याऐवजी 'हे दुकान माझे नाही' असे म्हणून निघून गेलो की मग झाले!

## सहज प्रकृती-सहज आत्मस्वरूप

प्रकृती सहज होईल असे नाही. म्हणून 'आम्ही' सहज आत्मा देतो आणि त्याचबरोबर प्रकृतीच्या सहजतेचे पण ज्ञान देतो. मग फक्त प्रकृतीला सहज करण्याचे कार्य शिल्लक राहते. 'आत्मा' सहज स्वभावात आला, की प्रकृती सहज स्वभावात येते, या काळात असेच आहे.

या गुलाबाच्या फुलाला कसला 'निकाल' करावा लागतो का? नाही, ते तर त्याच्या सहज स्वभावातच आहे. ही माणसेच फक्त असहज होतात. सगळ्या वस्तू सहज स्वभावाच्या आहेत, 'आत्मा' पण सहज स्वभावाचाच आहे. फक्त माणसाची प्रकृती विकृत आहे. त्यामुळे आत्म्याचा फोटो सुद्धा विकृत दिसतो. म्हणजे जेव्हा स्वत: विकृत होतो तेव्हा प्रकृती पण विकृत होऊन जाते. म्हणून स्वत: सहज होण्याची गरज आहे, पण असहज होऊनच जातो! प्रकृती झोपण्यास सांगते तेव्हा तो जबरदस्तीने जागा राहतो, अरे, सहज हो ना! 'सहज' म्हणजे प्रकृती जशी प्रेरणा देईल तसे वागावे! प्रकृती विषयी नसते. जर विषयी असती तर या पशूंमध्ये पण ती आढळली असती. विषय, हा स्वत:चा विकृत स्वभाव आहे. प्रकृती सहज स्वभावात असते. तिला खायला–प्यायला आमटी–भात हवा असतो. ती काही ढोकळे मागत नाही. ती षड्रस (सहा रस) मागत असते. ते सहा रस सहज मिळण्यासारखे असतात, याउलट माणूस बटाटेवडे मागतो! सहजमध्ये काहीही दोष नाही, विकृतीमध्ये दोष आहे. 'ज्ञानी पुरुष' स्वत: त्या स्वभावात राहतात आणि प्रकृतीला प्रकृतीच्या स्वभावात राहू देतात.

## घर म्हणजे प्रकृतींची बाग

या जगात जे काही घडत असते ते प्रकृतीच्या गुणांमुळे घडत असते, आत्म्याच्या गुणांमुळे घडत नाही. म्हणून प्रत्येकांनी प्रकृती गुणांना ओळखून घेतले पाहिजे. प्रकृतीच्या दोषांमुळे समोरची व्यक्ती दोषी दिसते. आपण स्वत:सुद्धा प्रकृती गुणांनाच पाहायचे. तसे केले तर 'त्या' दोषांना बळकट होण्याचा अवकाशच मिळणार नाही.

आमच्या इथे हजारो महात्मा आहेत तरी पण सगळ्यांशीच आमचे का पटते? कारण आम्ही सगळ्यांची प्रकृती ओळखतो. 'आम्ही' त्यांच्या 'काट्यांना' हात लावत नाही. आम्ही फक्त त्यांच्या फुलांकडे पाहतो.

जर चाफा गुलाबाचे दोष काढून गुलाबाला म्हणाला की, 'तुझ्यात काटे आहेत, तुझा काहीच फायदा नाही', तर गुलाब चाफ्याला म्हणेल

'तू तर सुकलेल्या पानासारखा दिसतोस' मग त्यांच्यात भांडण होईल. बागेतील प्रकृत्या जर बोलू लागल्या तर बागेत भांडणेच भांडणे होतील? त्याच प्रमाणे हा संसारसुद्धा एक बाग आहे. इथे पण प्रकृती बोलते त्यामुळे दुसऱ्यांचे दोष दिसतात आणि भांडणे होतात.

प्रत्येक माणसाची प्रकृती वेगवेगळी असते. पूर्वी सत्युगात घरातील सगळी माणसे गुलाबासारखी होती. आता तर एक मोगरा, एक चाफा, एक गुलाब असे सर्व वेगवेगळे या कलियुगात एकत्र येतात! सगळ्या वेगवेगळ्या प्रकृती एकत्र येतात. जसे छोटे-मोठे सगळेच एकत्र जमतात तसे. यात वडिलांचा आग्रह असतो की सगळ्यांनी त्यांच्याप्रमाणे गुलाब व्हावे. जर कुणी चाफा झाला तर वडील म्हणतात, चालणार नाही, सगळ्यांनी गुलाबच व्हायला हवे. अरे, ही प्रकृतीची बाग बघ तरी! सगळेच गुलाब झाले तर त्याला बाग कसे म्हणता येईल? त्याला मग गुलाबाचे शेत म्हणावे लागेल. तुला बाग फुलवायचा आहे का शेत हवे आहे?

कलियुगात आई कंजूष असेल, वडील कंजूष असतील आणि मुलगा सढळपणे खर्च करत असेल तर आई-वडील मुलाला उधळ्या म्हणत असत. अरे, जरा धीर धर, हा सढळ-खर्च करणाऱ्या प्रकृतीला पण फुले येतील. ही 'दादां'ची दृष्टी प्राप्त झाली तर प्रकृती भेद पाडणार नाही आणि भांडणे होणार नाहीत, प्रत्येक प्रकृतीला फुले येतील, म्हणून वाट पाहा. ही माणसे काय करतात की गुलाबाच्या रोपट्याला फूल आले आणि चाफ्याला नाही आले तर चाफ्याची फांदी तोडून टाकतात. परंतु जर धीर धरला तर चाफ्यालाही फुले येतील आणि त्यांचा सुगंध घेता येईल. प्रत्येकाच्या प्रकृतीला फुले येतील. गुलाबाच्या रोपट्याकडे बघेल आणि फूल नसेल तर म्हणेल याला नुसतेच कांटे आहेत, त्याला उपटून टाकू या. अहो नाही, काटे आहेत, तर जोडीला इतर चांगले गुण देखील असणार, असा निसर्गाचा नियमच आहे. म्हणून वाट पाहा. धीर धरा. त्या काटेरी रोपातून पण गुलाब फुलतील.

एक वडील आपल्या मुलाला मारत होते. अरे, असे नाही मारावे मुलांना! रागावल्यामुळे मुलगा ऐकणार असेल तर रागवायला हरकत

नाही. पण या कलियुगात रागावल्यावर मुले उलट बिघडतात. त्यांना तर प्रेमाने सुधारायचा प्रयत्न करा.

आपल्यात जर चांगले गुण असतील तर *'हाथिया थोरमाय प्रगटे सुहास!'* (काटेरी नागफणीतून देखील सुगंध यायला लागेल.) असे आहे की प्रकृतीची एक बाजू वाईट असेल तर दुसरी बाजू उत्तम असते.

असे समजा की बॅन्डमध्ये फक्त रामढोलच आहे तर त्याला बॅन्ड कसे म्हणणार? त्यात एक रामढोल, एक पिपाणीवाला, एक बाजावाला असे वेगळे-वेगळे वाजविणारे हवेत, तर त्याला बॅन्डची शोभा येईल. कुठल्या प्रकृतीतून केव्हा कसली फुले येतील ते सांगता येणार नाही. म्हणून धीर धरून वाट पाहायला हवी.

प्रत्येकांमध्ये वेगवेगळ्या शक्ती असतात, आणि वेगवेगळ्या कमतरताही असतात. सत्‌युगात घरातील एक व्यक्ती तापट स्वभावाची असेल तर इतर सर्व व्यक्ती पण तापट असत. कलियुगात मात्र एक तापट, दुसरा आंबट, तर तिसरा कडू, अशा वेगवेगळ्या प्रकृतीची माणसे एकाच घरात असतात, त्यामुळे ॲडजस्टमेंट होतच नाही. नवरा लवकर उठतो आणि बायको उशिरा उठते, मग सकाळपासून यावरूनच भांडण सुरू होते. त्यामुळे सगळा संसार कडू होतो. पण जर प्रकृतीला ॲडजस्ट होणे जमले तर काहीच त्रास होत नाही.

'भजी फार छान झाली आहेत' असे म्हणू शकतो. परंतु नाटकीपणे, आणि ते सुद्धा समोरच्या व्यक्तीला चांगले वाटावे म्हणून. कढी खारट झाली असेल तर लगेच, 'कढी खारट आहे', असे म्हटले तर कढी बनविणाऱ्याचा अहम् दुखावला जातो. जर नीट सांगता आले तर सांगावे नाही तर काहीतरी वेगळा उपाय करावा. हळूच कढीत थोडेसे पाणी ओतून कढी प्यावी. हे 'ज्ञान' आहे म्हणून जग जे देईल ते सगळेच पिऊन टाकावे. खरे तर, आत अमर्याद शक्ती आहेत! कढी खारट असेल तर प्रकृती ती खारट कढी पण पिणार. 'आपण' तर 'जाणणारे' आहोत. प्रकृतीला सोडून कोणी वेगळे वागू शकत नाही. 'आम्हाला' 'ज्ञान' प्राप्ती

होण्यापूर्वीपासूनच ॲडजस्टमेंटचे ज्ञान हजर राहत होते की इथे काय करण्यायोग्य आहे. ते सर्व ऑन दी मोमेंट - तत्क्षणी हजर राहते.

जग आहे म्हणून सर्व काही असेल. गव्हात खडे असतात म्हणून काय गहू आणायचे नाहीत? नाही. गहू आणायचे आणि खडे निवडायचे! जिथे प्रकृतीला अंतराय येतात तिथे अडथळे निर्माण होतात. म्हणून जिथे जिथे अंतराय असतील तिथे (ज्ञानाचा) टॉर्च लाइट वापरा आणि पाहा! स्वत:च्या चुका तर शंभर टक्के पाहता आल्या पाहिजेत. महावीर भगवंत देखील फक्त स्वत:चीच प्रकृती सतत पाहत असत की प्रकृती काय काय करते आणि काय करत नाही, एवढेच ते पाहत असत.

जेव्हा एखादा व्यवहार आपल्याला करायचा नसेल तरीपण करावा लागत असेल तर समजायला हवे की हे आपल्या इच्छेविरुद्ध करावे लागत आहे. याचा अर्थ 'प्रकृती' आपल्यावर स्वार होऊन बसली आहे. प्रकृतीला स्वार होऊ द्यायची नसते, म्हणून आपण प्रकृतीला 'घोडा' बनवले पाहिजे व प्रकृतीवर 'आपण' स्वार व्हायला पाहिजे. आणि प्रकृती-घोडा जर चालत नसेल तर त्या घोड्याला चाबूक मारून चल, असे म्हटले पाहिजे, मग तो चालेल. अनंत जन्मांच्या चुकीच्या सवयी लागल्या आहेत, *'अटकण'* (जी बंधनरूप होत असते, पुढे जाऊच देत नाही) झालेली आहे त्यामुळे प्रकृती स्वार होत आहे. पण 'आत्मा' तसा नाही. खरे म्हणजे प्रकृती स्वत:च म्हणत असते भगवंत तुम्ही वर बसा. पण हे त्याला समजत नाही आणि म्हणून प्रकृतीला डोक्यावर बसू देतो.

अगदी दोन हजार रुपयांचा व्हिक्टोरियाचा घोडा असला तरी 'कबरीवर आच्छादलेले हिरवे कापड' दिसले की तो थांबतो. (कितीही प्रयत्न केला तरी तो हलत नाही) याला *'अटकण'* म्हणतात. लोकसुद्धा असेच *अटकणवाले* झाले आहेत, तर ही *अटकण* दूर करावीच लागेल ना!

प्रकृतीला आपल्यावर स्वार होऊ द्यायचे नाही. तिला स्वार होऊ द्यायचे ही कुठली पद्धत? त्याऐवजी तुम्ही निवांत प्रकृतीवर स्वार व्हा ना!

'आम्हाला' जर कोणी म्हटले, चला अंतिम स्टेशनवर तरी आम्ही

तयार असतो आणि लग्नाला चला म्हटले, तरी आम्ही तयार असतो. आपली प्रकृती प्रत्येक गोष्टीसाठी तयार असली पाहिजे. याउलट माणसे एखादी गोष्ट करायची की नाही याचा विचार करण्यातच एक तास घालवितात. आणि शेवटी ते काम करावेच लागते, मग आधीच सरळ वाग ना! शेवटी ही 'व्यवस्थित शक्ती' तुला सोडेल अशी नाही, म्हणून सरळ होऊन जा.

कवी ने काय म्हटले आहे,

*'अटकण थी लटकण, लटकण, थी भटकण,*
*भटकणनी छटकण पर छांटो चरण-रज कण.'*

(अटकणमुळे फसतो आणि फसल्यामुळे भटकंती चालूच राहते. भटकंतीपासून सुटण्यासाठी ज्ञानींची कृपा प्राप्त करावी लागते.)

'ही' *अटकण* आहे, असे जर आपण जाणून घेतले तर *अटकण* तुटत जाते. प्रकृती अद्‌भुत आहे! पण काम कसे करायचे याची समज नाही. स्वतः प्रकृती स्वरूपच होऊन गेला! त्यामुळे घोडा धावेल तसे स्वतःला धावावे लागेल. त्याऐवजी प्रकृतीला लगाम घाला आणि निवांतपणे फिरा की!

प्रकृती नियमवाली आहे. मनाचा स्वभाव अनियमवाला आहे. कुणाचे खिसे कापून तीस रुपये हातात आले तर पाच रूपये भिकाऱ्याला दान देतो आणि पंचवीस रुपये बहिणीला देतो, असे आहे! मनाचा स्वभाव घटकेत दान देतो तर घटकेत चोरी करतो. मनाचा स्वभाव विरोधाभासी आहे. प्रकृती नियमानुसार आहे. प्रकृतीची ओळख झाली तर ती वश होणार अशी आहे. म्हणून प्रकृतीची पूर्ण ओळख करून घेतली पाहिजे.

प्रकृतीत जर लोकनिंद्य कार्य नसेल तर त्यास हरकत नाही. चहा पिणे, नाश्ता करणे हे लोकनिंद्य नाही. जर लोकनिंद्य प्रकृती असेल तर मात्र तिची अडचण आहे. अशा प्रकृतीकडे सतत 'पाहत' राहिल्याने ती प्रकृती नरम पडेल. जसजसे पाहत राहिलो तसतशी विलय होत जाईल. कोणी जर तलवार घेऊन लढायला आला आणि जर त्याच्याकडे डोळ्याने

पाहून तो नरम पडत असेल तर पुन्हा पाहिल्याने तो तिथे कधीही परत येणार नाही. तो जर बलवान असेल आणि आपला जोर कमी पडेल तर मात्र तो डोक्यावर बसेल. पण इथे, आपल्याकडे तर 'दिव्यचक्षु' आहेत. 'चर्मचक्षुंनी' पाहिले तरी त्याचा जोर कमी होऊ शकतो, मग हे तर 'दिव्यचक्षु' आहेत, तेव्हा फक्त दृष्टीनेच प्रकृती वितळू लागते.

मोक्षाला जाण्यास कोणाला मनाई केलेली नाही. फक्त 'स्वत:ला' 'स्वत:चे' भान व्हायला हवे. एखादी त्यागी प्रकृती असेल, एखादी तप करणारी प्रकृती असेल किंवा विलासी प्रकृती असेल, प्रकृती कशीही असो, मोक्षाला जाण्यासाठी फक्त प्रकृती संपवावी लागते.

भगवंत तर आत्मज्ञान झाल्यावर फक्त प्रकृतीलाच सतत पाहत असत. प्रकृतीचे सायन्स पाहत होते की हे सायन्स कसे आहे! भगवंत बाकी काहीच पाहत नव्हते. भगवंत फक्त स्वत:च्या 'पुद्‌गलालाच' पाहत होते.

प्रकृती 'पूरण-गलन' स्वभावाची आहे आणि 'स्वत:' 'अपूरण-अगलन' स्वभावाचा आहे.

## प्रकृती सुद्धा भगवंतस्वरूप

जेव्हा प्रकृती भगवंतासारखी दिसू लागेल, तेव्हा मोक्षाला जाऊ शकाल. जेव्हा खिसे कापणाऱ्याची प्रकृती भगवंतासारखी वाटेल तेव्हा मोक्षाला जाता येईल. खिसे कापतो ती तर त्याची प्रकृती आहे. ती प्रकृती तर भगवंतच आहे, पण रिलेटिव्ह भगवंत आहे. याउलट 'आत्मा' हा रियल भगवंत आहे. प्रकृती भगवंतच आहे, पण हा व्ह्यू पॉइंट माणसाला समजत नाही. कारण मधे बुद्धी आहे ना! बुद्धी सांगते की तो माझा खिसा कापून गेला, पैसे घेऊन गेला. परंतु दुसऱ्या व्ह्यू पॉइंटला, रियल व्ह्यू पॉइंटला तो जाणत नाही. नाही तर खिसे कापणारा स्वत:च भगवंत आहे, स्वत:च परमात्मा आहे. पण तशी समज नाही ना! भगवंतांनी खिसे कापूला, दानेश्वरीला, सतीला, वेश्येला आणि गाढवाला, सर्वांना भगवंत स्वरूपाने पाहिले, सर्वांना एकसमान पाहिले.

लोकांना सगळीकडे 'मी' आणि 'तू' असे दिसते. याउलट वीतरागींना सगळीकडे शुद्ध चेतन आणि प्रकृती स्वभाव दिसतो. या टोपलीतले आंबे चाखले तर 'ते आंबट आहेत' असा त्यांचा प्रकृती स्वभाव ओळखता येतो. 'वीतरागी' सगळ्यांच्या प्रकृतीला ओळखतात पण त्यात ते भेदभाव करत नाहीत त्यामुळे 'हा आंबट आहे', 'हा गोड आहे' असे त्यांच्या मनात येत नाही, आणि सर्वांसोबत ते 'वीतराग' राहतात. त्यांच्या दृष्टीने कुणी दान देत असेल तरी ती प्रकृती आहे आणि कुणी खिसे कापत असेल तरी देखील ती प्रकृतीच आहे. त्यांच्या दृष्टीने हे योग्य आणि हे अयोग्य असे नसते. असे वाटले तर राग–द्वेष होतील. आणि यात तर एक जरी स्पंदन निर्माण झाले की सगळे हलू लागते. खरे तर, यात कोणीही कर्ता नाहीच.

वीतराग कसे होते? शेवटी त्यांनी काय पाहिले? तर फक्त स्वत:ची प्रकृतीच पाहिली. सतत स्वत:चीच प्रकृती पाहत होते. प्रकृती सरळ चालली आहे की वाकडी? एवढेच पाहात होते. सर्वत्र 'ज्ञाता–दृष्टा' राहत होते. दुसऱ्यांची प्रकृती पाहिल्यामुळेच हे जग (संसार) उभे झाले आहे. वीतरागी सतत फक्त स्वत:चीच प्रकृती पाहत असत आणि ती पाहिल्याशिवाय गत्यंतरच नाही. फक्त स्वत:ची प्रकृती सतत पाहत राहणे, हीच केवलज्ञानाची शेवटची निशाणी आहे.

कोणाचा एकही गुण विसरू नका. शंभर अवगुण विसरून जा पण एकही गुण विसरू नका. वीतरागी कोणाचेही गुण विसरले नव्हते. आपण ज्याचे गुण विसरलो तो आपल्याला मोक्षापर्यंत पोहोचू देणार नाही. पण आपले 'ज्ञान' अनुपम आहे! म्हणून सर्व काही शक्य आहे.

प्रकृतीच्या प्रत्येक परमाणूला ज्याने ओळखले तो मुक्त झाला. भक्त तर मोक्षमार्गावर हळूहळू पुढे जातात. पण किंचितमात्र सांसारिक इच्छा केली नाही तर त्यांना ज्ञानी पुरुष अवश्य भेटतात. 'ज्ञान' आणि 'प्रकृती' या दोन्ही वेगळ्याच गोष्टी आहेत. पण प्रकृतीला जिथे अंतराय येतात तिथे अडथळा निर्माण होतो, म्हणून अशा वेळी टॉर्च (ज्ञान प्रकाश) वापरून पाहावे.

प्रकृती 'धर्म' काय म्हणते? प्राकृत धर्माची रचना पाहा तरी! मोठमोठ्या ज्ञानी पुरुषांना देखील प्रकृतीत राहावे लागेल. प्राकृतधर्म ओळखावाच लागेल. फक्त 'ज्ञाता-दृष्टा' हाच केवळ आत्म्याचा धर्म आणि बाकी सगळे प्रकृतीचे धर्म आहेत. हे प्राकृत कसे आहे? एक प्राकृत निर्भय बनवते आणि दुसरे प्राकृत भीती दाखवते. अनादि काळापासून प्रकृतीचाच परिचय आहे. अखेरीस या प्रकृतीला भगवंत स्वरूप होणे भाग आहे. हे आपले ज्ञानच असे आहे की, ज्यामुळे प्रकृती भगवंत स्वरूप होऊन जाते आणि परमानंद लाभतो!

प्रकृतीमय झाला म्हणजे परवश (परतंत्र) झाला. प्रकृतीचे अंतराय तुटतात, तेव्हा पुरुष होतो त्यामुळे गजब शक्ती उत्पन्न होते! हे लोक जे म्हणतात ती सर्व प्रकृतीच आहे. मुळात आपल्याच चुकांमुळे प्रकृती उत्पन्न झाली आहे, आणि ती आता कशी नाचवते. जे संयोग टिकणारे नाहीत त्यांनाच शाश्वत संयोग मानून बसलेत!

## प्रकृतीची विभाविकता

**प्रश्नकर्ता :** प्रकृती विभाविक होत असते, तर आतमध्ये अधिक गाठी फुटतात म्हणून असे होत असते, नक्की कशामुळे होते?

**दादाश्री :** हो, पण तिला एविडन्स (संयोग) मिळतात म्हणूनच तसे होते ना? माणसाला चक्कर येते तेव्हा तो काही पडत नाही, पण चक्करेचा एविडन्स जोरदार असेल तर तो पडूही शकतो. 'ज्ञान' मिळण्यापूर्वी तुम्ही रेल्वे स्टेशनवर गेला असाल, तुम्हाला तिथे कळले की गाडी पंधरा मिनिटे लेट आहे. तर तुम्ही पंधरा मिनिटे वाट बघता. नंतर कळते की आणखी अर्धा तास लेट आहे. मग तुम्ही अजून अर्धा तास वाट पाहाता. नंतर परत कळते की अजून अर्धा तास लेट आहे. मग तुमच्यावर काय परिणाम होतो?

**प्रश्नकर्ता :** मनात चीड यायला लागते आणि मग रेल्वेच्या लोकांना शिव्या पण देतो.

**दादाश्री :** 'ज्ञान' काय सांगते की गाडी लेट आहे, हे 'व्यवस्थित'

आहे. 'अवस्थामात्र नैसर्गिक रचना आहे, जिचा कोणीही बाप रचयिता नाही, आणि ती 'व्यवस्थित' आहे.' तुम्ही फक्त एवढे बोलाल तर मग या ज्ञानाच्या शब्दांच्या आधारे 'सहज' राहू शकाल. अनादि काळापासून प्रकृती आपल्याला 'असहज' बनवत आहे, तेव्हा आता ज्ञानाच्या आधारे आपण प्रकृतीला 'सहज' करायचे आहे. खरे म्हणजे प्रकृती सहजच आहे, पण स्वतःच्या विभाविक भावांमुळे असहज होत असते. तर आता ज्ञानाच्या आधारे तिला 'सहज' स्वभावात आणायची आहे. 'रिलेटिव्ह'मध्ये ढवळाढवळ करण्याचे थांबले की मग 'आत्मा' सहज होतो म्हणजे तो मग 'ज्ञाता-दृष्टा' आणि परमानंद पदात रहातो.

हे 'ज्ञान' जर हजर असेल तर अर्धा-अर्धा तास करत रात्रभर गाडीला उशीर झाला तरीही आपली हरकत नाही. याउलट 'अज्ञानी' व्यक्ती तर अर्ध्या तासातच रेल्वेला शिव्यांची लाखोली वाहील. त्या शिव्या काय गाडीला पोहोचणार आहेत का? गार्डला पोहोचणार आहेत का? नाही. तो तर स्वतःच स्वतःच्या अंगावर चिखल उडवत आहे! ज्ञानाची जागृती असेल तर अडचणीत अडचणीला पाहतो आणि सुगमतेत सुगमतेला 'पाहतो'. यालाच म्हणतात सहज आत्मा. आम्ही दिलेले ज्ञान असे आहे की तुम्ही कधीच कंटाळणार नाही. फासावर चढायची वेळ आली तरीही हरकत नाही. कारण फासावर जायचे ते तर 'व्यवस्थित' आहे आणि रडूनसुद्धा फासावर जायचेच आहे तर रडण्यापेक्षा हसत गेलेले काय वाईट?

## प्रकृतीः स्वभावानेच लाजाळू

प्रकृतीचा स्वभाव लाजाळूच्या झाडासारखा आहे. लाजाळूच्या झाडाला हात लावला तर त्या झाडाची पाने लाजतात (मिटतात). आपण घरात जर एखाद्या मुलाला म्हटले 'तू तर मला वैताग आणला आहेस!' तर त्याची प्रकृती लगेच संकोचते, लाजाळूसारखी. पण त्याला लगेच म्हटले पाहिजे 'नाही रे बाळा, खरोखरच मला तुझा काहीही त्रास नाही.' 'मग त्याची प्रकृती संकोचणार नाही.

आपण दमलो असू तरी पण 'मी खूप दमलो आहे' असे म्हणू

नये. नाही तर आपली प्रकृती संकोचते. प्रकृतीचा स्वभाव लाजाळू आहे. जास्त खाल्ले गेले आणि अजीर्ण झाले असे वाटले तरी 'मला अजीर्ण झाले आहे' असे म्हणू नये. नाही तर प्रकृती संकोचते. आपण तर म्हटले पाहिजे 'नाही बाबा, चांगले छान पचन झाले आहे!'

नवऱ्याला बायकोचा वीट येतो तेव्हा तो म्हणतो 'तू तर माझे डोकेच फिरवते.' पण लगेच आपण मनात म्हटले पाहिजे, 'डोके-बिके फिरते ते दुसऱ्यांचे. तुझ्यामुळे मला काहीच झालेले नाही.' मग आपली प्रकृती लाजणार नाही. नाही तर प्रकृती काय म्हणेल 'तुम्ही कोण लुडबुडणारे?' म्हणून आपण सरळ बोलावे.

## समज दिली तर प्रकृती सुधारते

आता तुम्हाला हे ज्ञान मिळाले आहे, म्हणून क्षणभर देखील *प्रमाद* (तन्मयता, अजागृतपणा) करण्यासारखा नाही. तिला (प्रकृतीला) रागवायचे नाही, तक्रार करायची नाही. तिला म्हणावे की 'तुला जे खायचे असेल ते सर्व आम्ही तुला खायला देऊ पण तू आमचे एवढे ऐक. देहाला सांगायचे एवढे आमचे ऐक. अहंकार जर उड्या मारत असेल तर त्याला पण सांगायचे की, आमचे एवढे ऐक.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, जर प्रकृतीचे विरोधी बनलो तर? तिला विरोध केला तर?

**दादाश्री :** नाही, प्रकृतीला विरोध करून चालणार नाही तसे केले तर ती पण विरोध करेल. तिला तेच तर हवे असते की तुम्ही विरोध करावा आणि मग तिने तुम्हाला ताब्यात घ्यावे. आपण विरोध करता कामा नये. समजावून-पटवून तिच्याकडून काम घ्यावे. शेवटी प्रकृतीची बालक अवस्था आहे. प्रकृती जरी कितीही मोठी असो पण तिची बालक अवस्था आहे. कधी उलटसुलट करून टाकेल, लहान मुलासारखी वागेल ते सांगता येणार नाही. लहान मुलासारखा स्वभाव असल्यामुळे समजावून-उमजावून, चॉकलेट देऊन, लालूच देऊन, भजी खायला घालूनसुद्धा प्रश्न सोडविला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे तिचे लाड पुरवून, प्रश्न सोडवायचा आहे का?

**दादाश्री :** नाही, लाड पुरवून नाही, समजावून. लाड पुरवून असा अर्थ घेणे चुकीचे आहे. तिला समजावयाचे आहे. ती स्वत:हून हो म्हणेल, स्वीकारेल असे घडेपर्यंत समजावायचे आहे. समजावल्याखेरीज काम होणार नाही. विरोधी वागून चालणार नाही. विरोध केल्याने आपली गाडी उलटवून टाकेल. बैलाला खूप मारलेत तर तो गाडी उलटवून टाकेल. मारले की ते धावतात खरे पण त्यामुळे आपल्याला असे वाटते की मारले तरच ते धावतात, चालतात. अशी श्रद्धा बसते पण ते कधी गाडी पलटवतील ते सांगता येणार नाही. त्याऐवजी तिला समजावून–पटवून काम करावे. प्रकृती लहान मुलासारखी आहे, कितीही मोठी असो, कितीही वय झाले असो पण ती आहे बालक स्वभावाची. आयुष्यभर वृद्धासारखे वागत असेल पण कधी बाल्यावस्थेत येईल ते सांगता येत नाही. ती रडेल, दीन होईल, गयावया करेल, सगळेच करेल. असे करते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो असे करते.

**दादाश्री :** प्रकृती ही बालक अवस्था म्हटली जाते. मग अशा बालकाची समजूत काढणे हे तर सोपे आहे. नाही का?

प्रकृतीकडून समजावून–पटवून काम घेण्यासारखे आहे. समजावयाला तर हवेच. जोपर्यंत प्रकृती 'येस' म्हणत नाही तोपर्यंत सगळे व्यर्थ आहे. आणि ती 'येस' म्हणेल अशी आहे देखील.

कधी सहा–सहा महिने 'नाही' म्हणत असेल, पण समजल्यावर पंधरा–मिनिटात देखील ती हो म्हणेल, असे आहे! आणि बालकासारखीही आहे. हट्ट धरला तर लाखो वर्षे ती जाग्यावर येणार नाही. हट्टी होणे आणि समजावणे, या दोघात खूप फरक आहे. समजावण्यासाठी तर कौशल्य पाहिजे. मुलाने कितीही हट्ट केला तरी त्याला समजावण्याची कला जमत असेल तर मूल समजून आपला हट्ट सोडते. नाही तर आरडाओरडा करील धिंगाणा घालील. त्याला समजावता यायला हवे.

आपल्या आत आत्मा आहे आणि एकदा 'आत्मा' प्राप्त झाल्यानंतर सर्वकाही जमते. सगळ्या कला शिकू शकतो, जर कलेचा शोध घेतला तर! स्वत: शोध घेतला आणि थोडी वाट पाहिली तर आतूनच दर्शनात येते, पण शोध घेतला तरच. इथे तर शोधच घेत नाहीत, जाणतच नाहीत, मारझोड करून जबदस्तीने करवून घेतात.

प्रकृतीचा स्वभाव कसा आहे की, साखरेचे रेशनिंग होणार आहे असे ऐकले की लगेच प्रकृती साखर आणून ठेऊया, साखर आणून ठेऊया, साखरेचे रेशनिंग येणार आहे, अशी सारखी सारखी भुणभुण सुरू करते. आपण कितीही समजावून सांगितले की रेशनिंग आले तर थोडी-थोडी घेऊन येऊ, तरी ती ऐकत नाही. प्रकृती तर लहान मुलासारखी आहे. प्रकृती वृद्धासारखीही आहे आणि बालकासारखीही आहे. समजावण्यासाठी ती मुलासारखी आहे. आम्ही तर तिला गोळ्या देऊन-देऊन समजावतो.

**प्रश्नकर्ता :** प्रकृती वृद्ध आहे तर ती कुठल्या दृष्टीने?

**दादाश्री :** वृद्धासारखी आहे याचे कारण काय की जरी कितीही मोठे सैन्य आले तरीही ती सोडतच नाही, धरून ठेवते. आणि कधी सोडले तर घटक्यात सोडून देते, 'आम्ही' हे पाहिले आहे. प्रकृती जर 'जड' असती तर तिने सोडलेच नसते, वीतरागीच म्हणायची. पण प्रकृतीने चेतनभाव प्राप्त केला आहे, ती मिश्रचेतन आहे.

'मिश्रचेतन' म्हणजे काय? तर या प्रकृतीचे जे परमाणू आहेत त्यांना 'मिश्रसा' असे म्हणतात. 'मिश्रसा' जेव्हा रस (परिणाम) देऊन जातात तेव्हा त्यांना 'विश्रसा' असे म्हणतात. शुद्ध परमाणूंना विश्रसा म्हटले जाते. आणि त्यात आपण जेव्हा भाव करतो तेव्हा 'प्रयोगसा' होतात. या प्रकृतीच्या परमाणूंचा गुण चेतनभाव प्राप्त आहे. आणि म्हणून आपण तिच्याशी बोलू शकतो, समजावू शकतो, जर या टेपरेकॉर्डरशी बोललो, ओरडलो, त्याला समजावले तरी त्याला काही समजेल का?

लोक आत्म्याला जाणत नाहीत, तरी पण त्यांचे चालतेच ना?

कारण प्रकृती मिश्रचेतन आहे. आपली मुले मोठी असतील, सगळ्यांना खूप त्रास देणारी असतील, त्यांना सहसा कोणी फसवू शकत नाही असे असेल तरी देखील ते सहज फसले जातात ना! याचे कारण काय? तर ती प्रकृती आहे. प्रकृतीला कुणी समजावून सांगणारा पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** कधी कधी समजावल्यानेही भागत नाही.

**दादाश्री :** याचा अर्थ 'कसे समजावायचे' ते जमत नाही.

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा प्रकृतीला समजावून देखील ती ऐकत नाही. तिला रागे भरावे लागते, बोलावे लागते. उदाहरणार्थ डॉक्टरनी दोनच पुऱ्या खा असे सांगितले असेल पण बरोबर आमरस असेल तेव्हा प्रकृती म्हणते तीन पुऱ्या खा. अशा वेळेला तिला समजावून ती ऐकत नाही, मग तिला फैलावर घ्यावे लागते. त्यावेळी गोड-गोड बोलून ती ऐकतच नाही, हट्ट धरावा लागतो.

**दादाश्री :** असे आहे, जर समजावता येत असेल तर उत्तम, पण ते जमत नसेल तर तुम्ही तिला रागावू शकता. पण ही सेकंडरी स्टेज (दुसरा मार्ग) आहे. देहाच्या बाबतीत तसे केले तर चालेल, पण मनाच्या बाबतीत मात्र रागावणे अजिबात योग्य नाही. देह जरा जड आहे आणि त्याला रागावले तर हरकत नाही. मुळात देह जड स्वभावाचा आहे आणि मनाला तर समजावून सांगायला हवे.

जर देहालाही समजावता आले तर ते अधिकच चांगले. देह पण आमचे म्हणणे ऐकतो.

**प्रश्नकर्ता :** दादा, त्यात देखील प्रकृती जेवढी सहज झाली असेल त्याप्रमाणात ती सहज ऐकत जाईल, बरोबर ना?

**दादाश्री :** हो, हे म्हणजे बरोबर आहे. हे सगळे परमाणू काय म्हणतात? चेतनभाव प्राप्त झाला आहे म्हणून ते म्हणतात तुमच्याकडून रागावून घ्यायला आम्ही इथे आलेलो नाही. रागवण्याचे फळ तुम्हाला लगेचच मिळेल. हे सर्व विज्ञान आहे!

**प्रश्नकर्ता :** पूर्वी मी जेव्हा जैन साधूंबरोबर राहत होतो. तेव्हा मी माझ्या आहाराला - आहार संज्ञेला काठीने बडवत होतो. सहा महिने झाल्यानंतर मग त्याने मानले. पण आता त्याची रिॲक्शन अशी आली आहे की गेल्या आठ वर्षात एक वेळ जरी जेवण मिळाले नाही तरी मनात आणि बाहेर देखील आरडाओरडा सुरू होतो.

**दादाश्री :** पाहा ना, हे लोक किती त्रासलेले आहेत? साधू, संन्यासी सगळेच किती त्रासलेले आहेत? मनाला दाबतात म्हणूनच तर. मनाला दाबून ठेवण्यासारखेही नाही आणि मोकळे सोडण्यासारखेही नाही. मोकळे सोडणे तोही गुन्हाच आहे! दोन्ही गुन्हेच आहेत!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दोन्ही गोष्टी प्रमाणात हव्यात का?

**दादाश्री :** नाही, प्रमाणात नाही. जर इथे तुमच्या मुलाची बायको आली तर तिच्या समोर वागताना काही मर्यादा ठेवावी लागते ना? असे असते ना तुमच्यात?

**प्रश्नकर्ता :** हो, असते, दादा.

**दादाश्री :** समजा, तुमच्या मुलाची बायको इथून जात असेल आणि तुम्ही तिला (ओरडून) सांगितले थांब, इथेच उभी रहा, तुझे नाव सांग? काय शिकली आहेस? काय करतेस? आणि असे सर्व केले तर ते नुकसानदायक आहे. हे तर मनाला मोकळे सोडले! मनाचे रक्षण केल्यागत झाले. मनावरचा आपला 'प्रभाव' तुटता कामा नये. म्हणून मनाला समजावयाचे, पण असे मोकळे सोडायचे नाही. आणि विरोध पण करायचा नाही. तुम्ही जर घरातील स्त्रियांबरोबर असे वागलात तर काय होईल? त्यांच्यावर तुमचा प्रभाव राहणार नाही.

एक गुजराती म्हण आहे, *'भाभो भारमा तो वहु लाजमां.'* (सासरा सुनेला आदराने वागवीत असेल तर सूनदेखील सासऱ्यांचा आदर करेल.) म्हणून मनाबरोबर अगदी पद्धतशीर वागायला हवे. या 'मनाने'च सर्वांचे पतन केले आहे. म्हणून तर सगळे, साधू, आचार्य यांना सतत डोकेफोड करावी लागते. गुरु बनलेले म्हणून त्यांचे पतन झाले, म्हणून शिष्यांचे

शिष्य आणि त्या शिष्यांच्या शिष्यांचेही शिष्य बनून हे बसले आहेत! कारण मन कधीही उसळी मारून आपटून टाकते. मनामध्ये प्रचंड शक्ती असते! कुठल्याही वस्तूवर कंट्रोल (बंधन) असतो, तेव्हा मन काय करते?

**प्रश्नकर्ता :** ते कंट्रोल झुगारून देते. निरंकुश बनते, बेकाबू होते.

**दादाश्री :** कारण ते त्याच्या स्वभावाविरुद्ध आहे. मन म्हणते मला अडवू नका

**प्रश्नकर्ता :** याच वेळी गुरुंची गरज आहे.

**दादाश्री :** हो, गुरुशिवाय तर काम होणारच नाही. स्वतः कसे कसे काय करू शकेल?

**प्रश्नकर्ता :** मनाची वृत्ती जेव्हा सैरावैरा धावते तेव्हा गुरुची गरज भासते.

**दादाश्री :** गुरुशिवाय कोणीही मोक्षाला गेलेले नाही. फक्त तीर्थंकर की जे स्वयंबुद्ध होते, ते गेले. पण त्यांना देखील मागील जन्मी गुरु लाभलेलेच होते. त्यांच्याद्वारे त्यांना ज्ञानांजनचे अंजन झाले होते, म्हणून त्यांना अडचण नव्हती. परंतु अन्य लोकांना गुरु नसेल तर त्यांना अतोनात त्रास होईल. माथी कुणी नसेल तर स्वच्छंद उभा होतो. आता या मनास मारणे, ते सुद्धा स्वच्छंदच आहे, आणि मनाचे लाड पुरवणे ते सुद्धा स्वच्छंदच आहे.

मनावर तर प्रभाव पडला पाहिजे. म्हणजे काय, ते मी तुम्हाला समजावून सांगतो. समजा, इथे कोणी या भाऊंना मारायला आले तर 'मला' बघताच त्याची वाचा बसेल, तो अगदी गप्प बसेल, याचे कारण काय? तर प्रभाव! मला काहीच बोलावे लागत नाही. तिथे प्रभावच काम करतो. त्याचप्रमाणे मनावर 'आपला' प्रभाव पडला पाहिजे. ज्या मनाकडून आपण चुकीचे काम करण्यासाठी मदत घेतो त्या मनावर आपला प्रभाव कसा राहील? शक्यतो मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार यांच्यावर आपला असा प्रभाव असला पाहिजे की हा चोर नाही. परंतु

आपण जर चुकीचे काम करण्यात त्याची मदत घेतली तर मन आपल्याला चोर समजू लागते. जर घरात आपला प्रभाव असेल तर कोणी विरोध करते का?

**प्रश्नकर्ता :** नाही करत.

**दादाश्री :** तसेच मनावर 'आपला' प्रभाव पडला पाहिजे. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार या सर्वांवर आपला प्रभाव असला पाहिजे. जसे मुरली वाजवल्यावर नाग फणा काढून डोलू लागतो, त्याचप्रमाणे मन, बुद्धी, चित्त व अहंकाराचे असले पाहिजे. असा प्रभाव पडला पाहिजे. ते सगळे परमाणूंपासून बनले आहेत. त्या बिचाऱ्यांना देखील शाता हवी असते. प्रभावामुळे शाता उत्पन्न होते. पण आपणच त्यांच्याकडून चुकीचे काम करवून घेतले तर 'आपला' प्रभाव नष्ट होतो.

हे जे तुम्ही खाता-पिता, ती सगळी प्रकृती आहे. (एकीकडे) आत्मा आहे आणि (दुसरीकडे) अनात्मा आहे. या दोघांच्यामध्ये प्रकृती आहे. दिसते चेतनस्वरूप पण मुळात जड स्वभावाची आहे, मिश्रचेतन आहे. 'खरे चेतन' नाही. साधू-संन्यासीना हे चेतनसारखे दिसले म्हणून त्यांनी त्यास रियल चेतन मानून घेतले. पण तो आत्मा नाही. ते जे मानतात त्याच्या पलीकडे रिअल चेतन आहे. जर 'ज्ञानी पुरुष' भेटतील, सर्वज्ञ भेटतील, आणि ते जेव्हा देतील तेव्हाच 'खरा आत्मा' प्राप्त होईल. बाकी, मानलेल्या आत्म्याने क्रोध-मान-माया-लोभ कधीच नाहीसे होणार नाहीत.

''प्रकृतीचा एक पण गुण 'शुद्ध चेतनात' नाही आणि
शुद्ध चेतनाचा एकही गुण प्रकृतीत नाही.''

हे सूत्र बारकाईने पूर्णपणे समजण्यासारखे आहे.

❖❖❖❖❖

## सहज प्राकृत शक्तीच्या देवी

अंबामाता, दुर्गादेवी या सगळ्या देवी प्रकृती भाव सूचित करतात. त्या सहजता सूचित करतात. प्रकृती सहज झाली तर 'आत्मा' सहज होतो किंवा 'आत्मा' सहज झाला तर प्रकृती 'सहज' होते. 'आपण' स्वत:च्या प्रकृतीकडून या देवींची भक्ती करवून घ्यावी. 'आपण आत्मभावाने' करू नये, 'चंदुलाल'कडून देवींची भक्ती करवून घ्यावी, आणि तसे केले तरच प्रकृती सहज होईल.

हिंदुस्तानात लोकांनी देवींना वेगवेगळी नावे दिली आहेत. तर ते सायन्स पण किती विशाल असेल! किती संशोधन करून अंबामाता, सरस्वतीदेवी, लक्ष्मीदेवी यांना शोधले असेल? एवढे सगळे केले म्हणून तर सायन्सने केवढी मोठी उंची गाठली असेल! पण हे सगळे आता संपले आहे, तेव्हा आता लोकांना 'देवीचे' (नीट) दर्शन करताही येत नाही.

देवी (अंबामाता) ही आद्यशक्ती आहे! ती प्राकृत शक्ती देते. या देवीची भक्ती केली तर प्राकृत शक्ती उत्पन्न होते. अंबामाता संसारातील विघ्ने दूर करतात परंतु मुक्ती मात्र ज्ञानाद्वारेच प्राप्त होते. दर्शन करता आले तर अंबामाता, बहुचरामाता, कालिकामाता आणि भद्रकालीमाता, या चारही देवी अगदी हजरच आहेत. या देवी पापांचा नाश करू शकत नाहीत पण प्राकृत शक्ती देतात.

ही अंबामाता 'आमचे' (दादाजींचे) किती रक्षण करते! आमच्या आसपास चारी बाजूला देवी-देवता हजरच असतात. देवी-देवतांना

विचारल्याशिवाय, त्यांच्या आज्ञेशिवाय आम्ही एक पाऊलदेखील उचलत नाही. 'आमच्या'वर आणि 'आमच्या महात्म्यांवर' सर्व देवी-देवतांच्या कृपेचा वर्षाव होतच असतो!

## माताजी

अंबिकादेवी म्हणजे सहज प्रकृती. प्रत्येक देवींचे काही नियम असतात. त्या नियमांचे पालन केले तर त्या देवी प्रसन्न होतात. 'आम्ही' अंबामातेचे एकमेव लाल (पुत्र) आहोत. मातेजवळ आमची चिठ्ठी घेऊन जाल तर ती त्या चिठ्ठीचा स्वीकार करेल. तुमचा मुलगा असेल आणि नोकर असेल, पण तो नोकर जर तुमचे सर्व नियम पाळत असेल तर तो नोकर तुम्हाला प्रिय वाटेल ना? वाटणारच. 'आम्ही' कधीच अंबामाता, लक्ष्मीमाता आणि सरस्वतीदेवी, यांचे नियम मोडलेले नाहीत. आम्ही निरंतर त्यांच्या नियमानुसारच वागतो. म्हणून या तिन्ही देवी आमच्यावर कायम प्रसन्न असतात! तुम्हाला देखील त्यांना प्रसन्न ठेवायचे असेल तर त्यांचे नियम पाळले पाहिजेत.

**प्रश्नकर्ता :** अंबामातेचे काय नियम आहेत? आमच्या घरातील सगळेच अंबामातेची भक्ती करतात, पण आम्हाला तिचे नियम माहीत नाहीत.

**दादाश्री :** अंबामाता म्हणजे काय? ती प्रकृतीची सहजता सुचवते. जर सहजता तुटली तर अंबामाता तुझ्यावर कशी प्रसन्न होईल? या अंबामातेबद्दल तर काय बोलावे? ती तर माता आहे, आई आहे. बंगालमध्ये जिला दुर्गा म्हणतात तीच ही अंबा. सर्व देवींना वेगवेगळी नावे दिली आहेत, पण त्या जबरदस्त देवी आहेत! पूर्ण प्रकृती आहे. पूर्ण प्रकृतीचा भाग म्हणजेच अंबामाता. प्रकृती जर सहज झाली तर 'आत्मा' सहज होणारच 'आत्मा' आणि 'प्रकृती', यातील कोणीही एक 'सहज' होऊ लागला तर दोन्ही सहज होतील!

## सरस्वतीदेवी

**प्रश्नकर्ता :** सरस्वतीदेवीचे काय नियम आहेत?

**दादाश्री :** सरस्वती म्हणजे वाणीसंबंधित जे जे नियम आहेत, ते सर्व पाळले तर सरस्वती देवी खुश राहते. जर वाणीचा दुरुपयोग केला, खोटे बोलला, कावेबाजी केली तर सरस्वती कशी प्रसन्न होईल? तुझ्या मनात जसे असेल तसे जर तू नाही बोललास तर सरस्वती कशी प्रसन्न होईल? आजकाल कोणाकडेच 'वचनबल' का राहिले नाही? कारण कोणीच वाणीच्या नियमांचे पालन करत नाही. मनुष्य जन्मात आल्यानंतर दोन प्रकारच्या बलांची आवश्यकता आहे, एक मनोबल आणि दुसरे वचनबल. देहबळाची गणना पाशवतेत होते. वचनबल आणि मनोबल 'रिलेटिव्ह आत्म्या'ला बळकट करतात. आजकाल वचनबल तर लुप्त झाले आहे आणि मन फ्रॅक्चर झाले आहे. सध्या वचनबल कसे झाले आहे? वडील जर मुलाला म्हणाले अरे, जरा उठून उभा रहा.' तर मुलगा आडवा होऊन झोपून जातो! स्वतःचा मुलगाच ऐकत नाही. हे 'वचनबल' का बरे नाहीसे झाले? तर वाणीचा चुकीचा उपयोग केला म्हणून. जर वाणीचा कुठल्याही प्रकारे अपव्यय केला नाही, वाणीला कोणत्याही विभाविक स्वरूपात नेले नाही, तर वचनबल उत्पन्न होईल.

खोटे बोलणे, कावेबाजी करणे याला वाणीचा अपव्यय म्हणतात. वाणीचा अपव्यय आणि दुर्व्यय यात खूप फरक आहे. अपव्यय म्हणजे सर्व प्रकारे नालायक, सर्व प्रकारे दुरुपयोग करणे. वकील दोन रुपयांसाठी खोटे बोलतात की, 'होय, मी यांना ओळखतो,' याला वाणीचा अपव्यय म्हणतात.

वाणीने अनेकांना घाबरवले, कुत्र्यांना घाबरवले, खोटे बोलले, फसवले, या गोष्टींना वाणीचा दुरुपयोग केला असे म्हणतात. यामुळे वचनबल तुटते. फक्त खरेच बोललात आणि जर सत्याचा आग्रह धरला नाहीत तर वचनबल पुन्हा उत्पन्न होते. वस्तूचा जर दुरुपयोग झाला तर त्याचे वचनबल कमी होते. स्वतःच्या बचावासाठी खोटे बोलले तर मन, वाणी सगळेच फ्रॅक्चर होते. सत्य बोलतो पण त्यामागची भावना पण जबरदस्त असली पाहिजे. या 'दादां'च्या वचनबलासारखे वचनबल पाहिजे. 'उठ' म्हटले तर उठले पाहिजे. 'आमचे' वचनबल तर अद्‌भुत

आहे! 'आमचे' शब्द कसे असतात? ते शास्त्रांमधले शब्द नसतात. शास्त्रांमधील शब्द 'जड' असतात आणि ते बोचतात, आणि 'आमच्या' प्रत्यक्ष 'चेतन' शब्दांनी तर आत 'ज्ञान' हजर होऊनच जाते! आत्माच प्रकट होऊन जातो! शिवाय आमचे शब्द अजिबात बोचत नाहीत 'आमच्या' वाणीमुळे अजिबात अजीर्ण होत नाही. हे तर संपूर्ण 'ज्ञानार्क' आहे! ते पचते आणि अजीर्ण होत नाही. 'ज्ञानी पुरुषां'चा एक शब्द देखील वाया जात नाही! गजब, जबरदस्त वचनबल असते त्या शब्दांत. त्यांचा एक-एक वचनावर जग आफरीन होईल! ज्ञानी पुरुषांचे एकच वचन थेट मोक्षापर्यंत पोहोचवते. 'आमच्या' एकेक शब्दात 'चेतन' आहे. वाणी 'टेपरेकॉर्ड' स्वरूप आहे, जड आहे. पण 'आमची' वाणी 'आमच्यात' प्रकट झालेल्या 'परमात्म्याला' स्पर्श करून निघत आहे, म्हणून ती 'निश्चेतन'ला 'चेतन' करील अशी चेतनवाणी आहे! समोरच्याची मात्र तशी भावना असावी. 'आम्ही' सांगितले 'ए, उडी मार', तर तो दहा फुटाच्या खड्डयात पण उडी मारील. तेव्हा काही लोक म्हणतात 'तुम्ही' शक्तिपात करता. नाही, आमच्या वचनातच एवढे बळ आहे. एखादा मनुष्य जर डिप्रेशन (नैराश्य) मध्ये गेला असेल तर आम्ही 'आमच्या' डोळ्यांनी त्याला प्रेम पाजतो. 'ज्ञानी पुरुष' तर कसेही करून शक्ती प्रकट करवितात. त्यांच्या शब्दात गजब वचनबळ असते.

कवी काय म्हणतात :

*''जगत् उदय अवतार, देशना ते श्रुतज्ञान,*
*स्याद्‌वाद ज्ञान-दान सर्वमान्य परमाण.''*

जेव्हा जगाचा उदय चांगला असतो, तेव्हा 'ज्ञानी पुरुष' प्रकट होतात. आणि त्यांची देशना म्हणजेच 'श्रुतज्ञान' आहे. त्यांच्या एकाच वाक्यात सर्व शास्त्र पूर्णरूपाने सामावतात.

शास्त्रात लिहिले आहे की 'सत्य बोला.' पण लोक म्हणतात 'आम्ही सत्य बोलू शकत नाही.' तेव्हा आता काही कलियुगी शास्त्र द्या तरच काम होईल. या कलियुगाचा परिणाम होणार नाही. आणि मोक्षाला घेऊन जातील अशी शास्त्रे आता लिहिली जातील. खरे बोला,

दया करा, शांती ठेवा, या सर्व शास्त्रांच्या गोष्टी आता जुनी औषधे झाली! आता नवीन औषधांची आवश्यकता आहे. आपला निश्चय मात्र खरे बोलण्याचाच असला पाहिजे. पण त्यातून जर चूक झाली तर आपण 'चंदुभाई'कडून प्रतिक्रमण करवून घ्यायला हवे. 'आमचे' शब्द आवरणे तोडून टाकणारे असतात. तुम्हाला 'आत' पूर्ण स्पष्टीकरण मिळेल असे ज्ञानींचे वचनबल आहे. तुम्ही येथे आमच्या जवळ बसता तेव्हा तुम्ही जग विसरता. जगाची विस्मृती म्हणजेच मोक्ष!

आमची वाणी प्रत्यक्ष सरस्वती म्हटली जाते. फोटोमधील सरस्वती, शास्त्रामधील किंवा पुस्तकातील सरस्वती, ही 'परोक्ष' सरस्वती आहे. प्रत्यक्ष सरस्वतीचे दर्शन करायचे असेल तर येथे आमची वाणी ऐकली की दर्शन होईल.

हे सगळे बोलले जात आहे पण यात एक अक्षर देखील 'मी' बोलत नाही. तुमच्या पुण्यामुळे हे शब्द बाहेर पडतात. 'ही' वाणी निघते त्यावरून आम्हाला कळते की समोरच्याचे पुण्य कसे आहे? 'आमची' वाणी सुद्धा टेपरेकॉर्ड आहे, त्यात आमचे काय देणेघेणे? तरी पण आमची रेकॉर्ड कशी असते? तर संपूर्ण स्याद्‌वाद! कुठल्याही जीवमात्राला किंचितदेखील दु:ख होणार नाही, प्रत्येकाचे प्रमाण (मान्यता, श्रद्धा) जिला स्वीकार करेल अशी 'ही' स्याद्‌वाद वाणी आहे.

सरस्वतीची आराधना म्हणजे काय? तर वाणीचा कुठल्याही प्रकारे अपव्यय न करणे आणि वाणीला तिच्या विभाविक स्वरूपात न नेणे. जर खोटे बोलले गेले तर तो केवढा मोठा विभाव आहे!

'क्षत्रिया'चे वचन म्हणजे वचनच, ते आपला शब्द फिरवीत नाहीत. सध्या मुंबई शहरात असा कुणी क्षत्रिय नाहीच ना! अरे! वचन तर सोडूनच द्या, पण लिहिलेले दस्तावेज, सही केलेले दस्तावेज देखील आजकाल लोक नाकारतात, 'ही माझी सही नाही' असे म्हणतात. आणि खरा क्षत्रिय तर एकदा बोलला म्हणजे बोलला.

हे चारण लोक फोटोतल्या सरस्वतीची पूजा करतात तरी पण त्यांची वाणी किती गोड असते!

## लक्ष्मीजी

**प्रश्नकर्ता :** 'लक्ष्मी'चे नियम काय आहेत!

**दादाश्री :** चुकीच्या पद्धतीने (अप्रामाणिकपणे) पैसे कमावू नये, असा लक्ष्मीजींचा नियम आहे. तो नियम जर मोडला तर लक्ष्मी कशी प्रसन्न होईल? मग जरी तू लाख वेळा लक्ष्मीला धुतलेस तरीही. सर्वच धुतात. तिथे विलायतेत कोणी असे लक्ष्मीला धुवून काढतात का?

**प्रश्नकर्ता :** नाही, दादा, तिथे तर कोणीच लक्ष्मीला धुवून काढत नाही.

**दादाश्री :** तरी पण लक्ष्मी त्या फॉरेनर्सकडे येते की नाही? लक्ष्मी काय अशी धुवून येत असेल का? आपल्या हिंदुस्तानात तर अगदी दह्यात पण धुतात. सगळेच लक्ष्मीला धूत असतात, कोणीच कच्चा नाही. मला पण लोक येऊन विचारतात, 'तुम्ही लक्ष्मीला धुतली की नाही?' मी म्हटले 'कशासाठी?' जेव्हा लक्ष्मीजी भेटतात तेव्हा आम्ही त्यांना सांगतो की, बडोद्यात, मामाची बोळ आणि सहावे घर, तुम्हाला जेव्हा अनुकूल वाटेल तेव्हा यावे आणि जेव्हा जायचे असेल तेव्हा जावे. तुमचेच घर आहे. तुमचे स्वागत आहे, इतके आम्ही त्यांना सांगतो. आम्ही विनय चुकत नाही. आम्ही तेव्हा असे म्हणत नाही की, 'आम्हाला तुमची गरज नाही.'

लक्ष्मीचा तिरस्कार करू नये. काही साधू-महाराज वगैरे लक्ष्मीला पाहून 'नको, नको' असे करतात. त्यामुळे त्यांना कित्येक जन्म लक्ष्मीवाचून काढावे लागतात. अरे वेड्या, लक्ष्मीजींचा असा तिरस्कार करू नकोस. नाही तर स्पर्श करायला देखील लक्ष्मी मिळणार नाही. तिरस्कार करता कामा नये. कोणत्याच गोष्टींचा तिरस्कार करता कामा नये. नाही तर पुढल्या जन्मात लक्ष्मीचे दर्शन सुद्धा मिळणार नाही. लक्ष्मीचा तिरस्कार करणे म्हणजे व्यवहार लाथाडण्यासारखे आहे. हा तर व्यवहार आहे. म्हणून आम्ही लक्ष्मी आली तरी 'जय सच्चिदानंद' म्हणतो आणि लक्ष्मी गेली तरी 'जय सच्चिदानंद' म्हणतो. हे 'आपलेच घर आहे. जेव्हा

अनुकूल असेल तेव्हा तुम्ही या' अशी विनंती केली पाहिजे. लक्ष्मीजी म्हणतात 'हे शेठ तर आमच्या मागेच लागतात, त्यामुळे पायाची कातडी झिजते. तरी मागे लागतात, दोन-चार वेळा पडतात, तेव्हा मनात भाव करतात की, जळो! यात तर आपले गुडघे सोलून निघतात, पण तितक्यातच आम्ही त्यांना पुन्हा खुणावतो, तेव्हा ते उठून पुन्हा धावू लागतात. म्हणजे आम्हाला त्यांना मार मारत राहायचे आहे. जखमा होऊन रक्तबंबाळ करून टाकायचे आहे. त्यांना इतकी सूज आली आहे तरीही त्यांना समज येत नाही.' लक्ष्मीजी तर फार हुशार आहेत!

## कलियुगातील लक्ष्मी

सध्याच्या काळातील लक्ष्मी 'पापानुबंधी पुण्याची' आहे. म्हणून ती क्लेश करविणारी आहे. यापेक्षा तर ती कमी मिळाली तरी चांगले, घरात क्लेश तरी शिरणार नाही. आजकाल जिथे जिथे लक्ष्मी आहे तिथे तिथे क्लेशमय वातावरण होऊन जाते. बत्तीस पक्वान्ने मिळण्यापेक्षा फक्त भाजी-पोळी मिळाली तरी चांगलेच आहे. कारण बत्तीस पक्वान्ने खाऊनही क्लेश होत असेल तर काय फायदा? आजच्या काळात लक्ष्मी येते आणि क्लेश देते. 'पापानुबंधी पुण्याची' लक्ष्मी दु:ख देऊन जाते, नाही तर फक्त एकच रुपया, अहोहो! किती सुख देतो! 'पुण्यानुबंधी पुण्य' तर घरात सगळ्यांनाच सुख-शांती देते. घरात सर्वांना फक्त धर्माचेच विचार येत राहतात.

लक्ष्मी कशी आहे? कमावताना दु:ख, सांभाळताना दु:ख, रक्षण करताना पण दु:ख आणि खर्च करताना पण दु:खच. घरात लाख रुपये आले तर ते सुरक्षित कसे ठेवायचे त्याची काळजी वाटते. कुठली बँक सुरक्षित आहे ते शोधावे लागते. शिवाय नातेवाईकांना समजले तर लगेच ते धावत येतात. सगळे मित्र धावत येतात. म्हणतात, 'अरे यार, माझ्यावर एवढा पण विश्वास नाही? मला फक्त दहा हजारच हवे आहेत.' मग नाइलाजाने द्यावे लागतात. म्हणजे पैसे जास्त असतील तरीही दु:ख, कमी असतील तरीही दु:ख. त्यापेक्षा नॉर्मल असलेलेच बरे, नाही तर लक्ष्मी खर्च करताना पण दु:ख वाटत राहते.

एखाद्या बाईने नवीन साडी घेतली, तर लगेच दुसऱ्या बाईच्या मनात येते 'अशी साडी माझी पण असती तर?' अशा विचारांनी तिला दु:ख होते. म्हणजे लक्ष्मी आली तरी दु:ख आणि गेली तरी दु:ख होते. म्हणतो की आपले चाळीस हजार बँकेत आहेत ते कधीच काढायचे नाहीत. त्याला असे वाटते की आता हे कायम 'क्रेडिट'च राहतील. पण असे नसते, त्यात डेबिटचे खाते सुद्धा जोडलेलेच असते. लक्ष्मी येते ती जाण्यासाठीच. या नदीत देखील पाणी जास्त झाले तर ती म्हणते, या, पाहिजे तेवढे पाणी घेऊन जा. याउलट माणसे मात्र पैसे वाढले तर साठवून ठेवतात. नदीत जर 'चेतना' असती ना, तर तिने पण आपले पाणी साठवून ठेवले असते! जितके येतात तितके खर्च केले पाहिजेत. साठवून का ठेवायचे? खा, प्या, दुसऱ्यांना खायला घाला. हे तर पूरण-गलन स्वभावाचे आहे. जेवढे पूरण झाले तेवढे गलन होईल. जर गलन झाले नाही तर संकट येईल. पण जितके गलन होते तितके खाल्लेही जाते. हा श्वास घेतला म्हणजे 'पूरण' झाले आणि उच्छ्वास सोडला म्हणजे 'गलन' झाले. सगळ्या गोष्टी 'पूरण-गलन' स्वभावाच्या आहेत. म्हणून आम्ही असा शोध लावला की 'कमी पण नको आणि जास्त पण नको!' 'आम्हाला कधी लक्ष्मीची कमतरता पडली नाही आणि कधी अधिकता पण झाली नाही!' कमतरता झाली तर माणूस कोमेजून जातो (कृश होतो) आणि जास्त झाली की जाड होतो. अधिक म्हणजे काय, तर लक्ष्मी तिथून दोन-तीन वर्षांपर्यंत जातच नाही. लक्ष्मी फिरत असलेली बरी, नाही तर दु:खदायी होते. आम्हाला कधी लक्ष्मीची आठवणसुद्धा येत नाही, ज्यांनी लक्ष्मीचे दर्शन घेतलेच नाही त्यांना लक्ष्मीची आठवण येते. पण आमच्याकडे तर लक्ष्मी आणि नारायण, दोन्ही एकत्रच राहतात. लक्ष्मी समोर दिसली तर आम्ही तिचा विनय करतो. त्यात आम्ही चूक करत नाही.

आपल्यात एक म्हण आहे की, 'मुलगा असेल तर सून येणारच ना!' 'नारायण' आहेत तर 'लक्ष्मी' येणारच. आपण फक्त तिला विनयपूर्वक आपल्या घराचा पत्ताच द्यायला हवा. पण इथे तर जसे नव्या नवरीला सासरची माणसे थांबून ठेवतात तसेच लोक लक्ष्मीजीला थांबवून

ठेवतात. लक्ष्मीजीला विनय हवा असतो, जिथे भगवंत आहेत तिथे वैभवाला काय कमी?

लक्ष्मी तर हाताला जसा सहज मळ येत राहतो तसेच प्रत्येकाच्या हातात (कर्माच्या) हिशोबाप्रमाणे येतच राहते. जो लोभामुळे आंधळा होतो त्याच्यासाठी सर्व दिशा बंद होतात. त्याला दुसरे काहीच दिसत नाही. एका शेठजीचे चित्त दिवसभर व्यापारात अधिकाधिक पैसे मिळविण्याकडेच असते, पण आपल्या घरी आपला मुलगा-मुलगी काय काय करत आहेत, कॉलेज सोडून इतर कुठे फिरत आहेत, याकडे शेठचे लक्ष असते का? अरे, तू इथे पैशाच्या मागे लागला आहेस पण तिथे तुझे घर बरबाद होत आहे. आम्ही त्याच्या भल्यासाठी त्याला हे स्पष्टच सांगतो.

## 1942 नंतरची लक्ष्मी

**प्रश्नकर्ता :** मी दहा हजार रुपये महिन्याचे कमावतो, पण माझ्याजवळ लक्ष्मी टिकत का नाही?

**दादाश्री :** 1942 नंतरची लक्ष्मी टिकत नाही. ही लक्ष्मी पापाची आहे, म्हणून ती टिकत नाही. आता 2-5 वर्षानंतरची लक्ष्मी टिकेल. 'आम्ही' 'ज्ञानी' आहोत, तरीही आमच्याकडे आलेली लक्ष्मीसुद्धा टिकत नाही. 'इन्कमटॅक्स' भरण्यापुरती 'लक्ष्मी' मिळाली तरी पुरे.

**प्रश्नकर्ता :** लक्ष्मी टिकत नसेल तर काय करावे?

**दादाश्री :** लक्ष्मी टिकेल अशी नाहीच. फक्त आपण तिचा मार्ग बदलला पाहिजे. ती त्या मार्गावर आहे तर तिचा प्रवाह बदलून धर्माच्या मार्गावर वळवावे. ती जितकी सन्मार्गावर जाईल तितके उत्तम. भगवंत आल्यानंतर लक्ष्मी टिकेल, नाही तर कशी टिकेल? भगवंत असतात तिथे क्लेश होत नाहीत आणि जिथे फक्त लक्ष्मी असते तिथे क्लेश आणि भांडणे होतात.लोक भरपूर पैसे मिळवितात पण ते सगळे वायफळ गोष्टींसाठी खर्च होतात. एखादा पुण्यवंतच लक्ष्मी चांगल्या कामासाठी खर्च करतो. लक्ष्मी चांगल्या कामासाठी खर्च केली तर ते खूप मोठे पुण्य म्हटले जाते.

1942 नंतरच्या लक्ष्मीत काहीच अर्थ उरला नाही. आजकाल लक्ष्मी योग्य जागी खर्च होत नाही. योग्य जागी खर्च झाली तर ते उत्तम म्हणायचे. इथे आपल्याकडे तर फक्त मोक्षाचीच गोष्ट आहे.

वाणिक बुद्धीवाल्या लोकांना लक्ष्मी मिळविण्याची ट्रिक (चलाखी, लबाडी) चांगलीच समजली आहे की मी जितके पैसे कमावले त्याच्या एक अष्टमांश देवासाठी वापरीन, नंतर त्याचे पीक घेईन. म्हणजे मग पैसे मिळत राहतील. देवाला पण त्याची लक्ष्मी मिळविण्याची ही ट्रिक समजली आहे. म्हणून देव काय म्हणतो. तुम्ही लक्ष्मीच मिळवत राहा, पण तुम्हाला मोक्ष मिळणार नाही.

लोकांची लक्ष्मी गटारात चालली आहे. पुण्याची कमाई संत पुरुषांसाठी खर्च केली जाते.

क्षत्रियांचा स्वभाव कसा असतो की देवळात भगवंतांचे दर्शन करायला गेले तर खिशात हात घालून येतील तेवढे पैसे भगवंतांचे चरणी अर्पण करतात. याउलट वाणिक बुद्धीवाले लोक आधीपासूनच ठरवून पैसे टाकतात. रुपयाची नोट निघाली तर त्याचे सुट्टे पैसे करून घेऊन फक्त दहा पैसे पेटीत टाकतात.

## लक्ष्मीजींचा स्वभाव

**प्रश्नकर्ता :** पैसे किती प्रमाणात कमावायला हवेत हे कसे ठरवायचे?

**दादाश्री :** असे काही ठरवायचे नाही. रोज सकाळी अंघोळ करावी लागते ना? तर कुणी असा विचार करतो की, आज फक्त तांब्याभरच पाणी मिळाले तर काय होईल? त्याचप्रमाणे लक्ष्मीचा पण विचार येता कामा नये. दीड बादली पाणी मिळेल हे ठरलेलेच आहे आणि दोन तांबे पाणी मिळेल तेही ठरलेलेच आहे, त्यात कोणी कमी-जास्त करू शकत नाही. म्हणून मन-वचन-कायेने लक्ष्मीसाठी तू प्रयत्न कर, पण इच्छा मात्र करू नकोस. लक्ष्मी म्हणजे एकप्रकारे बँकबॅलेंस आहे, बँकेत जमा असेल तरच मिळेल ना? कोणी लक्ष्मीची

इच्छा केली तर लक्ष्मीजी म्हणतात, 'तुला या जुलैला पैसे मिळणार होते पण ते आता मात्र पुढच्या जुलैला मिळतील.' आणि जर कुणी म्हटले, 'मला पैशांची गरज नाही' तर तो सुद्धा मोठा गुन्हा आहे. लक्ष्मीजींचा तिरस्कारही करू नये आणि इच्छाही करू नये. त्यांना तर नमस्कार करायला हवा. त्यांचा विनय राखावा. कारण त्या हेड ऑफिसात आहेत.

लक्ष्मीजींचे आगमन तर त्याचा काळ परिपक्व झाल्यावर होतच असते. इथे तर लोक इच्छेमुळे अंतराय (अडथळा, विघ्न) निर्माण करतात. लक्ष्मी म्हणते 'ज्या वेळेस ज्या परिसरात राहायचे असते त्यावेळेस तिथेच राहायला हवे. आणि आम्ही वेळोवेळी पाठवूनच देतो. तुझे सगळे ड्राफ्टस् वगैरे सर्व अगदी वेळच्या वेळी येत राहतील पण माझी इच्छा मात्र करू नकोस. कारण ज्याचे नियमपूर्वक आहे त्याला आम्ही व्याजासकट पाठवूनच देतो. जे इच्छा करतात त्यांना आम्ही उशिरा पाठवतो आणि जे इच्छा करत नाहीत त्यांना वेळेवर पाठवतो.' लक्ष्मी आणखी काय म्हणते, 'तुला मोक्ष हवा असेल तर जी तुझ्या हक्काची लक्ष्मी आहे तेवढीच घे. लक्ष्मी कोणाकडूनही हिसकावून, लुबाडून घेऊ नकोस.' तरीपण लक्ष्मीची उलथापालथ (येणे-जाणे) झाल्याशिवाय अनुभव येत नाही. आणि अनुभव आल्याशिवाय मोक्षाला जाता येत नाही.

## लक्ष्मीजींचे जाणे

**प्रश्नकर्ता :** लक्ष्मीची कमतरता कशामुळे भासते?

**दादाश्री :** चोरीमुळे. जिथे मन-वचन-कायेने चोरी केली जात नाही तिथे लक्ष्मीजींची कृपा असते. चोरीमुळे लक्ष्मी मिळण्यात अंतराय (विघ्न) निर्माण होतात. ट्रिक आणि लक्ष्मी यांचे वैर आहे, 'स्थूल' चोरी बंद होते तेव्हाच उच्च कुळात जन्म मिळतो. पण सूक्ष्म चोरी म्हणजे ट्रिक्स् करतात ते म्हणजे एकदम हार्ड (तीव्र) रौद्रध्यान आणि त्याचे फळ म्हणजे नरकगती. हे व्यापारी कापड ताणून मोजतात. ते हार्ड रौद्रध्यान आहे. ट्रिक असताच कामा नये. ट्रिक कशाला म्हणतात? 'एकदम शुद्ध माल आहे' असे सांगून भेसळयुक्त माल देऊन वर खुश होतो. आम्ही जर त्याला विचारले 'असे करणे योग्य आहे का?' तर

तो म्हणतो, 'असेच करायचे असते.' पण ज्याला प्रामाणिकपणे व्यवसाय करायाची इच्छा आहे त्याने असे म्हटले पाहिजे की, 'मला तर चांगलाच माल देण्याची इच्छा आहे, पण हा असा माल आहे, तो घेऊन जा.' एवढे बोललो की मग आपली जबाबदारी नाही.

सगळे मुंबई शहर दुःखी आहे. कारण ज्यांची पाच लाख मिळवण्याची लायकी आहे ते एक कोटी रुपयांवर शिक्का मारून बसले आहेत आणि ज्यांची हजार मिळवण्याची लायकी आहे ते लाखावर शिक्का मारून बसले आहेत.

**प्रश्नकर्ता :** पैसा नाशवंत आहे, पण पैशांशिवाय तर चालतच नाही. ट्रेनमध्ये बसण्यापूर्वी हातात पैसा तर पाहिजे.

**दादाश्री :** जसे पैशांशिवाय चालत नाही तसेच पैसे मिळणे न मिळणे ही गोष्ट आपल्या सत्तेत (हातात) नाही ना! जर कष्टांनी लक्ष्मी मिळत असेल तर मजूर किती कष्ट करतात? पण त्यांना जेमतेम खाण्यापुरते मिळते आणि शेठजी काहीही कष्ट न करता दोन-दोन गिरण्यांचे मालक असतात.

लक्ष्मी कशामुळे येते आणि कशामुळे जाते, हे आम्ही जाणतो. लक्ष्मी कष्टाने मिळत नाही किंवा हुशारीमुळे, ट्रिक्स् वापरून मिळत नाही. लक्ष्मी कशी कमावली जाते? जर सरळ मार्गाने लक्ष्मी कमावली जात असती तर आपल्या मंत्र्यांना चार आणे पण मिळाले नसते! लक्ष्मी पुण्यामुळे कमावली जाते. वेडा असेल तरी पण तो पुण्याईने कमावतो. तुम्हाला वेड्याचे उदाहरण सांगतो.

## लक्ष्मीजींचे येणे

एक शेठ होते. शेठ आणि त्यांचा मुनीम अहमदाबादमध्ये शेजारी शेजारी बसले होते. एक लाकडी पलंग, त्यावर गादी आणि समोर टेबल. त्या टेबलावर जेवणाची थाळी. शेठजी जेवायला बसले होते. शेठ कसे दिसत होते सांगू का? जमिनीवर तीन फुट ऐसपैस बसलेले. जमिनीपासून दीड फुटावर डोके, चेहरा त्रिकोणी, मोठे-मोठे डोळे आणि मोठे नाक

आणि जाड-जाड ओठ आणि जवळ फोन. जेवता-जेवता फोन आला तर फोनवर बोलत. शेठला तर धड खाताही येत नव्हते. पुरीचे दोन-तीन तुकडे जमिनीवर पडले होते आणि भाताची कितीतरी शिते तर जमिनीवर सांडली होती. फोन वाजला की शेठजी सांगायचे, 'दोन हजार गाठोडी घ्या' आणि दुसऱ्या दिवशी दोन लाख कमावून घेत. मुनीम बसल्या-बसल्या डोकेफोड करत असे आणि शेठजी मात्र काहीही कष्ट न करता पैसे कमावत असत. तसे तर शेठ आपल्या अकलेमुळे कमावतात असे दिसते. पण खरे तर ती अक्कल ऐनवेळी पुण्यामुळे प्रकाश देत असते. हे सर्व पुण्यामुळे घडते. शेठ आणि मुनीमला एकत्र बसवले की लगेच कळेल. यात खरी अक्कल तर शेठच्या मुनीमालाच असते, शेठची नाही. हे पुण्य कुठून मिळाले? भगवंतांची समजून पूजा केली म्हणून? नाही, समजल्याशिवायच पूजा केली म्हणून. कोणावर उपकार केले, कोणाचे भले केले, यामुळे पुण्य मिळाले. आगीत चुकून हात धरला तर भाजेलच ना? तसेच समजल्याशिवाय भगवंताची पूजा केली तरी पुण्य मिळते. हे 'अक्रम ज्ञान' आहे. येथे लिफ्टमार्ग आहे म्हणून खात-पीत असताना सुद्धा मुक्ती अनुभवास येते. आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत नाहीत. तेच पुणिया श्रावकचे सामायिक तुम्हाला येथे चाखायला मिळते.

येथे तर लोक दिवसभर (लक्ष्मीसाठी) आर्तध्यान आणि रौद्रध्यान करत असतात, तरी पण तेवढीच लक्ष्मी त्यांना मिळणार. भगवंतांनी सांगितले आहे की लक्ष्मी धर्मध्यानाने वाढते आणि आर्तध्यान-रौद्रध्यानाने कमी होते. लोक तर आर्तध्यान आणि रौद्रध्यान करून पैसे मिळवू पाहतात. पण ती तर पूर्वीचे पुण्य जमा असेल तरच मिळेल. या दादांच्या 'कृपे'मुळे तर सगळे काही मिळते. याचे कारण काय? तर त्यांच्या कृपेमुळे सगळे 'अंतराय' तुटतात. लक्ष्मी तर आहेच पण तुमच्या अंतरायांमुळे ती मिळत नव्हती. 'आमच्या' 'कृपे'मुळे ते 'अंतराय' दूर होतात आणि मग सर्वकाही मिळते. 'दादांची' 'कृपा' तर मनाचे रोग, वाणीचे रोग आणि देहाचे रोग, अशा सर्व प्रकारच्या दु:खांचे अंतराय दूर करणारी आहे. जगातील सर्व प्रकारची दु:खे येथे दूर होतात. एखादा माणूस दोन दोन गिरण्यांचा मालक असतो पण त्याचा दारुडा मुलगा

त्याला रोज शिवीगाळ करतो, बापाला मारतोसुद्धा. असे दु:ख सांगताही येत नाही आणि सहनही करता येत नाही. अशी दु:खे आहेत. हा संसार म्हणजे निव्वळ दु:खांचे साम्राज्यच आहे. मोठमोठे चक्रवर्तीराजा पण राज्य सोडून पळाले. आणि इथे सामान्य माणसांना साधी झोपडी सोडवत नाही. अशी कशी ममता की ती सुटत नाही? आधी, व्याधी आणि उपाधी यांच्या तापामुळे माणूस रताळ्यासारखा चारीबाजूंनी भाजून निघत आहे. दोन गिरण्या असेलला, संसारी, त्यागी, संन्यासी, दोन बायका असलेला असे सगळेच भाजून निघत आहेत. तिथे ही एकच थंडगार सावली निर्माण झाली आहे. नाही तर कसे जगावे हेच समजेनासे झाले आहे 'ही' एवढी एकमेव समाधीची जागा उपलब्ध झाली आहे!

**प्रश्नकर्ता :** आजकाल पैशाला एवढे प्राधान्य दिले जाते, ते का?

**दादाश्री :** जेव्हा माणसाला काहीच सुचत नाही. तेव्हा त्याला असे वाटते की पैशाने सुख मिळेल. ही मान्यता दृढ होते. त्याला वाटते पैशांनी सर्व विषय मिळतील. इतरही सर्व मिळेल असे वाटते. यात त्याचा काही दोष नाही, पूर्वी त्याने अशीच कर्मबंधने गोळा केली आहेत त्याचा परिणाम येत असतो. या संपूर्ण मुंबईत जेमतेम दहा लोक असतील की जे पुण्यानुबंधी पुण्यवाले आहेत, इतर सर्व श्रीमंत पापानुबंधी पुण्यवाले आहेत. आणि ते सतत अपार चिंतेत जगत असतात.

आम्ही पण व्यापारी आहोत. त्यामुळे संसारात व्यापार-धंदा आणि इन्कम टॅक्स, या सर्व गोष्टी आम्हालाही आहेत. आम्ही कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करतो पण तरी त्या व्यवसायात आम्ही संपूर्ण वीतराग राहतो. आम्हाला वीतरागी राहणे कसे जमते? 'ज्ञानामुळे.' अज्ञानामुळे माणसे दु:खी होतात. लक्ष्मी पापानुबंधी पुण्यामुळे आहे पण विचार मात्र पापाचेच असतात. लक्ष्मी पुण्यानुबंधी पुण्यवाल्या माणसाची दासी असते पण ती त्याला खूप उंचावर घेऊन जाते. आणि पापानुबंधी पुण्यवाल्या माणसांचीही लक्ष्मी दासी असते, पण ती त्याला अधोगतीत घेऊन जाते!

आजकालचा माणूस, तो माणूसच राहिलेला नाही! आणि त्यांचा मृत्यू तर पाहा! कुत्र्यासारखा मृत्यू त्यांच्या वाट्याला येतो. बिनहक्काचे

विषय भोगल्याचा हा परिणाम आहे. बुद्धी विपरीत झाल्यामुळे लक्ष्मी असून देखील अपार दु:ख सोसावे लागते. सम्यक बुद्धी माणसाला सुखी करते.

खरी लक्ष्मी केव्हा येते की तुमच्या मनातील भाव सुधारतात तेव्हा. मनात व्यभिचारी विचार असतील तर खरी लक्ष्मी कशी येईल? पापानुबंधी पुण्याची लक्ष्मी शरीराच्या रोमारोमात त्रास देऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** पण लोकांना सध्या पैशांची गरज तर आहेच ना?

**दादाश्री :** हो, पण त्यासाठी काय असे तीव्र रौद्रध्यान करायचे? रोजच अंघोळ करणे हे सुद्धा गरजेचे आहे. मग अंघोळीसाठी ध्यान का बिघडवत नाही? आजकाल तर अंघोळीला पाणी मिळाले नाही तरी लोकांचे ध्यान बिघडते, पण आपण मनात नक्की करावे की पाणी मिळाले तर अंघोळ करीन नाही तर करणार नाही, पण ध्यान बिघडविता कामा नये. येत राहणे हा पाण्याचा स्वभाव आहे, त्याचप्रमाणे लक्ष्मीचा पण तसाच स्वभाव आहे, की ती येत राहते आणि वेळ आल्यावर निघून जाते. संपूर्ण जगात संडास जाण्याची सत्ता देखील त्याची 'स्वत:ची' नाही. ही तर मात्र नैमित्तिक क्रिया करायची असते. पण ध्यान बिघडवून हिसकावून घेण्याची इच्छा ठेवली तर चांगले फळ कसे मिळणार?

एक माणूस आंबे खाण्याच्या इच्छेने एका झाडाखाली बसला. ईश्वराने विचारले 'अरे, तू झाडाखाली का बसला आहेस?' तेव्हा तो म्हणाला 'आंबे खायला.' ईश्वर म्हणाला 'अरे हे तर वडाचे झाड आहे ना! मग या झाडाखाली बसून आंब्याची आशा ठेवून तुला काय मिळणार? तू झाड तर ओळख! झाड ओळखून फळाची आशा ठेव.' 'ज्ञानी पुरुषांजवळ' जा तर तुझे समाधान होईल. लोक तर ईश्वराला विसरून फक्त लक्ष्मीला शोधत हिंडतात. जे भक्त असतात त्यांना नेहमी लक्ष्मीची कमतरता असते. भक्त आणि भगवंत दोन्ही वेगळे असतात. तिथे भेद असतो. भक्त लहरी असतात. नियम असा की लहरीपणा असेल तिथून लक्ष्मी निघून जाते. ज्ञानी व्यवहारात लहरी, नसतात. व्यवहारात फार सतर्क असतात. भक्तीमुळे 'ज्ञानी पुरुष' लाभतात आणि 'ज्ञान' प्राप्त होते, आणि ज्ञानामुळे मोक्ष मिळतो.

भगवंतांनी काय सांगितले होते की नर्मदा नदीची जेवढी रुंदी आणि खोली आहे त्याप्रमाणात नर्मदेत पाणी येते. पण तिच्या क्षमतेपेक्षा जास्त पाणी नर्मदेत पडले तर ती किनारा सोडून आसपासच्या गावात शिरून त्यांना पाण्याखाली घालते. लक्ष्मीचे पण तसेच आहे. नॉर्मल प्रमाणात असेल तोवर ठीक. लक्ष्मी बिलो नॉर्मल (प्रमाणापेक्षा कमी) आली तरीही फिवर (ताप) आहे आणि अबॉव्ह नॉर्मल (प्रमाणपेक्षा जास्त) असेल तरीही फिवर. अबॉव्ह नॉर्मल म्हणजे तर फिवर जास्त आहे. अर्थात दोन्ही प्रकारात लक्ष्मी तापदायक आहे.

लक्ष्मीचा स्वभाव असा आहे की जसजशी लक्ष्मी वाढते, तसतसा 'परिग्रह' वाढत जातो.

कित्येक लोक लक्ष्मीच्या बाबतीत निःस्पृह होतात, तर निःस्पृह भाव कोण करू शकतो? ज्याला आत्म्याची स्पृहा असेल तोच निःस्पृहभाव करू शकतो. परंतु आत्मा प्राप्त झाल्याशिवाय माणसाला आत्म्याची स्पृहा कशी काय होणार? म्हणून फक्त निःस्पृह होतो. परंतु असा निःस्पृह झाला तर भटकतच राहील. सस्पृही-निःस्पृही असेल तरच मोक्ष मिळेल. आम्ही लक्ष्मीच्या विरोधात नाही. त्यामुळे आम्ही लक्ष्मीचा त्याग करत नाही. लक्ष्मीचा त्याग करायचा नाही, पण अज्ञानतेचा त्याग करायचा आहे. काही जण लक्ष्मीचा तिरस्कार करतात. कोणत्याही गोष्टीचा तिरस्कार केला तर परत ती वस्तू मिळत नाही. केवळ निःस्पृह होणे हा निव्वळ वेडेपणा आहे.

## ज्ञानी-सस्पृह, निःस्पृह

आम्ही सस्पृह-निःस्पृह आहोत. भगवंत सस्पृह-निःस्पृह होते. मात्र त्यांचे चेले निःस्पृह झाले आहेत! नेसेसिटी अराइज होईल (गरज उत्पन्न होईल) त्यानुसार काम घ्यावे.

**प्रश्नकर्ता :** सस्पृह-निःस्पृह, कशा प्रकारे? हे समजले नाही.

**दादाश्री :** सांसारिक भावांत आम्ही निःस्पृही आणि आत्म्याच्या भावांत मात्र आम्ही सस्पृही. सस्पृही-निःस्पृही असेल तरच मोक्ष मिळू

शकेल. त्यामुळे सर्व परिस्थितींचे स्वागत करा. वेळेनुरूप काम करा. मग ते फायद्याचे असो की तोट्याचे असो. भ्रांत बुद्धीमुळे 'सत्य' दिसत नाही. भगवंत म्हणतात, तू थियरी ऑफ रिलेटिव्हीटीत राहिलास तरी हरकत नाही, पण जरा अविरोधाभास जीवन असावे. लक्ष्मीचे नियम तर पाळलेच पाहिजेत. चुकीच्या मार्गाने लक्ष्मी मिळवता कामा नये. लक्ष्मीसाठी सहज प्रयत्न करायला हवेत. रोजच दुकानात जाऊन बसले पाहिजे. पण लक्ष्मीची हाव धरता कामा नये. कोणाचे पैसे घेतले असतील तर लक्ष्मी सांगत असते 'पैसे परत करून टाक.' रोज मनात त्याला पैसे परत करायचे आहेत,' हा भाव ठेवला की एक दिवस नक्कीच पैसे परत केले जातील.

दुसरी गोष्ट ही की लक्ष्मीचा कधीही तिरस्कार करता कामा नये. काही जण म्हणतात, 'हमको नहीं चाहिये, लक्ष्मीजी को हम टच भी नहीं करते.' (आम्हाला पैसे नकोत, लक्ष्मीला आम्ही स्पर्शसुद्धा करत नाही.) लक्ष्मीला स्पर्श केला नाही तरी हरकत नाही, पण असे बोलतात आणि त्यांच्या भावांत देखील तसेच असते ती जोखीम आहे. त्यामुळे पुढचे कित्येक जन्म लक्ष्मीशिवाय घालवावे लागतात. लक्ष्मी वीतराग आहे, अचेतन वस्तू आहे (तरीही) तिचा तिरस्कार करता कामा नये. कुठल्याही गोष्टींचा तिरस्कार केला, मग भले ती चेतन असो किंवा अचेतन असो, तिरस्कार केलात तर ती गोष्ट मिळणार नाही. आम्ही 'अपरिग्रही आहोत' असे म्हणतो, पण 'लक्ष्मीला कधीच स्पर्श करणार नाही' असे आम्ही म्हणत नाही. लक्ष्मी तर साऱ्या जगाच्या व्यवहाराचे 'नाक' आहे (मुख्य साधन आहे). 'व्यवस्थित शक्ती'च्या नियमाच्या आधारावरच सर्व देवी-देवतांची स्थापना केलेली आहे. म्हणून कधीही त्यांचा तिरस्कार करू नये.

मन-वचन-कायेने थोडी जरी चोरी केली तर त्याला भरपूर मेहनत करून देखील कमी पैसे मिळतात. चोरी हा लक्ष्मी मिळवण्यात सगळ्यात मोठा अंतराय आहे. हे तर काय होत आहे की मनुष्य जन्मात मनुष्यपणाच्या ज्या ज्या सिद्धी मिळालेल्या असतात त्या सिद्धी वापरून लोक दिवाळखोर

होत जातात. आज प्रामाणिकपणे भरपूर मेहनत करूनसुद्धा लक्ष्मी मिळवू शकत नाही. याचा अर्थ काय? तर या पूर्वीच मनुष्यपणाच्या सिद्धी चुकीच्या पद्धतीने वापरून टाकल्या आहेत. त्याचा हा परिणाम आहे! सर्वात मोठी सिद्धी कोणती? तर 'मनुष्यजन्म.' त्यात देखील उच्च जातीत जन्म घेणे आणि त्यातही हिंदुस्तानात जन्म! याला सर्वात मोठी सिद्धी का म्हणतात? कारण या मनुष्यजन्मातूनच मोक्षाला जाता येते!

जोपर्यंत वाकडा धंदा सुरू होत नाही तोपर्यंत लक्ष्मी जात नाही. वाकडा मार्ग तो लक्ष्मी निघून जाण्याचे निमित्त आहे!

काळा पैसा कशाला म्हणायचे हे मी तुम्हाला समजावून सांगतो. जेव्हा पुराचे पाणी आपल्या घरात घुसते तेव्हा आपल्याला आनंद वाटतो की घर बसल्या पाणी आले. पण जेव्हा पुराचे पाणी निघून जाते आणि नंतर घरात जो चिखल राहतो तो धुता-धुता नाकी नऊ येतात. काळा पैसा हा असाच पुराच्या पाण्यासारखा आहे, तो रोमारोमास दुःख देऊन जाईल. म्हणून मला शेठजींना सांगावे लागले की, 'सावधानपणे वागा.'

लक्ष्मी ही तर देवी आहे. व्यवहारात तिला विष्णू देवाची पत्नी मानली आहे. हे सर्व पद्धतशीर 'व्यवस्थित' आहे पण आत चलबिचल झाल्यामुळे गोंधळ निर्माण होतो. मनात अजिबात चलबिचल होत नाही, तेव्हा लक्ष्मी वाढते जर आत चलबिचल होत नसेल तर 'माझे कसे होणार? कसे होणार?' असे विचार येत नाहीत. आणि जर असे विचार आले तर लक्ष्मी निघून जाते.

भगवंत काय म्हणतात, जर तुझ्या भाग्यात धन असेल तर तू झाड लावायला जाशील आणि ते तुला मिळेल. त्यासाठी जमीन खणण्याची पण गरज नाही. पैशासाठी खूप डोकेफोड करायची गरज नाही. जास्त मजुरी केल्याने फक्त मजुरीचे पैसे मिळतात. तेव्हा लक्ष्मीसाठी खूप कष्ट करण्याची गरज नाही. मोक्ष पण कष्ट करून मिळत नाही. तरी पण लक्ष्मीसाठी ऑफिसमध्ये जाऊन बसावे लागते. तेवढे कष्ट मात्र करावे लागतात, गहू उगवोत किंवा ना उगवोत, तरी पण तुला खायला पोळी मिळते ना? 'व्यवस्थित शक्ती'च्या हा नियमच आहे!

आपण ज्याची जास्त आठवण काढतो, ते आपल्यापासून दूर जाते. म्हणून लक्ष्मीची आठवण करायची नाही. कलियुगाच्या परिणामामुळे आपण ज्याची आठवण काढतो, तो रुसत राहतो, आणि सत्ययुगात मात्र आठवण केल्याबरोबर लगेच मिळत असे. लक्ष्मी निरोप घेते तेव्हा 'यावे' आणि येते तेव्हा 'स्वागत आहे' असे म्हणायचे असते. ती काही भजन केल्याने थोडीच येणार आहे? लक्ष्मीची विनवणी करायची नसते, फक्त पत्नीचीच विनवणी करावी लागते.

'ऑनेस्टी इज दि बेस्ट पॉलिसी' (प्रामाणिकपणा हेच उत्तम धोरण) आणि सत्य कधीही असत्य होत नाही. पण लोकांची श्रद्धा डळमळीत झाली आहे आणि काळ पण तसा विचित्र आहे. रात्री कोणाची सत्ता असते? रात्री चोरांचेच साम्राज्य असते, तेव्हा जर दुकान उघडलेत तर चोर सगळे सामान घेऊन जातील. हा काळ चोरांचा आहे. म्हणून काय आपण आपली पद्धती बदलावी? सकाळ होईपर्यंत दुकान बंद ठेवा, पण आपली पद्धती बदलता कामा नये. 'रेशन'चे नियम असतात त्यात कोणी गडबड-घोटाळा करतो तेव्हा त्याला फायदा वाटतो आणि दुसऱ्यांना का नाही वाटत? घरात जर सगळेच जण खोटे बोलू लागले तर कोणावर विश्वास ठेवणार? आणि जर एकावर विश्वास ठेवला तर सगळ्यांवरच विश्वास ठेवला पाहिजे ना? पण इथे तर घरात विश्वास ठेवतात आणि तो सुद्धा आंधळा विश्वास ठेवतात. कोणाचीही सत्ता नाही, कोणी काही बोलू शकत नाही. जर तशी स्वतःची शक्ती असती तर कुठलेच जहाज बुडाले नसते. पण हे तर सगळे 'भोवरे' आहेत. प्रकृती नाचवते तसे ते नाचतात. पर-सत्ता असे का म्हटले? आपल्याला आवडते तिथे पण घेऊन जाते आणि आवडत नाही तिथे पण घेऊन जाते. आवडत नाही अशा ठिकाणी इच्छा नसतानाही जातो. म्हणजे ती पर-सत्ताच झाली ना?

'ऑनेस्टी इज दि बेस्ट पॉलिसी' असेच आपले धोरण असले पाहिजे. पण हे वाक्य आजकाल निरर्थक झाले आहे. म्हणून आता आमचे नवीन वाक्य लक्षात ठेवा. 'डिसऑनेस्टी इज द बेस्ट फूलीशनेस!'

(अप्रामाणिकपणा म्हणजे सर्वात मोठा मूर्खपणा) ते सकारात्मक वाक्य लिहून तर लोक चक्रम झाले आहेत. 'बिवेअर ऑफ थीव्ज' (चोरांपासून सावध राहा) असा बोर्ड लावलेला असून जर माणसे लुटली जात असतील तर बोर्डचा काय उपयोग? तरी पण लोक 'ऑनेस्टी इज दि बेस्ट पॉलिसी' असा बोर्ड लावतात. तरी तिथे ऑनेस्टी (प्रामाणिकपणा) नसतेच. मग पण त्या बोर्डचा काय उपयोग? आता मात्र नवी शास्त्रे आणि नवी सूत्रे यांची आवश्यकता आहे. म्हणून आम्ही म्हणतो की आता 'डिसऑनेस्टी इज दि बेस्ट फूलीशनेस' असा बोर्ड लावा!

❖❖❖❖❖

## नो लॉ-लॉ

बरेच लोक आम्हाला म्हणतात, 'दादा, तुम्ही आश्रम का काढत नाहीत? तुम्ही आश्रम काढा ना, दादा?'

पण 'ज्ञानी पुरुष' आश्रम काढण्याचे श्रम करत नाहीत. ते कोणाची खोली मिळाली तर तिथे सत्संग करतात आणि ती पण नाही मिळाली तर एखाद्या झाडाखाली बसून सत्संग करतात. आश्रम आला की त्यात नियम आले, स्वयंपाकघर पाहिजे, संडास पाहिजेत, हे सगळे पाहिजे. म्हणजेच तिथे सगळा संसार पाहिजे. परत कशाला ही सर्व झंझट!

आश्रमात तर डाळ-भात, पोळी-भाजी खाऊन घरी बसतो तसेच बसणार ना? काही लोक तर असे खाऊन पिऊन पडून राहण्यासाठीच आश्रमात राहतात! आपल्या इथे आश्रम नसतो. 'आम्ही' ब्रह्मांडाचे *उपरी,* म्हणून आम्ही जिथे जाऊ ती सगळी गावे आमचीच होतात ना?

आपल्या इथे सत्संगात नो लॉ (कोणताही कायदा नाही)! आपल्याकडे तर लॉ नसलेला लॉ. अक्रम म्हणजे 'नो लॉ,' साऱ्या जगात कुठलाच कायदा नसलेली पार्टी असेल तर ती या 'दादांच्या' अनुयायांची आहे. त्यांना कुठल्याच जागी कसले नियम नसतात. जगातील लोक लॉशिवाय राहूच शकत नाहीत. लॉशिवाय राहिला तर मोक्षात जाईल! लॉ नसतील तर सहज होईल. लॉमुळे असहज होतो. लॉ नसलेले नियम म्हणून सहज असतो.

एखादी गोष्ट एक्सेस झाली, म्हणजेच अति झाली तर तिचा

अभाव होऊ लागतो. आणि एखाद्या बाबतीत कंट्रोल (नियंत्रण) आला तर चित्त तिथेच जाते. साखरेचा कंट्रोल आला की चित्त साखरेतच गुंतते आणि कधी साखर आणू असे होऊन जाते. कुठेही कंट्रोल आला की मन अधीर होते. म्हणूनच आम्ही म्हणतो की सगळे डीकंट्रोल करून टाका. बाहेरून तर सतत कंट्रोल करत असता आणि त्यामुळे मन दिवसभर अधीरच होत असते.

मनाचा स्वभाव असा आहे की एखादी गोष्ट एक्सेस-अति झाली की तिच्याबद्दल द्वेष निर्माण होतो. अशा गोष्टींचा कंट्रोल का करायचा? एखाद्या आवडत्या वस्तूवर कंट्रोल केला तर चित्त सारखे तिकडेच जाते. चित्ताचा स्वभावच तसा आहे.

लहान मुलाला सांगितले की 'हे घेऊ नकोस' की मग त्याचे चित्त त्याच वस्तूला चिकटून राहील, त्याला दुसरी एखादी वस्तू दिली तरी तो ती घेणार नाही, म्हणून त्याला हवे ते द्यावे. 'व्यवस्थित शक्ती'च्या नियमाबाहेर घेणार तरी किती आणि लुटणार तरी किती?

आपल्या इथे काहीच नियम नाहीत. कायदा म्हणजे अर्धा कंट्रोल. आपण जर इथे म्हटले, 'उशीरा का आलात? चार वाजताच यायचे.' मनावर असा कंट्रोल आला की मन बिघडतेच! कंट्रोल नसेल तर मन किती मुक्त राहील? सीमेंट वर कंट्रोल आणायला गेले तर त्याचा भाव 32 रूपये झाला! सन 1942 नंतर कंट्रोल आला त्यामुळे माणसांची मने बिघडून गेली.

आम्ही कोणावर रागवत नाही. आम्ही असे कोणाला म्हणत नाही की 'असेच का आणले? असेच का केले?' कोणावर देखील रागावयाची वेळच येणार नाही असे वातावरण आम्ही ठेवले आहे. 'नो लॉज,' कायदा-बियदा नाही. स्वयंपाकघरात कोणी पातेले उलटे ठेवले तरी आम्ही काहीच बोलत नाही. त्याचा त्यालाच अनुभव येईल ना? या जगाला एक ना एक दिवस सगळे नियम काढून टाकावे लागतील! आम्ही सर्व प्रथम बिननियमाचे संचालन उभे केले आहे. आम्ही सरकारला

सांगू, 'येऊन बघा इथे, आमचे विना नियमाचे संचालन!' या औरंगाबादला नियमाशिवाय 100 माणसे दहा दिवसांपर्यंत कशी राहतात! सर्व किती सुरेख चालते! चहा, पाणी, नाश्ता सगळे व्यवस्थित! इतर ठिकाणी तर किती नियम असतात? कायद्यांवर कायदा! ही तर 'विना कायद्याची' मंडळी म्हटली जाते.

नियम–कायदा असलेल्या मंडळीत भगवंत राहत नाहीत. परंतु विना कायद्याच्या मंडळीत भगवंत राहतात. मग भले तो चोर असला तरी तिथे कायदा नसेल तर भगवंत राहतात, कारण तिथे ऐक्य असते म्हणून भगवंत तिथे हजर राहतात. या विना कायद्याच्या मंडळीत ज्याला जसे ठीक वाटते तसे तो बसतो. आणि प्रत्येक जण स्वेच्छेने नियम पाळतात. जिथे कायदा लादलेला नसतो तिथे नैसर्गिक रीत्याच कायदा पाळला जातो.

सरकारने नियम बनवले, लोकांनी नियम बनवले, समाजाने नियम बनवले आणि मग सगळे नियमाच्या कचाट्यात सापडले. धर्मात तर नियम असताच कामा नयेत. नियमांच्या जाळ्यात सापडतात ते काळे कपडेवाल्यांच्या (वकीलांच्या) कचाट्यात अडकतात. काळे कपडे इटसेल्फ काय म्हणतात की, आम्ही तर अपशकुनवाले आहोत!

एक ना एक दिवस जगाला सगळे नियम सोडून द्यावे लागतील! 'नो कोर्टस्.' या कोर्टानीच सगळे बिघडविले आहे. काळे कपडे! नियमांचा अतिरेक झाला म्हणून सगळीकडे विष पसरले. नियम पटण्यासारखे असायला हवेत आणि धर्मात तर नियम नसतातच. तू जैन कसा? तू वैष्णव कसा? तुझी डेव्हलपमेंट (प्रगती) झाली असे कशावरून? तू जर मूर्ख असशील तर तुला नियमांची गरज आहे आणि तू जर डेव्हलप्ड असशील तर तुला नियमांची गरज नाही. जैन व्यक्तीला नियमांची गरज नाही. त्याला तर 'आतूनच' सगळे नियम दिसतात! आपल्या येथे विना नियमानेच सर्व काही चालत आहे ना! ज्याला जसे योग्य वाटेल तसे वागण्याची सूट! सर्वांना सगळीच सूट दिली आहे.

आम्ही सगळे 38 दिवसांच्या यात्रेला गेलो होतो. तिथेसुद्धा आमचे

नो लॉ. कोणी भांडायचे नाही असा पण नियम नव्हता.भांडण्याची वेळ आली तर भांडण्याची पण मुभा होती. पण याचा अर्थ त्यांना भांडायची सूट देणे असेही नाही आणि सूट न देणे असेही नाही. कोणी भांडत असतील तर 'आम्ही' ते पाहत होतो. रात्री परत सगळेच 'आमच्या' साक्षीने प्रतिक्रमण करून सर्व दोष धुवून टाकीत असत! समोरासमोर डाग पडत असत आणि परत रात्री ते धुतले जात. हा शुद्ध 'वीतराग' मार्ग आहे, म्हणून इथे लगेच कॅश-रोख प्रतिक्रमण करणे आवश्यक आहे. इथे पंधरा दिवसातून किंवा महिन्यातून एकदा प्रतिक्रमण करत नाहीत. चूक झाली की लगेच प्रतिक्रमण! नियम असतील तर लोक समोरासमोर भांडणार नाहीत पण आतल्याआत गुदमरत राहतात. आपल्याकडे तर कोणतेही नियम नाहीत. असे आहे हे अक्रम ज्ञान! 'आम्ही' आहोत तोपर्यंत ही सूट आहे म्हणून नियम-बियम नाहीत.

संपूर्ण जगात साधू, संन्यासी सगळ्यांकडेच नियम असतात. अशाच पद्धतीने बसायचे आणि असेच वागायचे. या नियमांमुळे संकल्प आणि विकल्प निर्माण होतात, आणि आत्मा तर सहज आहे! नियम म्हणजे बंधन आहे. संघात नियम असतात आणि नियम म्हणजे बंधन. खरे म्हणजे जे यमातून नियमात येतात, त्यांच्यासाठी नियम आहेत. यम म्हणजे फर्स्ट-स्टँडर्ड आणि नियम म्हणजे सेकंड स्टँडर्ड. फर्स्टमधून सेकंडमध्ये येतात त्यांच्यासाठी नियम आहेत. मोक्षासाठी नियमांची गरज नाही. मोक्षासाठी तर आत्म्याला सहजरूपाने वागू द्या, तरच सहज मोक्ष मिळेल!

इथे धर्मात एका पैशाचा पण व्यवहार होत नाही. आरतीच्या तुपासाठी सुद्धा आम्ही पैसे गोळा करत नाही. पुस्तके छापण्यासाठी पैशांची गरज असते, पण ते इथे मागितले जात नाही. तरी पण पैशांशिवाय सगळे कसे काय चालले आहे, हेच आश्चर्य आहे! जर धर्मकार्यात देखील पैशांचा व्यवहार केला तर डोकेफोड सुरू होते. मग नियम येतात, ऑफिस येते, अनेक गोष्टी मागे लागतात. इथे नियम-कायदे नाहीत त्यामुळे सगळे कसे निवांत बसले आहेत. आणि जर उपाश्रयात

व्याख्यान ऐकायला गेले तर लोक पाठीमागे टिंगल–टवाळी करत असतात! तिथला नियम असतो की 'शांतता राखा' पण तरी थट्टा–मस्करी चालूच असते!

या दूषमकाळातील लोक नियमांसाठी नाहीत. त्यांच्यावर कंट्रोल केला की मन आणखीच बिघडते! एक जरी नियम शिरला की मग नियमांची नवीन पुस्तके ठेवावी लागतात! काही नवीन घडले की, नियमांची जुनी पुस्तके उघडून त्याची चौकशी करा!

## नियमात विवेक असावा

एक वृद्ध जैन साधू महाराज एका उपाश्रयात चातुर्मासासाठी आले होते. ते खूप म्हातारे होते आणि पायाने लंगडत होते. त्यांना चालता पण येत नव्हते. चातुर्मास संपल्यावर त्यांना सांगण्यात आले 'आता आपण इथून विहार करावे.' महाराजांचा पाय बरा झाला नव्हता म्हणून त्यांनी अजून काही दिवस राहायची परवानगी मागितली. तेव्हा संघपतींनी सांगितले, 'नियमाप्रमाणे देता येईल तेवढ्या अधिक दिवसांची परवानगी दिली आहे, आता आणखी वाढवता येणार नाही.' तेव्हा महाराजांना आश्रम सोडण्याखेरीज गत्यंतरच राहिले नाही. महाराज म्हणाले, 'ठीक आहे, मग इथून चार मैलावर छाणी गाव आहे तेथे मी विहार करतो पण चार मैल चालणे मला शक्य नाही, तेव्हा तुम्ही डोलीची व्यवस्था करा.' त्यावर संघपती म्हणाले, 'आजपर्यंत आम्ही अशी डोली कोणाला दिलेली आहे असे आठवत नाही.' मग त्यांनी मागील सर्व नोंदी तपासल्या, हिशोब पाहिले, नियमांची पुस्तके पाहिली पण कुठल्याही पुस्तकात पाय लंगडत असल्यामुळे कोणा महाराजांना डोली द्यावी लागली असे लिहिलेले सापडलेच नाही! म्हणून त्यांनी महाराजांना सांगितले 'असा कोणता नियम बनलेलाच नाही. तेव्हा आम्ही तरी काय करू शकतो? नियम कसा तोडू शकतो?' अरे, पूर्वी कधी अशी वेळच आली नव्हती म्हणून नियम केला नव्हता. सगळे थोडेच लंगडतात की असा नियम करावा लागतो? काही तरी व्यावहारिक समज असायला हवी ना, की मग जडासारखे नियमांवर बोट धरून चालावे?

ते महाराज बिचारे माझ्याकडे आले आणि त्यांनी मला सगळे सांगितले. ते म्हणाले 'अहो, बघा ना, या संघाने माझी फार दशा करून टाकली आहे. कोणी पन्नास रुपये काढून डोलीची व्यवस्था करायला तयार नाही, आणि शिवाय म्हणतात, आता आपण विहार करा, विहार करा. आता मी काय करू? तुम्हीच काही तरी मार्ग काढा.' मग आम्ही त्यांच्यासाठी पैशांची व्यवस्था करून डोलीची व्यवस्था केली. त्यानंतर त्या महाराजांना बँड-बाजा सकट वाजतगाजत निरोप दिला! मोठी शोभायात्रा काढली आणि संघपती पण डोक्यावर पगडी घालून शोभायात्रेत सामील झाले!

अरे, या बँडबाजात आणि शोभायात्रेत चांगले पाचशे रुपये खर्च केले पण महाराजांच्या डोलीसाठी मात्र पन्नास रुपये खर्च करता आले नाहीत? कारण काय? तर म्हणाले, 'शोभायात्रेचे नियम आमच्याकडे आहेत पण डोलीचा नियम मात्र आमच्या इतिहासात कुठेही नाही, मग आम्ही तरी काय करणार?'

आता याला मी 'अव्यवहारीपणा' म्हणणार नाही तर काय म्हणणार?

आमच्याकडे नियम नाहीत, पण त्याच सोबत आम्ही दुसऱ्यांचे नियम मोडू शकत नाही. दुसऱ्यांचे नियम मोडल्यामुळे त्यांना चुकीचे अनुमोदन मिळते, आणि त्याचे आपण निमित्त बनतो. आपण असे करता कामा नये. 'आपले' तर कोणी नावही घेणार नाही. परंतु जर आपण निमित्त बनलो तर समोरच्याला अशी सवय लागते की आपणसुद्धा नियम मोडावे. म्हणून आपण पूर्णपणे दुसऱ्यांच्या नियमात राहावे.

आमच्याकडे नियम नाहीत, आज्ञाच आहेत. सर्व रिलेटिव्हमध्ये नियम असतात. इथे मात्र नियम नाहीत.

❖❖❖❖❖

## धर्मध्यान

**प्रश्नकर्ता :** पूजा-अर्चना करतात त्याला धर्मध्यान म्हणतात ना?

**दादाश्री :** नाही, त्याला धर्मध्यान म्हणत नाहीत. पूजा-अर्चना करताना तुमचे ध्यान कुठे वर्तत आहे ते पाहिले जाते. भगवंत क्रिया पाहतच नाहीत, तर क्रिया करताना तुमचे ध्यान कुठे आहे ते पाहतात.

एक शेठजी होते रोज सकाळी चार तास पूजा, पाठ सामायिक वगैरे करत असत. एक दिवस एका व्यक्तीने घरचा दरवाजा ठोठावला आणि शेठानीने दरवाजा उघडून विचारले, 'काय काम आहे?' त्या व्यक्तीने शेठानीला विचारले, 'शेठ कुठे गेलेत?' शेठानींने ताबडतोब उत्तर दिले, 'शेठजी उकिरड्यावर गेले आहे!' शेठजी आत बसून हे ऐकत होते. लगेच त्यांच्या लक्षात आले की खरंच मी विषय विकाराच्या ध्यानातच होतो. बाहेरून जरी मी सामायिक करत आहे असे वाटले तरी माझे ध्यान मात्र (विषयविकाररूपी) उकिरड्यातच मग्न होते. तेव्हा त्यांच्या लक्षात आले की आपल्यापेक्षा आपली पत्नी जास्त समजदार आहे!

सामायिक करत असाल, माळ जपत असाल, पण ध्यान मात्र दुसरीकडेच असेल तर त्या क्रियेचे फळ पाहिले जात नाही, त्यावेळी तुमचे ध्यान कुठे होते तेच पाहिले जाते.

## ध्यान म्हणजेच पुरुषार्थ

जग भ्रांतीवाले आहे. ते क्रियांना पाहते, ध्यान पाहत नाही. ध्यान

म्हणजे पुढच्या जन्मासाठी पुरुषार्थ आहे आणि क्रिया हा मागच्या जन्माचा पुरुषार्थ आहे. ध्यान हे पुढच्या जन्मात फळ देणारे आहे. ध्यान झाले की तेव्हा परमाणू बाहेरून आत ओढले जातात आणि ते ध्यानस्वरूप बनून आत सूक्ष्म रूपाने साठवले जातात. आणि कारण-देहाची निर्मिती होते. जेव्हा ऋणानुबंधी जीव मातेच्या गर्भात जातो तेव्हा सूक्ष्म शरीर वीर्य आणि रज यांच्या स्थूल परमाणूंना एकदम खेचून घेते. आणि त्यातून कार्य-शरीराची निर्मिती होते. जेव्हा माणसाचा मृत्यू होतो तेव्हा आत्मा, सूक्ष्म शरीर आणि कारण शरीर सोबत जातात. सूक्ष्म शरीर सर्वांचे कॉमन (सारखेच) असते, पण कारण शरीरे मात्र वेगवेगळी असतात, प्रत्येकाने स्वत: निर्माण केलेल्या कॉजेस अनुसार वेगवेगळी असतात. सूक्ष्म शरीर हे इलेक्ट्रिकल बॉडी आहे, जे आहाराशिवाय राहूच शकत नाही. म्हणून मृत्यूनंतर लगेच, त्याचक्षणी मातेच्या शरीरात प्रवेश प्राप्त करूनच घेते. आणि टाईमींग जुळल्यावर वीर्य आणि रज यांच्या संयोगातून अगदी त्याचक्षणी स्थूल परमाणूंना आहार स्वरूपात शोषून घेते आणि पिंडाच्या रूपात स्थूल शरीर प्राप्त करते. त्यानंतर जीवाचा विकास होत राहतो आणि सुमारे पाच महिन्यानंतर तो (गर्भात) फिरू लागतो.

क्षणभर देखील 'आम्हाला' 'आमच्या स्वरूपाशिवाय' एक सुद्धा सांसारिक विचार येत नाही. आमची इच्छा नक्कीच आहे की आम्हाला मिळालेले हे सुख सर्वांनाच मिळावे. ध्यान हेच पुढील जन्माचे साधन आहे! त्याशिवाय दुसरे कोणतेही साधन नाही, पुढील जन्मासाठी!

वीतरागांचे मत काय आहे? ध्यान बदला. दुर्ध्यान होत असेल तर दुर्ध्यान होणार नाही असा पुरुषार्थ करा.

**प्रश्नकर्ता :** यासाठी पुरुषार्थ कसा करावा?

**दादाश्री :** क्रिया बदलता येत नाही, पण ध्यान बदलता येते. या काळाच्या प्रभावामुळे रौद्रध्यान होते, आर्तध्यान होते, पण भगवंतांनी त्या समोर पुरुषार्थाचे साधन दाखविले आहे. रौद्रध्यान आणि आर्तध्यानाला हटवायचे आहे. जसे आपण हितकारी आहार खातो आणि अहितकारी

आहार टाळतो, तसेच रौद्रध्यान आणि आर्तध्यान टाळायचे आहे, आणि धर्मध्यान करायचे आहे.

## आर्तध्यान – रौद्रध्यान

**प्रश्नकर्ता :** आर्तध्यान आणि रौद्रध्यान कशाला म्हणतात?

**दादाश्री :** कोणाचेही सुख थोडेसे देखील हिरावून घेण्याचे ध्यान करणे म्हणजे रौद्रध्यान. मग जरी प्रत्यक्षात त्याने तसे केले नसलेही, पण असे ध्यान रौद्रध्यानच मानले जाईल. आणि त्याचे फळ म्हणजे नरकगती. आणि आर्तध्यान म्हणजे काही चिंता–उपाधी असेल तर तो कधीही तोंडाने बोलून न दाखवता मनातल्या मनात सहन करत राहतो, क्रोध करत नाही, तर ते आर्तध्यानात मोडते. आजकाल फक्त आर्तध्यान दिसणे मुश्कील झाले आहे. जिकडे–तिकडे रौद्रध्यानच आहे. अगदी धर्मस्थानात देखील आर्तध्यान आणि रौद्रध्यान शिरले आहे! साधू सतत आर्तध्यानात किंवा रौद्रध्यानात असतात. शिष्यावर चिडतात ते रौद्रध्यान आणि आतल्या आत घुसमटत राहतात ते आर्तध्यान. त्या महाराजांचे पंचवीस शिष्य आहेत आणि माझे तर फक्त एवढेच आहेत, असे वाटणे म्हणजे भयंकर आर्तध्यान आहे. मग ते शिष्य वाढविण्याच्या प्रयत्नात गुंततात आणि भयंकर रौद्रध्यान करतात. महावीर भगवंताच्या सिंहासनावर बसलेल्यांना हे शोभते का? हे तर रेसकोर्सात (स्पर्धेत) पडले आहेत! शिष्य वाढविण्याच्या मागे लागले आहेत. अरे, अगोदरच घरी एक बायको आणि दोन मुले, अशा तीन घंटा गळ्यात होत्या त्या सोडून एकशे आठ (शिष्यांच्या) घंटा गळ्यात अडकविल्या? या मार्गाला वीतराग मार्ग कसे म्हणणार?

**प्रश्नकर्ता :** हे आर्तध्यान आणि रौद्रध्यान कसे बदलायचे?

**दादाश्री :** रौद्रध्यान आणि आर्तध्यान होतात ही या काळाची विचित्रता आहे. पण असे अतिक्रमण जेव्हा जेव्हा घडते त्या त्या वेळी लगेच रोख प्रतिक्रमण करा. कदाचित अतिक्रमण झालेच तर आपल्याला त्याचे प्रतिक्रमण करावे लागते. रौद्रध्यानात पश्चाताप झाला तर त्याचे

रूपांतर आर्तध्यानात होते. आणि जर रौद्रध्यानात यथार्थ प्रतिक्रमण केले तर त्याचे रूपांतर धर्मध्यानात होते. प्रतिक्रमण म्हणजे आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान, तिन्ही गोष्टी बरोबरच होतात. भगवंताची मूर्ती जरी असेल तरी चालेल पण त्या मूर्तीच्या साक्षीने आलोचना करावी आणि सोबत पुन्हा असे माझ्याकडून न होवो असा दृढ निश्चय करावा लागतो.

**प्रश्नकर्ता :** कोणी आपला अपमान केला तर तो कसा सहन करावा?

**दादाश्री :** आत्मज्ञान असेल तर अपमानामुळे त्रास होत नाही. पण ज्ञान नसेल तर आपल्याच एखाद्या मागील चुकीमुळे हे घडले असावे असे आतून सांगावे. आपलीच चूक आहे म्हणून समोरचा आपला अपमान करीत आहे. मागचा काहीतरी असेल हिशोब म्हणून तो आज मला परत करीत आहे. म्हणून आपण तो जमा करून घ्यावा. अपमान करणाऱ्याला आपण जर म्हटले, 'भाऊ, माझा पुन्हा एकदा अपमान कर' तर तो म्हणेल 'मी काय रिकामटेकडा आहे?' म्हणजे जी उधारी आहे तीच जमा करवितो. जन्मापासून मृत्यूपर्यंत सगळे अनिवार्यच आहे. कित्येक पास होतात, कित्येक नापास होतात आणि कित्येक शिकत पण नाहीत. हा सगळा मागच्या जन्माचा हिशोब आहे. हा सगळा हिशोब कोण ठेवतो? ही आतील आश्चर्यकारक ॲडजस्टमेंट आहे. आत अनंत शक्ती आहेत. हा सगळा हिशोब - रौद्रध्यान, आर्तध्यान, धर्मध्यान आणि शुक्लध्यान या चार ध्यानांवर आधारित आहे. जसे ध्यान वर्तत असेल तसे फळ मिळेल.

अनंत काळापासून भटकतच आहोत, तरी पण आर्तध्यान आणि रौद्रध्यान होणे बंद झालेले नाही. म्हणून या ध्यानांना नीट समजून घ्यायला हवे. घरात भांडणे झाली तर क्षमा मागितली पाहिजे. समोरचा माणूस वैर राखणार नाही अशाप्रकारे क्षमापना केली पाहिजे. भगवंताच्या आज्ञेत राहणे हे सर्वश्रेष्ठ धर्मध्यान आहे. ही क्षमापना का करायची? मोफत क्षमापना का करायची? नाही, जितके तुम्ही देता तितकेच परत येते.

रौद्रध्यान आणि आर्तध्यान ह्या दोनच छळणाऱ्या गोष्टी आहेत. बाकी बाहेरचा कोणी छळत नाही. क्रोध-मान-माया-लोभ यांना हाकलून ते हाकलले जात नाहीत. डॉक्टरांनी साखर खाऊ नका म्हणून सांगितले तर कशी जागृती राहते? डॉक्टर जर म्हणाले, 'तुम्हाला हार्ट-अटॅक आला आहे आणि गोड अजिबात खायचे नाही, नाही तर दुसरा अटॅक येईल आणि तुम्ही मरून जाल.' मग तेव्हा तुम्ही किती दक्ष राहता. आर्तध्यान आणि रौद्रध्यान हे तर अनंतकाळाचे मरण आहे. म्हणून यांना बंद करायलाच हवे, एवढे जरी निश्चित केले तरी लगेचच पन्नास टक्के आर्तध्यान आणि रौद्रध्यान कमी होते. तुम्हाला जी काही भक्ती-बिक्ती, सामायिक, पूजा-पाठ, वगैरे जे काही करायचे असेल ते करा. ज्या गुरुची आराधना करत असाल त्या गुरुची आराधना करा, पण कसेही करून आर्तध्यान आणि रौद्रध्यान होणार नाही एवढे पाहा. शुक्लध्यान तर या काळात होतच नाही तरी पण कोणाला शुक्लध्यान पाहिजे असेल, काळजी कायमची दूर व्हावी असे वाटत असेल तर आमच्याकडे सत्संगाला यावे. 'आम्ही' एका तासातच तुम्हाला 'शुक्लध्यान' घडवून आणू. 'ज्ञानी पुरुष' काय करू शकत नाहीत? 'ज्ञानी पुरुष' चाहे-सो करे. (हवे ते करू) शकतात पण 'आम्ही' कुठल्याच गोष्टीचे कर्ता नसतो. आम्ही निरंतर निमित्त भावातच असतो.

जर शुक्लध्यान प्राप्त होत नसेल तर या काळात धर्मध्यान लाभले तरी पुरेसे आहे. आज तर खरे धर्मध्यानसुद्धा लुप्त झाले आहे. धर्मध्यान कशाला म्हणतात तेच त्यांना समजत नाही. धर्मध्यान जितका वेळ जमेल तितका वेळ करा, तासभर तर तासभर पण तेव्हा भरपूर आनंद मिळतो आणि त्या आनंदाचे पडसाद पुढचे दोन-तीन तास पडत राहतात. पण धर्मध्यान समजतच नाही त्याला काय करणार? दिवसभर रौद्रध्यान आणि आर्तध्यान, रौद्रध्यान आणि आर्तध्यान! दिवसभर कटकट! भगवंतांनी सांगितले होते धर्मध्यानात राहा.

## धर्मध्यानाचे चार आधारस्तंभ

**प्रश्नकर्ता :** भगवंतानी धर्मध्यान कशाला म्हटले होते?

**दादाश्री :** भगवंत म्हणाले होते आज्ञा हाच धर्म आणि आज्ञा हेच तप.. भगवंतानी धर्माचे चार आधारस्तंभ सांगितले आहेत.

भगवंताची आज्ञा खरीच आहे हे स्वीकारले तर तो धर्मध्यानाचा पहिला स्तंभ अर्थात 'आज्ञाविचय' मध्ये आला. दुसरा स्तंभ म्हणजे त्याला क्रोध-मान-माया-लोभ होत नाहीत, असे झाले तर 'अपायविचय' मध्ये आला. जर कोणी दगड मारला तरी हे माझ्याच कर्माचे फळ आहे असे समजू लागले म्हणजे तिसरा स्तंभ अर्थात 'विपाकविचय' मध्ये आला. आणि चौथा स्तंभ म्हणजे 'संस्थानविचय' - जे 'चारलोक' आहेत त्याची हकीगत समजून घेतली तर धर्मध्यान पूर्ण झाले.

आता भगवंतांची आज्ञा खरी आहे हे तर सगळेच जण कबूल करतात. 'संस्थान विचय' सखोल समजले नाही तरी चालेल. पण त्याऐवजी समकित प्राप्त होईल असा प्रयत्न कर तर त्यात सगळे मिळून जाईल. आणि धर्मध्यानासाठी मुख्य पुरुषार्थ हाच करायचा आहे की आर्तध्यान आणि रौद्रध्यान होणार नाहीत. आर्तध्यान आणि रौद्रध्यान थांबले तर मग उरले काय? तर धर्मध्यानच. शुक्लध्यान तर आता राहिले नाही. म्हणून जर धर्मध्यान प्राप्त करायचे असेल तर आर्तध्यान आणि रौद्रध्यान बंद करा. धर्मध्यान कशाला म्हणायचे? जर कोणी तुम्हाला शिव्या देत असेल तर तुम्हाला शिवी देणाऱ्याचा काहीच दोष दिसणार नाही. तुमचे ज्ञान असे असते की कोणी शिव्या दिल्या तरी तुम्हाला त्याचा दोष दिसणार नाही, उलट 'माझ्याच कर्माचा उदय आहे.' असे भान राहते. ह्यालाच भगवंतांनी धर्मध्यान म्हटले आहे.

घरात सासूशी भांडण होत असेल तर तुम्हाला हे लक्षात यायला हवे की हीच सासू माझ्या वाट्याला का आली? दुसऱ्या सासवा नव्हत्या का? मला हीच का मिळाली? म्हणून तिच्याशी माझा काही तरी (पूर्वजन्मीचा) हिशोब आहे, तर आता तो हिशोब शांतपणे पूर्ण करून घ्या.

धर्मध्यान राहिले नाही. या काळात लोकांना धर्मध्यान समजतच नाही. समजले असते तर कल्याणच झाले असते!

**प्रश्नकर्ता :** अहंकाराचा जोर अधिक असतो, म्हणून धर्मध्यान विसरतो का?

**दादाश्री :** समज कशाला म्हणतात की समजेला अनुसरून वर्तन असेल. जोपर्यंत वर्तनात येत नाही तोपर्यंत समज आलेली नाही असेच म्हटले पाहिजे. समजेचे फळ म्हणजे लगेच वर्तनात येणे. वर्तनात यायलाच हवे. आपण लहान मुलाला सांगितले की इथे दोन बाटल्या ठेवल्या आहेत, दोन्ही सारख्याच आहेत. दोन्हीत औषधे आहेत, दोन्हीत पांढरी पावडर आहे. एका बाटलीवर लिहिले असेल अमृत आणि दुसऱ्यावर विष. तर मुलाला समजावून सांगितले पाहिजे की यातले काही खाऊ नकोस. आपण फक्त अमृत तोंडात टाकत असू पण मुलाला जर हे माहीत नसेल की कुठल्या बाटलीत अमृत आहे आणि कुठल्या बाटलीत विष आहे, तर तो चुकून विष खाईल म्हणून आपण मुलाला सांगितले पाहिजे की त्यात विष आहे. नुसते विष आहे असे सांगून मुलाला समजणार नाही. म्हणून त्याला विष म्हणजे काय ते समजावून सांगितले पाहिजे. त्याला समजावयाचे की विषामुळे माणूस मरतो. मरतो म्हणजे काय ते पण मुलाला समजत नाही. म्हणून मग त्याला समजावावे लागते की परवा ते काका कसे वारले होते, तसे होते. असे सविस्तर समजावून सांगितले तर मुलगा कधी पण विषाची बाटली हातात घेणार नाही. त्याची अंमलबजावणी आपोआप होईल. जे अमलात येत नाही ते अज्ञान. म्हणजेच पूर्ण समजच नाही, पद्धतशीरपणे शिकलाच नाही. कोणाची तरी उत्तरे नक्कल करून लिहिली म्हणून काय शिकला असे म्हणायचे? कुणी तरी गणिते घातली आहेत त्याची उत्तरे नक्कल करून घेऊन आला म्हणजे काय तो गणित शिकला? हे सगळे नकली ज्ञान आहे. खरेखुरे-दरअसल ज्ञान नाही. कोणी शिव्या दिल्या तरी त्याचा परिणाम होत नसेल, स्वत:चीच चूक आहे असेच वाटेल आणि त्यासाठी सतत प्रतिक्रमण करत असेल तर ते भगवंताचे सर्वश्रेष्ठ ज्ञान आहे! तेच ज्ञान मोक्षाला घेऊन जाईल. इतकेच शब्द, आमच्या एकाच वाक्याचे पालन केले तरी तो मोक्ष प्राप्त करेल! बाकी गोष्टी हव्यातच कशाला?

लोकांना सामायिक म्हणजे काय ते समजतच नाही. सामायिक

कशाला म्हणायचे हे माहीतच नाही. सामायिकमध्ये जे आठवायचे नाही नेमके तेच आधी आठवते. सामायिक करायला बसले आणि ठरविले की आज दुकानाची आठवण काढायचीच नाही, मग पहिला धमाका दुकानाचाच होतो! (दुकानच आठवू लागते.) कारण मन रिॲक्शन करणारे आहे. तुम्हाला जे टाळावेसे वाटेल तेच सर्वप्रथम समोर येईल! आणि जर तुम्ही म्हणाल या, तर तेव्हा कुणीच येणार नाही. तुम्ही म्हणाल की मी सामायिक करीन तेव्हा तुम्ही सगळे या, तर तेव्हा कोणीच येणार नाही! असे आहे हे सगळे अज्ञान! एकदा स्पंदन झाले की संपले सगळे! आत्म्याच्या अनंत शक्ती आहेत.

आमच्या फक्त एवढ्याच शब्दांचे पालन केले की आपल्याला कुणी शिव्या दिल्या, दुःख दिले, त्रास दिला तर ते माझ्याच कर्माच्या उदयामुळे आहे समोरच्या व्यक्तीचा काही दोष नाही, तो केवळ निमित्त आहे. एवढेच जरी समजले तरी तुला समोरची व्यक्ती निर्दोष दिसेल आणि त्यामुळे तुला पैलतीरी पोहोचता येईल.थेट मोक्षापर्यंत पोहोचवेल. आमचे एकच वाक्य मोक्षाला नेईल असे आहे. 'ज्ञानी पुरुषा'चे फक्त एकच वाक्य पाहिजे. मोक्षाला जाण्यासाठी शास्त्रे शिकण्याची काहीच गरज नसते. कारण 'ज्ञानी पुरुष' सरळ मोक्षमार्गच दाखवतात, पूर्णपणे! म्हणून वस्तुस्थिती समजून घेण्याची गरज आहे.

लोक म्हणतात आम्हाला 'ज्ञान' आहे. पण त्याला 'ज्ञान' म्हणत नाहीत. 'ज्ञान' तर जे अमलात येते त्यालाच ज्ञान म्हणतात. आपल्याला बोरीवलीचा रस्ता माहीत असेल तर बोरीवली आलेच पाहिजे. जर बोरीवली आले नाही तर समजून घ्यायचे की आपल्याला बोरीवलीच्या रस्त्याचे 'ज्ञान' नव्हते. भगवंताच्या धर्मध्यानात एवढे प्रचंड बळ आहे, गजब शक्ती आहे! परंतु जोपर्यंत त्याला धर्मध्यान समजत नाही तोपर्यंत काय करू शकतो?

आणि वीतरागींनी आणखी काय म्हटले की, 'तू उदयकर्मांना घाबरू नकोस. दिवसभर जरी उदयकर्मामुळे त्रास झाला तरी तू घाबरू नकोस. कारण त्यात कोणाचाही दोष नाही.'

## चिंता म्हणजेच आर्तध्यान

*'राई मात्र वध-घट नही, देख्या केवलज्ञान*
*ते निश्चय कर छोडीने, तजिये आर्तध्यान.'*

(केवलज्ञानात आम्ही पाहिले आहे की, एका मोहरी इतकेही कमी-जास्त होऊ शकत नाही. म्हणून आर्तध्यान सोडण्याचा ठाम निश्चय कर.)

चिंता-काळजी सोडून द्या. चिंता म्हणजेच आर्तध्यान. जे काही सुख-दुःख हे शरीर जन्मःतच बरोबर घेऊन आले आहे ते सुख-दुःख वाट्याला येणारच ते सहन करण्याखेरीज पर्याय नाही. म्हणून कोणाचाही दोष पाहू नकोस, कोणाच्या दोषाप्रती दृष्टी करू नकोस, आणि स्वतःच्याच दोषामुळेच बंधन आहे हे समजून घे. मोहरी इतकेही कमी-जास्त होणार नाही. आणि त्यात तू काही बदल करू शकणार नाहीस. म्हणून तू 'जय महावीर, जय महावीर, जय महावीर' किंवा 'जय श्रीकृष्ण, जय श्रीकृष्ण, जय श्रीकृष्ण' असे म्हणत जा ना! भगवंताचा जयजयकार कर. दुसऱ्यांचा जयजयकार का करतोस? तू या भाऊला रागावत असशील तेव्हा कोणी तरी त्याच्या बाजूने उभा राहतो. मग हा त्या व्यक्तीचा जयजयकार करतो. अरे त्यापेक्षा महावीरांचा किंवा कृष्णाचा जयजयकार कर की, आज तर तू त्या भाईचा जयजयकार करतोस, पण उद्या तो तुझ्याशी भांडायला येणार नाही हे कशावरून! वीतरागांचा जय बोला - नमो वीतरागाय! नमो वीतरागाय!

**प्रश्नकर्ता :** चिंता, उपाधी, भगवंत पाठवतात का?

**दादाश्री :** स्वतःला जसा व्यापार करता येईल तसे त्याला मिळते. बाजारातले शुद्ध दही, बाजारातले मसाले, बाजारातील लाकडे, पाणी पण वॉटर वर्कस्‌चे असले, तरी प्रत्येकाच्या कढीत फरक असतो! प्रत्येकाच्या कढीची चव वेगळी! कोणाकोणाची कढी तर अशी असते की आपले डोके फिरते. या सगळ्यांना भगवंत काय म्हणतात? तुम्हाला जसे जमते तसे तुम्ही करा. तुमच्या हातात सत्ता आहे. कोणी *उपरी* (वरिष्ठ, मालक)

नाही, कोणी रागावणारा नाही. कोणी रागावणारा असलाच तर तो तुमच्या चुकांमुळेच तुम्हाला मिळतो, चूक नसेल तर कुणी रागावणाराही नसतो. आपल्या चुका संपल्या की रागावणारा कोणी असूच शकत नाही. कुणी *उपरीच* नाही. कुणी विघ्न घालणाराही नाही. भगवंतांना सांग 'साहेब, तुम्ही तर मोक्षात पोहोचलात, पण इथे हे लोक माझे चोरून नेतात, तर त्यांचे मी काय करू?' तेव्हा भगवंत म्हणातात 'भाऊ, लोक चोरी करतच नाहीत. जोपर्यंत तुझ्याजवळ चुका आहेत तोपर्यंत लोक चोरी करतील. तुझ्या चुका संपवून टाक.' खरे तर तुझे नाव पण कोणी घेऊ शकणार नाही. एवढी शक्ती तुझ्याजवळ आहे. प्रत्येक जीव संपूर्ण स्वतंत्र शक्ती घेऊनच आला आहे! प्रत्येक जीव स्वतंत्र आहे, परतंत्रता आहे असे वाटते, लोक त्याला दु:ख देतात, आपल्या चुकीमुळेच त्याला कोणाचा तरी जावई, तर कोणाचा तरी सासरा बनावे लागते. चुकांमुळेच ही परिस्थिती आहे. खरे म्हणजे, आपला कोणीच *उपरी* नाही. फक्त आपल्या चुकाच आपल्या *उपरी* आहेत. म्हणून चुका संपवा आणि नवीन चुका करू नका.

'ज्ञानी' म्हणजे जे 'अज्ञाना'ला घुसू देत नाहीत ते. जोपर्यंत ज्ञान मिळत नाही तोपर्यंत लोकांना धर्मध्यानात राहायला हवे. फक्त भगवंतानी सांगितलेले धर्मध्यान प्राप्त केले तरी पुष्कळ झाले! कोणी दु:ख देतो, कोणी खिसा कापतो त्यात इतर कोणाचाच दोष नाही पण माझाच दोष आहे, माझ्याच कर्मांचा उदय आहे. आणि म्हणून कोणालाही दोषी पाहिले नाही तर मुक्ती मिळेल. पण हा तर 'याने असे केले, त्याने माझे पैसे खाल्ले, याने माझी चोरी केली,' असा सगळ्यांवर आरोप करत बसतो, जे करू नये तेच करतो.

## निमित्ताचा चावा घेणे

जर सासू दु:ख देत असेल तर सून स्वत:चे दोष पाहत नाही, उलट सासूचे दोष काढत बसते. पण सुनेला जर धर्मध्यान समजून आले तर सून काय करील? 'माझ्याच कर्मामुळे मला अशी सासू मिळाली. माझ्या मैत्रिणीला चांगली सासू का मिळाली?' असा विचार करायला नको का? आपल्या मैत्रिणींची सासू चांगली असते ना? मग आपण

समजायला नको का की आपलीच काही तरी चूक असेल, त्याशिवाय अशी सासू भेटली नसती.

**प्रश्नकर्ता :** दृष्टीत फरक आहे म्हणून असे घडते का?

**दादाश्री :** नाही, दृष्टीत फरक नाही. पण हे माझ्याच कर्माचे फळ आहे याचे तिला भानच नाही. ती तर समोर असेल तेच बघते. निमित्तालाच चावायला धावते. सासू तर निमित्त आहे, तिचा चावा घेऊ नकोस. उलट आपण तिचे उपकार मानावे की तिने आपल्याला एका कर्मातून मुक्त केले. एका कर्मातून मुक्त व्हायचे असेल तर कसे मुक्त होणार? कोणी खिसा कापला आणि (तरी) त्या खिसेकापूला आपण निर्दोष पाहिले, किंवा सासूने शिव्या दिल्या, आणि आपल्याला निखाऱ्याने चटके दिले, त्यावेळी देखील आपण सासूला निर्दोष पाहिले तर समजावे की आपण या कर्मातून मुक्त झालो. नाही तर कर्मातून मुक्ती झालेली नाही. कर्मातून मुक्ती तर झालेलीच नाही, आणि त्यापूर्वीच सासूला दोषी ठरवून आणखी नवीन कर्मे बांधत राहतात. कर्मे वाढतात आणि गुंतागुंत अधिकच वाढत जाते. एकदा माणूस गुंतागुंतीत अडकला तर तो त्यातून कसा सुटणार? गुंततच जातो. पूर्ण दिवस फक्त गुंताच गुंता!

या जनावरांना अशा गुंतागुंती नसतात. फक्त माणसांनाच असतात, कारण ते नवीन गुंते वाढवत राहतात. जनावरांना कोणी मारले तर ते मार खाऊन पळून जातात. त्यांच्यामध्ये मारणाऱ्यावर आरोप करण्याची शक्ती नसते, की तुम्ही मला मारले. त्यांच्यात अशी बुद्धी नसते. फक्त माणसालाच बुद्धी मिळाली आहे म्हणून त्याचा दुरुपयोग करतो. आणि उलट त्यातच अडकतो. ज्यातून सुटायला हवे त्यातच अडकतो. एक-एक कर्माची मुक्ती झाली पाहिजे. सासू त्रास देते तेव्हा तेव्हा एक-एक कर्मातून मुक्ती झाली पाहिजे. त्यासाठी आपण काय केले पाहिजे? तर सासूला निर्दोष पाहायला पाहिजे की, 'तिचा काय दोष? माझ्या कर्मांचा परिणाम म्हणून मला ही सासू मिळाली आहे. ती बिचारी तर निमित्त आहे.' तर त्या कर्मातून मुक्ती झाली. आणि जर सासूचाच दोष पाहिला तर मग कर्मे वाढतील. मग त्याला कोण काय करणार? ईश्वर तरी काय करणार?

भगवंत काय म्हणतात? 'तू रोज माझ्या मूर्तीला नमस्कार करतोस परंतु तुला ही 'समज' येत नाही तोपर्यंत आम्ही तुला असे म्हणू शकत नाही की तू विष घे आणि तुझी प्रकृती सुधारेल. आमची आज्ञा पाळ. आमचे दर्शन करण्यापेक्षा तू जर आमच्या आज्ञांचे पालन केलेस तर आम्हाला अधिकच आवडेल. कारण तू दर्शन तर रोज करतोस, पण आमच्या एकाही शब्दाचे पालन करत नाहीस, याचा अर्थच की तू माझ्या जीभेवर पाय ठेवतोस! तुला त्याची लाज कशी वाटत नाही?' तेव्हा तो म्हणतो 'साहेब, मी तुमच्या जीभेवर पाय ठेवत आहे हे मला माहीतच नव्हते!' आणि तेही खरेच आहे. त्या बिचाऱ्याला हे कळणार तरी कसे? इतर लोक करतात म्हणून तोसुद्धा करतो आणि त्याला खरी समज कोणीच दिली नाही. तर मग खऱ्या रस्त्यावर परत फिरणार तरी कसे? अशी खरी समज दिली तर परत फिरून खऱ्या रस्त्यावर येईल.

## कर्म-निर्जरा होते प्रतिक्रमणाने

जरी एक कर्म कमी झाले तरी दिवसेंदिवस गुंतागुंत कमी होत जाते. एका दिवशी एक कर्म कमी केले तर दुसऱ्या दिवशी दोन कर्म कमी करू शकतो. पण इथे तर रोज नवीन कर्मे निर्माण करतो आणि गुंता वाढतच जातो. हे सगळे लोक एरंडेल तेल पिऊन फिरतात का? त्यांचे चेहरे जणू एरंडेल प्यायल्यासारखे दिसतात. मग काय एरंडेल तेल विकत आणत असतील का? इतके महाग एरंडेल तेल रोज कोण खरेदी करील? पण आत परिणती बदलली की एरंडेल तेल प्यायल्यासारखे तोंड दिसते! दोष स्वत:चा आणि चूक काढतो दुसऱ्यांची त्यामुळे आतील परिणती बदलते. 'वीतरागींनी' सांगितले स्वत:चे दोष शोधा. बाकी काहीच सांगितले नाही. तू तुझे दोष ओळख आणि मुक्त हो. बस, एवढ्यानेच तुला मुक्तीधाम मिळेल. भगवंतानी फक्त एवढेच करायला सांगितले आहे. आणि प्रतिक्रमण, रोख-प्रतिक्रमण करायला सांगितले आहे. इथे तर उधार प्रतिक्रमण चालू आहेत. बारा महिन्यांतून एकदा पर्युषण येते, त्यादिवशी प्रतिक्रमण करतात, तेव्हा तर नवीन-नवीन साड्या नेसून बाहेर पडतात. उलट त्यामुळे अधिक मूर्च्छित अवस्थेत हिंडत

असतात. जेव्हा प्रतिक्रमण करायला हवे तेव्हा मूर्च्छित होऊन नवीन-नवीन साड्या नेसून हिंडतात. अशा मूर्च्छा असलेल्या परिणामाला भगवंतांनी धर्म म्हटला नाही. प्रतिक्रमणाचा धर्म जर धरून ठेवला तर तुझ्यावर कुणी गुरु नसेल तरी चालेल. प्रतिक्रमणाचा धर्म म्हणजे काय? तुम्ही एखाद्याला म्हणालात 'तुम्ही वाईट आहात' तर तुम्हाला लगेच प्रतिक्रमण करायला हवे, की मी बोलायला नको होते ते मी बोललो. म्हणून भगवंताजवळ आलोचना करावी. वीतरागांना स्मरून आलोचना करावी की, 'भगवंता, माझ्याकडून चूक झाली आहे, मी ह्या भाऊंना असे असे म्हटले म्हणून मी त्याचा पश्चाताप करीत आहे. आता पुन्हा मी असे करणार नाही.' पुन्हा असे करणार नाही, असे म्हणणे म्हणजे प्रत्याख्यान. भगवंतानी सांगितलेले आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान, एवढेच जरी धरून ठेवले ना, आणि ते देखील अगदी रोख, अजिबात उधार नाही, आजचे आज आणि उद्याचे उद्या, जेव्हा कधी काही झाले की लगेच रोख देऊन टाकले तर श्रीमंत होशील, वैभव उपभोगशील आणि मोक्षाला जाशील! फक्त एकच शब्द धरून ठेवला, या 'ज्ञानी पुरुषाचा' एकच शब्द धरून ठेवला तरी खूप झाले, थेट मोक्षाला नेले नाही तर ते 'ज्ञानी'च नाहीत! फक्त एक शब्द धरून ठेव, जास्त नाही.

जेव्हा तुम्ही त्यांना उलट बोललात तर तुम्हाला त्याचे प्रतिक्रमण करावे लागते. तसेच त्यांना पण तुमचे प्रतिक्रमण करावे लागते. त्यांनी प्रतिक्रमण का करावे? तर असे समजावे की 'पूर्वी कधी तरी मी अशी चूक केली असेल की ज्यामुळे त्यांना मला शिवी द्यावी लागली.' म्हणून त्यांना त्यांच्या या चुकीसाठी प्रतिक्रमण करायला हवे. त्यांना त्यांच्या पूर्वजन्मींच्या चुकांचे प्रतिक्रमण करावे लागते आणि तुम्हाला तुमच्या ह्या जन्मातील चुकांचे प्रतिक्रमण करावे लागते! अशी प्रतिक्रमणे दिवसातून पाचशे-पाचशे कराल तेव्हा मोक्ष मिळेल.

आता असे धर्मध्यान आणि असे प्रतिक्रमण तर हल्ली उपाश्रयात देखील होत नाही ना? मग काय करणार? नाही तरी रडत रडत भोगावेच लागते ना! मग त्याऐवजी हसून भोगलेले काय वाईट?

जरी फक्त एवढे केलेत आणि इतर कुठल्या धर्माच्या मागे नाही लागलात तरी हरकत नाही. एवढेच पाळले तरी पुरे आहे. आणि मी तुला गॅरंटी देतो, तुझ्या डोक्यावर हात ठेवतो. जा, मोक्षासाठी शेवटपर्यंत मी तुला सहकार देईन! फक्त तुझी तयारी पाहिजे. एकच शब्द जरी पाळला तरी पुरे!

अतिक्रमण झाले की लगेच प्रतिक्रमण करावेच लागते. मनात वाईट विचार आले, एखादा स्त्रीबद्दल वाईट विचार आले तर 'विचार चांगले असायला हवेत' असे म्हणून लगेच ते वाईट विचार बदलून टाकावे. मनात वाटले की 'हा नालायक आहे', तर असा विचार का आला? आपल्याला त्याची लायकी आणि नालायकी पाहायचा अधिकार नाही, तरी पण बोलायची वेळ आलीच तर म्हणा 'सगळे चांगले आहेत.' चांगले आहेत, असे म्हटल्याने तुम्हाला कर्मबंधन होणार नाही, परंतु जर वाईट म्हणालात तर ते अतिक्रमण म्हटले जाईल आणि म्हणून त्याचे प्रतिक्रमण अवश्य करावे लागेल.

मुलाला मारायचा अधिकार नाही, समजावायचा अधिकार आहे. तरी पण मुलाला मारले आणि प्रतिक्रमण केले नाही तर कर्मबंधन होतच राहील ना? प्रतिक्रमण तर करायलाच हवे. मुलाला मारले ते तर प्रकृतीच्या उलट स्वभावामुळे, क्रोध-मान-माया-लोभ यामुळे, कषायांमुळे मारलेत. पण मारल्यानंतर लगेच माझे शब्द आठवले की, 'दादाजीं'नी असे सांगितले होते 'अतिक्रमण झाले तर असे प्रतिक्रमण करा.' आणि जर प्रतिक्रमण केलेत तरी ते धुतले जाईल! ताबडतोब धुतले जाईल. धर्मध्यानाने केलेल्या कर्मबंधनातून सुटका होते आणि नवीन कर्मबंधने होत नाहीत! आणि संपूर्ण मोक्ष तर मात्र शुक्लध्यान उत्पन्न होईल तेव्हाच होऊ शकेल. शुक्लध्यान ज्ञानी पुरुषांकडूनच प्राप्त होऊ शकते. वीतरागींनी सध्याच्या काळात शुक्लध्यान शक्य नाही असे सांगितले आहे. पण हा तर अक्रममार्ग आहे, अपवादमार्ग आहे, म्हणून 'आम्ही' एका तासातच शुक्लध्यान देत आहोत. नाही तर शुक्लध्यानाची गोष्टच करू नये. आणि शुक्लध्यान झाले तर कामच झाले ना!

आधी सून होती मग ती सासू झाली, कारण सून आणली म्हणून स्वतः सासू झाली. अशा तऱ्हेने हा संसार सारा सापेक्ष आहे, भ्रांती आहे. खरे काहीच नाही. सापेक्षला खरे मानले की हा माझा मुलगा. मुलगा आपला आहे असे केव्हा म्हणता येते? तर आपण त्याचा अपमान केला, त्याला शिव्या दिल्या, मारले तरी पण त्याला आपल्यासाठी प्रेमच वाटत असेल तर समजावे की हा खरोखर माझा मुलगा आहे. पण इथे तर तासभर जरी त्याचा अपमान केला तर तो तुम्हाला मारायला धावेल! अरे, एक वडील मुलाला थोडेसे जास्तच रागावले तर दोनच तासात मुलाने वडीलांच्या विरोधात कोर्टात खटला दाखल केला, आणि वकीलांना म्हणतो कसा 'तुम्ही जर भर कोर्टात माझ्या वडीलांची नाचक्की केली तर मी तुम्हाला 300 रूपये जास्त देईन!' हा संसार असाच आहे की संकट प्रसंगी कोणीच आपले होत नाही. म्हणून आश्रय फक्त भगवंताचा घ्यावा, आणखी कोणाचा नाही!

लोक असे म्हणतात 'मला ठेच लागली.' असेच म्हणतात ना, की 'मी असा सरळ चाललो होतो आणि मला ठेच लागली.' अरे, ठेच तर त्याच जागेवर असते, रोज तिथेच बसलेली असते. ठेच म्हणते 'मूर्खा, तूच मला मारलेस, तूच माझ्यावर आपटलास. मी नाही म्हटले तरी रोजच आपटतोस. माझा मुक्काम तर सतत इथेच आहे. हा मूर्ख आंधळ्यासारखा मला रोज ठेच देत आहे.' ठेच म्हणते ते बरोबरच आहे ना? तर जग असे आहे. मग मोक्ष शोधला तर कसा मिळणार? वीतरागांनी सांगितलेला मोक्ष सगळ्यात सोपा, सगळ्यात सरळ आहे. 'शुद्ध भावाने 'वीतरागींना' ओळखले तरी मोक्ष मिळेल.' पण लोक 'वीतरागींना' ओळखतच नाहीत. आणि वीतरागी भगवंताना म्हणतात 'मला मुलगा नाही.' म्हणून तर भगवंताचा पाळणा आणतात! अरे, वीतरागांपाशी मुलगा का मागतोस? वीतराग भगवंत अशा गोष्टीत कशाला लक्ष घालतील? आणि त्यांनी जर अशा गोष्टीत लक्ष घातले तर त्यांना वीतरागी कसे म्हणायचे? वीतरागींपाशी मागायचे असेल तर एकच गोष्ट मागा. मोक्ष मागा. मोक्ष मागितलात तर तो मिळेल, पण चारोळी मागितली तर मिळेल का?

इथे सर्व नवीनच ऐकायला मिळेल. रिलेटिव्हमध्ये इतर सर्व ठिकाणी जे ऐकायला मिळत होते तो साधन मार्ग आहे. आणि हा साध्य मार्ग आहे. अनंत जन्म साधनांचेच रक्षण केले आणि ध्येय निश्चित केल्याशिवायच ध्यान करत आले. ध्यान केव्हा होऊ शकते? तर स्वत: ध्याता होतो तेव्हा. आपण विचारले की, 'तुम्ही कोण आहात?' तर म्हणेल 'मी मॅजिस्ट्रेट आहे' अरे, ध्यान करताना तू ध्याता नव्हतास का? मॅजिस्ट्रेटच होतास? ध्याता तर केव्हा होऊ शकतो की जेव्हा सगळ्या जगाचा विसर पडतो! इथे तर त्याचे ध्यान मॅजिस्ट्रेटपदातच आहे मग ध्येय कसे निश्चित होणार? हे तर ध्येय बडोद्याला जायचे असेल आणि मग तो ध्याता होतो की कसे जाऊ? हे ध्यान इंद्रिय-प्रत्यक्ष आहे. आणि आत्म्याचे तर भानच नाही कारण ते अतिंद्रिय प्रत्यक्ष आहे!

## ध्यानाचे चार प्रकार

ध्यानाचे चार प्रकार आहेत आणि माणसे सतत या पैकी एका ध्यानात असतात. तुम्हाला इथे कुठले ध्यान असते?

**प्रश्नकर्ता :** 'मी शुद्धात्मा आहे,' हे ध्यान.

**दादाश्री :** ते तर लक्ष्य आहे. ध्यान केव्हा म्हटले जाते? तर जेव्हा ध्याता होतो तेव्हा. परंतु आपल्याकडे तर ध्यान, ध्याता आणि ध्येय पूर्ण झाले. अष्टांग योगाची आठही अंगे पूर्ण करून लक्ष्यामध्ये पोहोचले. आता येऊन तुम्हाला कोणी म्हणाले, 'चला उठा, जेवायला चला' तरी देखील तुम्ही ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदी राहता आणि नंतर म्हणाले की, 'नाही, तुम्ही इथे जेवायचे नाही' तरी देखील ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदी राहू शकलात तर त्याला शुक्लध्यान म्हणायचे. दुकानात वजनात गडबड करतात, कापड ताणूनताणून मोजतात, त्याला रौद्रध्यान म्हणतात. भेसळ केली तर ते सगळे रौद्रध्यानात मोडते. दुकानात बसल्या बसल्या गिऱ्हाईकाची वाट पाहतो, त्याला भगवंतांनी आर्तध्यान म्हटले आहे!

एकीकडे महावीर भगवंतांनी 45 आगमे सांगितली आणि दुसरीकडे चार शब्द सांगितले. या दोन्ही गोष्टी समान महत्त्वाच्या आहेत. ज्याने

हे चार शब्द ध्यानात ठेवले त्याने 45 आगम ध्यानात ठेवले. ते चार शब्द कोणते? तर रौद्रध्यान, आर्तध्यान, धर्मध्यान आणि शुक्लध्यान.

जग कसे आहे? तुझा गिऱ्हाईक असेल तर तू सोळाचे साडेसोळा सांगितलेस तरी तो तुझ्याकडून घेईल आणि तुझा गिऱ्हाईक नसेल तर सोळाचे पंधरा सांगितलेस तरी तो घेणार नाही! एवढी खात्री तर बाळग!

स्वत: स्वत:ची चिंता करत बसणे म्हणजे आर्तध्यान. मुलगी लहान आहे, माझ्याजवळ पैसे नाहीत, तर कसे होईल? तिचे लग्न कसे करीन? हे झाले आर्तध्यान. मुलगी अजून छोटी आहे आणि भविष्याची काळजी करत बसतो, ते आर्तध्यान आहे. घरात जर एखादी नावडती व्यक्ती चार दिवस राहायला आली तर मनात वाटत राहते - 'गेला तर बरे होईल! माझ्याकडेच कशाला आला? हे सर्व 'आर्तध्यान' आणि शिवाय 'तो नालायक आहे' अशा शिव्या दिल्यात तर ते रौद्रध्यान झाले.

चांगले शुद्ध दूध असेल आणि खीर करायची असेल तर त्याच्यात मीठ टाकू नये पण साखर टाकावी. शुद्ध दुधात साखर घालणे म्हणजे धर्मध्यान. माझ्याच कर्म दोषामुळे, माझ्याच चुकांमुळे ही दु:खे येतात. हे सर्व धर्मध्यानात सामावते.

महावीर भगवंतांचे हे चार शब्द शिकला तर 45 आगम समजले, असे म्हणता येईल.

वीतरागांचे खरे धर्मध्यान असेल तर क्लेश मिटतात.

धर्मध्यान कशाला म्हणतात? कोण्या व्यक्तीने जर आमचे वाईट केले तरी त्याच्याबाबतीत आपल्या मनात किंचितदेखील भाव बिघडत नाहीत, उलट त्याच्याबद्दल काय वाटते, ज्ञानाचा आधार कसा घेतला जातो की, 'माझ्याच कर्मांच्या उदयामुळे हे भाऊ मला भेटले आहेत.' तर ते धर्मध्यानात मोडते. कोणी भर सभेत भयंकर अपमान केला तरी त्याला आशीर्वाद देऊन, गोष्ट केव्हाच विसरून जातो. अपमानाला उपेक्षाभावाने विसरतो याला भगवंतानी धर्मध्यान म्हटले आहे. इथे तर झालेला अपमान मरेपर्यंत विसरत नाहीत, अशी माणसे आहेत!

धर्मध्यान करणाऱ्याला श्रेष्ठी पुरुष म्हणतात. सारा दिवस, उठल्यापासून तो लोकांना ऑब्लाइज (उपकार) करत राहतो. ऑब्लाइजिंग (परोपकारी) स्वभावाचा असतो. स्वतः सहन करून सुद्धा तो समोरच्या व्यक्तीला सुख देतो. दु:ख मात्र जमा करून टाकतो. एकही आर्तध्यान किंवा रौद्रध्यान करत नाही. त्याचे तोंड कधीच एरंडेल तेल प्यायल्यासारखे नसते. चेहऱ्यावर तेज असते. साऱ्या गावातील भांडण-तंटे तो मिटवतो. त्याला कोणासाठीही पक्षपात नसतो. जैन कसा असला पाहिजे? जैन तर श्रेष्ठी पुरुष म्हटले जातात, श्रेष्ठ म्हटले जातात. पन्नास पन्नास मैलाच्या रेडियसमध्ये (परिसरात) त्यांचा सुगंध दरवळत असतो.

सध्या श्रेष्ठीचे शेठ झाले आहेत आणि त्यांच्या ड्रायव्हरला शेठ बद्दल विचारले तर तो म्हणेल काहीच बोलण्यासारखे नाही. शेठ मधील मात्रा उडवायला हवी! शेठ मधील मात्रा काढली तर काय राहील?

**प्रश्नकर्ता :** शठ (धूर्त)!

**दादाश्री :** आजकाल श्रेष्ठी कसे झाले आहेत? सोफा घेऊन दोन वर्षे पण झाली नाहीत तरी पण शेजाऱ्याने सोफा घेतला तर हे पुन्हा नवीन घेतात. इथे तर स्पर्धेत पडले आहेत! एक गादी आणि तक्क्या असले तरी पुरे आहे ना! पण यांची तर सतत शेजाऱ्यांशी स्पर्धा चालू असते. यांना शेठ कसे म्हणणार? या गादी-तक्क्याची ही भारतीय बैठक फार उत्तम आहे, पण लोकांना हे समजत नाही आणि लोक सोफ्याच्या मागे लागले आहेत. अमक्याने असे घेतले तर मला पण तसेच हवे. यावरून मग घरात जोरदार भांडणे! ड्रायव्हरच्या घरी पण सोफा आणि शेठच्या घरी पण सोफा, हे सगळे नकली शिरले आहे. कोणी असे कपडे घातले तर त्यालाही तसे कपडे घालण्याची वृत्ती होते! कोणाच्या तरी घरी गॅसवर पोळी करताना पाहिले की लगेच गॅस आणतो. अरे, चुलीवरच्या आणि गॅसवरच्या पोळीच्या चवीतला फरक तुला कळत नाही का? हवे ते खरेदी करा, त्यात हरकत नाही पण त्यासाठी स्पर्धा कशाला? या स्पर्धेच्या मागे लागून माणुसकी पण गमावून बसलेत. अरे, तुझ्यात पाशवता आली तर पशु योनीत जाशील. नाही तर श्रेष्ठी तर पूर्ण

सुखी असतो, आणि गल्लीतल्या सगळ्यांना सुखी करण्याची भावना त्याच्यात असते. स्वत: सुखी असेल तरच दुसऱ्यांना सुखी करू शकेल. स्वत:च जर दु:खी असेल तर दुसऱ्यांना सुख काय देणार? दु:खी माणूस तर भक्ती करतो आणि सुखी होण्याचा प्रयत्न करत राहतो.

मोक्षाची गोष्ट फार दूरची आहे पण आर्तध्यान आणि रौद्रध्यान याच्यावर तरी अंकुश हवा ना? त्याची सूट कशी देता येईल? सूट कशाची असते? धर्मध्यानाची असते. इथे तर उघडउघड दुर्ध्यानात गुंतले आहेत! काय शोभते आणि काय शोभत नाही एवढे तरी कळायला नको का?

**प्रश्नकर्ता :** अपध्यान म्हणजे काय?

**दादाश्री :** अपध्यान तर या काळात उत्पन्न झाले आहे. अपध्यान म्हणजे चारी ध्यानात जे समाविष्ट होत नाही ते अपध्यान. भगवंतांच्यावेळी चार प्रकारचे ध्यान होते. त्या काळात अपध्यान शब्दाचा उल्लेख नव्हता. त्या काळी त्याचा अनुभवच आला नव्हता मग त्याचा उल्लेख करून काय फायदा? या काळातच असे अपध्यान उत्पन्न झाले आहे. अपध्यानाचा अर्थ मी तुम्हाला समजावून सांगतो. सामायिक करताना सारखे घडयाळाकडे बघत बसतात 'अजून किती वेळ बाकी आहे; कधी पूर्ण होणार? कधी पूर्ण होणार?' अर्थात ध्यान सामायिकमध्ये नसते तर घडयाळात असते! त्याला अपध्यान म्हणतात. एकवेळ दुर्ध्यान असलेले चालेल. दुर्ध्यान म्हणजे विरोधी ध्यान आणि सद्ध्यान मोक्षाला नेते. आणि सारखे घडयाळ बघणे याला अपध्यान म्हणतात. सरळ ध्यान पण नाही, उलटे ध्यान पण नाही पण तिसऱ्याच प्रकारचे ध्यान. (सामायिक करताना) सारखे घडयाळ बघत राहतात ह्याला अपध्यान म्हणतात. असे करण्यामागे त्यांची नियत काय आहे? एक व्यक्ती चिडून स्वत:च्या अहंकाराला पोषण्यासाठी अख्ख्या गावाला जाळून टाकतो! ते पण एक प्रकारचे ध्यान झाले. आणि अपध्यानात असलेल्या व्यक्तीला स्वत:च्या अहंकाराची पर्वा नसते, पण जेव्हा ध्यान करतो तेव्हा अपध्यानच करतो. म्हणजे हे सगळे पूर्णपणे अनर्थकारी. नाही स्वत:साठी की नाही मानासाठी, केवळ निरर्थक! अर्थाशिवाय, हेतूशिवाय केलेली क्रिया म्हणजे अपध्यान.

## हार्ड रौद्रध्यान

अलीकडच्या काळात हार्ड रौद्रध्यान वाढले आहे. हार्ड रौद्रध्यान म्हणजे आपल्या बुद्धीने स्वतःपेक्षा कमी बुद्धीच्या माणसांना फसवून त्यांच्याकडून हिसकावून घेणे. इथे माणूस स्वतःच्या बुद्धीचा दुरुपयोग करून समोरच्या व्यक्तीला मारतो, त्या व्यक्तीचे सगळे रक्त पिऊन टाकतो, फक्त त्याची हाडे आणि चामडीच शिल्लक उरते, एवढे सगळे करून परत म्हणतो कसा, 'मी कुठे मारले? अहिंसा परमो धर्म!' या शेठ मंडळीनी असे-असे लागेबांधे करून अशी व्यवस्था केलेली असते की शेठ गादी-तक्क्यावर बसून राहतात व शेतकरी बिचारे रात्रंदिवस मेहनत करतात आणि लोणी शेठच्या घरी पोहोचते आणि शेतकऱ्याच्या पदरात ताक पण उरत नाही. आपल्या जास्त बुध्दीचा जोरावर शेतकऱ्याच्या कमी बुद्धीचा फायदा घेऊन शेठ शेतकऱ्याला हळूहळू मारतो. याला हार्ड रौद्रध्यान म्हटले गेले आहे, इथे रोज एक-एक चापट देत हळूहळू मारतो. तलवारीने एकदम दोन तुकडे केले तर ते साधे रौद्रध्यान होईल, हार्ड रौद्रध्यान नाही. त्याला साधे रौद्रध्यान म्हणायचे, कारण तलवारीने दोन तुकडे केले तर रक्त बघून त्याच्या मनाला वाईट वाटते आणि तो म्हणतो, 'अरेरे, हा बिचारा माझ्या हातून मेला!' पण हार्ड रौद्रध्यानात असे काही दिसत नाही आणि त्यामुळे मनाला दुःखही होत नाही आणि तो मागे पण फिरत नाही, उलट अधिकाधिक वाढत जाते. रक्ताचा एक थेंब पण न सांडता शेठजी मजुराच्या रक्ताचा थेंबन् थेंब शोषून घेतो. याला कसे बरे पुरुन उरावे? याला तर टर्मिनसच (अंतिम स्टेशनच) नाही ना! अशा हार्ड रौद्रध्यानाचे फळ पण खूप भयंकर येते. सातवी नरक देखील कमी पडेल असे फळ! हे हार्ड रौद्रध्यान आणि अपध्यान नीट समजून घ्यायला हवे ना! तुम्हाला काय वाटते? न समजून चालेल का?

**प्रश्नकर्ता :** समजून घ्यायलाच हवे ना, दादा.

**दादाश्री :** सध्याचा काळ म्हणजे महावीर भगवंतांनंतर, 2500 वर्षांनंतरचा दूषमकाळ आहे. म्हणून सर्वच जण या काळात खूप चुका

करतात, अगदी मोठमोठे साधू पण चुकतात! शंभरातील दोन-चार साधूच चुका करत नसतील! बाकी सगळे रौद्रध्यान, आर्तध्यान आणि नको ते अपध्यान अशातच पूर्ण दिवस गुंतलेले असतात. आता हे लोक साधू का बनतात? तर रौद्रध्यान आणि आर्तध्यान टाळण्यासाठी. घरी कोणाला आवडत नाही. रोज भांडणे होतात, कोणाशी पैशावरून, देण्या-घेण्यावरून वाद होतात, या सगळ्यातून सुटण्यासाठी साधू झाला की मग खाण्यापिण्याची काळजी मिटेल, आणि संसार चालविण्याची, लग्न करण्याची, या सगळ्याची काळजी मिटेल आणि मग आपोआपच रौद्रध्यान आणि आर्तध्यान संपेल! एवढे सोडण्यासाठी साधू व्हायचे आहे. पण सध्या तर गृहस्थांना जेवढे आर्तध्यान, रौद्रध्यान होत नसतील तेवढे ह्या साधू महाराजांना होतात! सगळ्यांचीच इच्छा भगवंताच्या आज्ञेत राहायची आहे. खरी मनापासूनची इच्छा आहे. पण खरा मार्ग सापडतच नाही, तेव्हा ते तरी काय करणार?

भगवंताच्या वेळी जे नव्हते अशाप्रकारचे ध्यान आत्ताच्या काळात होत आहे!

इथे तुम्हाला सगळ्या गोष्टींचे स्पष्टीकरण मिळेल. महावीर भगवंत होऊन गेले तेव्हापासून म्हणजे गेली 2500 वर्षांपासून ही 'भट्टी' चालू झाली होती. आता 2500 वर्षे पूर्ण झाली आहेत. आणि ती 'भट्टी' संपत आली आहे आणि आत्ता नवीन युग-सर्व काही नवे सुरू होत आहे.

## संसाराचे उपादान कारण

संसाराचे उपादान आर्तध्यान आणि रौद्रध्यान आहे आणि तीच अधिकरण क्रिया आहे. फक्त धर्मध्यान होत असेल तर ते संसारात भटकवणारे नाही. आणि त्यामुळे कधीतरी शुक्लध्यान पण प्राप्त होईल. आर्तध्यान आणि रौद्रध्यानामुळे पूर्ण दिवस *कढापा* आणि *अजंपा* चालू असतो. *कढापा* म्हणजे रौद्रध्यान आणि *अजंपा* म्हणजे आर्तध्यान. आत *अजंपा* होत असेल आणि ते जर त्या समोरच्या व्यक्तीला समजले तर मात्र ते रौद्रध्यान.

## रौद्रध्यान कशाला म्हणतात?

तुम्हाला रौद्रध्यान आणि आर्तध्यान म्हणजे काय ते समजते का? काळ्या रंगाचा माणूस म्हणजे आर्तध्यान आणि गोऱ्या रंगाच्या माणूस म्हणजे रौद्रध्यान, असे आहे का?

क्रोध नेहमी दुसऱ्यांवरच येतो ना? क्रोध जर स्वत:वरच आला तर भगवंतानी त्याला आर्तध्यान म्हटले आहे. पण लोक वेडे थोडेच आहेत? सर्व हुशार आहेत, स्वत:वर क्रोध करत नाहीत! करतात का? स्वत:वर नाही दुसऱ्यांवरच करतात ना? दुसऱ्यांवर क्रोध केला म्हणजे दुसऱ्यांना दु:ख देण्याचा भाव मनात ठेवला. दुसऱ्यांना दु:ख देण्याचा भाव म्हणजे क्रोध. दुसऱ्यांच्या वस्तू पळविण्याचा भाव म्हणजे लोभ. दुसऱ्यांचे नुकसान करून त्यांच्या वस्तू पळविण्याचा भाव म्हणजे माया-कपट आणि दुसऱ्यांचा तिरस्कार करण्याचा भाव म्हणजे मान. या सर्व गोष्टी म्हणजे रौद्रध्यान. क्रोध, मान, माया आणि लोभ म्हणजे रौद्रध्यान.

## आर्तध्यान कशाला म्हणतात?

आर्तध्यान म्हणजे, तुमच्या घरी दोन पाहुणे आले आणि ते तुमच्या आवडीचे असतील किंवा नसतीलही, पण असे पाहुणे येतात की नाही? पाहुणे नावडते असतात तेव्हा असे वाटते ना की हे कुठून आले? त्यांना दारावर पाहाताक्षणीच मनात बेचैनी सुरू होते आणि तरी तोंडाने म्हणावे लागते, 'या या, बसा' असे म्हणावे लागते ना? असे म्हटले नाही तर अब्रू जाईल, कारण बाहेर लोक तुम्हाला नावे ठेवतील! म्हणून 'या, बसा' असे म्हणावेच लागते. मनात मात्र अशांती असते, याला भगवंतानी आर्तध्यान असे म्हटले आहे. आर्तध्यान म्हणजे स्वत:लाच दु:ख देणारे ध्यान. आता पाहुणे आले आहेत ते काय लगेच थोडे परत जातील? तेव्हा या, बसा म्हटले पाहिजे, आणि आतून आर्तध्यान होऊ देऊ नये असे भगवंतांनी सांगितले. आणि आर्तध्यान झालेच तर प्रतिक्रमण करावे की, 'हे ईश्वरा, मला असे का होत आहे? मला असे करायचे नाही.' असे म्हणत प्रतिक्रमण करायला हवे. समजा दोन आवडत्या व्यक्ती

आल्या असतील, किंवा तुमची आजी आली असेल, ती दोन दिवसासाठीच आली असेल तर तिने आठ दिवस राहावे असे वाटणे हेसुद्धा आर्तध्यानच आहे. आजी निघाली की दु:ख वाटते आणि अजून दोन दिवस राहिली तर मला समाधान झाले असते. असे वाटते हे सुद्धा आर्तध्यानात मोडते. किंवा तुम्ही कोणावर रागावलात तर ते रौद्रध्यान झाले आणि कोणावर रागावल्यानंतर तुम्हाला पश्चाताप झाला तर त्याला आर्तध्यान म्हटले जाते.

काही जण रागावतात आणि रागावल्यानंतर 'इथे तर रागावण्यासारखेच होते' असे म्हणतात, म्हणून हे रौद्रध्यान, जबरदस्त रौद्रध्यान झाले! दुप्पट झाले. रागामुळे रौद्रध्यान तर झालेच पण रागावण्यासारखेच होते असे वाटले, म्हणजे राजी-खुशीने केले म्हणून दुप्पट रौद्रध्यान झाले आणि दुसऱ्या व्यक्तीला मात्र त्याच्या कृत्याचा पश्चाताप वाटतो म्हणून ते आर्तध्यानात मोडते. रौद्रध्यान आहे, पण पश्चाताप केल्यामुळे त्याची गणना आर्तध्यानात होते, कारण पश्चातापपूर्वक केले म्हणून.

पैसे कमावण्याची भावना म्हणजेच रौद्रध्यान. पैसे कमावण्याची भावना म्हणजे दुसऱ्यांचे पैसे कमी करायचे, अशीच भावना, नाही का? म्हणून भगवंत म्हणतात, 'पैसे कमावण्याची भावना तू करूच नकोस'

**दादाश्री :** अंघोळीसाठी तू रोज ध्यान करतोस का?

**प्रश्नकर्ता :** नाही साहेब.

**दादाश्री :** अंघोळीचे ध्यान करत नाहीस तरी बादलीभर पाणी अंघोळीला मिळते ना?

**प्रश्नकर्ता :** हो, मिळते.

**दादाश्री :** ज्या प्रमाणे अंघोळीला पाण्याची बादली मिळते तसेच गरजे पुरते पैसे प्रत्येकाला मिळतातच, असा नियमच आहे. त्यासाठी उगीचच माणूस अनाठायी ध्यान करत बसतो.

दिवसभर रात्री झोपायला गादी मिळेल की नाही असा विचार करता का? इथे तर सकाळ असो, संध्याकाळ असो, पैसे, पैसे आणि

पैसे, फक्त पैशांचाच विचार? अरे तुला असा कुठला गुरु मिळाला? कुठल्या मूर्ख गुरुने तुला दिवसरात्र लक्ष्मीच्या मागे धावायला शिकवले? घरातील सगळे संस्कार विसरला, स्वास्थ्य बिघडविले, ब्लड प्रेशर झाले, हार्ट फेल होण्याची पाळी आली! तुला असे कोणते गुरु भेटले की ज्यांनी तुला पैशांच्या मागे धावायला शिकवले?

यांना जर कुणी गुरु मिळाले नाहीत तर लोकसंज्ञा हाच त्यांचा गुरु. लोकसंज्ञा म्हणजे लोकांनी मानले की पैशात सुख आहे, ती लोकसंज्ञा. लोकसंज्ञेमुळे हा रोग लागला तर कुठल्या संज्ञेमुळे हा दूर होईल? तेव्हा भगवंत म्हणतात, ज्ञानींच्या संज्ञेमुळे हा रोग दूर होईल. लोकसंज्ञेमुळे झालेला रोग ज्ञानींच्या संज्ञेने निघून जाईल.

आम्हाला असे सांगायचे आहे की अंघोळीच्या पाण्यासाठी, झोपण्याच्या गादीसाठी किंवा इतरही अनेक गोष्टींसाठी तुम्ही काहीच विचार करत नाही तरी पण त्या तुम्हाला मिळतातच ना? तसेच लक्ष्मीसाठी सुद्धा सहज राहा.

'आम्ही' ज्ञानी या सगळ्या गोष्टींचा हिशोब कसा लावतो? हे जग कसे चालते याचे भान कोणालाच नाही. एखाद्या मुलाच्या मित्राला दाढी आली नाही तर त्याला शंका येते की मलाही दाढी आली नाही तर काय होईल? पण हे जग उगीचच शंका घेण्यासारखे नाही. एखाद्याला दाढी येत नाही ही वेगळी गोष्ट, पण तुला तर दाढी उगवणारच. प्रत्येक पुरुषाला दाढी येणारच, एखाद्याला येत नाही तर ते निसर्गाचे आश्चर्य आहे!

अरे, पैसे कमावणारा तू आहेस का? तर त्याचे असे आहे की 'नक्कीच, तू कमावशीलही आणि गमावशीलही!' पण या दोन्ही गोष्टी तुझ्या हातात नाहीत. मग उगाचच तुझे ध्यान का बिघडवून घेतोस? हे पैसे तर पूरण-गलन होत असतात. ही सगळी सत्ता निसर्गाची आहे. म्हणजे पूरण होत असते, लाख रुपये कमावतो तीही निसर्गाची सत्ता आहे आणि लाख रुपयांचे नुकसान होते तीसुद्धा निसर्गाची सत्ता आहे. ती तुमची सत्ता नाही, मग तिथे विनाकारण हात कशाला घालता?

आरोपित भावाने जे जे केले जाते ते सर्व बंधनरूप आहे आणि तोपर्यंत रौद्रध्यान आणि आर्तध्यान बंद होत नाहीत. जैन धर्माचा सारांश काय आहे? याचा सारांश म्हणजे आर्तध्यान आणि रौद्रध्यान दोन्हीही बंद झाले तर जैनधर्म प्राप्त केला असे म्हणू शकतो. दोन्हीही बंद झाले तर त्यांनी जैन धर्माचे सारांश प्राप्त केले असे म्हणायचे. महावीर भगवंतांनी जे सांगितले ते प्राप्त केले असे म्हणता येईल. नाही तर सगळ्याच धर्माच्या लोकांना आर्तध्यान आणि रौद्रध्यान होते आणि तुम्हाला पण होते, तर मग त्यात काही अर्थ नाही. दुसऱ्या लोकात आणि यांच्यात काही फरक नको का? जैन धर्मात आणि इतर धर्मात काही फरक नको का? इतर धर्मात सुद्धा चारही प्रकारचे ध्यान आहेत आणि जैन धर्मात देखील चारही प्रकारचे ध्यान आहेत. तर मग जैन धर्माला वीतराग भगंवताचा धर्म कसे म्हणणार? इतर सर्व धर्माचे लोक पण या चार प्रकारच्या ध्यानात असतात आणि हे पण चार प्रकारच्या ध्यानात असतात. या चारच्या पुढे पाचव्या प्रकारचे तर ध्यान नाही. जर तेसुद्धा चार प्रकाराच्या ध्यानात असतील आणि तुम्ही (जैन) सुद्धा त्याच प्रकारच्या ध्यानात असाल तर तुमची प्रगती झाली असे कसे म्हणणार? 'वीतराग' धर्मात काही तरी फरक नको का? तर म्हणतात, कशात फरक असला पाहिजे? तुझे दुर्ध्यान किती प्रमाणात कमी झाले आहे? चार प्रकारच्या ध्यानातून कोणते कोणते ध्यान कमी झाले आहे? कदाचित रौद्रध्यान बंद झाले असेल आणि आर्तध्यान असेल तरीही भगवंतांना चालेल. आर्तध्यान आणि रौद्रध्यान दोन्हीही काही प्रमाणात बंद झाल्यानंतर वीतराग धर्म प्राप्त झाला असे म्हणता येईल.

**प्रश्नकर्ता :** अगम विचार, याला कुठल्या प्रकारचे ध्यान म्हणता येईल?

**दादाश्री :** अगम विचारांचा समावेश आर्तध्यानात होतो किंवा त्याला भूतकाळाच्या विचारांमुळेही दु:ख होत असते. एक वर्षापूर्वी मुलगा गेला त्याच्यासाठी आज रडणे म्हणजे आर्तध्यान. अशा दु:खात मनुष्य आर्तध्यान आणि रौद्रध्यान करतो. एकुलत्या एक मुलाच्या निधनाने

कल्पांत करतो. सतत कल्पांत केला म्हणजे *कल्पाचा* (काळचक्रचा) अंत होईपर्यंत तुला भटकावे लागेल. एक कोटी वर्षे भटकावे लागेल!

जे व्यापारी कापड ताणून मोजतात त्यांना आम्ही विचारतो की, 'शेठजी, मोक्ष नको आहे का तुम्हाला?' ते विचारतात, 'का बरे? असे का म्हणता?' तेव्हा मला सांगावे लागते की तुम्ही कापड ताणून मोजता तेव्हा कोणत्या प्रकारच्या ध्यानात असता? महावीर भगवंतांच्या ध्यानाला तरी ओळखा! तुम्ही करत आहात ते रौद्रध्यान आहे. दुसऱ्यांचे थोडेसेसुद्धा, अगदी बोटभर पण लुबाडणे याला रौद्रध्यान म्हणतात. गिऱ्हाईकाने विचारले की, या टेरेलिनचा भाव काय आहे, तर अठराच्या ऐवजी साडे अठरा रुपये सांगू शकता. पण अठरा रुपये भाव सांगितल्यानंतर कापड पूर्ण मापाने द्यायचे. किंचितमात्र कमी मोजता कामा नये. कमी दिले नसेल पण कमी देण्याची भावना जरी केली तरी ते रौद्रध्यानच झाले. कमी द्यायच्या प्रयत्नात चुकून जास्त गेले तर मात्र ते कोणी जमा करत नाही. शेठने नोकराला आधीच बजावून ठेवलेले असते, 'हे पाहा, या चाळीस वार कापडातून एवढे कापड उरले पाहिजे.' म्हणजे त्याने यासाठी अनुमोदनही दिलेले असते.

स्वतः करतो, करवितो आणि कर्त्याप्रती अनुमोदन देतो. दिवसभर असेच रौद्रध्यान होत असते आणि जैनपणा नष्ट झाला आहे. जैन तर कसा असावा? जरी आपण कितीही अडचणीत असलो तरीपण कोणी आपली मदत मागायला आला आणि त्याला आपली अडचण कळली तर आपण कसले जैन? तो आशेने आला आहे, त्याची निराशा होता कामा नये. त्याला मदत मिळालीच पाहिजे. कमी असेल, जास्त असेल पण तुमची मदत तर मिळायलाच पाहिजे. समजा तुमच्याकडे पैसे नसतील तर काही हरकत नाही पण तुमची साथ तर मिळायलाच हवी ना! त्याला म्हणावे, तुझे दुसरे काही काम असेल तर सांग. जैन समजून, शेठ समजून तो तुमच्याकडे आला आहे आणि तो बिचारा निराश होऊन, उसासे सोडत निघून जातो, असे कसे चालेल? तुम्हाला काय वाटते? मी बोलतो ते खरे आहे की खोटे?

एखादे चांगले झाड दिसले की लोक सावलीसाठी झाडाखाली

बसतात. जर झाडच चावायला लागले तर काय होईल? असेच हे आजकालचे शेठ चावायला धावतात की, 'तू नालायक आहेस, असा आहेस, तसा आहेस' वगैरे. गरीब लोकांना तर तुम्ही नालायक म्हणू शकता, कारण त्या बिचाऱ्यांकडे सत्ता नाही. आणि शेठ नोकरांना दिवसभर पिळून घेतात. नोकरांच्या हातून ग्लास फुटला तर 'तुझे काय हात तुटलेत का?' अशा शिव्या देतात. अरे, मग तुला कोणती गती मिळेल? नोकराचे हात जर तुटलेले असते तर तू त्याला कामावर ठेवले असतेस का? हे तर तुम्ही कर्माचे कर्ता झालात! भगवंतांनी व्यवहाराने सांगितले होते, नाटकीय भावाने करायला सांगितले होते, परंतु हा तर 'मीच करतो, माझ्याशिवाय कोण करणार?' असे म्हणतो. त्यामुळेच तर कर्मबंधन होत असते, आणि ते सुद्धा निकाचित (चिकट) कर्मबंधनच होते, हलके नाही. त्या नोकराला हलके कर्मबंधन होते आणि शेठला मात्र घट्ट गाठ बसते.

यात कोणाचा दोष नाही. सर्व आचार्य, साधू, सगळ्यांचीच इच्छा असते की भगवंतांनी सांगितल्यानुसार वागावे. पण तसे संयोग जुळत नाहीत. जसे या जगाच्या लोकांना असे वाटते, अशी भावना असते की माझ्या घरच्या लोकांना मी सुखी करावे. पण संयोग जुळल्याशिवाय ते कसे सुखी होतील? त्याच प्रमाणे हे साधू, आचार्य यांना पण संयोग मिळत नाहीत.

आम्ही तुम्हाला स्वरूपाचे ज्ञान दिले. त्यानंतर तुम्हाला आर्तध्यान आणि रौद्रध्यान होतात का?

**प्रश्नकर्ता :** नाही दादा, आता होत नाहीत.

**दादाश्री :** नुकतेच तुम्ही मुलीचे लग्न केलेत तेव्हा परिणती कशी होती? आर्तध्यान आणि रौद्रध्यान झाले होते का?

**प्रश्नकर्ता :** नाही दादा, एकदासुद्धा आर्तध्यान आणि रौद्रध्यान निर्माण झाले नाहीत.

**दादाश्री :** हे 'अक्रम ज्ञान' आहेच तसे. या ज्ञानामुळे 'रिलेटिव्ह'मध्ये धर्मध्यान असते आणि आत 'रियल'मध्ये शुक्लध्यान वर्तत असते! असे हे गजब, आश्चर्यकारक ज्ञान आहे!!

क्रमिक मार्गात ज्याचे रौद्रध्यान आणि आर्तध्यान गेले तो भगवंत पदावर आला असे मानले जाते, तेव्हापासून भगवंत पदाची सुरुवात मानली जाते.

## धर्मध्यान कशाला म्हणतात?

आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत नसेल तर धर्मध्यानात आला असे म्हणता येईल. आर्तध्यान आणि रौद्रध्यान बंद झाले की नवीन कर्मबंधन होणे थांबते. पण असे होणे शक्य नाही. ते तर आम्ही जेव्हा 'स्वरूपाचे ज्ञान' देतो त्यानंतरच 'बाहेर' धर्मध्यान सुरू होते आणि 'आत'मध्ये शुक्लध्यान सुरू होते. म्हणजे आर्तध्यान आणि रौद्रध्यान बंद होतात. हा अक्रम मार्ग आहे म्हणून बाहेरील सर्व क्रिया मिथ्यात्वीसारखीच, तशीच्या तशीच राहते परंतु ध्यान मात्र पूर्ण बदलते.

भगवंतांनी सांगितलेले धर्मध्यान असेल तरी तिथे क्लेश नसेल, क्लेशरहित असेल. पैसे कमी जास्त झाले तरी पण क्लेशरहित जीवन हवे. असे क्लेशरहित घर सापडणे कठीण आहे. मतभेद म्हणजे क्लेश, आणि जिथे क्लेश आहेत तिथे संसार आहेच. ज्याचे क्लेश मिटले तो भगवंतपदात आला असे म्हणता येईल.

प्रथम लहान लहान प्रकारचे क्लेश सुरू होतात आणि नंतर त्याचे मोठे स्वरूप बनते. या मतभेदामुळे आणि क्लेशामुळे मोठ्या मुश्कीलीने मिळालेला मनुष्यजन्म वाया जातो. जितका वेळ क्लेश करतो तितका वेळ तो जनावराची गती बांधतो. सज्जनता असेल तर जनावरगती बांधली जात नाही.

## कलुषित भावांच्या अभावामुळे भगवंतपद

**प्रश्नकर्ता :** आम्हाला क्लेश करायचा नसतो तरी पण दुसरा येऊन क्लेश करू लागला तर?

**दादाश्री :** हो, याचेच तर नाव जग ना! म्हणूनच असे म्हटले आहे की अशी एखादी 'गुहा' शोध की जी कोणाला माहीत नसेल

आणि तुला कोणी ओळखणार नाही, अशी 'गुहा' शोधून काढ की! इथे तर लोकांच्या मनात आले तर कधी पण येऊन तुला क्लेश करवतील, नाही तर रात्री दोन-तीन डास येऊन सुद्धा तुला क्लेश करवतील! चैनच पडू देणार नाही! म्हणून मनुष्यगतीत जन्म मिळाला की परत अधोगतीत जायचे नसेल तर क्लेश मात्र होऊ देऊ नकोस. तुझे क्लेश संपल्यावर तू इतरांचेही क्लेश मिटवू शकशील, आणि तेव्हा तू लोकपूज्य पदात आलास असे म्हणता येईल.

'आत्मा' स्वत:च 'परमात्मा' आहे. म्हणून पूज्य आहे, लोकपूज्य आहे. पण 'पुद्‌गल' देखील लोकपूज्य होऊ शकते, जर कलुषित भाव पूर्ण गेले असतील तरच! जेव्हा स्वत:मध्येही कलुषित भाव राहिले नसतील आणि समोरच्या व्यक्तीमुळेही स्वत:मध्ये कलुषित भाव निर्माण होत नसतील तेव्हा पुद्‌गल देखील लोकपूज्य बनून जाते! समोरच्या व्यक्तीच्या कलुषित भावातसुद्धा स्वत: कलुषित होत नसेल तर पुद्‌गल लोकपूज्य बनून जाते. अन्य भाव असले तरी चालतील पण कलुषित भाव मात्र असता कामा नयेत. जो स्वत:साठी, दुसऱ्यांसाठी, संपूर्ण जीवमात्रांसाठी कलुषित भाव करीत नाही ती व्यक्ती पूजनीय बनते. 'आम्ही' 'आमच्यात' काय पाहिले? 'आमच्यातून' काय निघून गेले? आमचे हे पुद्‌गल लोकपूज्य कशामुळे झाले? आम्ही 'स्वत:' तर निरंतर 'आमच्या स्वरूपातच' राहत असतो पण पुद्‌गलातून सुद्धा सर्व कलुषित भाव निघून गेले आहेत! म्हणून हे पुद्‌गल देखील लोकपूज्य झाले आहे! फक्त कलुषित भाव निघून गेले आहेत, बाकी खाणे, पिणे, कपडे घालणे हे सगळे चालू आहे. अगदी टेरेलीनचे कपडे सुद्धा घालतो आणि तरीही लोकपूज्य पद आहे! हे ही या काळाचे आश्चर्यच आहे ना? 'असंयति पूजा' नावाचे हे अकरावे आश्चर्यच आहे.

सर्व कलुषित भाव निघून जातील असा हा 'अक्रम मार्ग' आहे. कलुषित भाव राहतच नाहीत, संपून जातात, असे आहे. स्वत:चे क्लेश तर संपतातच पण स्वत:मुळे समोरच्या व्यक्तीला पण क्लेश होत नाहीत आणि समोरच्याचे क्लेश आमच्या अकलुषित भावामुळे शांत होतात. त्यांचा पूर्ण भावच बदलून जातो! हे 'घर' कधी कलुषित होतच नाही.

पण स्वत: कलुषित भाववाला आहे म्हणून त्याला घर सुद्धा कलुषित दिसते. आणि मग म्हणतो ही 'खोली' मला आवडत नाही. स्वत:च्या कलुषित भावांचे त्यात आरोपण केले म्हणून सर्व बिघडून जाते.

कलुषित भाव निघून गेले तर पुद्गलसुद्धा पूज्य होते, असे हे जग आहे! मग तो कुणीही असो, मुस्लिम असो, जैन असो की वैष्णव असो, ज्याचे कलुषित भाव गेले तो लोकपूज्य बनून जातो! हे अवलिया असतात त्यांचे तर थोडेफार कलुषित भाव संपलेले असतात, म्हणून ते दर्शन घेण्यायोग्य असतात. तरी पण ते त्यांच्यात नैसर्गिकपणे आलेले असते, विकासक्रमाच्या मार्गात आल्यावर असे घडते. त्यात त्यांचा स्वत:चा काही पुरुषार्थ नसतो. पुरुषार्थ तर ज्ञानप्राप्तिनंतरच होऊ शकतो. त्यानंतर 'स्वक्षेत्रात' बसतो, त्यामुळे कलुषित भाव कमी कमी होऊ लागतात. नाही तर एक कलुषित भाव कमी करायचा प्रयत्न केला तर दुसरे चार कलुषित भाव घुसतात! जोपर्यंत कलुषित भाव घुसू देणार नाहीत असे गार्डस् आपल्याजवळ नसतात तोपर्यंत पूर्ण लष्कर घुसते. गार्ड कधी भेटतो? 'पुरुष' बनतो तेव्हाच, म्हणजे मग पूर्ण लष्कर जसेच्या तसे राहते. आणि गार्ड नसेल तर चोर घुसतील, मग काय फायदा?

दिवसेंदिवस कलुषित भाव कमी झाले नाहीत तर मानवता शिल्लकच राहणार नाही, पाशवताच राहील.

उच्च गोत्र कधीपर्यंत म्हणता येईल? लोकपूज्य असेल तोपर्यंत. जे लोकनिंद्य नाहीत, त्यांना कलियुगात भगवंतांनी लोकपूज्य म्हटले आहे, या कलियुगाचा लोकांना इतका लाभ मिळाला आहे की या कलियुगात तुझी निंदा होत नाही म्हणून तू लोकपूज्य पदात आहेस! या बाबतीत भगवंत समजदार होते. पण भक्त इतके समजदार नाहीत की भगवंतानी मला लोकपूज्यपद दिले आहे तर मला माझ्यावर डाग पडू देता कामा नयेत. खरे म्हणजे कोणी लोकपूज्य नसतातच. असले तरी जगभरात दोन-तीनच असतील! गुरुची शिष्य पूजा करतात पण ती पोलिसांसारखी. गुरुंच्यामागे शिष्य म्हणतात, 'जाऊ दे ना त्यांची गोष्ट,' असे म्हणतात. कृपाळूदेव (श्रीमद् राजंचद्रची) लोकपूज्य होते. लोकपूज्य

म्हणजे एकदम सर्वश्रेष्ठ गोत्र. भगवंत लोकपूज्य होते. जी जी गोष्ट लोकनिंद्य असेल ती ती गोष्ट माफी मागून धुवून टाकली पाहिजे.

पूज्य हार्टिली असतात. महावीर भगवंत लोकपूज्य पद घेऊनच जन्माला आलेले.

भगवंत म्हणजे काय? तर त्यांच्या दर्जाचे आसपासचे लोक त्यांच्या व्ह्यू पॉइंटमध्ये जे आलेले असतात, त्यांना तेच भगवंत वाटतात. क्राइस्ट भगवंतांच्या व्ह्यू पॉइंटमध्ये आलेल्या लोकांना महावीर दाखवले तर त्यांना ते महावीर भगवंत न दिसता क्राइस्ट आहेत असेच वाटते.

या 'ज्ञानी पुरुषांना' देखील लोक भगवंत म्हणून ओळखतात. भगवंत हे विशेषण आहे, आणि आम्ही 'निर्विशेष' शुद्धात्मा आहोत! शुद्धात्म्याला विशेषण नसते. म्हणूनच 'आमचे' पद निर्विशेष आहे.

आम्हाला भगवान म्हणणे म्हणजे आमची थट्टा करण्यासारखे आहे. दुसरा कोणी साधू असेल आणि त्याला जर कोणाबद्दल कलुषित भाव होत नसतील आणि त्याच्या निमित्ताने दुसऱ्यांचा मनात कलुषित भाव निर्माण होत नसतील तर त्याला सुद्धा भगवंत पद प्राप्त होते. आणि 'आम्हाला' पण भगवंत म्हणतात. पण हे तर निर्विशेष पद आहे! याला विशेषण नसते. शास्त्रात हे पद नसते. म्हणून आम्हाला कोणी विशेषण लावायच्या प्रयत्नात पडू नये. 'आमचे' विशेषण नसतेच. भगवंत हे विशेषण आहे. नाव नाही. कोणी बी.एससी. झाला तर त्याला ग्रॅज्युएट म्हणतात. पण त्याच्या पुढे देखील दहा वर्षे अभ्यास केला तरी त्याला आपण ग्रॅज्युएट म्हटले म्हणजे तर ते त्याचा अपमान करण्यासारखे आहे. 'ज्ञानी पुरुषांना' 'भगवंत' म्हणणे म्हणजे त्यांना हीन पद देण्यासारखे आहे. भगवंत पद हे 'ज्ञानी पुरुषां'साठी हीन पद आहे. 'ज्ञानी पुरुष' म्हणजे आश्चर्य असतात. ते तर निर्विशेष असतात. पण लोकांनी कसे ओळखावे? म्हणून त्यांना 'भगवंत' असेच म्हणावे लागते. भगवंत शब्द 'भग' या धातुपासून बनला आहे 'भग' वरून भगवंत. भाग्य वरून जसे भाग्यवान शब्द बनतो तसेच ज्यांनी भगवत् गुण प्राप्त केले असतील त्यांना भगवंत

म्हणतात. 'ज्ञानी पुरुष' त्याहूनही खूप पुढे गेलेले असतात. त्यानंतर काही उरतच नाही. आमच्या फक्त चार डिग्री बाकी राहिल्या आहेत. महावीर भगवंताच्या 360 डिग्रीज पूर्ण झाल्या होत्या. आमचे केवलज्ञान 356 डिग्रीवर अडकले आहे. तेसुद्धा या काळाच्या विचित्रपणामुळे! पण तुम्हाला जर हवे असेल तर 'आम्ही' तुम्हाला 360 डिग्रीचे केवलज्ञान एका तासात देऊ शकतो, फक्त तुमची तयारी हवी. पण हा काळ विचित्र आहे म्हणून तुम्हाला ते पूर्ण पचणार नाही. आम्हालाही 356 डिग्रीवर येऊन थांबले आहे ना? पण आत तर 'आम्हाला' त्याचे संपूर्ण सुख वर्तत असते.

धर्मासाठी आजच्या इतका योग्यकाळ या पूर्वी कधीही आला नाही. महावीर भगवंतांना जाऊन 2500 वर्षे पूर्ण झाली आहेत आणि जणू काही महावीरांना जाऊन साडे तीन वर्षेच झाली आहेत असा काळ आता येत आहे. सध्या जरी दूषमकाळ असला तरीही सध्याचा काळ उत्तम आहे. खरा काळ आता आला आहे. या काळात जे लोकनिंद्य नाहीत अशांना भगवंतानी लोकपूज्य म्हटले आहे. इतका सुंदर काळ आला आहे तर त्याचा लाभ घ्यायला हवा ना?

या काळात आम्ही नगद मोक्ष देऊ शकतो. इथेच मोक्ष अनुभवास येतो. आम्ही मोक्षदाता आहोत, आम्हाला मोक्ष देण्याचे लायसेन्स मिळाले आहे. जगत् कल्याणासाठी आम्ही निमित्त आहोत. आम्ही त्याचे कर्ता नाही. आम्ही कधीच कशाचेही कर्ता होत नाही. कारण जो कर्ता बनतो त्याला भोक्ता बनावेच लागते. 'आम्ही' निमित्तभावातच राहतो.

म्हणून या काळात जरी सगळ्यांना मोक्षधर्माचे ज्ञान प्राप्त होत नसेल तरी पण या काळात धर्मध्यान तर फुल स्टेजपर्यंत पोहोचू शकेल असे आहे. अक्रममार्गाने मोक्ष तर जे महापुण्यशाली असतात त्यांना मिळू शकतो, पण इतर सर्वांना सर्वोत्तम धर्मध्यान आम्ही देऊ शकतो. रौद्रध्यान आणि आर्तध्यान हे सर्व अधर्मध्यान आहे. धर्मध्यान हे धर्मध्यान आहे, आणि शुक्लध्यान हे आत्मध्यान आहे. रौद्रध्यान आणि आर्तध्यान गेले यालाच म्हणतात धर्मध्यान.

❖❖❖❖❖

# निजदोष

आपल्यापासून इतर कुणाला थोडेसे देखील दुःख झाले तर समजूनच घ्यावे की चूक आपली आहे. आपल्या आत परिणाम वरखाली झाले तर चूक आपली आहे, असे समजते. समोरची व्यक्ती भोगत आहे म्हणजे त्याची चूक तर आहेच, पण त्यासाठी निमित्त आपण झालो, आपण त्याला रागावलो म्हणून आपली पण चूक आहे. 'दादाजीं'ना का असे भोगावे लागत नाही? कारण त्यांची एक पण चूक शिल्लक नाही. आपल्या चुकीमुळे समोरच्या व्यक्तीवर थोडासा जरी परिणाम झाला असेल आणि जर अशी उधारी राहिली असेल तर ताबडतोब मनातल्या मनात माफी मागून जमा करून टाकावे. आपल्यात जे क्रोध-मान-माया-लोभ असे कषाय आहेत त्यांच्यामुळे उधारी निर्माण झाल्याशिवाय राहत नाही. म्हणून अशा वेळी ताबडतोब (माफी मागून) जमा करून घ्यावे. आपली चूक झाली तर ती उधारी झाली पण लगेचच कॅश-रोख प्रतिक्रमण करून टाकावे. आपल्यामुळे कोणाला अतिक्रमण झाले तर आपण ते जमा करून टाकावे. त्यास उधार ठेवता कामा नये. आणि जर कोणामुळे आपली चूक झाली तरीही लगेच आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान करून घ्यावे. मन-वचन-कायेने, प्रत्यक्ष दादा भगवानांच्या साक्षीने क्षमा मागत राहावी. पावलोपावली जागृती असली पाहिजे. आपल्यात क्रोध-मान-माया-लोभ असे कषाय आहेत त्याच्यामुळे चुका होतात आणि उधारी निर्माण होते, असा माल आपल्यात भरलेला आहे त्याच्यामुळे चुका होतात. पण त्यासाठी आपण ताबडतोब माफी मागून जमा करून हिशोब

चोख केला पाहिजे. हा व्यापार कधीच पेंडिंग (लटकत) ठेवता कामा नये. याला तर खरा रोख व्यापार असे म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** आता ज्या चुका होत आहेत त्या मागच्या जन्मांच्याच आहेत ना?

**दादाश्री :** हो, मागच्या जन्मींच्या पापांमुळे या चुका घडतात पण शिवाय या जन्मात देखील चुका संपवत तर नाहीच, उलट आणखी वाढवितो. चुका संपवायच्या असतील तर चुकांना चूक म्हणून मान्य केले पाहिजे. त्या चुकांचे रक्षण करता कामा नये. याला 'ज्ञानी पुरुषांची' किल्ली म्हणतात. या किल्लीमुळे कुठलेही कुलूप उघडते.

आपण आपल्या चुकांमुळे बंधनात आहोत. चुका संपल्या तर आपण परमात्माच आहोत! ज्याची एक पण चूक नाही तो स्वत:च परमात्मा आहे. ही चूक काय म्हणते? तू मला जाण, मला ओळख. इथे तर लोक चुकीला चूक न समजता स्वत:चा चांगला गुण मानत होते. चुकांचा स्वभाव असा आहे की त्या आपल्यावर अंमल करतात, पण चुकांना चूक म्हणून ओळखले तर चुका पळून जातील. मग त्या तिथे थांबणारच नाहीत, जायलाच लागतील. पण लोक काय करतात, एक तर चुकीला चूक मानतच नाहीत आणि उलट त्याचे रक्षण करतात म्हणजे चुकीला घरातच चांगले जेवायला घालतात.

## चुकांचे रक्षण

**प्रश्नकर्ता :** दादाजी चुकांचे रक्षण कसे केले जाते?

**दादाश्री :** जर कोणाला रागावल्यावर आपण असे म्हटले की, 'आम्ही त्याला रागावलो नसतो तर त्याला समजलेच नसते. म्हणून त्याला रागवावेच लागले.' असे बोलण्यामुळे त्या चुकीला समजते की या भाऊंना अजून माझी ओळखच होत नाही आणि उलट ते माझे रक्षण करत आहेत, तेव्हा आता इथेच खाऊ, पिऊ आणि राहू. एकदाच जरी चुकीचे रक्षण केले तरी त्या चुकीचे आयुष्य दहा वर्षांने वाढते! (म्हणून) कुठल्याच चुकीचे रक्षण करता कामा नये.

आमच्यात आडमुठेपणा अजिबात नाही. कोणी जर आम्हाला आमची चूक दाखवली तर आम्ही ती लगेच स्वीकारतो. कोणी म्हटले की ही तुमची चूक आहे तर आम्ही, म्हणतो, 'होय बाबा, तू माझी चूक दाखविलीस त्याबद्दल तुझे उपकार.' आम्ही तर असे समजतो की जी चूक मला समजत नव्हती, ती त्याने मला दाखवून दिली, म्हणून त्याचे उपकार मानावे. जर रोज पंचवीस चुका समजू लागल्या तर आश्चर्यकारक शक्ती उत्पन्न होईल. ही चूक म्हणजे काय आहे हे समजण्यासाठी आम्ही म्हटले आहे ना की, 'जो भोगतो त्याचीच चूक' तू भोगत आहेस मग चूक तुझी. तुझा खिसा कापला गेला आणि तू दुसऱ्यांना शिव्या दिल्यास तर चुकीला एक्सटेन्शन (वाढ) मिळते 'चुकी'ला समजते की हा तर आपल्याला खाऊ घालण्याचीच गोष्ट करत आहे. मग ती जात नाही. जर कोणी घर जाळले तर लोक जाळणाऱ्याला शिव्या देत बसतात. पण जाळणारा तर घरी आरामात बसलेला असतो. ही तर तुझीच चूक. आता या क्षणी कोण भोगत आहे? त्याची चूक.

'दादा' चोर आहे असे आमच्या कोटाच्या मागच्या बाजूला लिहिले असेल, तर ती चूक आमची! कारण असे लिहायला कोण रिकामा असेल? आणि त्याने आमच्या मागेच का लिहिले? म्हणून आम्ही ताबडतोब चूक स्वीकारून निकाल करून टाकतो. असे असते की पूर्वी चुका केल्या होत्या त्यांच्या निकाल केला नव्हता म्हणून त्या परत येतात. चुकांचा निकाल करता आला नाही म्हणून एक चूक मिटवण्याएवेजी नवीन पाच चुका केल्या!

संसार बाधक नाही, खाणे पिणे बाधक नाही, नाही तपाने बांधले की नाही त्यागाने बांधले. स्वतःच्या चुकांनीच लोक बांधले गेले आहेत! आत तर अपार चुका भरलेल्या आहेत पण फक्त मोठमोठ्या पंचवीसेक चुका संपविल्या की मग सव्वीसावी चूक आपोआप जायला लागेल.

काही लोकांना चूक कळते पण अहंकारामुळे ते चूक कबूल करत नाहीत. हे कसे आहे? एकच चूक अनंत जन्म बिघडवून टाकते, हे कसे परवडेल?

'ज्ञानी पुरुषात' दिसतील अशा स्थूल चुका नसतात आणि सूक्ष्म चुका देखील नसतात. आमच्या सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम चुका असतात पण त्या चुकांचे 'आम्ही' 'ज्ञाता-दृष्टा' असतो. मी तुम्हाला या चुकांची व्याख्या सांगतो : 'स्थूल चूक' म्हणजे काय? माझ्याकडून काही चूक झाली तर जवळ कोणी जागृत व्यक्ती असेल तर त्याला कळेल की यांनी काहीतरी चूक केली आहे. सूक्ष्म चूक म्हणजे काय की माझ्याकडून काही चूक झाली तर चूक मला लगेच कळते पण समजा इथे 25 हजार माणसे बसली असेल तर त्या 25 हजारातून जेमतेम पाच माणसांनाच माझी सूक्ष्म चूक समजते. सूक्ष्म दोष तर बुद्धीने सुद्धा दिसतात, पण सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम चुका मात्र 'ज्ञानानेच दिसू' शकतात. सामान्य माणसांना सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम चुका कळतच नाहीत. देवी-देवतांनी जर अवधिज्ञानाने पाहिले तरच त्यांना त्या दिसतात. पण त्या दोषांनी कोणाचेच नुकसान होत नाही. असे सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम दोष आमच्यात आहेत पण ते या कलियुगाच्या विचित्रतेमुळे!

## ब्लंडर्स आणि मिस्टेक्स

चूक एक नाही, अनंत आहेत. ब्लंडर्स आणि मिस्टेक्समुळे 'स्वत:' बंधनात अडकलेला आहे. जोपर्यंत ब्लंडर्स दूर होत नाहीत तोपर्यंत मिस्टेक्स जात नाहीत.

**प्रश्नकर्ता :** ब्लंडर्स (घोडचुका) कशाला म्हणतात?

**दादाश्री :** 'मी चंदुलाल आहे' असे मानणे हेच ब्लंडर आहे. आम्ही स्वरूप ज्ञान देतो त्यानंतर ब्लंडर्स संपतात आणि मिस्टेक्स उरतात. त्या चुका मग 'ज्ञेय' स्वरूपात दिसतात जितकी ज्ञेये दिसतात त्यातून मुक्त होता येते. कांद्यात जसे अनेक थर असतात ना? तसेच दोषांचेही थर असतात. जसेजसे दोष दिसतात तसेतसे दोषांचे थर कमी कमी होतात आणि जेव्हा सर्व थर संपतात तेव्हा तो दोष मुळापासून संपून कायमचा निरोप घेतो. काही दोषांचा एकच थर असतो, दुसरा थरच नसतोच. म्हणून एकदा त्या दोषांना पाहिले की ते निघून जातात. जास्त थर असलेल्या दोषांना पुन्हा-पुन्हा पाहावे लागते आणि त्यांचे प्रतिक्रमण

केल्यावर ते निघून जातात. आणि काही दोष इतके चिकट असतात की त्यासाठी वारंवार प्रतिक्रमण करत राहावे लागते. लोक म्हणतात, 'तोच तोच दोष परत परत का होत आहे?' तेव्हा आम्ही म्हणतो, 'हो, भाऊ.' पण त्याचे कारण त्यांना समजत नाही. दोष थरांसारखे असतात, अनंत असतात. म्हणून जे जे दोष दिसतात त्यांचे प्रतिक्रमण केले की शुद्ध होत जातो. कृपाळूदेव यांनी म्हटले आहे,

*'हुं तो दोष अनंत नुं भाजन छुं करूणाळ*
*दीठा नहीं निज दोष, तो तरीये कोण उपाय?'*

('हे करुणामय! मी तर अनंत दोषांनी भरलेला आहे,
माझे दोष मला दिसले नाहीत तर मी कसा तरेन?')

दोष अनंत आहेत आणि ते दिसले नाहीत म्हणून ते दोष जातच नाहीत. जर 'तुझ्यात' दोष नसतील तर मग मी 'अनंत दोषांचा भाजन आहे' असे म्हणू नकोस. नाही तर तू तसाच होशील. आणि जर अनंत दोष असतील तर तसे स्पष्ट रूपाने म्हण की माझ्यात अनंत दोष आहेत. पण मंदिरातून बाहेर पडल्यावर शेठजींना विचारले तर म्हणतील, एक-दोनच दोष असतील. थोडासा क्रोध आहे आणि थोडासा लोभ आहे, बस एवढेच! तेव्हा मग दोषांना पण कळते की हा भाऊ कपट करत आहे. त्यामुळे दोष तिथेच मुक्काम करतात!

सगळ्यात मोठी चूक म्हणजे स्वच्छंदीपणा. स्वच्छंदीपणामुळे तर दोषांची पूर्ण फौज उभी राहते. स्वच्छंदीपणा ही फार मोठी चूक आहे. म्हणजे सहज जरी असे म्हटले की 'त्यात काय झाले?' म्हणजे संपलेच. मग अनंत जन्म बिघडून जातात!

ज्ञानी पुरुषांच्या कृपेमुळे, त्यांच्या शक्तीमुळे दोष दिसतात आणि संपतात. कोणा व्यक्तीला आपल्या चुका संपवायच्या असतील तर आम्ही त्याला म्हणतो की फक्त तीन वर्षे क्रोध-मान-माया-लोभ यांना जेवण (पोषण) देऊ नका (तसे केले की) चुका मृतप्राय होऊन जातील. चुकांना जर तीन वर्षे जेवण मिळाले नाही तर त्या चुका आपले घर

बदलतात. दोष म्हणजेच क्रोध-मान-माया-लोभ यांची बाजू घेणे. आणि तीन वर्षे जर यांची बाजू घेतली नाही तर ते दोष पळून जातील.

## लोभीचा प्रकृती स्वभाव

लोभी व्यक्ती बाजारात गेला तर त्याची दृष्टी सर्वप्रथम स्वस्त भाज्यांवर जाते. तेव्हा आतला लोभ काय म्हणतो, 'हा लोभी मला चांगले खायला घालत आहे, तेव्हा इथेच मुक्काम ठोकू'. अशा वेळी लोभ्याला काय करायला हवे? तर जिथे महाग भाजी आहे तिथे जावे आणि भाव न विचारताच भाजी घ्यावी. मग जरी दुप्पट पैसे लागले तरी चालेल. मग लोभाला समजेल की इथे मला खायला मिळत नाही, मग तो तिथून पळ काढेल! आमच्याकडे एक भाऊ यायचे. मोठे साहेब होते. पगार चांगला भरपूर होता. घरी फक्त नवरा-बायको दोघेच होते. त्यांना मूल-बाळ नव्हते. एक दिवस ते मला म्हणाले, 'दादा, माझा स्वभाव फार कंजूष आहे, म्हणून माझ्या हातून पैसे सुटत नाहीत. कोणाच्या लग्नात मी जेवण वाढले तर तिथे देखील मी थोडे थोडे, चटणी एवढेच वाढतो. म्हणून मला ऐकू यावे या उद्देशाने लोक म्हणतातही की हा माणूस फार कंजूष आहे. माझी बायको पण तक्रार करते, पण काय करू? हा लोभी स्वभाव जातच नाही. तुम्ही काही तरी मार्ग सुचवा, कोणा दुसऱ्याचे वापरायचे असेल तरी हा माझा लोभ मला तिथे मान खाली घालायला लावतो.' मग मी त्यांना म्हटले, 'तुम्ही रोज सत्संगाला चालत येता, तर आता चालत न येता रिक्षेने या आणि सोबत दहा रुपयांची चिल्लर घेऊन या आणि ती रस्त्यात टाकत टाकत या.' त्यांनी असे केले आणि त्यांचे काम झाले. असे केल्यामुळे काय होते की लोभाला जेवण मिळत नाही, शिवाय मन पण मोठे बनते.

## चूक ओळखली तर चूक संपते

चूक ओळखता यायला लागली की चूक मिटते. कित्येक लोक कापड ताणून ताणून मोजतात आणि मग म्हणतात आज पाव वार कापड कमी दिले! हे तर इतके मोठे रौद्रध्यान आणि पुन्हा त्याचे रक्षण?

चुकीचे रक्षण करता कामा नये. तूप विकणारा कोणालाही समजणार नाही अशा तऱ्हेने भेसळ करून 500 रुपये कमावतो, तो तर मुळासकट संपूर्ण झाडच लावतो. स्वतःच स्वतःचे अनंत जन्म बिघडवून ठेवतो.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, अजूनदेखील जास्त दोष दिसत नाहीत. थोडेच दिसतात.

**दादाश्री :** इकडे सत्संगाला बसल्याने आवरणे तुटत जातात आणि दोष दिसू लागतात.

## चुका दिसण्याची जागृती

**प्रश्नकर्ता :** (स्वतःचे) दोष जास्त दिसतील यासाठी जागृती कशी आणता येईल?

**दादाश्री :** आतमध्ये जागृती तर खूप आहे परंतु दोष शोधण्याची भावना निर्माण झालेली नाही. पोलिसवाल्यांना जर चोर शोधायची इच्छा असेल तर चोर सापडतो. पण पोलिसवाले जर म्हणाले, 'चोर पकडायला जायचे नाही, तो येईल तेव्हा पकडू.' मग तर चोर मजाच करणार ना? या चुका अशाच लपून बसलेल्या असतात. त्यांना शोधले तर त्या लगेचच सापडतील.

साऱ्या कमाईचे फळ काय? तुमचे दोष जर तुम्हाला एका पाठोपाठ एक दिसू लागले तर खरी कमाई झाली असे म्हणता येईल. हा सगळा सत्संग स्वतःचे दोष स्वतःला दिसावेत यासाठी आहे. आणि स्वतःचे दोष दिसतील तेव्हाच ते दोष जातील. दोष कधी दिसतील? जेव्हा स्वतः 'स्वयं' होईल, 'स्व स्वरूप' होईल तेव्हा. ज्याला स्वतःचे जास्त दोष दिसतात तितका तो उच्च. जेव्हा या शरीरासाठी, वाणीसाठी, वर्तनासाठी संपूर्ण निष्पक्षपातीपणा उत्पन्न होईल तेव्हा स्वतःला स्वतःचे सगळेच दोष दिसू लागतील.

क्रमिकमार्गात तर कधीच स्वतःचे दोष स्वतःला दिसत नाहीत. 'दोष तर खूप आहेत पण आम्हाला दिसत नाहीत.' असे जर कोणी

म्हणेन, तर मी म्हणेन की तू मोक्षाचा अधिकारी आहेस. पण जो असे म्हणतो, 'माझ्यात दोन-चारच दोष दिसतात' तो तर अनंत दोषांनी भरलेला आहे, आणि तरी फक्त दोन-चार दोष आहेत, असेच म्हणतो! तुला दोन-चार दोषच दिसतात म्हणून तुझ्यात एवढेच दोष आहेत असे तू मानतोस का?

महावीर भगवंतांचा मार्ग प्राप्त केला असे कधी म्हणता येईल? जेव्हा रोज स्वत:चे शंभर-शंभर दोष दिसतील, रोज शंभर-शंभर प्रतिक्रमणे होऊ लागतील तेव्हा महावीर भगवंतांच्या मार्गावर आहे असे म्हटले जाईल. 'स्वरूपाचे' ज्ञान तर त्याच्यापासून अजून खूपच दूर आहे. पण हा तर चार पुस्तके वाचून 'स्वरूप' प्राप्त केल्याच्या नशेतच फिरत असतो. याला तर 'स्वरूपाचा' एक थेंबसुद्धा मिळाला आहे असे म्हणता येणार नाही. जिथे ज्ञान अडकते तिथे नशा (गर्व) वाढते. आणि या नशेमुळे ज्ञानावरण आणि दर्शनावरण दूर होणे थांबून जाते. मोक्ष मिळवण्यासाठी फक्त तुझा आडमुठेपणाच बाधक आहे. दुसरे काहीही बाधक नाही. सगळ्यात मोठे भयस्थान म्हणजे स्वच्छंदीपणा आणि नशा.

साधू महाराज उदयकर्माचा गर्व करतात, ही चूक जर त्यांच्याकडून होत असेल आणि एवढी एकच चूक जर त्यांनी सुधारली, तर त्यांचे काम होईल. महाराजांना उदयकर्माचा गर्व आहे की नाही एवढेच तपासायचे असते, बाहेरचे आणखी काहीही पाहायचे नाही. कषाय असतील तरी चालेल पण उदयकर्माचा गर्व असता कामा नये. बस एवढेच पाहायचे असते.

स्वत:ची एक जरी चूक संपवू शकतो त्याला भगवंत म्हणतात. स्वत:ची चूक दाखविणारे पुष्कळ असतात, पण कोणी ती चूक संपवू शकत नाही. चूक दाखवता पण आली पाहिजे. जर चूक दाखवता येत नसेल तर आपली चूक आहे हे कबूल करून घ्यावे. कोणाची चूक दाखविणे हे मोठे अवघड काम आहे आणि जो त्याची ती चूक दूर करून देतो तो तर भगवंतच म्हटला जातो. ते तर 'ज्ञानी पुरुषांचेच' काम. आम्हाला या जगात कोणीच दोषी दिसत नाही. खिसेकापू असो

किंवा चारित्र्यहीन असो, त्यांना सुद्धा आम्ही निर्दोषच पाहतो! आम्ही 'सत् वस्तूलाच' पाहतो. ही तात्विक दृष्टी आहे. आम्ही पॅकिंगकडे बघत नाही. पॅकिंग भरपूर प्रकारची आहेत. त्यांना आम्ही तत्वदृष्टीने पाहातो 'आम्ही' संपूर्ण निर्दोष दृष्टी करून साऱ्या जगाला निर्दोष पाहिले! म्हणूनच 'ज्ञानी पुरुष' तुमची चूक मिटवू शकतात! इतरांच्या आवाक्यातील ती गोष्ट नाही. भगवंतांनी संसारी दोषाला दोष मानलेच नाही. 'तुझ्या स्वरूपाचे अज्ञान' हाच सर्वात मोठा दोष आहे. जोपर्यंत 'मी चंदुलाल आहे' तोपर्यंत इतर सर्व दोष पण राहणारच आहेत आणि एकदा 'स्वतःच्या स्वरूपाचे' भान झाले की इतर सर्व दोष जाऊ लागतात.

## निष्पक्षपाती दृष्टी

'स्वरूपाच्या ज्ञानाशिवाय' चूक दिसतच नाही, कारण 'मीच चंदुभाऊ आहे आणि माझ्यात काहीच दोष नाही, मी तर शहाणा आहे, समजदार आहे' असेच वाटत असते. आणि 'स्वरूप ज्ञानाच्या' प्राप्तीनंतर तुम्ही निष्पक्षपाती झालात, मन–वचन–कायेसाठी तुम्हाला पक्षपात राहिला नाही. त्यामुळे स्वतःच्या चुका तुम्हाला दिसू लागतात. ज्याला आपल्या चुका सापडतात, क्षणोक्षणी स्वतःच्या चुका दिसतात, जेव्हा–जेव्हा होतात तेव्हा–तेव्हा दिसतात, चुका नसतात तिथे चुका दिसत नाहीत तो स्वतःच 'परमात्म स्वरूप' झाला! 'वीर भगवंत' झाला!! आमचे ज्ञान प्राप्त केल्यावर स्वतः निष्पक्षपाती झाला. कारण 'मी चंदुभाऊ नाही, मी शुद्धात्मा आहे' हे एकदा समजल्यानंतर निष्पक्षपाती होता येते. कोणामध्ये किंचितदेखील दोष दिसत नाही, आणि स्वतःचे सगळेच दोष दिसतात, तेव्हा स्वतःचे कार्य पूर्ण झाले असे म्हणता येते. प्रथम तर हा 'मीच आहे' असेच वाटायचे. म्हणून निष्पक्षपाती झाले नव्हते. आता निष्पक्षपाती झालात त्यामुळे आता स्वतःचे सगळेच दोष दिसायला सुरुवात झाली आणि उपयोग आतल्या बाजूलाच असतो त्यामुळे दुसऱ्यांचे दोष दिसत नाहीत! स्वतःचे दोष दिसू लागले की आम्ही दिलेले 'ज्ञान' परिणमित व्हायला सुरुवात होते. स्वतःचे दोष दिसू लागले म्हणून दुसऱ्यांचे दोष दिसत नाहीत. दुसऱ्यांचे दोष दिसतात हा तर फार मोठा गुन्हा आहे. या

निर्दोष जगात कुणीच दोषी नाही तर कोणाला दोष देणार? दोष हा अहंकाराचा भाग आहे, हा भाग धुतल्याशिवाय सर्व दोष निघणार नाहीत, आणि तोपर्यंत अहंकार निर्मूल होत नाही. अहंकार निर्मूल होईपर्यंत दोष धूत राहायचे आहे.

दोष प्रतिक्रमणामुळे धुता येतात. कुणाशी संघर्ष (भांडण, वाद) झाले की मग दोष दिसू लागतात. जोपर्यंत कुणाशी संघर्ष होत नाही तोपर्यंत दोष झाकलेले असतात. रोज पाचशे पाचशे दोष दिसू लागले की मग समजा पुर्णाहूती जवळ येत आहे. ज्ञान प्राप्तीनंतर आम्हाला रोज हजारो दोष दिसू लागले होते. जसजसे दोष दिसू लागतात, आणि तसतसे दोष कमी होत जातात आणि तसतशी जागृती वाढू लागते. आता आमचे फक्त सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम दोष शिल्लक आहेत, ज्यांना आम्ही 'पाहतो' आणि 'जाणतो.' या दोषांमुळे कुणाला त्रास होतो असे नाही, पण ते काळाच्या प्रभावामुळे अडकले आहेत आणि त्यामुळेच 360 डिग्रीचे केवलज्ञान थांबले आहे. 356 डिग्रीवर येऊन थांबले आहे! पण आम्ही तुम्हाला पूर्ण 360 डिग्रीचे केवलज्ञान तासाभरातच देतो, पण ते तुम्हालाही पचणार नाही. अरे, आम्हालाच पचले नाही ना! या काळाच्या प्रभावामुळे 4 डिग्रीची कमतरता राहिली आहे! आत पूर्ण 360 डिग्री रियल आहे आणि रिलेटिव्हमध्ये 356 डिग्री आहे. या काळात रिलेटिव्हमध्ये पूर्ण 360 डिग्रीपर्यंत जाता येईल असे शक्य नाही, पण त्याला आमची काहीच हरकत नाही कारण आत तर अपार सुख वर्तत आहे.

या जगात तुमच्यावर कोणीच *उपरी* (वरिष्ठ, मालक) म्हणून नाही, याची मी तुम्हाला गॅरंटी देतो. कोणी बाप पण *उपरी* नाही. 'तुमच्या चुकाच तुमच्या *उपरी* आहेत!' जर 'ज्ञानी पुरुष' भेटले तर तुमच्या चुका मिटवू शकतात. तू तुझ्या चुकांमुळेच बांधलेला आहेस. तू फक्त मानतोस की या साधनामुळे मी सुटायचा प्रयत्न करत आहे, प्रत्यक्षात त्या साधनामुळेच तू बांधला जात आहेस!

एका-एका जन्मात एकेक चूक जरी संपवली असती तरी मोक्षस्वरूप झाला असतास. पण हा तर एक चूक संपवता संपवता पाच नवीन चुका

वाढवून बसतो. बाहेर सगळे सुंदर–सुंदर आणि आतमध्ये मात्र भरपूर क्लेश! याला चूक संपवली असे कसे म्हणायचे? तुमच्यावर तर कोणीच *उपरी* नाही पण चूक दाखविणारा कोणी तरी पाहिजे. चुका संपवा, पण स्वतःची चूक स्वतःला कशी कळणार? आणि त्या काय एक दोन थोड्याच आहेत? अनंत चुका आहेत!! कायेच्या अनंत चुका आहेत. वाणीच्या अनंत चुका आहेत. वाणीच्या चुका तर फारच वाईट दिसतात. कोणाला जेवणाचे आमंत्रण द्यायला गेलेले असताना असे कटु शब्द बोलतात की बत्तीस–पक्वान्नांचे जेवणाचे आमंत्रण असले तरी नको ते बोलावणे असे वाटते. त्यापेक्षा नसते बोलावले तर बरे, असे आतून वाटते. अरे, साधा चहा पाजताना देखील कर्कशवाणी निघते. आणि मनापासून झालेले दोष तर मोजताच येणार नाहीत.

'चुका' कोण मिटवू शकतो? तर 'ज्ञानी पुरुष' की जे स्वतःच्या सर्व चुका मिटवून बसले आहेत, जे शरीर असूनही अशरीरी भावाने–वीतराग भावाने राहतात. अशरीरी भाव म्हणजे ज्ञानबीज. साऱ्या चुका संपल्यावर स्वतःचे अज्ञानाचे बी संपूर्ण नष्ट होते आणि ज्ञानबीज पूर्णरूपाने उगवते ही अवस्था म्हणजे अशरीरी भाव. ज्याची शरीरावर थोडीशी जरी, किंचितमात्र ममता आहे त्याला अशरीरी भाव म्हणता येणार नाही. आणि शरीरावरची ममता जाणार तरी कशी? जोपर्यंत अज्ञान आहे तोपर्यंत ममता जात नाही.

## दोषांचा आधार

**प्रश्नकर्ता :** दादा, समोरच्या व्यक्तीचे दोष का दिसतात?

**दादाश्री :** स्वतःच्या चुकांमुळे समोरची व्यक्ती दोषी दिसते. या 'दादांना' सगळेच निर्दोष दिसतात. कारण (दादांनी) स्वतःच्या सर्व चुका संपवल्या आहेत. स्वतःच्या अहंकारामुळे समोरच्यांच्या चुका दिसतात. ज्याला चुका पाहायच्याच आहेत त्याला स्वतःच्या सर्व चुका दिसू लागतील. ज्याला निर्दोष पाहायचे आहे त्याला सर्व निर्दोषच दिसतील!

ज्याच्या चुका होतात तोच चुका संपवितो. समोरच्या व्यक्तीच्या चुकांशी आपल्याला काय देणेघेणे?

**प्रश्नकर्ता :** दादा समोरच्या व्यक्तीचे दोष पाहायचे नसतील तरी दिसतात. हे जे भूत डोक्यावर बसले आहे. त्याचे काय करावे?

**दादाश्री :** जी गोंधळ घालते ती बुद्धी आहे. ती विपरीत भाव प्राप्त बुद्धी आहे आणि ती बऱ्याच काळापासून आहे. आणि तिला तसा आधारही दिलेला आहे, म्हणून ती जात नाही. जर बुद्धीला सांगितले 'तू माझ्यासाठी हितकारक नाहीस' तर बुद्धी पासून मुक्त होऊ शकतो. एखादा नोकर असेल त्याला सांगितले की आता माझ्याकडे तुझ्यासाठी काही काम नाही, आणि मग त्याच्याकडून काम करवून घेतले तर चालेल का? तसेच बुद्धीकडून काहीच काम करवून घ्यायचे नाही. या बुद्धीशी तर पूर्ण असहकार करायचा आहे. विपरीत बुद्धी संसाराचे हिताहित दाखवणारी आहे. या उलट सम्यक् बुद्धी संसाराला दूर सारून मोक्षाकडे घेऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** दोष सुटत नाहीत तर काय केले पाहिजे?

**दादाश्री :** दोष सुटणार नाहीत. पण त्या दोषांना सांगितले की, 'ती माझी गोष्ट नाही' तर ते सुटतील.

**प्रश्नकर्ता :** पण असे सांगून देखील दोष सुटत नाहीत तर काय करावे?

**दादाश्री :** जे दोष बर्फासारखे गोठलेले (घट्ट) आहेत ते एकदम कसे जातील? तरी पण ते 'ज्ञेय' आणि आपण 'ज्ञाता', असा संबंध ठेवलात तर ते जातील. आपण त्यांना आधार देऊ नये. जर आधार मिळाला नाही तर त्यांना सुटण्याशिवाय दुसरा मार्गच नाही. आधारामुळे गोष्ट उभी राहते. निराधार झाल्यावर पडते. जग या (अज्ञानाच्या) आधारामुळे उभे आहे. निराधार झाले तर ते उभेच राहणार नाही, पण निराधार कसे करायचे तेच माहीत नाही ना! ते तर फक्त 'ज्ञानी'च जाणतात! हे जग तर अनंत गुह्य आहे. त्यातला गुह्याहून गुह्य भाग कोणाला कसा समजेल?

## तक्रार करतो तोच गुन्हेगार

तक्रार करायला प्रथम कोण येतो? कलियुगात तर जो गुन्हेगार असतो तोच प्रथम तक्रार करायला येतो! आणि सत्‌युगात जो खरा असतो तो प्रथम तक्रार करायला यायचा. आता या कलियुगात न्याय करणारेही असेच असतात की ज्याचे प्रथम ऐकतात त्याच्याच बाजूने होऊन जातात!

एखादी छोटी मुलगी असते, ती संध्याकाळी जेव्हा पप्पा घरी येतात की लगेच पप्पांजवळ जाऊन सांगते – 'पप्पा, दादा मला असे असे बोलला'. ते ऐकल्यावर पप्पा लगेच त्या मुलीच्या बाजूने होऊन जातात आणि मुलाला हाक मारून म्हणतात –'ए, इकडे ये, असे का केलेस?' मुलाला ओरडण्यापूर्वी मुलाला विचारा 'तुझी बहीण असे का म्हणते?' आणि मुलीनेच तक्रार का केली? मुलाने तक्रार का केली नाही? मुलाने काय केले होते? इथे तर पप्पाच सेन्सिटीव (भावुक) आहे म्हणून लगेच मुलीचे बोलणे खरे मानतो. मागाहून म्हणतो की मी जरा कच्च्या कानाचा आहे म्हणून माझी चूक झाली! अरे, तू स्वतः मूर्ख आहेस आणि कानांची चूक असा बहाणा करतोस? स्वतः (योग्य तो) निष्कर्ष काढत नाहीस की मुलगी गुन्हेगार आहे म्हणून ती प्रथम तक्रार घेऊन आली. घरात अनेक प्रकारच्या गोष्टी घडत असतात. आमच्याकडे सगळ्यांच्या तक्रारी येतात तर आम्ही काय करतो की आधी सगळ्यांचेच ऐकतो आणि त्यानंतरच न्याय निवाडा करतो. न्याय जर बरोबर झाला तर गुन्हेगार वाढत नाहीत. गुन्हेगाराच्याही हे लक्षात येते की हे खरा न्याय करतात, इथे आपला गुन्हा पकडला जाईल.

या जगात आपल्याला खुलासा करायची गरजच नाही. गुन्हेगारालाच खुलासे द्यावे लागतात, स्पष्टीकरण करावे लागते. या जगात सगळ्यांना आर्बिट्रेटर (मध्यस्थ) व्हायचे असते. मी कोणा आर्बिट्रेटरला घुसूच देत नाही. या जगात जे काही घडत असते त्याहून नवीन प्रकारचे काही घडणार नसते. चिखल तर म्हणतो, 'तुला आवडत असेल तर हात घाल. नंतर तुला हात धुवावेच लागतील.' आपण आपलीच नाडी तपासून पाहावी. कोणी आपला आर्बिट्रेटर होईल अशी संधीच देऊ नये.

हे तर संपूर्ण दिवस माझे आणि तुझे, माझे आणि तुझे करतच असतात! आणि त्यात स्वत: काहीही सोबत घेऊन जात नाही! पुढच्या जन्मी कोणती गोष्ट तुम्ही सोबत घेऊन जाणार आहात? इथे कोणाशी भांडण करून केलेली गुंतागुंत सोबत घेऊन जायचे, कुणाला दान दिले ते सोबत घेऊन जायचे आणि अहंकार तर सोबत घेऊनच जावा लागतो. ह्या सगळ्या गुंतागुंतीचा मालक अहंकार, तो तर सोबतच राहणार. क्रोध-मान-माया-लोभ आणि अहंकार तर सोबतच येतात.

## अनुमोदनाचे फळ

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांच्या दोषांमुळे आपल्याला दंड मिळतो?

**दादाश्री :** नाही, त्यात कुणाचाही दोष नाही. स्वत:च्या दोषांमुळेच समोरचा निमित्त मात्र बनतो. हे तर 'भोगतो त्याची चूक'. करणे, करविणे आणि अनुमोदणे, या अनुमोदनेचेही फळ मिळते. केल्याशिवाय फळ मिळत नाही.

**प्रश्नकर्ता :** अनुमोदन कशास म्हणतात?

**दादाश्री :** एखादी गोष्ट करण्यापासून कुणी कचरत असेल तर तुम्ही म्हणता 'तू कर की, मी आहे ना!' याला अनुमोदन असे म्हणतात आणि अनुमोदन करणाऱ्याची जोखीमदारी जास्त असते. कृत्याचे फळ जास्त कोणाला मिळते? तर ज्याने बुद्धीचा जास्त वापर केला त्याला, त्या प्रमाणात जोखीम वाटली जाते. लोक कसे असतात? दुसऱ्यांच्या सगळ्या चुका त्यांना बरोबर दिसतात पण स्वत:ची एक पण चूक दिसत नाही! जेव्हा मन वाकडे चालते तेव्हा म्हणता, या जगाचा आता वीट आला आहे! बुद्धी वाकडी चालली की म्हणेल माझी बुद्धी वाकडी झाली आहे. आतमध्ये न संपणारे 'रामायण' आणि 'महाभारत' सर्वच आहे. त्याचाच तर तो मालक होऊन बसला आहे.

## ब्रह्मांडाचा मालक कोण?

या ब्रह्मांडातील प्रत्येक जीव या ब्रह्मांडाचा मालक आहे. फक्त

स्वत:चे भान नाही त्यामुळे जीव म्हणून वावरतो. स्वत:च्या देहाच्या मालकीचा दावा ज्याने सोडला तो साऱ्या ब्रह्मांडाचा मालक झाला! हे जग आपल्या मालकीचे आहे हे समजले तोच मोक्ष! अजूनपर्यंत हे का समजलेले नाही? कारण आपल्याच चुकांनी आपण बांधलेले आहोत म्हणून. सर्व जग आपल्याच मालकीचे आहे! कोणी जर आपल्याला शिवी दिली तर त्याचे कारण हिशोबात काही तरी बाकी असेल, म्हणून ती जमा करून टाकावी. आता पुन्हा व्यापार सुरू करू नये. जमा करत राहिलो तर व्यापार हळूहळू बंद होईल आणि मग चांगला माल येऊ लागेल.

डोळ्यावर जर हाताने दाब पडला तर एका वस्तू ऐवजी दोन वस्तू दिसू लागतात. 'डोळे' हे आत्म्याचे रियल स्वरूप नाही. 'डोळे' फक्त रिलेटिव्हचे स्वरूप आहे, तरी पण एक चूक झाली तर एकाचे दोन दिसू लागतात ना! हे काचेचे तुकडे जर जमिनीवर पडले असतील तर त्यात किती डोळे दिसतील. या डोळ्यांच्या जराशा चुकीमुळे किती तरी डोळे दिसू लागतात? तसेच हा आत्मा स्वत: दबत नाही, पण संयोगाच्या दबावामुळे एकाचीच अनंत रूपे दिसतात. हे सर्व जग भगवत् स्वरूप आहे. हे झाड कापण्याचा नुसता भाव केला तरी कर्मे चिकटतात. कोणासाठी वाईट विचार केले तर पाप लागते आणि चांगले विचार केले तर पुण्य मिळते. मनाचे भाव बिघडतात ही सुद्धा स्वत:चीच चूक. इथे सत्संगात आलात आणि इथे सर्व लोक उभे दिसले, तर मनात येते की हे सर्व का उभे आहेत? असा विचार आला म्हणजेच भाव बिघडला, तेव्हा या चुकीबद्दल लगेच प्रतिक्रमण करावे लागते.

पूर्वी 'क्रमिक' मार्गात तुम्ही तप-त्याग करत होता, पण तरी देखील स्वत:च्या चुका दिसत नव्हत्या. पण आता हा 'अक्रम मार्ग' मिळाला आहे तर (मोक्षाचे) काम करून घ्या. इथे तर साहेबांकडे जातो आणि म्हणतो, 'साहेब, मला सोडवा साहेब, मला सोडवा'. पण जिथे साहेबच बांधलेले आहेत ते तुम्हाला कसे सोडवणार? आजकल माणसे सर्रास ट्रिक (चलाखी) करतात, कपट करतात. तर अशा कपट कृत्याने बाधंलेला माणूस कधी सुटेल? कोणी बापही बांधत नाही. तसे असते

तर थोडेसे भक्तीने गयावया केले, माफी मागितली तरीही साहेब सोडतील, पण नाही, असे नाही, हे तर 'स्वत:च्या चुकांनी' 'स्वत:' बांधला गेला आहे. 'ज्ञानी पुरुष' अंगुलिनिर्देश करतात की असे करा, तर चूक दुरुस्त होईल. नाही तर ज्ञानी पुरुषांच्या आज्ञांचे पालन केले तरी काम होईल!

भगंवतानी काय म्हटले की, 'तुम्ही स्वत: कशाने बांधलेले आहात? तर जन्मोजन्मींच्या वैरामुळे बांधले गेले आहात.' त्यामुळेच जग चालत आले आहे. सतत वैरामुळे गुंता झालेला आहे आणि हा तर परत वैराचीच बाजू घेतो, त्यामुळे तेच वैर परत पुढच्या जन्मात येते आणि एका गुंत्याऐवजी नवीन पाच गुंते तयार करतो!

लोकांना वाटते की ईश्वर आपला *उपरी (वरिष्ठ, मालक)* आहे. म्हणून त्याची भक्ती केली तर आपण सुटू. पण नाही, कोणी बापही *उपरी* नाही. तूच तुझा *उपरी.* तुझा रक्षक पण तूच आणि तुझा भक्षक पण तूच, यू आर होल ॲन्ड सोल रिस्पोन्सिबल फोर योर सेल्फ. तू स्वत:च, स्वत:चा *उपरी* आहेस. त्यात इतर कोणीही ढवळाढवळ करत नाही. कुणी आपला बॉस आहे याचे कारण आपल्या चुका, आणि अंडरहॅन्ड आहे त्याचेही कारण आपल्याच चुका. म्हणून चुका संपवायलाच हव्यात ना?

स्वत:चीच चूक आहे हे जर समजले नाही तर पुढच्या जन्मीचे बीज पडते. असे आम्ही तुम्हाला वारंवार बजावतो. पण तरी तुम्ही सावध झाला नाहीत तर काय करणार? आणि आपली चूक नसेल तर मनात अजिबात अशांति वाटणार नाही. आपण निर्मळ दृष्टीने पाहिले तर जग निर्मळ दिसते आणि आपण वाकड्या दृष्टीने पाहिले तर जग वाकडे दिसते. म्हणून प्रथम स्वत:ची दृष्टी निर्मळ करा.

## प्राकृत गुणांचा मोह कशासाठी?

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आम्ही लोकांचे दोष पाहायचे नाहीत पण त्यांचे गुण पाहायचे का?

**दादाश्री :** नाही. दोष पण पाहायचे नाहीत, आणि गुण पण

पाहायचे नाहीत. हे दिसतात ते सगळे प्राकृत गुण आहेत. त्यातील एक पण गुण टिकाऊ नाही. एखादा दानशूर असेल, तो पाच वर्षांपासून पन्नास वर्षांपर्यंत त्याच गुणात राहिला असेल तरी सन्निपात होतो तेव्हा तो गुण बदलून जातो. हे गुण आहेत ते वात, पित्त आणि कफ यांच्यामुळे आहेत, पण या तिघांच्यात बिघाड झाला तर सन्निपात होतो! असे गुण अनंत जन्मांपासून गोळा करत करत आलो आहोत. तरी पण असे प्राकृतिक दोष मात्र गोळा करत जाऊ नये. चांगले प्राकृत गुण गोळा केले तर एक ना एक दिवस आत्मा प्राप्त करू शकतो. दया, शांति असे सर्व गुण असतील तरी एखाद्या दिवशी सन्निपात झाला, वात, पित्त, कफ बिगडले तर तो सर्वांना मारायला धावेल. याला प्रकृतीची लक्षणे म्हणतात. अशा गुणांमुळे पुण्यानुबंधी पुण्य मिळते. त्यामुळे एखाद्या जन्मात 'ज्ञानी पुरुष' भेटतात, आणि आपले काम होऊन जाते. पण अशा गुणात अडकून बसता कामा नये. कारण ते गुण कधी बदलतील हे सांगता येत नाही. ते स्वतःच्या शुद्धात्म्याचे गुण नाहीत. ते तर प्राकृत गुण आहेत. त्यांना आम्ही भोवरा असे म्हणतो. सर्व जग प्राकृत गुणातच रमलेले आहे. सर्व जग भोवरा छाप आहे. सामायिक-प्रतिक्रमण प्रकृती करवून घेते आणि स्वतः मानतो की 'मी केले!' जर भगवंतांना विचारले तर ते म्हणतील, 'यातील काहीही तू करत नाहीस.' कधी पाय दुखत असेल तर म्हणेल, 'मी काय करू?' अर्थात प्रकृती जबरदस्तीने करवीत असते आणि हा म्हणतो, 'मी केले!' आणि यामुळेच तर पुढच्या जन्मीचे बी पेरतो. हे सर्व उदयकर्मामुळे होत असते आणि स्वतः गर्व करतो. जो उदयकर्माचा गर्व करतो त्याला साधू कसे म्हणणार?

## मुक्त पुरुषच सोडवितात

या सगळ्या चुका आहेतच ना? त्या पाहण्याचा प्रयत्न कधी केलाच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** यातून बाहेर पडण्याचा प्रयत्न करतो पण अधिकाधिक खोलवर रुतत जातो.

**दादाश्री :** नाही, असा प्रयत्न करूच नका. इथे खणायचे असेल

आणि त्याऐवजी दुसरीकडेच खणले तर काय होईल? उलट दंड मिळेल. लोक असेच चुकीचे प्रयत्न करत असतात. त्याऐवजी जो 'सुटलेला' (मुक्त) आहे त्याच्याकडे जा, तर तो तुझी सुटका करील. जे स्वत:च बुडलेले आहेत ते दुसऱ्यांना कसे तारणार? जे डॉक्टर स्वत:च तरलेले नाहीत, स्वत:च गटांगळ्या खात आहेत ते दुसऱ्यांना कसे तारणार? या पूर्वी कधी चांगला संयोग जुळून आला नाही. आता हा 'ज्ञानी पुरुषांचा' चांगला संयोग जुळून आला आहे तर तुमचे ईप्सित साध्य होईल. कधी ना कधी तर चूक संपवायलाच हवी ना? अतिशय अवघड गोष्ट कोणती? तर 'मोक्षदाता पुरुष' मिळणे! आणि तो 'मोक्षदाता' मिळाल्यावर तुम्हाला बंधनात का ठेवील?

आम्ही तुम्हाला 'स्वरूप ज्ञान' दिले त्यानंतर तुम्हाला जी दशा प्राप्त झाली ती दशा श्रीकृष्णांनी सांगितलेल्या 'स्थितप्रज्ञ' दशेपेक्षा फारच उच्च आहे. ही तर 'प्रज्ञा' आहे! प्रज्ञेद्वारा 'राग-द्वेष' यांना नष्ट करून टाका.

हे जग 'व्यवस्थित' आहे. ही 'व्यवस्थित शक्ती' आपली जी गुन्हेगारी होती ती आपल्याकडे परत पाठवून देते. तर तिला येऊ द्यायचे, आणि आपण आपल्या मोक्षात राहून त्याचा निकाल करून टाकावा. मागील जन्मी ज्या चुका केल्या त्या या जन्मात समोर येतात, म्हणून या जन्मात जरी आपण सरळ चालतो तरी पण मागील चुका मधेमधे बाधा आणतात, त्याचेच नाव गुन्हेगारी!

## गुन्हेगारी - पाप-पुण्याची

गुन्हेगारी दोन प्रकारची असते : 'आम्हाला' फुले वाहिली हा पण गुन्हा आणि दगड मारले तो पण गुन्हा! फुले वाहतात तो पुण्याचा गुन्हा आणि दगड मारले हा पापाचा गुन्हा. त्याचे कारण काय आहे? पूर्वी ज्या चुका केल्या होत्या, त्याबद्दल कोर्टात खटले चालतात आणि मग न्याय होतो. ज्या ज्या चुका केल्या होत्या त्या त्या चुकांची शिक्षा भोगावीच लागते. त्या चुका भोगाव्याच लागतात. त्या चुकांचा आपण समभावाने निकाल करावा. म्हणजे काहीही बोलायचे नाही. बोलले नाही

म्हणजे काय होईल? वेळ आल्यावर चूक समोर येईल आणि भोगून झाल्यावर ती निघून जाईल. उच्च जातीमध्ये असे बोलण्यामुळेच साऱ्या गाठी पडल्या आहेत ना! त्या गाठी सोडवण्यासाठी जर 'मौन' राहिले तर समस्या सुटतील असे आहे.

'ज्ञानी पुरुषांची' वाणी तर प्रत्यक्ष सरस्वती असते आणि ती ऐकता ऐकता सगळे काही समजू लागते. जी जी निमित्ते समोर येतात, ती त्या त्या चुकीची शिक्षा देऊन जातात. सुख मिळते ते पण निमित्तांमार्फत आणि दु:ख मिळते ते पण निमित्तांमार्फत.

'ज्ञानी पुरुषांनी' काहीच गाठी बांधून ठेवलेल्या नाहीत म्हणून त्यांना आता पुढे वैभवच वैभव मिळत राहते. आणि तुम्हा सर्वांना आता या जन्मी 'ज्ञानी पुरुष' मिळाले आहेत म्हणून मागच्या सर्व चुकांचा समभावे निकाल केलात पुन्हा आणि नवीन गाठी पाडल्या नाहीत तर मग त्या गाठी पुन्हा समोर येणार नाहीत आणि सुटका होईल.

## ग्रंथी-सवय, स्वभावमय

स्वत:चे सगळेच दोष दिसायला हवेत. म्हणजे मग दोषांना वाटेल, 'हे घर आता सोडायला हवे.' हा दोष दिसला तर कधी ना कधी तरी त्याला जावेच लागेल. काही दोष कांद्याच्या थरांसारखे असतात. कांद्यामध्ये आठ-दहा थर असतात तसेच दोषांचेही (एकावर एक) थर असतात. काही दोषांचे दोन-पाच तर काही दोषांचे शंभर-शंभर थर असतात! आणि म्हणून 'आम्ही' असे सांगितले आहे की, ''मन, वचन, कायेच्या सवयी आणि त्यांच्या स्वभावाला मी जाणतो आणि माझा स्व-स्वभावालाही 'मी' जाणतो.''

आता स्वभाव म्हणजे काय? तर कोणाचा दहा थरांचा कांदा असतो, कोणाचा शंभर थरांचा कांदा असतो आणि कोणाचा लाख थरांचा सुद्धा असतो! मन, वचन, कायेच्या सवयीत बदल होत नाहीत. सवयींची हरकत नाही. सवयीत बदल नाहीसुद्धा होणार, कारण प्रकृतीत फरक पडत नाही पण स्वभाव संपतो. ग्रंथीमुळे बी पडण्याचे संपते. जेवढ्या वेळा प्रतिक्रमण

करतो, तेवढे थर दूर होतात. प्रतिक्रमण केले की थर दूर होतीलच. 'दादांच्या' हजेरीत आलोचना प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान केले पाहिजे म्हणजे दोष धुतले जातात आणि पुन्हा जर चूक झाली तर पुन्हा प्रतिक्रमण करायचे. तरी लोक म्हणतील, 'हा पुन्हा पुन्हा तसेच कर्म करतो (वागतो) आणि पुन्हा प्रतिक्रमण करतो.' होय, यालाच संसार म्हणतात!

## लाल झेंडा? म्हणजे थांबा

कोणी आपल्याला लाल झेंडा दाखवीला तर ती आपली चूक आहे. जग वाकडे नाही. आपल्या चुकीमुळे तो लाल झेंडा दाखवत आहे. म्हणून आम्ही विचारतो, की 'भाऊ, आमचे काय चुकले?' तेव्हा जर तो असे म्हणाला, 'तुम्ही दहा दिवसानंतर जाणार होतात आणि आज सातव्या दिवशीच का चाललात?' तेव्हा आम्ही त्याचा खुलासा करतो मग तो हिरवा झेंडा दाखवतो, त्यानंतरच आम्ही पुढे जातो. चुकीला चूक समजून ती मिटवावी तर लागेलच ना! जर समोरची व्यक्ती ती चूक मिटवायला तयार नसेल तर ती आपल्यालाच मिटवायला हवी ना? आम्हाला कोणी लाल झेंडा दाखवीत नाही आणि कोणी दाखवलाच तर मग आम्ही विचारतो, 'काय झाले? लाल झेंडा का बरे दाखवतोस?' याउलट लोक तर कोणी लाल झेंडा दाखवीला तर आरडाओरडा करतात (आणि म्हणतात) 'अरे, तू काय जंगली आहेस की काय? असे वाकडे का वागतोस?' हा लाल झेंडा दाखवीत आहे याचा अर्थच 'देअर इज समथिंग,' काही तरी कारण आहे. एखादा लहान मुलगा देखील आम्हाला रागवू शकतो. जगातील लोक लाल झेंडा दाखविणाऱ्याला म्हणतात, 'तुझ्यात हे नाही, ते नाही, तू असा आहेस, तसा आहेस, बेअक्कल आहेस?' जसे काही हा मोठा अक्कलवंत! याला विकायला जाल तर कोणी चार आणे पण देणार नाही! आम्हाला तर प्रथमपासूनच अक्कल कमी. 'आम्ही' तर अबुध म्हटले जातो. म्हणजे ही तर आपलीच चूक आहे म्हणूनच लाल झेंडा दाखवीत आहे. त्याला खुलासा दिला की मग तो जाऊ देतो.

## यथार्थ लौकिक धर्म

या जगातील लोकांना आम्ही अतिशय सरळसोपा लौकिक मार्ग

देऊ. यात कुठेही कर्मकांडांची भानगड नसेल. कोणी गावठी माणूस आला आणि आम्ही जर त्याला सांगितले, 'खरे बोल, चोरी करू नकोस, दया दाखव, चुकीच्या गोष्टी करू नकोस.' तर तो ते ऐकून सरळ दुर्लक्ष करील. त्याऐवजी 'आम्ही' त्याला एकच वाक्य सांगू, की 'बाबा रे, तू गुंता करू नकोस.' मग तो विचारील, 'गुंता म्हणजे काय?' मग त्याला आम्ही समजावून सांगू, 'तुझ्या समोरच्या शेतात तुला तुरी दिसल्या आणि तुला काढाव्याशा वाटल्या तर तू काढतोस. तर असे कोणाला न विचारता घेणे त्याला गुंता म्हणतात, समजले का तुला?' मग तो लगेच म्हणेल 'हो गुंता म्हणजे काय ते मला समजले. असा गुंता मी करणार नाही. असे गुंते तर फारच केले आहेत.'

मग तो त्याच्या बायकोला घेऊन येतो. तेव्हा 'आम्ही' तिला या गुंत्यांबद्दल समजावून सांगतो. त्याची बायको म्हणते, 'दादाजी, 'तो' माझ्या बरोबरही फार गुंता घालतो.' मग 'आम्ही' तिलाही गुंता म्हणजे काय ते नीट समजावून सांगतो. त्यानंतर जेव्हा जेव्हा गुंता होण्याची वेळ येते तेव्हा त्यांना दादांची आठवण येते आणि मग गुंता होत नाही. 'आम्ही' सांगतो, गुंता करू नका आणि कधी गुंता झालाच तर प्रतिक्रमण करा. गुंता म्हटले की लोकांना ताबडतोब समजते. लोक तर 'खरे बोला, चोरी करू नका, दया करा' हे सारखे सारखे ऐकून विटले आहेत.

हा लौकिक धर्म तर आम्ही घटकाभरात समजावू शकतो. पण अलौकिक धर्म (रियल धर्म) समजावायला थोडा वेळ लागतो.

**प्रश्नकर्ता :** थोडा गुंता पडला आहे पण तो सुटतच नाही, तर मग मी काय करू?

**दादाश्री :** वेळच गुंता करविते आणि वेळच गुंता सोडविते, पण चुका कोणाच्या? आपणच आपला गुंता करतो आणि तो योग्य वेळ आल्यावर आपोआपच सुटतो. ज्याचा अजिबात गुंता राहिला नाही, त्याच्याजवळ तुम्ही बसले आहात, त्यामुळे तुमचा गुंताही पूर्णपणे सुटू शकेल. आणि जर गुंता असणाऱ्या माणसांजवळ बसाल तर तुमचा गुंता अधिकच वाढेल. असाच नैसर्गिक नियम आहे. ज्या गाठी पडल्या आहेत,

त्या 'योग्य वेळ येईल' तेव्हाच सुटतील. या गाठी सोडवणे हे आपल्या हातात नाही. म्हणून भगवंत काय म्हणाले की अशा वेळी तू धर्मध्यान कर, देवदर्शन कर, असे काही कर. केस वाढतात, ते कापण्यासाठी काही धावाधाव करावी लागते का? नाही. कारण संयोग जुळतात आणि केस कापले जातात. तसेच जेव्हा वेळ येईल तेव्हा गुंता सुटेल.

दि वर्ल्ड इज दि पझल इटसेल्फ! (जग हे कोडेच आहे) 'पझल' आहे. गुंतागुंत झाली आहे. ती जर सुटली तर कार्य सिद्धी होईल!

*'लख रे चौरासीनी भूलभुलमणीना फेरा मारा कोण टाळे?'*

(या चौऱ्याशी लक्ष योनीच्या फेऱ्यातून मला कोण बाहेर काढील?)

या लक्ष चौऱ्यांशीमधून सुटायचे कसे? कोण सोडवील कृपाळूदेव म्हणतात की, जो जीव या चौऱ्याशी लक्ष योनीच्या फेऱ्यातून बाहेर पडेल त्याला मी खूप महान समजेन. आता तुम्हाला तर यातून बाहेर पडण्याचा मार्ग मिळाला आहे. 'ज्ञानी पुरुष' मिळाले आहेत, म्हणून त्यांच्या माध्यमातून बाहेर पडणे शक्य आहे. 'ज्ञानी पुरुष' तुमच्या चुकांसाठी काय करू शकतात? तर ते फक्त तुम्हाला तुमच्या चुका दाखवीतात, प्रकाश दाखवीतात. उपाय सांगतात की चुकीचे रक्षण करू नका. तरी पण जर त्या चुकांचे रक्षण केले की, 'आम्हाला तर या जगातच राहायचे आहे, तर असे कसे करता येईल?' अरे, हे तर तुम्हीच चुकीला पोषण दिले; चुकीचे रक्षण करू नका. एक तर चूक करतो आणि परत कल्पांत करतो, मग कल्पाचा अंत येईपर्यंत भटकावेच लागेल!

स्वतःचे संपूर्ण स्वातंत्र्य आजादी हवी असेल तर ती स्वतःच्या सर्व चुका संपल्यानंतरच मिळेल. चूक केव्हा समजते? तर 'तुम्ही कोण आहात' याचे भान होईल, परमात्म्याचा साक्षात्कार होईल तेव्हा.

❖❖❖❖❖

## निसर्गाचा नियम - 'भोगतो त्याचीच चूक'

भगवंतांचा नियम काय सांगतो की ज्या क्षेत्रात, ज्या काळात जो त्रास भोगत असतो तोच स्वतः गुन्हेगार आहे. त्याबाबत कुणालाही, वकिलालासुद्धा विचारण्याची गरज नाही. जेव्हा एखाद्याचा खिसा कापला जातो तेव्हा खिसा कापणारा आनंदात असतो. तो हॉटेलात बसून मजेत जिलबी खात असतो, चहा-पाणी आणि नाश्ता करत असतो. आणि त्याचवेळी ज्याचा खिसा कापला गेला आहे ती व्यक्ती मात्र खूप दुःख भोगत असते, म्हणून भोगणाऱ्याची चूक! त्याने कधी ना कधी तरी चोरी केली असेल, म्हणून आज पकडला गेला, तेव्हा आज तो चोर आहे. आणि खिसेकापू जेव्हा पकडला जाईल तेव्हा त्याला चोर म्हटले जाईल.

'जो भोगतो त्याची चूक' हे एक 'गुप्त तत्व' म्हटले जाते. जिथे बुद्धी थकते, मतिज्ञान काम करीत नाही, त्या गोष्टीचे रहस्य 'ज्ञानी पुरुषां'कडून जसेच्या तसे जाणायला मिळते. हे 'गुप्त तत्व' अतिशय सखोल समजून घेतले पाहिजे.

कोणी बापही *उपरी* नाही, कोणी ओरडणारा नाही. खरे तर, तुझ्या गाठीच तुझ्या *उपरी* आहेत. चूक इतर कोणाचीही नाही. 'भोगतो त्याचीच चूक' आहे.

डॉक्टराने रोग्याला इंजेक्शन दिले आणि डॉक्टर घरी जाऊन आरामात झोपी गेला. रोग्याला ते इंजेक्शन रात्रभर दुखत राहिले. आता

या ठिकाणी चूक कोणाची? तर रोग्याची. आणि डॉक्टर तर जेव्हा त्याची चूक पकडली जाईल, तेव्हा चूक भोगेल.

दोन प्रकारच्या भाषा आहेत. एक ‘भ्रांतीची भाषा’ आणि दुसरी ‘वीतराग भाषा.’ वीतरागींच्या भाषेत ‘भोगतो त्याचीच चूक.’

एक स्त्री मुंबईच्या बस स्टँडवर उभी होती. आता बस स्टँडवर उभे राहणे हा काय गुन्हा आहे का? इतक्यात एक बस आली, स्टँडवर घुसली आणि स्टँड मोडून तिने त्या स्त्रीला चिरडले. लगेच तिथे पाचशे माणसांचा जमाव जमा झाला. आता त्या जमलेल्या लोकांना जर ‘याचा निवाडा करा’ असे म्हटले तर ते लोक म्हणतील, ही बाई बिचारी हकनाक बळी गेली. तिचा काहीच दोष नव्हता. तो बस ड्रायव्हर नालायक आहे. ती स्त्री बिचारी निरपराध असताना मेली. म्हणून या जगात ईश्वर असे काही अस्तित्वातच नाही, असे म्हणतील.

बघा, लोकांनी कसा निष्कर्ष काढला? पण आम्ही काय म्हणतो, ‘भोगतो त्याचीच चूक.’ ईश्वर तर आहेच आहे. अरे, तो नसता तर या जगात काय राहिले असते? हे लोक समजतात की आता ईश्वराची सत्ता राहिली नाही. आणि मग त्यांची ईश्वरावरची श्रद्धा उडून जाते. अहो, असे नाही. हा सगळा मागच्या जन्मींचा हिशोब आहे. हा एक जन्माचा हिशोब नाही. आज (या जन्मात) त्या बाईची चूक पकडली गेली म्हणून तिला भोगावे लागले.

या कलियुगात ॲक्सिडेन्ट आणि इन्सिडंट (घटना आणि दुर्घटना) असे घडतात की माणूस भांबावून जातो. ॲक्सिडेन्ट म्हणजे काय? तर ‘टू मेनी कॉजेज ऍट ए टाईम (अनेकानेक कारणे एकाच वेळी) आणि इन्सिडंट म्हणजे काय तर सो मॅनी कॉजेस ऍट ए टाईम’ (अनेक कारणे एकाच वेळी) म्हणून आम्ही असे म्हणतो की, ‘भोगतो त्याची चूक’ आणि तो तर जेव्हा पकडला जाईल तेव्हा त्याची चूक मानली जाईल.

एक म्हातारे गृहस्थ मला म्हणतात, मला खूप दुःख सोसावे लागत आहे.

मी विचारले, ‘काय काका, काय झाले?’

तेव्हा ते म्हणाले, ‘माझा मुलगा खूप बिघडला आहे.’

मी विचारले, ‘एकच मुलगा बिघडला आहे की सगळेच?’

ते म्हणाले, ‘एकच असा निपजला आहे. बाकी तीन तर चांगले आहेत.’

मी विचारले, ‘तो काय करतो?’

म्हातारे म्हणाले, ‘दारू पितो, जुगार खेळतो, रेसला जातो. हॉटेलमध्ये पडलेला असतो. त्याच्यामुळे मला रात्ररात्र झोप लागत नाही. त्याची सतत काळजी वाटत असते.’

मी म्हणालो, ‘मग साहेब, तुमचीच चूक आहे. तुमच्याच चुकीमुळे तो असे करत आहे. तुमची बाकीची तीन मुले चांगली आहेत त्या गोष्टीचा तुम्हाला आनंद का वाटत नाही?

या म्हाताऱ्या गृहस्थाच्या त्या बिघडलेल्या मुलास मी एक दिवस विचारले ‘अरे, (तुझ्या वागण्यामुळे) तुझ्या बाबांना खूप दुःख होते. तुला त्याचे काहीच कसे वाटत नाही?

तो मुलगा म्हणाला, ‘मला कसले दुःख? बाबांनी खूप कमाई केली आहे. मग मला कसली काळजी? मी तर खूप मजा करतो.’

आता ह्या बाप–मुलात कोण भोगत आहे? तर बाप. म्हणजे बापाचीच चूक आहे. ‘भोगतो त्याची चूक.’ हा मुलगा नालायक निघाला, दारू पितो, कुठेही भटकतो, जुगार खेळतो, मनाला वाटेल ते करतो, पण तरी त्याचे भाऊ तर आरामात झोपतात ना? त्याची आई पण निवांत झोपते ना? आणि हा अभागी म्हातारा एकटाच जागा असतो. म्हणून त्याचीच चूक. त्याची काय चूक? त्या वृद्धाने या मुलाला पूर्वीच्या

जन्मात बिघडविले होते. म्हणून मागच्या जन्मीचे हे असे ऋृणानुबंध पडले आहेत. म्हणून त्या वृद्धाला असा त्रास सोसणे भाग पडत आहे. मुलगा जेव्हा त्याची चूक भोगेल तेव्हा त्याची चूक पकडली जाईल. आज दोघांत कोण भाजत (सोसत) आहे? जो भाजला जात आहे त्याचीच चूक. फक्त एवढा एकच नियम नीट समजला तरी संपूर्ण मोक्षमार्ग मोकळा होईल!

'भोगतो त्याची चूक' आमच्या तोंडून हे अगदी एक्जॅक्ट वाक्य बाहेर पडले आहे. त्याचा जो वापर करील त्याचे कल्याण होईल.

रस्त्यात दगडासारखे काही पडले असेल, आणि थिएटरमधून कित्येक लोक त्या रस्त्याने ये-जा करत असतील, पण फक्त चंदुलाललाच ठेच लागते. तेव्हा तो म्हणतो, 'मला ठेच लागली' अरे नाही, तूच ठेचेला लागलास! ठेच तर हलतही नाही आणि डुलतही नाही. खरे तर, तूच भाग्यवान म्हणून तुला ठेच लागली! पण भ्रांतीमुळे तो म्हणतो, 'मला ठेच लागली.' अरे, ही तर 'भोगतो त्याची चूक.' हे जग अंधेरनगरी नाही. हे जग एक्जॅक्ट-पूर्ण न्यायस्वरूप आहे. एक सेकंद देखील इथे अन्याय होत नसतो!

साप चावला आणि माणूस मेला, त्यात चूक त्या माणसाची. साप तर जेव्हा पकडला जाईल तेव्हा त्याची चूक मानली जाईल.

आपण एखाद्या व्यक्तीला पैसे दिले आणि नंतर सहा महिने त्या व्यक्तीने पैसे परत दिलेच नाहीत, तर? अरे, दिले कुणी? त्याने तुझ्या अहंकाराला पोसले आणि म्हणून दयाळू होऊन तू त्याला पैसे दिले, आता ते पैसे त्या व्यक्तीच्या खात्यात जमा कर आणि अहंकाराच्या खात्यात उधार कर!

दोघा जणांनी एकत्र येऊन लक्ष्मीचंदावर आरोप केला की तुम्ही आमचे नुकसान केले आहे. मग त्या रात्री लक्ष्मीचंदाला झोप लागत नाही. ते दोघे अगदी निवांत झोपतात म्हणून चूक लक्ष्मीचंदचीच. पण जर त्याला दादांचे वाक्य, 'भोगतो त्याची चूक' हे आठवले तर मग तो

सुद्धा निवांत झोपेल, नाही तर रात्रभर लक्ष्मीचंद त्या दोघांना शिव्या देत राहील.

ज्याला दगड लागला त्याचीच चूक! नुसती चूक नाही तर सोसण्याचे बक्षीस आहे. पापाचे बक्षीस मिळाले तर ती त्याच्या वाईट कृत्याची शिक्षा आहे, आणि कुणी हार–तुरे घातले तर ते त्याच्या चांगल्या कृत्याचे बक्षीस आहे, तरी पण हे दोन्ही भोगणेच आहे. अशाताचे (दु:खाचे) किंवा शाताचे (सुखाचे).

न्यायासाठी कोर्टात जाणे हाच सर्वात मोठा अन्याय आहे!

यू आर होल एन्ड सोल रिस्पॉन्सिबल फोर योर सेल्फ. (तुम्हीच तुमच्यासाठी पूर्णपणे जबाबदार आहात) जे दु:ख देतात ते तर केवळ निमित्त असतात, पण मूळ चूक स्वत:चीच असते. ज्याच्यामुळे फायदा होतो तो पण निमित्त आणि ज्याच्यामुळे नुकसान होते तो पण निमित्त. (दोन्ही वेळा) आपल्याच हिशोबामुळे असे होत आहे.

मुलाने दरवाजा बंद करताना तुमचे बोट दरवाजात अडकले तर मुलाला ओरडू नये. आपल्याला भोगावे लागले म्हणून आपलीच चूक. आणि त्या मुलाला काय सांगितले पाहिजे? त्याला सांगितले पाहिजे, 'तू अशा खोड्या करत होतास म्हणून माझे बोट चिमटले. पुन्हा अशा खोड्या करत जाऊ नकोस.' मुलाला असे समजावायचे. पण हा तर त्याला मारतो. अरे, परत नवीन गुंता कशाला घालतोस?

आजचे नवरे तर बायकोला टाकून बोलतात. तिला म्हणतात, 'ही आमटी तर तू फारच विचित्र बनविली आहेस?' अरे, विचित्र तर तू आहेस. तुझी चूक आहे म्हणून तुझ्या वाट्याला अशी आमटी आली.

लोक म्हणतात जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत भोगायचे आहे. परंतु असे नाही, चुका आहेत तोपर्यंतच भोगायचे आहे. आम्हाला भोगावे लागत नाही, कारण आमची एकही चूक शिल्लक नाही.

बायकोने तुमच्या डोळ्यात औषध घातले आणि तुमचा डोळा

दुखला, तर ती तुमची चूक आहे. जो सहन करतो त्याचीच चूक, असे 'वीतराग' म्हणतात आणि हे लोक तर निमित्तालाच चावायला धावतात!

'भोगतो त्याची चूक' हा सिद्धांत मोक्षाला घेऊन जाईल. कोणी विचारले की, मी माझ्या चुका कशा ओळखायच्या? तेव्हा आम्ही त्याला शिकवतो की 'तुला जिथे जिथे दुःख भोगावे लागत आहे, तिथे तुझी चूक आहे. तुझी अशी कोणती चूक झाली असेल की तुला असे भोगायची वेळ आली हे शोधून काढ.' असे तर संपूर्ण दिवस भोगावे लागते, तर शोधून काढायला हवे की कोण-कोणत्या चुका झाल्या आहेत.

'आम्हाला' समोरच्याची चूक कशा प्रकारे समजते? तर आम्हाला त्याची 'होम' आणि 'फॉरेन' डिपार्टमेंटस् वेगवेगळी दिसतात. त्याच्या चुका जर 'फॉरेन'मध्ये झाल्या, गुन्हे जर 'फॉरेन'मध्ये झाले तर आम्ही काहीच बोलत नाही, परंतु त्याच्या 'होम'मध्ये चुका होत असतील तर मात्र आम्हाला त्याला सावध करावे लागते. कारण त्याला मोक्षाला जाण्यासाठी कसलीही अडचण राहता कामा नये.

'भोगतो त्याचीच चूक' एवढे फक्त बोलले तर एका बाजूने पझल (कोडे) सुटते आणि दुसरे 'व्यवस्थित' असे म्हटले की दुसऱ्या बाजूचे पझल पण सुटते.

आपल्या आतमध्ये बरीच मंडळी आहेत. कोण भोगत आहे हे लक्षात येते. कधी अहंकार भोगत असतो, तर ती अहंकाराची चूक आहे. कधी कधी मन भोगते, तर ती मनाची चूक. कधी चित्त भोगते, तर तेव्हा चित्ताची चूक. स्वतःच्या चुकांपासून 'स्वतः' वेगळा राहू शकतो.

'ज्ञानी पुरुषां'चा एकच शब्द नीट समजून घेतला आणि तो शब्द धरून ठेवला तर मोक्षालाच जाईल. कोणाचा शब्द? तर 'ज्ञानीं'चा! म्हणून कोणाचा सल्ला घेण्याची गरज नाही की यात चूक कोणाची? 'भोगतो त्याचीच चूक!'

न्याय-निवाडा करणारा जर चेतन असता तर कदाचित त्याने

पक्षपात केला असता. परंतु जगाचा न्याय करणारा 'निश्चेतन चेतन' आहे. याला जगाच्या भाषेत समजायचे असेल तर हे कंप्युटरसारखेच आहे. या कंप्युटरला प्रश्न विचारला तर कदाचित कंप्युटरची चूक होण्याची थोडी शक्यता आहे, पण जगाच्या न्यायात चूक होत नाही. जगाचा न्याय करणारा निश्चेतन-चेतन आहे, आणि वीतराग देखील आहे!

## जीवमात्रांचे संपूर्ण स्वातंत्र्य

कोणताही जीव दुसऱ्या कोणत्याही जीवाला त्रास देऊ शकत नाही. जर एक जीव दुसऱ्या जीवाला त्रास देऊ शकत असेल तर 'हे जग खोटे आहे असे म्हणावे लागेल.' जगाचा मूळ सिद्धांतच खोटा ठरेल, नष्ट होईल! जर कुठलाही जीव दुसऱ्या एखाद्या जीवाला थोडासाही त्रास देऊ शकेल अशी त्याची स्वतंत्र शक्ती असेल तर 'जगाचे सर्व नियम' फ्रॅक्चर होतील (मोडीत निघतील). कोणीही जीव दुसऱ्या जीवाला काहीही करू शकत नाही, इतके हे जग स्वतंत्र आहे. आपलेच फळ आपल्याला मिळत असते! बाकी, आपला कोणीही *उपरी* नाही. *उपरी* असता तर कोणालाही कधीच मोक्ष मिळाला नसता. कोणीही तुमच्यात हस्तक्षेप करू शकत नाही. तुमच्या चुकाच तुमच्या *उपरी* आहेत.

एखादा जीव जर तुला त्रास देत असेल, तर तो (केवळ) निमित्त आहे. तुझा खिसा कापला गेला. का? तर 'खिसे कापणे' हा खिसेकापूचा व्ह्यू पॉइंट (दृष्टी बिंदु) आहे. खिसे कापण्यात त्याला आनंद वाटतो. त्याला वाटते बस, याशिवाय दुसरे कुठलेच काम करायचे नाही. खिसेकापूला 360 डिग्रीच्या सर्कलमध्ये खिसे कापायचाच व्यवसाय करावा असा व्ह्यू पॉइंट निश्चित झालेला असतो. तो खिसे कापणे यालाच व्यवसाय मानतो. आणि व्यवसाय म्हटल्यावर या व्यवसायातही काही ग्राहक लागणारच ना? निसर्गाची व्यवस्था अशी आहे की जो गुन्हेगार आहे (ज्याची चूक आहे) त्याची भेट तो खिसेकापूशी घडवून देतो. ज्याने दु:ख भोगले त्याचीच चूक. 'भोगतो त्याचीच चूक.' अंधारात

झालेल्या चुका उजेडात पकडल्या जातात. जेव्हा खिसा कापला जातो. तेव्हा ती चूक उघडकीस येते.

जो चोर नाही, त्याचा खिसा कोण कापणार? ज्या व्यक्तीमध्ये हिंसेचा एकही परमाणू शिल्लक नाही त्यांना कोण मारणार? साप अगदी जवळ असेल तरी त्याला चावणार नाही. एक चारित्र्यवान् व्यक्ती असेल आणि ती जर सापानी भरलेल्या खोलीतून जाऊ लागली तर साप एक दुसऱ्याच्या अंगावर चढतील पण त्या व्यक्तीला वाट मोकळी करून देतील. साप जर त्याच्या वाटेत असेल तर तो साप जळून भस्म होईल! शीलाचे एवढे प्रचंड सामर्थ्य असते! आणि आज तर मच्छरदाणी बांधली तरी डास आत येऊन चावतात.

भगवंतानी शील कशास म्हटले आहे? कोणाही जीवाला मनाने, वाणीने, विचाराने, कायेने, कषायाने आणि अंत:करणाने कधीही त्रास न देण्याचा ज्याचा भाव आहे तो आहे शीलवान! अशा व्यक्तीला जगात कोणी कसे बरे दु:ख देऊ शकेल?

❖❖❖❖❖

# जग, व्यवहार स्वरूप

हे जग 'न्याय'स्वरूप नाही. 'व्यवहार' स्वरूप आहे. भगवंतानी म्हटले आहे, 'न्याय शोधत बसू नका, नाही तर बुद्धी विभ्रमित होऊन जाईल.' व्यवहार पाहा, पण न्याय पाहत बसू नका. म्हणजे व्यवहारात न्याय करण्यासारखा नाही. व्यवहार जसा आहे तसा आहे, हे समजून घ्या.

व्यवहार, व्यवहारस्वरूप आहे म्हणजे काय ते मी तुम्हाला सांगतो. तुमच्या घरात लग्न कार्य असेल त्यावेळी जर तुम्ही तुमच्या भावाशी व्यवहार केला नसेल, त्याच्या घरी मिठाई पाठवीली नसेल, तर आता तुमच्या भावाच्या घरी लग्न कार्य येईल तेव्हा तो तुमच्या घरी मिठाई पाठवील अशी अपेक्षा तुम्ही ठेवाल का? नाही, कारण तुम्ही तुमच्या भावाबरोबर तसाच व्यवहार केला होता आणि जर एका भावाकडून त्याच्या घरच्या लग्न कार्य निमित्त सोळा लाडू आले आणि दुसऱ्या भावाकडून तीनच लाडू आले तर तुमच्या लक्षात यायला हवे की, भले आज मला आठवत नाही, पण मी त्याला तीनच लाडू पाठवीले असणार. माझा व्यवहार असाच असेल म्हणून आज तीनच लाडू आले. व्यवहारात न्याय पाहायचा नसतो. व्यवहार व्यवहार स्वरूपच आहे.

हा पंखा फुल स्पीडवर फिरत होता. त्याचे रेग्युलेटर बिघडले होते हे मला माहीत नव्हते, म्हणून मी म्हटले, 'पंख्याचा स्पीड जरा कमी करा.' तेव्हा लोकांनी सांगितले, त्याचा स्पीड कमी होतच नाही. मग मला ताबडतोब समजले की ह्या पंख्याचा व्यवहारच तसा आहे. तर मग त्याचा न्याय का करत बसू? म्हणजे व्यवहारात न्याय करू नये.

घरात मुलांबरोबर जो व्यवहार आहे तोच करावा लागेल. त्यात न्याय कसला करायचा? नवरा त्रास देतो. मग काय करायचे? घटस्फोट घ्यायचा? अरे, हा असाच व्यवहार आहे, त्यात कसला न्याय करायचा?

प्रत्येकाशी आपला व्यवहार असतो. तर आपण समजूनच घ्यावे की याच्याबरोबर सरळ व्यवहार घेऊन आलो आहोत आणि याच्याबरोबर वाकडा व्यवहार घेऊन आलो आहोत. मुलगी असून ती तुला उलट बोलली तोच तुझा व्यवहार, त्यात न्याय कुठे शोधणार? आणि दुसरी मुलगी मात्र आपले पाय दुखत नसतील तरी चेपत राहते, हा सुद्धा तुझा व्यवहार. इथेही न्याय पाहू नकोस.

हे न्याय शोधायला जातात आणि त्यातच फसतात. व्यवहार तर उलगडत जातो आणि जसा आणला असेल तसाच परत मिळतो. त्याउलट न्याय काय सांगतो 'समोरची व्यक्ती अशी असायला हवी, तशी असायला हवी,' असे सर्व दाखवितो. न्याय कोणासाठी आहे? ज्याला 'माझी चूक आहे' असे समजते त्याला त्याची चूक संपविण्यासाठी हा न्याय आहे. आणि जे असे समजतात की 'मी कधीच चूक करत नाही.' त्यांना समजण्यासाठी व्यवहार आहे. न्याय हा कॉमन लॉ आहे. ज्यांना मोक्ष हवा आहे त्यांनी सतत न्यायाची जाणीव ठेवत ठेवत पुढे चालायचे. आणि ज्यांना मोक्षाची गरज नाही, ज्यांना संसारातच राहायचे आहे त्यांना ह्या कॉमन लॉ शी काही देणेघेणे नाही. न्याय, हे तर थर्मामीटर आहे. आपण जे वागलो ते न्यायपूर्ण वागलो की न्यायाला सोडून वागलो, हे पाहायचे आहे. न्यायाने वागलास तर उर्ध्वगतीत जाशील आणि न्यायाला सोडून वागालास तर अधोगतीत जाशील.

**प्रश्नकर्ता :** या काळात फक्त वाणीचीच समस्या आहे ना?

**दादाश्री :** समोरची व्यक्ती काय बोलली, कठोर बोलली की नरम बोलली त्याचे आपण ज्ञाता-दृष्टा. आपण काय बोललो त्याचेही आपण 'ज्ञाता-दृष्टा'. आणि जर समोरच्या व्यक्तीस जिव्हारी लागणारे शब्द बाहेर पडले तर तो व्यवहार आहे. वाणी कठोर निघाली ती तर त्या व्यक्तीच्या व्यवहाराधीन निघाली, परंतु तुम्हाला जर मोक्षाला जायचे

असेल तर प्रतिक्रमण करून त्यास धुवून टाका. कठोर शब्द निघाले आणि समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले हा सुद्धा व्यवहार आहे. कठोर शब्द का बाहेर पडले? कारण आज आपला आणि त्या व्यक्तीचा व्यवहार उघड (जाहीर) झाला. आणि भगवंत पण ह्या व्यवहाराचा स्वीकार करतात.

एखाद्या व्यक्तीने तुला शिवी दिली, याचा अर्थ काय? त्याने तुझ्याबरोबरचा व्यवहार पूर्ण केला. समोरची व्यक्ती जयजयकार करील किंवा शिव्या देईल, जे काही करील तो तुझ्याबरोबरचा व्यवहार उघड करीत आहे. तेव्हा तिथे व्यवहाराला व्यवहाराने भागले पाहिजे, आणि जो व्यवहार झाला तो स्वीकारला पाहिजे. तिथे तू न्याय शोधण्याचा प्रयत्न करू नकोस. नाही तर तू त्यातच गुरफटून पडशील.

**प्रश्नकर्ता :** जर मी कधी शिव्या दिल्याच नसतील तर?

**दादाश्री :** जर तुम्ही शिव्या दिल्या नसतील तर तुम्हाला समोरून शिव्या मिळणारच नाहीत. हा तर पुढचा-मागचा हिशोब आहे म्हणून शिव्या मिळाल्याशिवाय राहणारच नाहीत. वहीखात्यात जमा असेल तरच मिळेल. हिशोब शिल्लक असल्याखेरीज कोणताही इफेक्ट (परिणाम) येत नाही. इफेक्ट हा कॉजेसच्या फळस्वरूप असतो. (कारणाशिवाय परिणाम नसतो.) इफेक्टचा हिशोब म्हणजेच व्यवहार.

## वाणी, समोरच्याच्या व्यवहाराधीन

व्यवहार कशास म्हणतात? तर नऊला नऊने भागायचे, जर नऊच्या ऐवजी बाराने भागले तर व्यवहार कसा पूर्ण होईल?

न्याय काय म्हणतो? नऊला बाराने भागा. त्यामुळे मग गुंतत राहतो. न्याय तर काय सांगतो की, 'ते तुम्हाला असे असे बोलले, मग तुम्ही पण त्याला तसेच बोलावे.' पण तुम्ही एकदा बोललात तर तो दोनदा बोलेल. तुम्ही दोनदा बोलाल तर तो दहा वेळा बोलेल. दोन्ही भोवरे फिरतील इतका व्यवहार आहे. जेव्हा दोघेही बोलायचे थांबतील

तेव्हा व्यवहार पूर्ण होईल. व्यवहार भागला जाईल, नि:शेष पूर्ण होईल. व्यवहार म्हणजे शेष बाकी उरत नाही. त्यातून जर तुम्हाला मोक्ष हवा असेल तर ताबडतोब प्रतिक्रमण करा.

तुम्हाला बोलायचे नसते तरी कधीकधी तोंडातून निघून जाते? कारण समोरच्या व्यक्तीचा व्यवहार तसा आहे, त्यामुळे तुमच्याकडून बोलले जाते. असे केव्हा केव्हा घडते ते तपासून पाहा. कुणी तुमचे नुकसान केले असेल तरी तुम्ही त्याला उलटून काहीच बोलत नाही आणि तुमचे कोणी नुकसान केले नसेल तरी तुम्ही त्याला उलटून बोलता, असे का? तर समोरच्या व्यक्तीच्या व्यवहाराधीन असे घडत असते.

जशा व्यवहाराने गुंडाळले आहे तसाच व्यवहाराने उलगडते. जर तुम्ही मला विचाराल, 'तुम्ही मला का रागावत नाही?' तर मी म्हणेन, 'तुम्ही तसा व्यवहार आणलेला नाही. जितका व्यवहार तुम्ही आणला होता तितक्या वेळी मी तुम्हाला सावध केलेलेच आहे. याहून जास्त व्यवहार तुम्ही आणलेला नव्हता.' 'ज्ञानी पुरुषांची' वाणी कठोर नसतेच आणि समोरच्याला कठोर शब्द बोलणे 'आम्हाला' आवडत नाही. तरी देखील एखाद्याशी बोलताना कठोर शब्द तोंडातून बाहेर पडलेच तर 'आम्हाला' लगेच समजते की या व्यक्तीशी असाच व्यवहार ठरलेला होता. वाणी समोरच्या व्यक्तीच्या व्यवहारानुसार बाहेर पडते. वीतराग पुरुषांची वाणी निमित्ताधीन निघत असते. ज्यांना कुठलीही कामना नाही, इच्छा नाही, कुठल्याही प्रकारचे राग-द्वेष नाहीत, अशा वीतराग पुरुषांची वाणी समोरच्या व्यक्तीच्या निमित्ताधीन निघत असते. त्या वाणीमुळे ऐकणाऱ्या व्यक्तीला किंचितदेखील दु:ख होत नाही. ज्ञानी पुरुषांना तर कठोर शब्द बोलायला फुरसतच नसते. तरी देखील एखादी महापुण्यशाली व्यक्ती आली तर त्याला कठोर शब्द ऐकायची वेळ येते. त्या व्यक्तीचा व्यवहार असा असतो की त्याचा रोग दूर करण्यासाठी आम्हाला अशी कठोर वाणी बोलावी लागते, नाही तर आम्ही असे कसे बरे करू? एका तासातच जे मोक्ष देतात, ते कठोर शब्द का बोलतील? पण त्याचा रोग घालविण्यासाठी असे कठोर शब्द बाहेर पडतात. कवी काय म्हणतात की,

*'मुआ जेने कहे ए तो अजर अमर तपे ;*
*गाळ्युं जेणे खाधी एना पूरवनां पापोने वींधे.'*

('दादा' ज्याला 'मेल्या' म्हणतात तो अजर आणि अमर होतो, ज्याने शिव्या खाल्ल्या त्याची पूर्वीची पापे नष्ट होतात.)

कोणी म्हणेल, या भाऊला 'दादा' इतके कठोर शब्द का बरे बोलत आहेत? पण 'दादा' काय करणार? तो तसाच व्यवहार सोबत घेऊन आला आहे. काही जण एकदम नालायक असतात, तरी पण 'दादा' त्यांच्याशी आवाज चढवून बोलत नाहीत. त्यावरून त्यांनी किती सुंदर व्यवहार बरोबर आणला आहे हे लक्षात येतेच ना! जे कठोर व्यवहार घेऊन आले आहेत त्यानांच कठोर वाणी ऐकायला मिळते.

घरी आम्हाला वरच्या मजल्यावर चहा आणून देतात. तेव्हा जर कधी चहात साखर घालायची राहिली असेल तरी पण 'आम्ही' काहीही न बोलता पिऊन टाकतो. कित्येक वेळा खाली कळत पण नाही. कळले तरी ते स्वत: जेव्हा चहा पितात तेव्हाच त्यांना कळते. रोजच्या गोष्टीत आम्ही बोलत नाही. बोलतो केव्हा, तर काही नवीन घालायचे असेल तरच आम्ही बोलतो, चहात साखर तर रोजच घालतात ना. आजच विसरले आहेत, तर त्यासंबंधी बोलण्याची गरज नाही. साखर घालणे हा तर व्यवहार आहे. म्हणून बिन साखरेचा चहा आला तर आम्ही समजतो की आजचा व्यवहार हा असाच ठरला होता, म्हणून आम्ही तो चहा पितो.

## व्यवहारात 'न्याय' कोणता?

व्यवहारच सगळीकडे गोंधळात घालतो ना? व्यवहार आणि न्याय, याचा काहीही संबंध नाही. लोक न्याय शोधत बसतात पण त्यात न्याय पाहायचा नसतो. जर सासू सूनेला त्रास देत असेल तर तोही व्यवहार आहे आणि सासू सूनेला जेवण करून वाढत असेल, तर तोही व्यवहारच आहे. दिवसभर केशर उधळली तर तोही व्यवहार आणि दिवसभर दु:ख दिले तर तोही व्यवहार. व्यवहार नसेल तर हे पुद्‌गल मिळणारच नाही

ना! हा व्यवहार आहे, त्यात जर न्याय बघत बसलात, तर गुंते कधीच सुटणार नाहीत.

भगवंतांशी अकरा शिष्यांच्या व्यवहार होता. त्यातल्या एखाद्या शिष्याला जर कधी वाईट वाटले तर तो रात्रभर झोपत नसे. यात भगवंत तरी काय करणार? यात 'न्याय' पाहायचा असतो का? जो व्यवहाराला व्यवहार आहे असे समजतो त्याला न्याय समजला असे म्हणता येईल. शेजारी उलटून का बोलला? कारण आपला व्यवहार तसाच होता म्हणून. आणि आपण कुणाला उलटून बोललो तर ते त्याच्या व्यवहाराधीन आहे. पण आपल्याला तर मोक्षाला जायचे आहे, त्यामुळे आपण त्याचे प्रतिक्रमण केले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** पण आपल्याकडून तर बाण सुटलाच, त्याचे काय?

**दादाश्री :** ते व्यवहाराधीन आहे.

**प्रश्नकर्ता :** अशीच परंपरा राहिली तर शत्रुत्व वाढेल ना?

**दादाश्री :** नाही, म्हणून तर आपण प्रतिक्रमण करतो. प्रतिक्रमण मोक्षाला जाण्यासाठी नाही, तर शत्रुत्व थांबविण्यासाठी आपण भगवंताला फोन लावतो. प्रतिक्रमणात आपण कच्चे पडलो तर शत्रुत्व निर्माण होईल. जेव्हा जेव्हा चूक लक्षात येते तेव्हा तेव्हा ताबडतोब प्रतिक्रमण करावे. त्यामुळे शत्रुत्व निर्माणच होणार नाही. त्याला शत्रुत्व निर्माण करण्याची इच्छा झाली तरी होणार नाही. कारण आपण थेट त्याच्या आत्म्याला फोन पोहोचवतो. व्यवहार निरुपाय आहे. पण आपल्याला मोक्ष हवा असेल तर प्रतिक्रमण करायलाच हवे. ज्याला 'स्वरूप-ज्ञान' नसेल आणि त्याला व्यवहार जर व्यवहार स्वरूपच ठेवायचा असेल तर समोरची व्यक्ती उलट बोलली ते बरोबरच आहे, असेच समजावे. पण मोक्ष हवा असेल तर मात्र त्याचे प्रतिक्रमण करा. नाही तर शत्रुत्व उत्पन्न होईल.

## निःशेष व्यवहाराने पूर्णाहूती

भगवंत म्हणतात, एक व्यवहार आहे आणि दुसरा निश्चय आहे.

व्यवहाराचा नि:शेष भागाकार होत राहिला आहे, नाही तर तो पूर्ण होणारच नाही. निरंतर, व्यवहाराला व्यवहाराच्या जागी आणि निश्चयाला निश्चयाच्या जागीच ठेवले पाहिजे. आणि व्यवहारात जितके असेल तितके समोर येईलच ना? व्यवहार तर तुम्ही जितका आणला असेल तितका रोखच देतो. व्यवहार काय म्हणतो? नियमानुसार अठरा दिले पाहिजेत मग आठच का दिले? असे का झाले? कारण आठचाच व्यवहार होता म्हणून आठच दिले. जेणे करून व्यवहार शून्य (पूर्ण) होईल. पूर्वजन्मीची कर्मे शून्य होतील. जर 'ज्ञानी पुरुषां'नी ज्ञान दिलेले असेल तर चार्ज होत नाही. (नवीन कर्म बांधणार नाही) नाही तर चार्ज होणे चालूच राहील.

व्यवहार म्हणजे दोन्ही व्यक्तींचा हिशोब नि:शेष पूर्ण करणे स्थूल कर्मे, पंचेंद्रियांद्वारे दिसणारी, अनुभवात येणारी कर्मे शून्य होतात म्हणजे व्यवहार. ज्याला स्वरूपाचे ज्ञान नाही त्याला कर्मे चार्ज होतात आणि आम्ही ज्याला ज्ञान दिले आहे, ज्याला स्वरूपाचे भान आहे त्याचे तर कर्म डिस्चार्ज होते आणि नवीन चार्ज होत नाही. डिस्चार्ज कुठल्याही प्रकारचा असेल पण समोरच्या व्यक्तीचा जसा व्यवहार असेल तसाच डिस्चार्ज होईल.

काही लोक असे असतात की तुम्ही उपकार केलेत तरी ते अपकार करतात! त्यात 'न्याय' पाहत बसलात तर वेडे व्हाल. सरकार, वकील, सगळेच वेडे होतील. एकजण उपकार करतो तोही व्यवहार आहे आणि एकजण अपकार करतो तोही व्यवहार आहे. त्यात न्याय करायला गेलो आणि कुणी मध्यस्थाला बोलावले तर उलट तो आधी म्हणेल, 'ए, चहा-पाणी, नाश्ता आणा!'

व्यवहार म्हटल्यावर तिथे न्याय शोधण्याचा प्रश्न येतोच कुठे? तू जर हे समजला नाहीस तर व्यवहारच तुला जबरदस्तीने व्यवहार करावयास लावील. म्हणून तू हे समजून घे ना, की हा तर व्यवहारच आहे!

**प्रश्नकर्ता :** दादा, व्यवहारात आतमध्ये आग होते, तर त्यास झिडकार म्हणावे का?

**दादाश्री :** ते तर तुम्ही त्याच्याबरोबर व्यवहार समंजसपणाने न हाताळल्यामुळे असे होते. एखाद्या व्यवहारात 'आम्ही' एखाद्याला रागावत असतो, पण त्या व्यवहारात 'आमचा' कुठलाही वैयक्तिक स्वार्थ नसेल तर तो व्यवहार रमणीय होईल, त्याचे फळ (परिणाम) चांगले येते. पण स्वार्थासाठी किंवा पक्षपातीपणे लढले तर त्याचे फळ कडू येते. आमचा व्यवहार रमणीय असतो. काहीही न करता 'आम्हाला' यश मिळते. आमचे सहज पाऊल पडले तरी परिवर्तन घडून येते. हा आमच्या पूर्वजन्मींचा रमणीय व्यवहार आहे. आता मात्र आपला जेवढा आणि जसा व्यवहार असेल तो पूर्ण करायचा आहे आणि आता कुठे आपल्याला नवीन व्यवहार उत्पन्न करायचा आहे? तेव्हा आता तर तुम्हाला ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदात राहायचे आहे.

आता जर कुणी आम्हाला विचारले की, 'माझा मुलगा असे करतो, तमक्याने तसे केले, असे कोणी वागते का?' तर 'आम्ही' सांगू, 'जे घडत आहे, तोच न्याय आहे.' न्याय तर थर्मामीटर आहे. दरअसल (खरी) संज्ञा - तोच दरअसल न्याय आहे. जे घडत आहे त्यालाच आम्ही 'व्यवस्थित' असे म्हणतो. त्यात मग न्याय-अन्याय शोधण्याचा प्रश्न येतोच कुठे?

आज ही अद्‌भुत गोष्ट बाहेर पडली आहे! ही गोष्ट जगात सर्वात उच्च आहे! द्रव्य, क्षेत्र, काळ आणि भाव, यांच्या आधाराने ही गोष्ट बाहेर पडली आहे. सर्व शास्त्रांच्या साररूपाने हे निघाले आहे! या वाक्याचे विवरण करण्यासारखे आहे.

❖❖❖❖❖

## यावहारिक सुख दु:खाची समज

या संसारात जी सुख-दु:खे आहेत, त्यांना भगवंतानी सुख दु:ख असे म्हटलेले नाही. भगवंतानी त्यांना वेदनीय म्हटले आहे. सुखाला शाता वेदनीय आणि दु:खाला अशाता वेदनीय, असे म्हटले आहे.

**प्रश्नकर्ता :** वेदनीय का म्हटले?

**दादाश्री :** कारण त्याचे प्रमाण वाढले तर वीट येतो. जर जेवण रोज एकाच प्रकारचे मिळाले तर वीट येईल. म्हणजे ती पण वेदनाच आहे ना! पुण्यकर्माने शाता वेदनीय आहे आणि पाप कर्माने अशाता वेदनीय आहे. लग्न समारंभात सगळेच आनंदात असतात आणि भावाचा चेहरा मात्र एरंडेल प्याल्यासारखा दिसतो. असे का? तर 'आत' अशाता वेदक आहे. तो कधी इथून मारतो, कधी तिथून मारतो, आणि काहीही करून दु:खाचे सायंटिफिक सरकमस्टन्शियल एविडन्सेस गोळा करून देतो आणि त्या भावाला दु:ख देतो. वरून कोणी ईश्वर किंवा ग्रह दु:ख देत नाही. वर कोणी बाप रिकामटेकडा बसला नाही तुम्हाला त्रास देण्यासाठी! हा तर आत जो वेदक आहे तोच हे सगळे करवीत आहे. त्यात आत्मा नाही, आत्म्याशिवाय दुसरीच वस्तू आहे. आत पूर्ण सैन्य आहे. पोलिस, हवालदार, त्याचा वरिष्ठ, असे सगळे जण या सैन्यात आहेत!

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी पुरुषां'मध्ये हे दोन वेदक नसतात ना, दादा?

**दादाश्री :** नाही, 'ज्ञानीत' सुद्धा असतात. पण 'ज्ञानी' पाहतात आणि जाणतात. जर एखादे अपयश आले तर म्हणावे 'माझ्या हिशोबातच

होते म्हणून अपयश मिळाले.' आपण तर ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदी, आणि शेजाऱ्यासारखे राहायचे आहे. या सगळ्या टेम्पररी ॲडजस्टमेंट आहेत. एखाद्याची दाढ दु:खायला लागली तर तो असा विचार का करत नाही की कायम दुखत राहिली तर? प्रत्येक गोष्टीचा कालावधी असतो. तो संपला की दाढ दुखणे बंद होईल. एक अवस्था अठ्ठेचाळीस मिनीटांपेक्षा जास्त वेळ टिकत नाही, इतके नियमबद्ध जग आहे!

अवस्थेत सुख नसते. अवस्था सतत बदलतच राहणार. बागेत सुख वाटते पण थोड्या वेळाने परत घरी यावेच लागते. त्यापेक्षा दु:खाच्या हंडीतच पडून राहिले, जिथे दु:ख आहे तिथेच पडून राहिले तर सुख वाटेल. दु:ख सहन करणाऱ्याला आपोआप सुख वाटते. कारण उन्हात चालणाऱ्याला बाभळीच्या झाडाखाली सुख वाटतेच. जर कोणाला बाभळीच्या झाडाखाली सुख वाटत नसेल तर त्याला चार-पाच तास उन्हात फिरवा की मग बाभळी खालीही त्याला सुख वाटेल. या संसाराच्या कलुषित क्रिया आणि त्यांच्या फळरूपाने सुख उत्पन्न होते! मग तो घरी गेल्यावर नुसता पंखा लावून बसला तरी 'हुश्श... आता सुख वाटते!' असे म्हणतो. मग आरामात चहा पितो. आणि दिवसभर घरीच बसलेल्या शेठजींसाठी पंखा लावला तर त्यांना आवडणार नाही, चहासुद्धा आवडणार नाही. या संसारात जे काही सुख वाटते ते थकव्याचे फळरूपाने आहे. तात्विक सुख-सनातन सुख एकदा आले की मग कधीही जात नाही.

काही ठिकाणी पत्नी पतीला त्रास देते, तर काही ठिकाणी पती पत्नीला दु:ख देतो. पण हे दु:ख का वाटते? तर प्रमाणापेक्षा खूप कमी दु:ख देतात म्हणून. जर प्रमाणापेक्षा जास्त दु:ख दिले तर सुख वाटेल. त्याउलट इथे ज्ञान म्हणते की मार पडतच राहणार हे असेच चालू राहणार, मग सुख वाटू लागते.

या चक्रवर्ती राजांना महालातही सुख वाटले नाही आणि गरीबाला झोपडीत सुद्धा सुख वाटते, हेच आश्चर्य आहे ना! सुख टिकाऊ असले पाहिजे, आल्यावर ते जाता कामा नये. 'दादां'ना जसे सुख आहे तसे

सुख असावे. क्षणभरही जात नाही, तसे सुख हवे. 'दादां'ना निरंतर सहज समाधी राहत असते.

**प्रश्नकर्ता :** जीव दुसरीकडे सुख शोधत का फिरतो?

**दादाश्री :** या मुलाला जर घरीच चांगला वरण-भात खायला मिळाला तर तो बाहेर हॉटेलमध्ये खायला जाणार नाही. त्याला घरात संतोष वाटत नाही म्हणून बाहेर हॉटेलात खायला जातो. त्याचप्रमाणे माणासाला सुखात असंतोष आहे म्हणून सुख शोधत फिरतो. माणूस अतींद्रिय सुखाच्या शोधात भटकत आहे. स्वतःच्या सुखाची चव कोणी चाखलेलीच नाही. हे काल्पनिक सुख किती काळ टिकणार? 'ज्ञानी पुरुष' भेटले तरच अतींद्रिय सुख लाभेल! काल्पनिक सुखाने तृप्ती होत नाही, संतोष निश्चितच होतो. जोपर्यंत 'ज्ञान' उत्पन्न होत नाही तोपर्यंत माणसाला चांगल्या-वाईटाचे भानच नसते. बुद्धी संसारातील हित-अहित दाखवीते पण मोक्षासंबंधी हित-अहित दाखवीत नाही, कारण तिथे बुद्धीला 'मी मरून जाईन' अशी भिती वाटते.

हे जग क्रमानुसार निश्चित झाले आहे. पद्धतशीर जग आहे. येथे कुणालाही मनाचे दुःख नाही. फक्त मनुष्य नावाच्या प्राण्यालाच दुःख आहे. प्राणी कशामुळे? तर प्राणाच्या आधारे जगत आहे म्हणून. माणूस वगळता इतर कुठल्याही प्राण्याला मनाचे दुःख नाही. भूक लागली की त्यांना वेदना होतात पण खायला मिळाले की ती वेदना शांत होते. त्यांना लोभ नसतोच ना! या माणसांनाच लोभ असतो. तो स्वतःच्या वाट्याचे तर खातोच, शिवाय बरोबर बसलेल्या माणसाच्या वाट्याचे पळविण्याची पण त्याची इच्छा असते. या लोभामुळेच दुःख उत्पन्न होते!

ही माणसे म्हातारपणी पाय दुखले तर डॉक्टरकडे धावतात. इलाज करून घेतात. पण ह्या पक्ष्यांना, माशांना डॉक्टर असतात का? त्यांना सहन करावेच लागते. त्यांना एकतरी विषय मागे आहे का? आहार संज्ञा असते त्यामुळे खावे लागते पण जिभेचा विषय नसतो. त्यांनाही जर खाण्यापिण्याचे विषय असते तर त्यांच्या पण दाढा दुखल्या असत्या,

चष्मे आले असते. जनावरांना सुद्धा म्हातारपणाची दु:खे असतात, पण त्यांना ती मूकपणे सहन करावी लागतात!

शेतकरी पूर्ण दिवस बैलाकडून शेती करून घेतात आणि त्या बैलाने आपल्या शेतातले काही खाऊ नये म्हणून त्याच्या तोंडावर फडके बांधतात, मग बैलाला कळते की त्याने काही खाता कामा नये. एका शेतकऱ्याला रात्री सिनेमाला जायची हुक्की आली. त्याने बैलासमोर चांगले गवत वगैरे ठेवले आणि सिनेमाला गेला, पण बैलाच्या तोंडाला बांधलेले फडके काढायला तो विसरला. बिचारा बैल काय करणार? पोटात भूक लागली पण करणार काय? कुणाला सांगणार? शेतकरी रात्री बारा वाजता आला आणि झोपला, बैलाकडे पाहिले पण नाही. रात्रभर बैल जमिनीवर पाय आपटत राहिला! शेतकऱ्याला सकाळी लक्षात आले की आपण बैलाच्या तोंडावरचे फडके काढायलाच विसरलो!

## आयुष्य-तेल्याच्या बैलासारखे

अनंत जन्म तेल्याच्या बैलासारखी मजुरी केली, त्या बदल्यात मिळाले काय? पेंडीचा एक तुकडा. तसाच हा भाऊसुद्धा दिवसभर घाण्याच्या बैलासारखी मेहनत करून दमल्यावर मिळते काय? तर रात्री हांडव्याचा (एक गुजराती पदार्थ) एक तुकडा. खूप दु:खे भोगली आहेत. अगणित त्रास सोसले आहेत. हे तर काल्पनिक दु:खांना आमंत्रणपत्रिका देऊन बोलवतात. मावशीच्या मामेसासऱ्याच्या मुलाला लग्नाला बोलावतात. खरोखरच आवश्यक आहे तेवढ्यांनाच निमंत्रण दे ना! पण इथे तर सगळ्यांनाच पत्रिका देतात आणि सगळेजण येतात. या दु:खाचे असे नाही की यांच्याकडे जायचे आणि यांच्याकडे जायचे नाही. सुखाचेही असे नाही की यांच्याकडे जायचे आणि यांच्याकडे जायचे नाही. पण आमंत्रण देतो, तो तर येणारच ना? मग म्हणतात, 'दु:ख का आले?'

गावच्या स्त्रिया एकत्र जमतात आणि आपल्या सुख-दु:खांच्या गप्पा-गोष्टी करतात. एक बाई म्हणते, 'मला माझ्या नवऱ्याला एक दिवस चांगले झाडायचे आहे.' पुरुष पण एकत्र येऊन गप्पा मारतात

की, 'माझ्या बायकोला दोन थोबाडीत मारायच्या आहेत.' बघा मग काय होते? बायको नवऱ्याला ताडताड बोलते आणि नवरा तिला दोन थोबाडीत मारतो, असा आहे हा संसार! या संसारात खऱ्या आवश्यक गोष्टी किती? दोन वेळा जेवण मिळाले आणि अंघोळीला पाणी मिळाले तर ठीक, पण प्यायचे पाणी मात्र पाहिजेच. केस छोटे असतील तर त्यात कोंडा होतो का? नाही. पण लोक केस वाढवितात आणि मग कोंडा होतो. असे ते कारण नसताना दुःखांना आमंत्रण पाठवितात.

संसार म्हणजे केवळ दुःखांचा भांडार आहे. त्यात बोलताही येत नाही, कोणाला सांगता येत नाही आणि सहन पण करता येत नाही. नुसते गिळत राहायचे. या बैलाला आयुष्यभर कष्ट करावे लागतात आणि म्हातारपणी त्याला कत्तलखान्यात जाऊन मरावे लागते. त्यांना कधी रिटायर होता येते का? त्यांना टेन्शन मुक्त होता येते का? आपल्याला जेवढी दुःखे असतात त्याच्या किती तरी पट जास्त दुःखे जनावरांना असतात. 'या जनावरांपेक्षा तर आपले दुःख कमीच आहे,' असा विचार करावा. इथे तर चेहऱ्यावर जराशी पुटकळी आली की दुःखी होतात!

## आपले दुःख कळू देत नाही, तोच खानदानी

रडून आपले दुःख दुसऱ्यांना सांगत फिरणे, यात काय खानदानीपणा आहे का? पण लोक तर आपले दुःख सर्वांना सांगत फिरतात. दुःख सांगण्याची शक्ती असूनही दुःख सहन करणे आणि कोणालाही न सांगणे हाच खरा खानदानीपणा! महान पुरुष आपले दुःख गिळून टाकतात. कारण त्यांना वाटते दुसऱ्यांना सांगण्याची काय गरज आहे, आपले दुःख कुणी घेणार आहे का? ही जनावरे आपले दुःख सांगायला येतात का? कुत्रीच्या पायावरून मोटार गेली तर ती कोणाला सांगायला जाईल? ती बिचारी खरडत चालत राहते. कोण औषध-पाणी करणार?

या जनावरांना असते का नणंद-बिणंद? मनुष्यजन्मात आल्यानंतरच माझी नणंद, माझा नवरा! कुठल्या जन्मात नवरा नव्हता? कुत्रा असताना, गाढव असताना, सगळीकडेच नवरा मिळाला होता, तरी पण लोकांना असेच सर्व आवडते. नाही तर तो स्वतःच परमात्मा आहे! हा जन्म

मुक्ती मिळवण्यासाठी लाभला आहे, पण तेवढे काम मात्र तो विसरतो. ज्या कामासाठी येतो तोच काम विसरतो, मग याहून जास्त मूर्खपणा कोणता? या प्रपंचात हे माझे सासरे, ही माझी सासू, हा माझा नवरा, ही माझी बायको, असे सारखे 'माझे-माझे' करत राहतात पण जेव्हा दात दुखू लागतात तेव्हा कोणीच कामाला येत नाही. म्हातारी सुनेला सांगते, 'अगं, माझी दाढ खूप दुखत आहे, काही तरी उपाय सांग ना? तेव्हा सून मनातल्या मनात म्हणते, 'ही म्हातारी उगाचच किटकिट करत आहे!' पण स्वत:ची दाढ दुखेल तेव्हा कळेल. पण तेव्हा ती विसरते. दोष करून नंतर विसरते. आणि जेव्हा दोषांची शिक्षा भोगण्याची वेळ येते तेव्हा म्हणते, 'मलाच हे दु:ख का?'

## वहीखात्यातील हिशोब

संसार म्हणजे काय ते नीट समजून घ्यायला हवे. हे काका कोण? हे मामा कोण? नवरा कोण? बायको कोण? हे सगळे तर वहीखात्यातील हिशोब आहेत, पण असे सगळे जाणलेलेच नाही. असे समजले असते तर हिशोब मिटविण्याच्या मागे लागला असता. पण हे समजत नाही त्यामुळे एक हिशोब मिटतो आणि दुसरा हिशोब मांडला जातो. जर मामाचा हिशोब बाकी असेल तर कुठल्या ना कुठल्या निमित्ताद्वारे चुकता झाल्याशिवाय राहत नाही ना!

जग दु:ख भोगण्यासाठी नाही. सुख उपभोगण्यासाठी आहे. ज्याचा जितका हिशोब असेल तितका मिळतो. कित्येक माणसे फक्त सुखच उपभोगत असतात. ते कशामुळे? कित्येक माणसे फक्त दु:खच दु:ख भोगत असतात, ते कशामुळे? कारण त्यांचा हिशोबच तसा आहे. बातम्यात रोज येते 'आज टॅक्सीत दोन माणसांनी यांना लुटले, फ्लॅटमध्ये बाईसाहेबांना बांधून लुटले.' असे वाचून 'मी असा लुटला गेलो तर' अशी भीती बाळगण्याची गरजच नाही. असा विकल्प मनात येणे, हीच चूक आहे. त्यापेक्षा तू सहज रहा ना! तुझ्या हिशोबात असेल तर तुझ्याकडचे पळवून नेतील, नाही तर कुणी बापही तुला विचारणार नाही. 'भोगतो त्याचीच चूक.' म्हणून तू निर्भय होऊन फिरत रहा. पेपरवाले

तर लिहितील म्हणून काय आपण घाबरत राहायचे? आपल्याकडे घटस्फोट कमी प्रमाणात होतात ते चांगले आहे. पण जर जास्त प्रमाणात घटस्फोट होऊ लागले तर प्रत्येकालाच आपला पण घटस्फोट झाला तर? अशी शंका वाटू लागते. ज्या जागेवर एक लाख लोकांना लुटले गेले असेल अशा जागी देखील जाण्यास तुम्ही घाबरायचे कारण नाही. तुमच्यावर कोणीही *उपरी* नाही.

एखाद्या ज्योतिष्याने तुमचा हात पाहून सांगितले की, 'चार घात (धोका) आहेत.' या चार घातात तुम्ही सावध राहावे. त्यातला एक घात गेला तर आनंद मानावा. चार मधून एक कमी झाला! तसेच जेव्हा अपमान आणि शिव्या असे सर्व आपल्या वाटेस आले तर खुश व्हा की एक दु:ख कमी झाले. उलट हा तर त्या अवस्थेतच तन्मयाकार होतो, असे होता कामा नये. एखाद्या व्यक्तीबरोबर कदाचित हजार शिव्यांचा हिशोब आणि त्याने एक शिवी दिली तर म्हणावे हजारापैकी एक तर कमी झाली! आता फक्त 999 शिव्या शिल्लक राहिल्या! 'मला त्याने शिव्या दिल्या' असे ओझे ठेवता कामा नये. आणि जर तुम्ही तुमचे सगळे दु:ख 'दादांवर' सोपवलेत तर मग तुमचे कामच झाले! 'आम्ही' साऱ्या जगाचे दु:ख घेण्यासाठी आलो आहोत, ज्यांना सोपवायचे असेल त्यांनी या 'दादां'वर सोपवावे. तसे जरूर करावे. तुम्ही 'दादां'ना म्हणावे की, 'दादा, आम्ही तर पहिल्यापासूनच वेडे आहोत, म्हणून आता तुम्ही हजर राहा.' मग 'दादा' येतीलच.

ज्याप्रकारे मान मिळते तेव्हा आनंद वाटतो, त्याच प्रकारे अपमान मिळतो तेव्हा देखील आनंद हजर राहिलाच पाहिजे. अपमानाच्या वेळी आनंद का हजर राहत नाही? 'अपमानाच्या वेळी पण माझा आनंद कायम राहीलच' असे न म्हटल्यामुळे आनंद हजर राहत नाही. म्हणून आपण 'हजर राहीलच' असे म्हणायचे, म्हणजे राहील. पण हा तर 'लक्षातच राहत नाही' असे म्हणतो मग कसा हजर राहील? आत्म्यामध्ये अनंत शक्ती भरलेल्या आहेत. तुम्ही जसे ठरवाल तसे होईल, असे असते.

या संसारात सुख नाही असा निष्कर्ष तू काढला आहेस का?

**प्रश्नकर्ता :** होय, दादा.

**दादाश्री :** ज्याला संसाराच्या वहीखात्याचे सार काढता आले त्याला मोक्षाची तीव्र इच्छा होऊ लागते. वहीखाते तपासता आले नाही तरी पण मोक्षाची तीव्र इच्छा असतेच. हे सार काढतो तेव्हा कळते की सुख कशात आहे? बाप होण्यात सुख आहे का? नवरा होण्यात सुख आहे का?

## सत्सुख कधी मिळते?

**प्रश्नकर्ता :** स्वत: शुद्ध आहे, हे लोकांना माहीत असते का?

**दादाश्री :** कसे माहीत असेल? स्वत: शुद्ध आहे हे समजले तर अपार सुख मिळेल. पण हे माहीत नसल्यामुळेच ही सारी दु:खे आहेत. अज्ञानतेमुळे दु:खे आहेत. सुख कशात आहे याचा शोध तर घेतला पाहिजे ना? हा तर गाढवासारखी धावपळ करत असतो आणि मग कुठेतरी पडतो, आपटतो. हे योग्य आहे का? या माणसांची जीवन जगण्याची कलाच नष्ट झाली आहे. पितळ, तांबे आणि लोखंड, हे सगळे धातू आपल्याच गुणधर्मात राहतात पण हा पंचमहाभुतांचा पुतळा मात्र फार बिकट आहे. तो काहीतरी तिसरेच शोधून काढतो! असतात मोठे शेठजी, पण लोक म्हणतात, 'जाऊ द्या, त्यांच्याबद्दल बोलूच नका.' कारण काय? तर शेठ काही कामाचे नाहीत. म्हणजे स्वत:च्या सुखासाठी काहीतरी मार्ग तर काढावा लागेल ना?

संसारात सुख नाही असे कधी वाटते? जेव्हा दु:ख वाट्याला येते तेव्हा हिशोब निघतो. ह्या सगळ्या जुन्या हिशोबात अनंत दु:खे आहेत. पण जेव्हा सुख मिळत असते तेव्हा लोक मस्तीत फिरतात आणि जेव्हा दु:ख भोगायची वेळ येते तेव्हा संसार म्हणजे कडू विषच आहे याची जाणीव होते. स्वत: जवळचे सगळे सोने जर समुद्रात फेकून दिले तर ते कधी परत मिळेल का? तेव्हा ढसाढसा रडण्याची पाळी येते. एकदा संसार बिघडविला की मग तो कसा सुधारणार? त्यास फक्त वीतरागांची वाणीच सुधारू शकते, तीच मोक्ष देऊ शकते. शरीराचे बंधन, वाणीचे

बंधन, मनाचे बंधन, बुद्धीचे बंधन आणि अहंकाराचे बंधन, ही सगळी बंधने कशी परवडतील? खरे म्हणजे ही सगळी बंधने स्वत:पासून वेगळीच आहेत. पण ती तुम्हीच गोळा केली आहेत. 'मीच मन आहे, मीच अहंकार आहे.' अशी चुकीची धारणा बाळगल्यामुळे मुढात्मदशा होते. जर त्या दशेतून मोकळा झाला तर स्वत: परमात्माच आहे. या सगळ्या विनाशी गोष्टीत सुख मानले म्हणून मूढात्मा झाला आहे!

खरे म्हणजे दु:ख नावालाही नाही, पण असे मानतो त्यामुळे दु:ख आहे. मृत्यू पावलेल्या नातेवाईकांचे पत्रे येतात का तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** नाही ते कसे शक्य आहे?

**दादाश्री :** संसार हा असाच आहे. खात्यात जर 500 रुपये जमा असतील तर हिशोब पूर्ण करण्यासाठी ते या जन्मी भेटतात. जुना हिशोब पूर्ण झाल्यावर ते निघून जातात, मृत्यू पावतात आणि जर नवीन हिशोब मांडला नसेल तर पुन्हा कधी भेटत नाहीत.

या कप–बश्या 100 रुपयांच्या आहेत, तर जोपर्यंत त्यांचा हिशोब आहे, ऋणानुबंध आहे, तोपर्यंत त्या जिवंत राहतील, पण तो हिशोब संपला की त्या फुटतील. त्या फुटल्या हे 'व्यवस्थित' आहे. नंतर त्यांची आठवण काढू नये. तशीच ही माणसे म्हणजे पण कप–बशाच आहेत! असे दिसते की मरण पावली. पण मरत नाहीत, पुन्हा इथेच येतात. म्हणून तर आपण मृत्यू पावलेल्यांचे प्रतिक्रमण केले तर ते त्यांना पोहोचते. ते जिथे असतील तिथे त्यांना ते पोहोचते.

## कडू पितात ते नीलकंठ

**प्रश्नकर्ता :** दादा, कोणी कडू शब्द बोलले तर ते सहन होत नाही. अशा वेळी मी काय करावे?

**दादाश्री :** हो, याचा मी खुलासा करतो. या रस्त्यात काटा पडलेला असेल आणि त्या रस्त्याने शेकडो लोक ये–जा करतात पण काटा कोणालाही टोचत नाही पण चंदुभाई जातात तेव्हा काटा वेडावाकडा

पडला असेल तरी पायात आरपार घुसतो! हिशोबात असते तेव्हाच कडू वाट्याला येते आणि कडू वाट्याला आले की समजावे, आपल्या हिशोबातील एक कडू कमी झाले. जितके कडू सहन कराल तितके कडू कमी होत जाईल. गोडसुद्धा जसजसे वाट्याला येईल तसतसे कमी होत जाईल. पण कडवटपणाचा स्पर्श झाला की चांगले वाटत नाही. खरे तर ते कमी होत आहे तरी पण ते का आवडत नाही? ज्यांनी कडू दिले त्यांना म्हटले, 'पुन्हा एकदा कडू दे ना!' तरी पण तो देणार नाही. तशी सत्ता कोणाच्या हातातच नाही. सगळे हिशोबासहित आहेत, शिलकीसहित आहेत, ही काय थाप नाही. मृत्यूपर्यंतचे सर्व हिशोबासहित आहे. या हिशोबात लिहिलेल्याप्रमाणे याच्याकडून 302 येतील, याच्याकडून 25 येतील, आणि त्याच्याकडून 10 येतील. 'ज्ञान' हजर होत असेल तर काहीच सहन करावे लागत नाही. ही सगळी 'रिलेटिव्ह' रिलेशन्स आहेत. कडू-गोड सर्व हिशोबाप्रमाणेच मिळते. रोज कडू देणारा एखाद्या दिवशी खूप सुंदर देतो! ही सगळी ऋणानुबंधी, ग्राहक-व्यापारी अशी नाती आहेत.

आमच्या वाट्यालाही कडू पेले पिण्यास आले होते. आम्ही ते पिऊन टाकले आणि ते संपले सुद्धा. ज्यांनी जे काही कडू दिले, आम्ही ते आशीर्वाद देऊन प्यायलो. म्हणून तर आता आम्ही 'महादेव' बनलो आहोत!'

**प्रश्नकर्ता :** कर्म संपविणे यालाच म्हणतात का?

**दादाश्री :** होय यालाच, कडू भेट आली तरी ती स्वीकारली पाहिजे. पण अशा कडू भेटी जेव्हा येतात तेव्हा लोक म्हणतात, 'अहो, तुम्ही माझ्याशी असे का वागता?' असे बोलण्याने कर्मे संपत नाहीत. पुन्हा नवीन व्यापार सुरू होतो. ज्याला स्वरूपाचे भान आले आहे, म्हणजे ज्याला हे दुकान बंद करायचे आहे तो मार्ग काढतो. ज्याला स्वरूपाचे भान नाही त्याचा व्यापार तर चालूच आहे, दुकान चालूच आहे.

समोरच्याने कडू दिले तर ते कुठल्या खात्यातून आले हे जोपर्यंत कळत नाही तोपर्यंत बरे वाटत नाही. पण एकदा कळले की 'अरे, हे

तर या खात्यातून आले आहे, मग बरे वाटते.' या 'दादांचा' तर हिशोब संपलेला आहे मग आता कडू कोण देणार? जोपर्यंत 'देणी' शिल्लक असतात तोपर्यंतच देणारे येतात.

इथला सत्संग निरंतर आनंद देणारा आहे! बाहेर कुठेही आनंद नाहीच. म्हणून लोक काही वस्तूंमध्ये आनंद मानून आनंदी होतात. 'जाणलेल्यातून' नाही तर 'मानलेल्यात्यातून' आनंद घेतात. संसारातील सुखे ही सर्व रॉंग बिलिफमुळे (चुकीच्या मान्यतेमुळे) आहेत. हे 'ज्ञान' असते तरी थोडाफार चालला असता पण इथे तर 'रॉंग बिलीफ'मुळे पुढे पाऊलच टाकत नाही! त्याने सुखांचे नीट विवरण करून पाहिले तरी लक्षात येईल की ही सर्व काल्पनिक सुखे आहेत. पण जोपर्यंत रॉंग बिलीफ जात नाही तोपर्यंत त्यातच सुख वाटते.

चांगले संयोग आले तर सुख मिळते आणि वाईट संयोग आले तर दु:खाला आमंत्रण देतो. एखाद्या व्यक्तीला जुगाराचा आणि दारुड्यासोबत दारू पिण्याचा कुसंग मिळाला तर तो संयोग त्याला दु:खी करतो, आणि सत्संगात बसला तर तो सुखी होतो. अर्थात मनुष्य कुठल्या प्रकारच्या संगतीत आहे यावरून त्याला कसले सुख असेल हे समजते.

## दु:ख कशाला म्हटले जाते?

स्वत:ला दु:ख नसतेच. दु:ख दुसऱ्यालाच आहे पण हे समजत नसल्यामुळे स्वत:च स्वत:वर दु:ख ओढून घेतो. जर तीन दिवस खायला मिळाले नाही, प्यायला मिळाले नाही, तर त्याला दु:ख म्हणायचे! खायला-प्यायला व्यवस्थित मिळत असले तरी हे दूषम मन सगळी दु:खे गोळा करते आणि त्यांचा संग्रह करते. याला थोडेच दु:ख म्हणायचे? दु:खे कशाला म्हणतात की जर खायला मिळाले नाही, प्यायला मिळाले नाही, कपडे मिळाले नाहीत, झोपायला मिळाले नाही, अशा गोष्टींना दु:खे म्हणतात. या सगळ्या गोष्टी मिळतात तर मग दु:ख कशाला म्हणायचे? इथे तर संसारात दूषम मनामुळे दु:खे आहेत. मन सुषम झाले की सुखी होईल! मन बिघडते तेव्हा ते आधींना (मानसिक

यातनेला) बोलावते. आधी नसेल तरी बोलावते. कधी दाढ दुखली तर त्याला दु:ख म्हणता येईल. बाकी गोष्टी म्हणजे दु:ख नव्हेच, पण लोक विनाकारणच बेचैन होत असतात. ज्याच्यावर उपाय असतो अशा गोष्टींना दु:ख म्हणतात. उपाय असेल तरच त्याला दु:ख म्हणतात. ज्याच्यावर उपाय नाही त्या गोष्टी म्हणजे दु:खे नाहीतच. जे दुखते त्याच्यावर आपण उपाय करतोच ना? हा पाय आहे, युद्धात तो कापला गेला, तर आता तो पुन्हा परत येणार नाही, म्हणून त्याला दु:ख म्हणत नाही, कारण यावर उपाय नाही. पण पायाला फोड झाला आणि तो ठणकत असेल, तर ते दु:ख आहे, कारण ते बरे करणे शक्य आहे, त्याच्यावर उपाय आहे.

कोणी म्हणते, 'मला सगळे सुख आहे तरी पण पायाला गजकर्ण झाले आहे, इतकेच जरा दु:ख आहे.' आता याला काय दु:ख म्हणायचे का? तिथे तर हात आपोआपच खाजवत राहतो.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, आमची आर्थिक परिस्थिती बिघडली आहे, त्याचे काय?

**दादाश्री :** ती तर बदलत असते. दिवसामागून रात्र येतेच ना? आज नोकरी नसेल, पण उद्या नवीन नोकरी मिळेल. दोन्ही परिस्थिती बदलतात. किती तरी काळ असा असतो की तेव्हा कोणतीच आर्थिक काळजी नसते. पण माणसांना लोभ असतो. उद्या भाजी घ्यायला पैसे आहेत की नाहीत एवढीच काळजी करावी. यापेक्षा जास्त पुढचे पाहू नये. सांगा आता, तुम्हाला असे दु:ख आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग याला दु:ख म्हणायचेच कसे? दु:ख नसतानाच लोक दु:खाचे रडगाणे गात बसतात. याच्यामुळे सतत बेचैनी आणि अशांती वाटते, त्यातून हार्टॲटॅक येतो. ज्यावर उपाय नसतो त्याला दु:ख म्हणतच नाहीत. ज्याच्यावर उपाय शक्य आहे, त्याच्यावर उपाय करावे पण जिथे उपायच नसेल तर ते दु:खच नाही.

आजचा काळ कसा आहे? या काळातील लोकांना सतत पैसे कसे मिळवू, दुसऱ्यांचे कसे लुबाडू, भेसळयुक्त माल कसा विकू, बिनहक्काचे विषयसुख भोगू, या असल्या गोष्टींमधून वेळ मिळेल तर तो काहीतरी (चांगले) शोधेल ना? या अशा गोष्टीतून तर सुख कधीही वाढलेले नाही. सुख कधी म्हणता येईल? जर 'मेन प्रॉडक्शन' (मुख्य उत्पादन) केले तर. हा संसार म्हणजे बाय-प्रॉडक्ट (दुय्यम उत्पादन) आहे. पूर्वजन्मी काहीतरी केले, म्हणून देह मिळाला, भौतिक वस्तू मिळाल्या, पत्नी मिळाली, बंगले मिळाले. जर कष्टानेच हे सर्व मिळत असते तर साध्या मजुराला सुद्धा मिळाले असते, पण तसे नाही. आजच्या लोकांचा गैरसमज झाला आहे. म्हणून 'बाय प्रॉडक्टचेच' कारखाने काढले आहेत. बाय प्रॉडक्शनचे कारखाने काढू नयेत. 'मेन प्रॉडक्शन' म्हणजे मोक्षाचे साधन. ते 'ज्ञानी पुरुषां'कडून प्राप्त करून घेतले की मग संसाराचे बाय-प्रॉडक्शन आपोआपच मोफत मिळेल. बाय-प्रॉडक्टच्या मागे लागून अनंत जन्म व्यर्थ घालविले, दुर्ध्यान करून! एकदा तू मोक्ष मिळव म्हणजे सगळी वादळे संपतील!

**प्रश्नकर्ता :** कोणी आत्महत्या करून मृत्यू पावला तर काय होते?

**दादाश्री :** त्याने जरी आत्महत्या केली, तरी पण कर्ज चुकविण्यासाठी शेवटी परत इथेच यावे लागते. माणूस आहे मग त्याच्या डोक्यावर दुःखे तर येणारच पण त्यासाठी कोणी आत्महत्या करावी का? आत्महत्येची फळे खूप कडू असतात. भगवंतांनी आत्महत्येची मनाई केली आहे. खूपच वाईट फळे येतात त्याची. आत्महत्येचा विचार देखील करता कामा नये. जे काही कर्ज असेल तर ते परत करण्याची भावना सतत मनात ठेवली पाहिजे. पण आत्महत्या मात्र करता कामा नये.

दुःख तर प्रभू रामचंद्रजींना होते. त्यांच्या चौदा वर्षांच्या वनवासातल्या एका दिवसाचे दुःख म्हणजे या माणसांचे आयुष्यभराचे दुःख! तरी ही अभागी माणसे उगीचच 'चीं, चीं' करत दिवसभर दुःखाचे रडगाणे गात असतात.

सुख आणि दुःख हे निमंत्रित पाहुण्यांसारखे आहेत, ते येतात

तेव्हा त्यांना धक्का मारायचा नसतो, तर आदरसत्कार करायचा असतो. संसार हा दु:खांचा समुद्र आहे. व्यवहार नीट सांभाळताना कोणाची भीती बाळगता कामा नये. थोबाडीत खायला आवडत नसेल, आणि वहीखाते बंद करायचे असेल तर कुणाला थोबाडीत मारताना विचार करावा की हे जेव्हा परत येईल तेव्हा सहन होईल की नाही?

तीन प्रकारची दु:खे आहेत. शरीराच्या दु:खांना 'कष्ट' म्हणतात. त्यांना प्रत्यक्ष दु:खे म्हणतात. दाढ दुखते, डोळे दुखतात किंवा अर्धांगवात होतो, ही सगळी दु:खे शरीराची दु:खे आहेत. दुसरी म्हणजे वाणीची दु:खे. त्यांना 'घाव' म्हणतात. एकदा हृदयात घुसले की जात नाहीत. आणि तिसरी म्हणजे मनाची दु:खे, त्यांना दु:ख म्हणतात. आपल्याला आता मनाचे दु:ख किंवा वाणीचे घाव राहता कामा नयेत पण कष्ट मात्र येतील. जे सहन करावे लागतात त्यांना कष्टच म्हणतात. पण आपण 'ज्ञाता-दृष्टा' पदात राहून ते सोसले पाहिजेत. पण मनाची दु:खे आणि वाणीचे घाव असू नये. इन्कमटॅक्स ऑफिसरने सांगितले, 'तुम्हाला एवढा टॅक्स लावीन.' असे बोलला तर ती टेप-रेकॉर्ड आहे. म्हणून तो आपल्याला वाणीचा घाव आहे असे वाटता कामा नये.

कोणाला तरी हार्टअॅटॅक आला तेव्हा त्याला छातीत दुखत होते. तर याला कधी छातीत दुखले तर वाटते आता मलाही हार्टअॅटॅक आला तर? त्यामुळे विनाकारण दु:ख वाढवितो. त्याऐवजी असा विचार आला तर लगेच त्या विचाराला म्हणा, 'चालता हो.' एक ना एक दिवस हे शरीर जाणारच आहे, आणि ते सगळे 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहे ना? मग विनाकारण त्या विचाराचे दु:ख कशासाठी? किती कष्ट पडत आहेत ते पाहायचे. आणि कष्ट नसतील तर मजेत राहा ना! 'दादा, दादा बोलताना मी कधीच थकणार नाही.' यातच मजेत रहा ना!

भगवंतानी म्हटले आहे की फक्त शरीराच्या कष्टांनाच दु:ख माना, बाकी दु:खे ती म्हणजे खरी दु:खे नाहीतच. पशुंना दु:खे का नाहीत? कारण त्यांचे मन सीमित आहे, गाईला जर गवत दाखविले तर ती धावत येते, खायला मिळणार म्हणून! काठी घेऊन गेलो तर ती पळून जाते,

बस, एवढेच त्यांचे मन आहे. पण या शिवाय इतर काही भानगड आहे का? गाईला मनाची भानगड नसते म्हणून त्यांना मानसिक दु:खे नसतात. त्यांचा संसार पण आपल्या संसारासारखाच आहे. त्यांच्यात अक्कल नाही तरी त्यांचे सर्व चालते ना? मग आपले का नाही चालणार? शिवाय आपल्याकडे मनही आहे, तर त्याचा लाभ घ्या ना! या मनाच्या चक्रामुळे दु:खे का व्हावीत? जर दु:खाचे विचार आले तर लगेच त्यांना हाकलून द्या, आणि तरीही ते जात नसतील तर ते मान्य करू नका.

या गाई-म्हशींना कष्ट आहेत तसेच आपल्यालाही आहेत पण त्यांना वाणीचे कष्ट नाहीत. आपण त्यांना शिव्या दिल्या तर त्याचा त्यांना त्रास होत नाही. त्यांचे मन सीमित आहे आणि बुद्धी पण सीमित आहे. या अतिरिक्त दु:खांना तर ताबडतोब पळवून लावा. या गाई-म्हशींना आहे का कसला त्रास? त्यांच्या मुलांच्या लग्नाची आहे का त्यांना काळजी?

फुल लाईटच्या प्रकाशात विंचू घुसला की लगेच आतमध्ये भीती आणि काळजी सुरू होते पण जर फुल लाईटला डिम केले (मंद केले) तर विंचू दिसणारच नाही, आणि मग भीती वाटतच नाही. फुल लाईटला डिम करता येते पण डिम लाईटला फुल करता येत नाही. या 'डिम लाईट'मध्ये गाई-म्हशींचे चालते मग आपले का नाही चालणार? ज्यांना भान नसते अशा लोकांचेही चालतेच, सगळे जग पण चालूच आहे. मग सोडा ना ही झंझट!

आम्ही तुम्हाला स्वरूपाचे ज्ञान देतो त्यानंतर तुम्ही दु:ख कशाला म्हणाल? जे शरीराला स्पर्श करते (जाणवते) तेच फक्त दु:ख, तुमच्या कपड्यांना स्पर्श करते ते दु:ख नाही. इथे तर तुमच्या कपड्यांना स्पर्श केला तरीही म्हणता 'मला दु:ख झाले!' लग्नाला चालला असाल आणि तुमच्या कपड्यांवर कोणी थुंकले, तर म्हणाल 'हा माझ्यावर थुंकला.' तेव्हा आम्ही म्हणू, 'हो, तो तुमच्यावर थुंकला हे खरे आहे, पण ते काही तुमचे दु:ख नाही.' दु:ख तर कशाला म्हणावे, तर जे शरीराला स्पर्श करते त्याला दु:ख म्हणावे.

पत्नीला स्पर्श करणारे दु:ख पत्नीचे दु:ख आहे. मग त्या दु:खाला आपण आपल्या मनावर का ओढून घ्यावे? त्याला तर ज्ञानाने घ्यावे.

'आम्ही' प्रत्येक गोष्टींचे पृथक्करण करतो (वेगळी करतो).जर धंद्यात नुकसान झाले तर धंद्याला नुकसान झाले असे आम्ही म्हणतो. कारण 'नफा किंवा तोटा' यांचे मालक आपण नाही, मग ते नुकसान आपल्या डोक्यावर का घ्यावे? 'नफा-तोटा' यांचा स्पर्श आपल्याला होत नाही. आणि जर धंद्यात नुकसान झाले आणि इन्कमटॅक्सवाले आले, तर आम्ही धंद्याला म्हणतो, 'हे धंद्या! तुला भरपाई करता आले तर भरपाई कर, कारण ती भरपाई तुलाच करायची आहे.'

तू म्हणशील, 'कान दुखत आहे' तर मी तुझे ऐकेन, 'दाढ दुखत आहे' तरीही मी ऐकेन, 'भूक लागली आहे' तेही मी ऐकेन. ही सगळे दु:खे आहेत. पण तू म्हणशील 'खिचडीवर तूप वाढले नाही' तर ते मी ऐकणार नाही. या देहाला थोडी खिचडी खाऊ घातली तर तो तक्रार करणार नाही. मग तुला जसे ध्यान करायचे असेल तसे तू कर, आणि जर दुर्ध्यान करायचे असेल तर तेही कर, तुला सगळीच सूट आहे!

लोक विनाकारण दु:खे डोक्यावर घेतात. घरात थोडीशी कढी सांडली तरी शेठजी ओरडतात, माझेच वाईट कर्म की कढी सांडली. याला ते दु:ख मानतात. तसेच या व्यापारात देखील शेठ दु:ख डोक्यावर घेऊन फिरतात. कित्येक दु:खे ऑफिसची असतात आणि कित्येक दु:खे समाजाचीही असतात. पण त्यांना दु:खे म्हणता येत नाही. आम्ही तर व्यापाराचे दु:ख व्यापाराच्या डोक्यावर आणि समाजाचे दु:ख समाजाच्या डोक्यावर टाकतो. जर कोणी तुझे केस कापले तर ते दु:ख नाही. पण जर कान कापले तर ते मात्र दु:ख आहे. कारण त्यामुळे वेदना होतात. तरी पण तो जर आपल्या सत्संगात आला तर ते दु:ख पण विसरेल. कानाची वेदना पण विसरेल!

एक वडील होते. त्यांची एका डॉक्टरांशी ओळख होती. त्यांच्या मुलाच्या बोटाला जखम झाली, ती पिकून ठणकू लागली होती. म्हणून त्याचे ऑपरेशन करायचे होते. वडीलांनी मुलाला खूप लाडावून बिघडविले

होते. ते खूप श्रीमंत होते. डॉक्टर म्हणाले, 'घटकाभरात मी हे ऑपरेशन करून टाकीन, तुम्ही काळजी करू नका.' पण शेठजी म्हणाले, 'मला ऑपरेशन थिएटरमध्ये बसू द्या.' श्रीमंत शेठ, म्हणून डॉक्टरांना त्यांना आत बसवावे लागले.शेठजी आठ फूट अंतरावर बसले होते. डॉक्टरांनी जेव्हा ऑपरेशन करण्यासाठी बोटावर काप मारला तेव्हा वडील रडू लागले. मुलात आणि वडीलात कोणतीच तार जोडलेली नव्हती, काहीच नव्हते, तरीही वडीलांच्या डोळ्यातून पाणी निघू लागले. कुठलीही अशी तार जोडलेली नसताना डोळ्यातून पाणी आले तर अशा लोकांना काय म्हणणार? अशांना मूर्खच म्हणावे लागेल, हे जग रडण्यासाठी नाही. आणि रडण्यासाठी वेळ आली तरीही तिथे हसावे. याचे कसे आहे की जर परिस्थितीला तुम्ही चांगल्या रकमेने भागले तर वाईट रक्कम संपून जाते. जिथे दुःखाचा भागाकार करायचा असतो तिथे तो रडून गुणत बसतो. त्याऐवजी हसून भागाकार कर म्हणजे ती रक्कम संपून जाईल. शेष काहीच उरणार नाही!

एक व्यक्ती आली आणि म्हणाली, 'समाजात माझी अब्रू गेली.' ते समाजाचे दुःख, त्यात तुझे कसले दुःख? दुःख तर देहाला स्पर्श करते तेच फक्त खरे दुःख. महावीर भगवंतांच्या देहाला दुःखाचा स्पर्श झाला होता. त्यांच्या कानात बरू ठोकलेले होते ते जेव्हा काढले तेव्हा खूप वेदना झाल्या, त्यांच्या डोळ्यातून पाणी आले आणि मोठ्याने किंचाळलेसुद्धा. असे सगळ्यांनाच होणार. देह आणि आत्मा वेगळेच आहेत. परंतु मानलेला आत्मा आहे तोपर्यंत देह जगतो. जोपर्यंत मानलेला आत्मा आहे तोपर्यंत हा देह जिवंत राहतो. प्रतिष्ठित आत्मा कन्झ्युम झाला (वापरला गेला) की मग देह संपतो.

म्हणून दुःख कशाला म्हणतात? तर जे शरीराला स्पर्श करते ते दुःख. मुलाचे बोट कापले तर काय? ते तर मुलाला झाले, पण वडील ते आपल्या डोक्यावर घेतात. भगवंत काय म्हणतात की, आम्ही मुलाला 1 किलो दुःख दिले होते, त्यातले अर्धा किलो दुःख बाप डोक्यावर घेऊन फिरतो आणि पाव किलो आई डोक्यावर घेऊन फिरते. आता यांना मूर्ख म्हणायचे नाही तर काय म्हणायचे?

तू मला म्हणालास, ‘दादा, माझे पोट दुखत आहे.’ आणि अशा वेळी जर मी म्हटले की, ‘तू तर आत्मा आहेस ना,’ तर मी ज्ञानी म्हटला जाणार नाही. त्यावेळी मी तुझे ऐकले पाहिजे. पण खिचडीत तूप मिळाले नाही असे म्हणालास, तर मात्र ते आम्ही ऐकणार नाही. याला दु:ख म्हणत नाहीत.

ही खूप गहन गोष्ट आहे. जर कुठलेही दु:ख असेल पण त्यावर उपाय असतोच. दाढ दुखली तर ते दु:ख आहे, कारण डॉक्टरांकडे जाऊन उपचार करू शकतो. दाढ काढूही शकतो. ज्याच्यावर उपाय करता येतो ते दु:ख. ज्याच्यावर उपाय करता येत नाही त्याला दु:ख म्हणतच नाहीत. हे तर मुलाला एक किलो दु:ख होते. मग तू त्यातले अर्धा किलो दु:ख कशाला घेतलेस? कुत्र्याच्या पिल्लाला जखम झाली तर इतर कुत्री रडत नाहीत. त्याला चाटून ती जखम भरून काढतात. त्यांच्या लाळेत जखम भरून काढण्याची शक्ती असते. आणि कुत्र्याला स्वत:ला लागले तर तो किंचाळतो! आणि ही निराश्रित माणसे मात्र दुसऱ्यांना काही झाले तर ते आपल्या डोक्यावर घेतात.

एक माणूस माझ्याकडे आला होता. मला म्हणाला, ‘माझ्यावर फार मोठे संकट आले आहे.’ मी विचारले, ‘काय आहे?’ तर तो म्हणाला, ‘माझ्या पत्नीची डिलिव्हरी व्हायची आहे.’ आता पत्नीची डिलिव्हरी ही काय नवीन गोष्ट आहे का? या कुत्र्या-मांजराची पण डिलिव्हरी होते ना? पोस्टमनसुद्धा डिलिव्हरी करतात, त्यात नवीन काय आहे? पण लोक मनातल्या मनात घाबरता की त्या शेजाऱ्याची पत्नी डिलिव्हरीच्या वेळी मरण पावली, मग माझ्या पत्नीचे काय होईल? मग आम्ही त्यांना समजावून सांगितले, तेव्हा त्यांचे समाधान झाले. अशावेळी एखादा मंत्र देतो की, ‘हे मंत्र बोल.’ त्यामुळे त्याचे लक्ष त्यात राहते. नाही तर तो त्याच नकारात्मक विचारात गुंतून राहील. ‘त्यावेळी असे झाले होते तसेच आताही झाले तर?’ असा विचार करत राहिला तर त्याचा परिणाम पण तसाच होणार ना? हा तर याला दु:ख मानतो आणि त्याचाच विचार करत राहतो, त्यामुळे जे होणार नव्हते तेच होऊन जाते. विचारांच्या परिणामामुळेच तर

सर्व बिघडते. ज्या कामासाठी विचार येत नाहीत ते काम सफल होते. विचार येऊ लागले की बिघडलेच समजा. कारण हे निराश्रितांचे विचार आहेत ना! आश्रिताचे विचार असले तर ती वेगळी गोष्टी आहे!

कोणी म्हणतात, 'ही स्त्री मला असे बोलते, तसे बोलते.' हे शरीराला टोचते का? नाही. मग हे दु:ख नाही. हे दु:ख तुम्ही ओढवून घेता, त्याला दु:ख म्हणता येत नाही.

या मुलाचे दु:ख बाप किलो किलोने अंगावर घेतो, मग मुलगा जातो तेव्हा तू पण मुलाबरोबरच का जात नाहीस? पण तसे तर कोणी करत नाही.

ज्ञानी तर खूप शहाणे असतात. त्यांनी सगळ्या प्रकारे हिशोब काढलेला असतो. आता हा असा काळ आला आहे तर काय या काळात त्यांना दु:ख येत नसेल? येतेच. पण ते त्याची नीट व्यवस्था (सेटिंग) करतात. पोस्ट ऑफिसात सॉर्टिंग करतात ना? तसे हा नडियादचा खण, हा सूरतचा खण वगैरे.. हा व्यापाराचा खण, समाजाचा खण, हा ऑफिसचा खण अशी व्यवस्था करून निवांत झोपतात.

स्वरूपाचे ज्ञान मिळाल्यानंतर दु:ख अजिबात राहत नाही, असे आहे!

सिनेमा थिएटरमध्ये वरून छत कोसळले आणि आपल्याला किंवा इतर कोणालाही लागले नाही तर बरे, कदाचित कोणाला लागले तर कोणाचा मृत्यू झाला नाही हे बरे झाले. असे समजून सांत्वन घ्यावे.

आमच्या कॉन्ट्रॅक्टच्या व्यवसायात अशी बातमी आली की 500 टन लोखंड समुद्रात बुडाले तर आम्ही प्रथम विचारायचो, 'आपला कोणी माणूस गेला तर नाही ना?' तसे प्रत्येकाचे मरण त्याच्या उदयकर्मानुसार होत असते, पण आपण या गोष्टीला निमित्त होता कामा नये.

जी गोष्ट ज्या खात्याची आहे त्याच खात्यात ती ठेवायला हवी. जी गोष्ट प्रत्यक्ष शरीराला स्पर्श करते तेवढ्याच गोष्टीची काळजी घ्यायला हवी, वडीलांना काही झाले तर ते दु:ख आपण आपल्या डोक्यावर घेता कामा

नये. अर्थातच काय झाले? कुठे लागले? याची चौकशी केली पाहिजे. आणि वेळच्या वेळी औषधे पण आणलीच पाहिजेत पण ड्रॅमॅटिक. जर ड्रॅमॅटिक नसेल तर वडीलांबरोबर मुलालाही जावे लागेल ना? मृत्यूच्या वेळी ड्रामा (नाटक) आणि जखम होते तेव्हा ड्रामा नाही, असे कसे चालणार?

'ज्ञानी पुरुष' कायम आनंदात का असतात? कारण त्यांना सगळ्या गोष्टींची योग्य सेटिंग्स् करता येते. आणि ती सेटिंगस् कशी करायची हेच ते तुम्हाला शिकवतात. तुम्हाला ते येत नाही म्हणून तर तुम्ही आम्हाला या आसनावर बसविले आहे!

विद्यार्थ्याला गुणाकार कसा करायचा हे खूप वेळा सांगून देखील त्याला आले नाही तर मास्तर त्याला मारतात. मग घरी मास्तर बन की! पण बायकोसमोर मास्तर बनत नाही, नाही तर बायकोच त्याला मारील.

## सत्ता वापरणे हा मूर्खपणा

सत्ता प्राप्त झाल्यावर जो सत्ता चालवतो तो मूर्ख म्हटला जातो. जोपर्यंत सत्ता प्राप्त झाली नसेल तोपर्यंत मनात असा भाव असतो की मी सत्तेचा उपयोग करीन, पण प्राप्त झाल्यावर मात्र ती वापरता कामा नये. सत्तेचा जो वापर करतो तो मूर्ख, असे आम्ही म्हटले की त्याचा रोग निघून जातो. कारण आतापर्यंत कुणी शिव्या दिल्या नाहीत आणि देणारही नाहीत. पण त्याशिवाय रोग कसा जाईल? बाहेर सगळे जण 'या शेठजी, या शेठजी' असे का करतात? कारण कधीतरी उपयोगी पडतील म्हणून ना? सगळ्यांनाच काहीतरी काम असते. एखादा निष्काम पुरुष असेल आणि तो जेव्हा रागावेल तेव्हा काम होते.

आमच्याकडे एक वकील आले होते, त्यांना मी खूप खूप रागावलो होतो. मग ते घरी गेल्यावर आपल्या भावाला म्हणाले, 'इतका करुणामय मनुष्य मी कधी पाहिलाच नाही.' लोकांचे कसे असते की त्यांना डॉक्टर, वकील वगैरे उपयोगी पडतील, कधीतरी कामी येतील, असे वाटते. पण अशा लोकांचा काय उपयोग? थोडीशी जरी खिचडी मिळाली तरी ती कामाची, बाकी काहीच कामाचे नाही. आणि जेव्हा खिचडी पण मिळत नाही तेव्हाच कोण उपयोगी आणि कोण निरुपयोगी ते कळते.

'ज्ञानी पुरुषांना' मान किंवा अपमान, याची काहीच पर्वा नसते. मानाचे सुख हे एक प्रकारचे विषय सुखच आहे.' 'माझा मानभंग होईल' अशी भीती जोपर्यंत वाटते तोपर्यंत काहीच 'ज्ञान' प्राप्त झालेले नाही असे म्हणावे लागेल. मूळ वीतराग ज्ञानच प्राप्त करायचे असते, आणखी काहीच नको ना!

कित्येक तर दुःखापोटी येथे येतात परंतु खऱ्या जिज्ञासापूर्वक आले तर मात्र खूप काम होईल. लोक तर दुःखाच्या वेळी परमेश्वराला बोलवतात, मग परमेश्वर काय म्हणतो, 'अरे, सुखाच्या वेळी तू मला बोलावले नाहीस, एक पण पत्र लिहिले नाहीस. आणि आता दुःखाच्या वेळी मात्र मला पत्र पाठवत आहेस. तर मी तुझ्या पत्राचे उत्तर देणार नाही.'

लोक कसे आहेत की कार्य रूपाने आज दुःख उत्पन्न होते, पण तरी देखील पुन्हा तसेच दुःख निर्माण करणारी नवीन कारणे उभी करतात. मागच्या कर्मांच्या कारणांमुळे जे दुःख येत आहे त्यात नवीन कारणे उत्पन्न होऊ दिली नाहीत, तर ते उपयोगी.

(मोक्षाचे) काम करून घेण्यासाठी 'हे' एकच स्टेशन आले आहे. म्हणून खा, प्या, आणि प्राप्त संयोगाचा खुशाल उपभोग घ्या आणि अप्राप्त संयोगांच्या मागे लागू नका.

सुख तर आतूनच येईल. परंतु हा तर बाहेरून मधाचे थेंब चाखण्यामागे लागला आहे!

साधू व्हायचे विचार डोक्यात का येतात? कारण अनंतकाळापासून त्याने सोसलेली दुःखे, सासूचा त्रास, सासऱ्यांचा त्रास, नवऱ्याचा त्रास, बायकोचा त्रास, मुलांचा त्रास, ही सगळी दुःखे तो जन्मोजन्मी सोसत आला आहे. ती सगळी आठवितात आणि मग 'या संसारात सुख नाही' असे म्हणणारी निमित्तेही भेटतात म्हणून मग त्याच्या मनात येते, 'मला तर दीक्षाच घ्यायची आहे' आणि मग दीक्षा घेतो!

'ज्ञानी पुरुषां'कडे तुमचे प्रत्येक दुःख निश्चितच मिटेल. या ज्ञानींकडे तर एकूण एक दुःखे निश्तिच दूर होतील. पण जर तुम्ही

इच्छा केली नाही तरच! तुमच्या पायावर जखम असेल, त्यावर पट्टी बांधलेली असेल आणि जर ज्ञानींनी सांगितले की 'ही पट्टी काढू नकोस' आणि तरीही त्याने पट्टी काढली तर मग 'ज्ञानी' काय करणार? हे तर ज्ञानींनी सांगितले, मग त्याकडे दुर्लक्ष कसे काय करू शकतो?

व्यवहारात रोज सकाळी उठल्यावर 'दादां'चे स्मरण करून निश्चय करा आणि पाच वेळा म्हणा, 'ह्या मन-वचन-कायेने जगातील कोणत्याही जीवाला किंचितमात्रही दु:ख न होवो, न होवो, न होवो!' असा निश्चय केला की मग तुमच्या आतील पोलीस खाते सावध होते. आतमध्ये तर वेगवेगळी वंशावळ आहे, मोठे सैन्य आहे. 'ज्ञानी पुरुषां'च्या हजेरीत एवढे केल्याने शक्ती वाढतात आणि मग जातच नाहीत. 'दादां'ना समोर बसवून असा निश्चय करावा, मग जरी आतमधील वेगवेगळी वंशावळ (कषाय इत्यादी) समोर आली तरी त्यांना काहीही खायला-प्यायला घालू नये!

## कंटाळ्याचे स्वरूप

**दादाश्री :** कंटाळ्याचा अर्थ, काय?

**प्रश्नकर्ता :** कंटाळा म्हणजे काहीच न आवडणे.

**दादाश्री :** कंटाळा म्हणजे काटे पसरलेल्या बिछान्यावर झोपल्यावर जी अवस्था होते, ती! जेव्हा कंटाळा येतो तेव्हा उपाय करता का? औषधांच्या दुकानात जाऊन काही औषध आणता का?

**प्रश्नकर्ता :** असे औषध तर कुठेच मिळत नाही.

**दादाश्री :** पण काहीतरी करतच असाल ना?

**प्रश्नकर्ता :** बाहेर फिरायला जातो.

**दादाश्री :** हे म्हणजे देणेकऱ्याला बाहेर हाकलण्यासारखे आहे. कंटाळा येतो तेव्हा तो काय म्हणतो? निसर्ग काय म्हणतो? की, 'याचे देणे देऊन टाक.' तेव्हा हा म्हणतो, 'नाही, आम्ही असे करणार नाही.' आणि विनाकारण धावपळ करतो. हा तर कंटाळ्याला ढकलून द्यायचा प्रयत्न झाला. पण तो जेव्हा सगळे सरसकट मागायला येईल तेव्हा काय

कराल? कंटाळा आला की सिनेमाला जातो. हा कंटाळा घालविण्याचा अन्य मार्ग झाला, कंटाळ्याचा विरोध केला. कंटाळा आला तेव्हा जर स्थिर राहिला तर हा कंटाळा का आला आहे? कुठून आला आहे? याचा शोध घेता येईल. मग तिथे पुरुषार्थ धर्म जागृत होऊ शकतो. पण तेव्हा चुकीचे उपाय करत बसतो आणि कंटाळ्याला ढकलून देतो.

**प्रश्नकर्ता :** बाहेर गेलो तरी कंटाळा जात नाही.

**दादाश्री :** कंटाळा येतो तेव्हा बाहेर जातो त्यामुळे ब्लड सरक्युलेशन (रक्तसंचार) वाढते म्हणून कंटाळा येण्याचे संयोग काही काळ दूर होतात.

**प्रश्नकर्ता :** कंटाळा आला की काही लोक दारू पितात.

**दादाश्री :** कंटाळ्याचा उपाय म्हणून ते दारू पितात, धावपळ करतात. पण ही एक प्रकारची मूर्च्छाच आहे. कंटाळा येतो पण सहनशक्ती नाही. नाही तर कंटाळा आला तर का आला? काय चूक झाली? असा विचार करू शकतो. पण असे काही करतच नाहीत आणि त्याऐवजी ते दारू पितात, भटकतात. त्यामुळे सुख (तात्पुरते) मिळते पण ती पॉवर उतरली की परत कंटाळा सुरू होतो. ही प्रापंचिक दुःखे क्षणभर देखील शांती देत नाहीत.

माणसांना कंटाळा आवडत नाही. कित्येक तर चिंता करत करत जीव जाळत राहतात, जीव जाळू नका. कपडे जळाले तर नवीन आणता येतील पण स्वतःच्या जीवालाच जर जाळत बसलासत तर नवीन कुठून आणणार?

## ठाकूरजींची पूजा

**दादाश्री :** पूजा करत असताना कंटाळा येत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** पूजा करता ती पूज्य पुरुषाची करता की मूर्तीची?

**प्रश्नकर्ता :** मी पुष्टिमार्गी आहे. सेवीत ठाकूरजींच्या (बाळकृष्णाच्या) मूर्तीची स्थापना केली आहे, त्याची मी पूजा करतो.

**दादाश्री :** हो बरोबर, पण ते पूज्य आहेत म्हणून त्यांची स्थापना केली आहे ना? जे पूज्य नाहीत त्यांची पूजा करू नये, केवळ कर्मकांड म्हणून पूजा करता कामा नये. पूज्यबुद्धीने पूज्यची पूजा केली पाहिजे. तुमची ठाकूरजींवर श्रद्धा तर आहे ना? मग ठाकूरजी तुमच्याशी कधी बोलतात का?

**प्रश्नकर्ता :** अजूनपर्यंत तरी असा लाभ झालेला नाही.

**दादाश्री :** ठाकूरजी तुमच्याशी का बरे बोलत नसतील? मला वाटते ते लाजत असतील किंवा तुम्ही लाजत असाल. मला वाटते तुमच्यापैकी कोणी तरी एक लाजाळू आहे.

**प्रश्नकर्ता :** मी पूजा करतो, पण ठाकूरजींना बोलावू शकत नाही.

**दादाश्री :** बोलावू शकत नाही ना? आम्ही जेव्हा जयपूर आणि अयोध्येला गेलो होतो तेव्हा प्रभू रामचंद्र आमच्याशी बोलत होते. आम्ही जिथे एखादी नवीन मूर्ती पाहतो तिथे आम्ही तिच्यात प्राणप्रतिष्ठा करतो. बिरलांनी जयपूर आणि अयोध्या येथे मंदिरे बांधली तेव्हा त्या मंदिरात आम्ही रामचंद्रजींच्या मूर्तीत प्राणप्रतिष्ठा केली होती. त्या दोन्ही ठिकाणी 'आश्चर्यच' झाले. आमच्याबरोबर आमचे 35 महात्मा होते आणि त्या देवळातील पुजाऱ्याला रामचंद्रजी खूप हसताना दिसले. त्यांना मंदिर बांधल्यापासून रामचंद्रजी रुसलेलेच दिसले होते. म्हणजे देऊळ पण रुसलेले आणि दर्शन करणारे पण रुसलेलेच! रामचंद्राची मूर्ती हसलेली पाहून पुजारी धावत धावत आला आणि त्याने माझ्या गळ्यात हार घातला. मी विचारले, 'तुम्ही असे का करत आहात?' तर तो खूप रडू लागला. म्हणाला, 'असे दर्शन यापूर्वी कधीच झाले नाही, आज तुम्ही रामचंद्रांचे खरे दर्शन घडविले.' आम्ही त्याला म्हटले, 'हे लोकांच्या कल्याणासाठी आम्ही केले आहे. आजपर्यंत रामचंद्रजी रुसलेले होते, मग लोकांचे कल्याण कसे होईल? आता रामचंद्रजी हसत आहेत, आता पुढेही ते कायम हसतच राहतील. त्यामुळे त्यांना जे पाहतील ते पण हसतील. 'आम्ही' प्राणप्रतिष्ठा केली आहे. अजूनपर्यंत कधी खरी प्राणप्रतिष्ठा झालीच नव्हती.' जे प्रतिष्ठा करतात त्यांच्या मनात वासना असते. प्रतिष्ठा

तर आत्मज्ञानी अशा 'ज्ञानी पुरुषांनी' केली तरच ती फळ देते. वासना म्हणजे काय, हे समजले ना? काही ना काही इच्छा म्हणजे वासना. हा 'चंदुलाल कधी उपयोगी पडेल.' असे वाटणे म्हणजे वासना. ज्यांना जगातील कोणत्याही वस्तूची इच्छा नाही, सगळ्या जगातील सोने दिले तरी नको आहे, कुठल्याही विषयांची गरज नाही, कीर्तीची गरज नाही, कोणत्याच प्रकारची भीक नाही. अशा व्यक्तींना निर्वासनिक (वासनारहित) असे म्हणतात. असे 'ज्ञानी पुरुष' चाहे सो करे - काय वाटेल ते करू शकतात, मूर्तीला ते बोलके करू शकतात. तुम्ही मूर्तीशी बोलत नाही का? तुम्हाला तर बोलायची सूट आहे ना? मग ते नाही बोलले तर आपण बोलायचे. त्यात काय हरकत आहे? तुम्ही म्हणा, 'प्रभू, तुम्ही माझ्याशी का बोलत नाही? तुमचा माझ्यावर विश्वास नाही का?' असे आपण त्यांना म्हणावे. जर आपण असे दुसऱ्या माणसाशी बोललो तर तो हसेल की नाही? त्याचप्रमाणे मूर्ती पण हसेल. एक मूर्ती आहे का दोन?

**प्रश्नकर्ता :** एक.

**दादाश्री :** मूर्तीला रोज अंघोळ वगैरे घालता का?

**प्रश्नकर्ता :** हो, रोज अंघोळ घालतो.

**दादाश्री :** गरम पाण्याने की गार पाण्याने?

**प्रश्नकर्ता :** कोमट पाण्याने.

**दादाश्री :** हे योग्य आहे. खूप थंड पाण्याने अंघोळ घातली तर त्यांना थंडी वाजेल, आणि खूप गरम पाण्याने त्यांचे अंग भाजेल. म्हणून किंचित कोमट पाणी पाहिजे. ठाकूरजींना रोज जेवायला घालता की त्यांना एकादशी करायला लावता?

**प्रश्नकर्ता :** एकादशी मी पण करत नाही.

**दादाश्री :** तुम्ही करा, न करा, त्याला हरकत नाही पण ठाकूरजींना रोज जेवायला देता ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** किती वाजता जेवायला घालता?

**प्रश्नकर्ता :** सकाळी आठ वाजता जेवण देऊन, झोपवून, मग प्रसाद घेऊन मी ऑफिसला जातो.

**दादाश्री :** मग दुपारी जेवता की नाही?

**प्रश्नकर्ता :** भूक लागली की मग कुठेही खातो.

**दादाश्री :** हो, पण त्यावेळी ठाकूरजींना भूक लागली आहे की नाही हे पाहता का?

**प्रश्नकर्ता :** ते कसे पाहणार?

**दादाश्री :** तर मग ते रडत असतील बिचारे! भूक लागली तर काय करणार? म्हणून तुम्ही माझे एक सांगणे ऐकणार का? सांगतो तसे कराल की नाही करणार?

**प्रश्नकर्ता :** जरूर करीन, दादा.

**दादाश्री :** तर मग जेव्हा तुम्ही जेवता तेव्हा ठाकूरजींचे स्मरण करून, त्यांना अर्पण करून, 'ठाकूरजी तुम्ही जेवा, तुम्हाला भूक लागली असेल, तुम्ही जेवल्यानंतर मी जेवेन' असे म्हणून मग तुम्ही जेवा. असे करणार? असे जमणार असेल तर हो म्हणा, नसेल तर नाही म्हणा.

**प्रश्नकर्ता :** पण साहेब, मी त्यांना झोपवून येतो ना?

**दादाश्री :** नाही, तुम्ही त्यांना झोपवता पण ते उपाशी राहतात ना? म्हणून तर ते बोलत नाहीत ना! किती वेळ झोपतील ते? म्हणून उठून बसतात आणि मग झोपतात, पुन्हा उठून बसतात आणि झोपतात. त्यांना चालत नाही असे तर तुम्ही काही खात नाही ना? तुमचे खाणे सात्विक असते ना? तामसी खाणे असेल तर ते त्यांना देऊ नका. पण सात्विक आहार असेल तर आपण त्यांना म्हणावे, 'ठाकूरजी, घ्या, भोजन करा.' इतके तर तुम्हाला जमेल असे आहे ना? असे केलेत तर कधी तरी ठाकूरजी तुमच्याशी बोलतील, ते खुश होतील तेव्हा बोलतील. का नाही बोलणार?

अहो, या भिंतीसुद्धा बोलतात! सगळे काही बोलेल असे आहे या जगात! ठाकूरजींना रोज अंघोळ घालता, कोमट पाण्याने न्हाऊ घालता मग ते कायम अबोला थोडाच धरतील? एखाद्या माणसाने लग्न करून पत्नीला घरी आणले आणि तिने अबोला धरला तर काय उपयोग? ती जर बोललीच नाही तर तो माणूस काय करील? म्हणजेच काय, तर ठाकूरजीसुद्धा बोलतील, जर आपला तसा भाव असेल तर ते निश्चितच बोलतील. तुम्ही ही जी ठाकूरजींची पूजा करता, हे तुमच्या घरचे संस्कार चांगले आहेत.

**प्रश्नकर्ता :** मी जेव्हा दुसऱ्या गावी जातो, तेव्हा मी ठाकूरजींना बरोबर घेऊन जातो.

**दादाश्री :** देवाशिवाय कुठलीही क्रिया करू नये. खरे म्हणजे ठाकूरजींनी तामसी आहार घेण्यास मनाई केली आहे, पण काय करणार? जास्तीतजास्त ते काय करणार? तर तुमच्याशी बोलणे बंद करतील. खरे म्हणजे सच्चा वैष्णव तर बाहेरचे खाऊच शकत नाही, पाणी पण पिऊ शकत नाही, त्याला फार उत्तम, पक्का वैष्णव म्हणता येईल! मूर्तीला अंघोळ वगैरे घालतो तो पक्का वैष्णव म्हणायचा. पण काय करणार? सध्या संयोग असे आहेत की याबद्दल कोणाला दोष देणे योग्य ठरणार नाही, शेवटी संयोगानुसारच सगळे घडणार ना? म्हणून ती मूर्ती बोलत नाही, नाही तर मूर्ती बोलते. जर आपण सर्व प्रकारे त्यांच्या नियमांचे पालन केले तर ते का नाही बोलणार? मूर्ती पितळेची आहे की सोन्याची?

**प्रश्नकर्ता :** चांदीची.

**दादाश्री :** आजकाल सोन्याची मूर्ती असेल तर कदाचित आपली मुले ती बाहेर विकूनही येतील, तुम्हाला माझे बोलणे पटत आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो दादा, खूपच पटत आहे.

**दादाश्री :** आता याच्यापुढे जर बाहेर खाणे खाल्ले, तर ठाकूरजींना खायला घालून नंतर खा, असे केल्याने तुमची जवाबदारी पूर्ण होईल.

❖❖❖❖❖

## राग-द्वेष

**प्रश्नकर्ता :** राग कशाला म्हणतात?

दादाश्री : जिथे स्वत: नाही तिथे 'मी आहे', असे मानणे हाच सर्वात मोठा राग (आसक्ती, मोह) आहे, तोच जन्मदाता आहे. 'मी चंदुलाल आहे' हाच राग आहे. हा राग जर का एकदा तुटला की सर्व प्रकारचे राग तुटले आणि ज्यांना 'मी आचार्य आहे,' 'मी कलेक्टर आहे' असे भान आहे त्यांचे सर्व राग शाबूत आहेत! इथे तर लोक असे तंतीले झाले आहेत की जर एखादी गोष्ट वाईट बोलली गेली तरी डोळ्यातून आग बाहेर पडू लागते. वीतरागांची गोष्ट त्यांना समजलेलीच नाही. 'मी चंदुलाल आहे' असे भान असेल तर सर्व प्रकारचे 'राग' उत्पन्न होतात आणि शुद्धात्म्याचे भान झाले आणि जिथे 'मी आहे' तिथे 'मी आहे' असे बोलतो, तो राग नाही पण वीतरागतेचे लक्ष्य आहे. शुद्धात्मा तर वीतरागच आहे, पण हे लक्ष्य असल्यामुळे 'बाहेरचे' सर्व रिलेटिव्ह शुद्ध होत जाते. वीतराग कोण? 'मी शुद्धात्मा आहे' हे ध्यानात राहणे किंवा 'दादांची' आठवण येणे हे सुद्धा वीतरागतेचे लक्ष्य आहे. वीतराग कोण? 'ज्ञानी पुरुषात' जे प्रगट झाले आहेत ते संपूर्ण वीतराग आहेत! आणि ज्ञानींनी जे दिले आहे ते लक्ष्य आहे, ते संपूर्ण वीतरागतेचे लक्ष्य आहे. हे अद्‌भुत पद तुम्हाला दिले गेले आहे!

**प्रश्नकर्ता :** पण मला माझ्या मुलावर खूप राग (आसक्ती, मोह) आहे. तर ते काय आहे?

**दादाश्री :** आत्म्यात राग हा गुण नाहीच आणि लोक म्हणतात की

माझा आत्मा राग–द्वेषी आहे. पण खरे तर, या देहात इलेक्ट्रिकल बॉडी आहे, त्यामुळे त्या बॉडीला मिळते–जुळते परमाणू जेव्हा जवळ येतात तेव्हा ती पूर्ण बॉडी लोहचुंबकासारखी ओढली जाते. तेव्हा लोक म्हणतात, 'मी ओढला जात आहे,' 'मला राग होत आहे,' पण अशा वेळीही आत्मा किंचितदेखील ओढला जात नसतो. आत्म्यात राग हा गुण नाहीच. आत्मा वीतरागच आहे. वीतराग काय म्हणतात की, 'हा पुतळा कसा नाचतो, कुठे ओढला गेला, कुठे ओढला गेला नाही.' हे जाणायचे. हे वीतरागींचे निर्मल, शुद्ध मत आहे आणि तेच आम्ही तुम्हाला दिले आहे.

आत्मस्वरूप झाल्याशिवाय मुक्ती मिळू शकत नाही. गच्छ म्हणजे चूल आणि मत म्हणजे पण चूल. मग चुलीत कोण पडणार? ते तर चक्क विष आहे. 'मत' फक्त आत्म्याच्या बाजूने असायला हवे. आणि इथे तर 'आमचे' आणि 'तुमचे' यातच पडले आहेत. भगवंत निष्पक्षपाती मताचे आहेत!

राग–द्वेष हे तर आत्म्याच्या वृत्ती समोर आकर्षण–विकर्षण आहेत. आकर्षणात बाधा येते तेव्हा द्वेष निर्माण होतो.

**प्रश्नकर्ता :** राग–द्वेष, हे सजातीय आणि विजातीयतेमुळे होतात का?

**दादाश्री :** हे लोहचुंबकासारखे आहे. 'राग' ही फार वेगळी गोष्ट आहे. जिवंत व्यक्तीबद्दल जे आकर्षण असते त्याला लोक 'राग' असे म्हणतात पण वीतरागींच्या भाषेतील 'राग' म्हणजे हा नव्हे. हे परमाणूंचे आकर्षण आहे त्याला राग म्हणतात आणि विकर्षणाला द्वेष म्हणतात.

जेव्हापासून हे माझे आणि हे परके, हा भेद निर्माण केला तेव्हापासूनच राग–द्वेष उत्पन्न होऊ लागतात. परके म्हटले की द्वेष निर्माण होतो. मशीद दिसली तर आवडत नाही, शंकराचे देऊळ आले तर 'हे आपले नाही, हे तर दुसऱ्यांचे आहे,' असे म्हटल्यावर द्वेष होतो आणि याउलट सगळीकडे हे आपलेच आहे असे वाटले तर राग–द्वेष मिटतात. विरोधी मत संपविले की विरोध पण संपतो. कोणाला सट्ट्यावर राग असतो आणि कोणाला सट्ट्यावर द्वेष असतो. तर राग असलेला म्हणेल 'सट्टा चांगला आहे'

आणि द्वेष असलेला म्हणेल सट्टा 'हा धंदा वाईट आहे,' ही दोघांची मते आहेत. तेव्हा जर या विरोधापासून बाजूला झाला तर मग विरोध संपेल.

पत्नीला सोडले, करोडो रुपये सोडले, सगळे सोडून जंगलात गेले, तरी पण राग-द्वेष होतच राहतात, मग कामच (!) झाले ना! खरे म्हणजे काय बाधा आहे? तर अज्ञान. राग-द्वेष बाधक नाहीत पण अज्ञान बाधा आहे. वेदांती म्हणतात, मल, विक्षेप आणि अज्ञान दूर करा आणि जैन म्हणतात, राग, द्वेष आणि अज्ञान दूर करा.' दोन्हीमध्ये अज्ञान कॉमन (समाईक) आहे. आणि कसले अज्ञान? तर स्वरूपाचे अज्ञान. ते गेले की हे सगळेच जातात. अज्ञान दूर करण्यासाठी मात्र ज्ञानी पुरुषांची गरज असते.

जिथे राग-द्वेष आहेत, तिथे संसार आहे. जिथे राग-द्वेष नाहीत, अशी व्यक्ती राजवाड्यात राहत असो किंवा हॉटेलमध्ये राहत असो, तरीही ती 'अपरिग्रही' आहे. आणि एखादी व्यक्ती गुहेत राहत असेल, कुठलाही परिग्रह नसेल तरीपण त्याला जर राग-द्वेष होत असेल तर त्याला परिग्रही म्हटले आहे. राग-द्वेष गेले की तो वीतराग होतो. 'मी चंदुलाल आहे' हा परिग्रह आहे, राग-द्वेष हाच परिग्रह आहे, आणि 'मी शुद्धात्मा आहे' हा अपरिग्रह आहे.

तुम्हाला ज्ञान दिल्यानंतर पण तुमची भांडणे होतात, पण त्यातून राग-द्वेष निर्माण होत नाहीत हे आश्चर्यच आहे ना? याउलट अज्ञानी व्यक्ती भांडत नसली तरी त्याला राग-द्वेष होतच असतात. भांडणातून तर राग-द्वेष होत नाहीत, पण त्या भांडणाचा तंत चालूच राहतो त्याला म्हणतात राग-द्वेष.

**प्रश्नकर्ता :** तंत म्हणजे काय, दादा?

**दादाश्री :** तंत म्हणजे सातत्य (रेगांळणे, चालू राहणे). बायकोबरोबर रात्री भांडण झाले की ती सकाळी चहाचा कप टेबलावर आपटते. याचा अर्थ काय? रात्रीचे भांडण त्याचा तंत अजून डोक्यात रेंगाळतच आहे. याला तंत म्हणतात. ज्याचा हा तंत गेला तो वीतराग झाला! ज्याचा तंत तुटला त्याच्या मोक्षाची गॅरंटी आम्ही घेतो!

जिथे अज्ञान तिथे राग-द्वेष आणि जिथे ज्ञान तिथे वीतरागता!

**प्रश्नकर्ता :** एखाद्या गोष्टीची सतत आठवण येत राहते तीकशामुळे?

**दादाश्री :** आठवण, ही राग-द्वेषामुळे येत असते. जर आठवणी आल्या नसत्या तर सगळ्या पडलेल्या गाठी सुटल्या असत्या, तुम्हाला कोणा फॉरेनर्सची आठवण का येत नाही? आणि मृत व्यक्तींची आठवण का येत राहते? हा सगळा हिशोब आहे आणि त्याचे कारण राग-द्वेष हेच आहे, त्यासाठी प्रतिक्रमण केले तर राग-द्वेष संपून जातील. ज्याच्याबद्दल राग आहे त्याची रात्रीसुद्धा आठवण येते आणि ज्याच्याबद्दल द्वेष आहे त्याची सुद्धा रात्री आठवण येते. पत्नीवर राग (मोह, आसक्ती) करतो! लक्ष्मीवर राग करतो! राग फक्त एक ज्ञानी पुरुषांवरच करण्यासारखा आहे. 'आम्हाला' राग पण नाही आणि द्वेष पण नाही, आम्ही तर संपूर्ण वीतराग आहोत!

'मी चंदुलाल आहे' या आरोपित जागी राग आहे म्हणून इतर जागी द्वेष आहे! याचा अर्थ की स्वरूपात द्वेष आहे! एका बाजूला राग असेल तर त्याच्या विरूद्ध बाजूला अवश्य द्वेष असतोच. असा नियमच आहे. कारण राग-द्वेष हे द्वंद्व गुण आहेत. म्हणून वीतराग व्हा. 'वीतराग' हे द्वंद्वातीत आहे!

तुम्ही कोणाला एक लाख रुपये उसने दिले असतील तर तुमच्याकडे कोणी येणार नाही पण जो तुमचा घेणेकरी असेल, तुम्ही कर्ज घेतले असेल तर तो तुमच्याकडे मागायला येईल. आणि घेणे कसले? तर वैराचे घेणे आहे. प्रथम राग होतो त्यातूनच वैराची उधारी होते, मग पुन्हा राग होतो मग पुन्हा वैर निर्माण होते. असे चक्र चालू राहते. हीच जगाची परंपरा आहे. या जगाच्या कढईतून तळून निघेल आणि मगच मोक्ष होईल. याची वीतरागींना कल्पना होती. 'वीतराग'च आपल्याला मोक्ष देऊ शकतील याचे एकदा भान झाले की मग सुटका होते. वीतरागांकडून फक्त मोक्षच मिळतो, अन्य काही मिळत नाही.

कोणी स्तुति केली की राग होता कामा नये आणि निंदा केली की द्वेष होता कामा नये, असे असावे. स्तुति आणि निंदा ही दोन्ही एकाच आईची मुले आहेत. मग त्यात भेदभाव कशासाठी? म्हणून आपण

स्तुति पण करू शकतो आणि निंदा पण करू शकतो. या दोन्ही वेळी तोंड बंद ठेवायची गरज नाही, फरक फक्त भावचाच आहे. कुणाची निंदा करायची नाही अशी शपथ घेतली असेल तर एक ना एक दिवस ती पण मोडावीच लागेल.

वीतरागता कशात असते? आम्ही स्तुति केली किंवा निंदा केली, तरी दोन्ही ठिकाणी आमची समदृष्टी असते. आम्ही नग्न सत्य बोलतो पण आमच्या भावात समदृष्टीच असते. तुम्हाला स्तुति आणि निंदा ही दोन्ही गोष्टी सांभाळता आल्या पाहिजेत. मग कुणी तुम्हाला या दोन्हीमधून एक दिले तरी ते तुम्हाला स्पर्श करणार नाही. या दोन्ही गोष्टी जर बाहेरून समान दिसतील तर आतही समान दिसतील. सगळे पाय सारखेच दिसले पाहिजेत ना? जर पलंगाचे चारही पाय सारखे नसतील तर एका ठिकाणी आधार द्यावा लागतो ना? स्तुति आणि निंदा तर एकाच आईची मुले आहेत, मग त्यांच्यासाठी भेदभाव का असावा? या द्वंद्वामुळेच तर जग उभे आहे. निंदा आणि स्तुति हे दोन्हीही द्वंद्व आहेत. दोन्ही द्वंद्वापासून द्वंद्वातीत व्हावे लागेल, वीतराग व्हावे लागेल.

## आवड आणि नावड यातून राग-द्वेष

आवड आणि नावड असे दोन भाग आहेत. आवडत्या गोष्टीत सुख वाटते आणि नावडत्या गोष्टीत दु:ख वाटते. आवडती गोष्ट पण अधिक प्रमाणात मिळाली की मग ती पण नावडती होते. तुम्हाला जिलबी खूप आवडत असेल आणि सतत सात-आठ दिवस तुम्हाला जिलबीच खायला दिली तर तुम्हाला काय वाटेल?

**प्रश्नकर्ता :** मग ती आवडणार नाही, तिचा वीट येईल.

**दादाश्री :** आवड-नावड जर एक्सेस (अति प्रमाणात) झाली तर राग-द्वेषात परिणमित होते. आणि ती जर सहजरूपात राहिली तर काही अडचण नाही. कारण आवड-नावड हे नोकर्म आहे. हल्के कर्म आहे, चिकट कर्म नाही. त्यापासून कोणाला नुकसान होत नाही. हे 'ज्ञानी पुरुष' देखील इथे गादी असेल आणि जवळ चटई असेल तर ते गादीवर

बसतील, कारण त्यात विवेक आहे आणि ते सगळ्यांना मान्यही आहे. पण जर कोणी म्हटले, 'आपण इथे बसू नका, तिथे बसा.' तर आम्ही तेही मान्य करू. आम्हाला पण आवड-नावड असते. तुम्ही आम्हाला इथून उठवून जमिनीवर बसवले तर आम्ही लाईक करून (आवडीने) तिथे बसू. आम्हाला लाईक-डिसलाईक (आवडी-नावडी)चा थोडासा पूर्व पर्याय असतो. पण आत्म्याला असे काही नसते. आवडी-निवडी हे चेतनेचे फळ नाही. भाजी जरा कडू लागली तर लगेच नावडती होते, कारण ती भाजी आहे. जिथे आवड-निवड वाटते त्या सर्व गोष्टी भाजीसारख्या आहेत. हे चेतनेचे फळ नाही. 'दादां'ना मात्र केव्हाही नावडते नसते. दादा तर सकाळी उठतात तेव्हाही तसेच आणि रात्री झोपतात तेव्हाही तसेच्या तसेच. 'दादां'ची निरंतर एकच परिणती असते! निरंतर आत्मरमणतेत आणि परमानंदातच असतात!!

राग-द्वेष असलेली वाणी अशी असते की ते सख्ख्या भावाशी देखील मानाने बोलत नाहीत आणि डॉक्टरांना मात्र 'या साहेब, या साहेब' असे करतात. डॉक्टरांचा कधी तरी उपयोग होईल असा स्वार्थ त्यामागे दडलेला असतो. 'आमची' वाणी वीतराग असते. वीतराग वाणी काय सांगते की, तू तुझे मोक्षाचे काम साधून घे, आमचे तुझ्याकडे काहीच काम नाही. वीतराग वाणी काम साध्य करून मुक्त होण्याचे सांगते. 'मोक्ष तुझ्या हातात घेऊनच इथून जा'. असे सांगते.

## द्वेषपूर्वक केलेल्या त्यागाला रागपूर्वक उपभोगतो

जोपर्यंत राग-द्वेष आहेत तोपर्यंत तू वीतरागी झाला नाहीस. जर 'लिंबाचा'त्याग केला असेल आणि कुणी चुकून जेवणात लिंबू पिळले तर चिडतो. याचा अर्थ असा आहे की रागपूर्वक ज्याचा त्याग केला त्याला द्वेषपूर्वक भोगावे लागते. आणि त्याचप्रमाणे द्वेषपूर्वक ज्याचा त्याग केला त्याला रागपूर्वक भोगावे लागते. कोणी विडी ओढायची शपथ घेतली असेल आणि त्याला जर कोणी विडी ओढायला दिली तर माझी शपथ याने मोडली त्यामुळे त्याच्या मनात क्लेश उत्पन्न होतो. राग-द्वेषपूर्वक त्याग करणे म्हणजे काय? एखादी गोष्ट आवडत असेल तरी

तिचा द्वेषपूर्वक त्याग करतो, की मला ही गोष्ट आवडत नाही, तरीदेखील ती वस्तू जेव्हा समोर येते तेव्हा ती वस्तू परत आवडते. द्वेषपूर्वक त्याग केलेली गोष्ट रागपूर्वक उपभोगतो. म्हणजे या सर्वांनी रागपूर्वक त्याग केलेले म्हणून द्वेषपूर्वक भोगावे लागते.

## जिथे स्पर्धा तिथे द्वेष

जेव्हा एखादे महाराज व्याख्यान देत असतात तेव्हा त्या महाराजांचे राग-द्वेष डोळ्यांना दिसत नाहीत, ते वीतरागी आहेत असेच वाटते. पण महाराजांच्या विरोधी पक्षातील लोक तिथे आले तर त्यांचा वैरभाव दिसू लागतो. अहो, इथे ज्ञानी पुरुषांजवळ जरी एका पक्षाच्या महाराजांकडे दुसऱ्या पक्षाचे महाराज येऊन बसले तरी त्यांना ते सहन होत नाही. सध्या तर जिथे जिथे स्पर्धक तिथे तिथे द्वेषभाव असतो. तसे तर इतर सर्व जागी वीतराग राहतात पण जेव्हा त्यांना कळते की हा माझ्यापेक्षा उच्च पदावर आहे, तर मात्र त्यांना द्वेष होतो. म्हणून आम्ही सांगतो की स्पर्धारहित व्हायचे आहे.

हिऱ्याचे दोन व्यापारी जर स्पर्धक बनले तर द्वेष निर्माण होतो, पण परत राग पण त्याच्यावरच होतो आणि मग ते एकमेकांबरोबर चहासुद्धा पितात.

भगवंत राग कशाला म्हणतात? तर 'मी चंदुलाल आहे' 'मी जेवलो' याला राग (मोह, आसक्ती) म्हणतात. आणि 'मी निराहारी फक्त त्यास जाणतो' याला राग म्हणत नाही. 'मी आणि माझे' म्हणजे राग.

अज्ञानाप्रति जो राग आहे, तोच राग आणि ज्ञानाप्रति राग असेल तर 'वीतराग'.

या सर्वांनी रागाचा चुकीचा अर्थ घेतला आहे. विषयांवर राग असेल त्याला ते राग म्हणतात. पण तो फक्त आकर्षण गुण आहे, राग आहे. संपूर्ण जग रागामध्येच अडकले आहे. आसक्ती म्हणजेच आकर्षण.

अज्ञानाबद्दलचे प्रेम म्हणजे राग आणि ज्ञानाबद्दल प्रेम म्हणजे वीतराग.

❖❖❖❖❖

# वैर

हे जग कशामुळे उभे आहे? वैरामुळे. जर वैरभाव गेला तर काहीच शिल्लक उरणार नाही. वैरामुळेच हे जग चालू आहे, म्हणून 'आम्ही' फाइलींचा समभावाने निकाल करायला सांगतो. अशा प्रकारे निकाल केल्याने जुने वैर संपून जाते, आणि मग त्यानंतर नवे वैर निर्माण करू नका.

दोन भाऊ आहेत, एक दिवस त्यांची मने वेगळी होतात, ते दुरावतात. दुसऱ्या दिवशी आणखी दुरावतात. नंतर हळूहळू तो भाऊ नावडता होतो आणि मग त्यांच्यात वैर निर्माण होते. मग हे भाऊ किती दिवस एकत्र राहू शकतील? देहाचे जास्त लाड करू नयेत. हे 'दोन भाग' एक झालेत म्हणून तर जग उभे राहिले आहे! लोक काय म्हणतात, 'मी करत नाही, तरी पण का बरे होऊन जाते?' एकाकार झाल्यामुळे अशी ढवळाढवळ होते आणि त्यातून सगळा गोंधळ निर्माण होतो. त्यामुळे होळी पेटलेलीच राहते. पण आता तर दोन भाग वेगळे झाले, मग जरी होळी पेटली तरी आपण तर त्याचे ज्ञाता-दृष्टा आहोत.

गिऱ्हाईक आणि व्यापारी यात संबंध असतोच ना? मग समजा, व्यापाऱ्याने दुकान बंद केले तर तो संबंध संपतो का? नाही. गिऱ्हाईक तर लक्षात ठेवतो की 'या व्यापाऱ्याने माझ्याशी असे केले होते, मला वाईट माल दिला होता.' लोक वैराची कायम आठवण ठेवतात. या जन्मात या व्यापाऱ्याने जरी दुकान बंद केले असेल तरी तो तुम्हाला

पुढच्या जन्मात सोडेल का? नाही सोडणार, त्या वैराचा बदला तो घेणारच. म्हणूनच भगवंतांनी सांगितले आहे की, 'काहीही करा पण वैर सोडा.' आमच्या ओळखीची एक व्यक्ती आमच्याकडून पैसे घेऊन गेली, मग परत करण्यासाठी आलीच नाही. मग आम्ही समजून गेलो की, हे वैरामुळे कर्मबंधन झाले असेल म्हणून तो खुशाल घेऊन गेला आणि आम्ही उलट त्यांना म्हणालो, 'तुम्ही आम्हाला पैसे परत करू नका, तुम्हाला तशी सूट आहे.' असे पैसे सोडून देऊनही जर वैर संपत असेल तर संपवा. कोणत्याही मार्गाने वैर सोडा. नाही तर एकाच माणसाशी असलेले वैर देखील तुम्हाला भटकवत राहील.

मग अशा लोकांशी कसे वागावे? यांच्यावर गोळ्या झाडल्या तरी त्या वाया जातील! उलट वैर निर्माण होईल. एका व्यक्तीबरोबर वैर निर्माण झाले तर ते सात जन्म बिघडवेल. तो तर असे म्हणेल, 'मला तर मोक्ष नको आहे, पण मी तुम्हालाही मोक्ष मिळू देणार नाही!' पार्श्वनाथ भगवंतांचे कमठाशी आठ जन्मांपर्यंत कसे (भयंकर) वैर होते! ते वैर पार्श्वनाथ भगवंत वीतराग झाल्यानंतर सुटले! कमठाने केलेला उपसर्ग तर फक्त पार्श्वनाथच सहन करू शकले. आजच्यासारख्या माणसांना जमण्यासारखी ही गोष्ट नाही. कमठाने पार्श्वनाथ भगवंतांवर अग्निवर्षाव केला, मोठमोठे दगड फेकले, मुसळधार पाऊस पाडला, तरीही पार्श्वनाथ भगवंतांनी सर्व गोष्टी समताभावाने सहन केल्या आणि उलट आशीर्वादच दिले, आणि वैर संपवले.

मांजराला उंदराचा वास येतो तसा शत्रूंना पण एकमेकांचा वास येतो. त्यासाठी त्यांना उपयोग द्यावा लागत नाही. (ते आपोआप घडते). पार्श्वनाथ भगवंत खाली जमिनीवर ध्यानस्थ बसले होते. वरून आकाशमार्गाने कमठदेव चालले होते. त्यांना खाली बघायचे नव्हते तरी त्यांची दृष्टी आपोआपच पार्श्वनाथ भगवंतांवर पडली आणि मग त्यांनी भगवंतांवर उपसर्ग केले. वरून दगडांचा मारा केला, अग्निवर्षाव सुरू केला, जोरदार पाऊस पाडला, सगळे काही केले. तेव्हा ज्या देवावर पूर्वजन्मी पार्श्वनाथ भगवंतांनी उपकार केले होते त्या धरणेन्द्र देवांनी

अवधिज्ञानात हे सर्व पाहिले आणि त्यांनी पार्श्वनाथ भगवंतांच्या डोक्यावर छत्र बनून त्यांचे रक्षण केले! आणि देवींनी पद्ममकमळ रचून भगवंतांना उचलून घेतले! एवढे सगळे होऊन देखील पार्श्वनाथ भगवंत ध्यानस्थच राहिले! त्यांच्यावर घोर उपसर्ग करणाऱ्या वैरी कमठाबद्दल त्यांच्या मनात किंचितदेखील द्वेष निर्माण झाला नाही. त्याचप्रमाणे उपकार करणाऱ्या धरणेन्द्र देव आणि देवींबद्दल किंचितही राग (मोह, आसक्ती) निर्माण झाला नाही. असे वीतराग पार्श्वनाथ भगवंत स्पष्टपणे वीतराग मुद्रेत स्थित दिसत आहेत! त्यांची वीतरागता उघडपणे दिसते! अद्‌भुत वीतरागतेत राहिले होते. चौवीस तीर्थंकराच्या मूर्तीत वीतरागतेचे दर्शन करण्यासाठी पार्श्वनाथ भगवंतांची मूर्ती अद्‌भुत आहे!

सध्या तर लोकांना सहन करण्यासारखे काहीच नाही, तरी पण ते रोज रडत असतात! सगळ्या आयुष्यातील दु:खांचा ताळेबंद (हिशोब) काढला तर तो या महान पुरुषांच्या एका दिवसाच्या दु:खा इतका नसतो, तरी ह्यांचे रडगाणे चालूच असते!

'आम्हाला' ज्ञानावस्थेत हे सतत दिसते की या जगातील लोक वैरानेच बांधले गेले आहेत आणि म्हणून त्यांची तोंडे एरंडेल प्यायल्यासारखी दिसतात! वैरामुळे क्लेश होतो. या पार्श्वनाथ भगवंतांना किंचित जरी ओळखता आले तरी वीतरागतेचे अंकुर फुटतील, पण त्यांना ओळखणार कसे? डोक्यावर साप आहे ते पार्श्वनाथ आणि सिंहाबरोबर आहेत ते महावीर स्वामी! लोकांना आंबा ओळखता येतो की हा रत्नागिरी हापूस आणि हा वलसाडचा आंबा! पण त्यांना भगवंत ओळखता येत नाहीत. यांना कसे पुरून उरायचे?

आपल्यामुळे कोणालाही दु:ख होऊ नये हा सुखी होण्याचा मार्ग आहे!

रात्री मी बाहेरून येत असे तेव्हा माझ्या बुटांच्या आवाजामुळे कुत्र्याला जाग येऊ नये म्हणून मी सावकाश पावले टाकीत असे. कुत्र्यालाही नीट झोप मिळायला नको का? त्यांना बिचाऱ्यांना गादी-बिदी काहीच नसते, रामा, तुझी माया! मग त्यांना शांतपणे झोपूही द्यायचे नाही?

एकदा रात्री आमच्या गल्लीतला एक ओळखीचा माणूस खूप जोराने पळत जात होता. आता 200 किलोचा तो माणूस, रस्त्यात पडला आणि त्याने दोन-तीन वेळा कोलांट्या खाल्ल्या. त्याला मी विचारले, 'अहो बाबा, इतक्या रात्री धावत धावत कुठे जात आहात?' तो म्हणाला, 'जिलबी विकत घ्यायला धावतोय. आम्ही पत्ते खेळत होतो, मी त्यात हरलो त्यामुळे 10 रुपयांची जिलबी घेण्यासाठी जात आहे. उशीर झाला आहे तेव्हा दुकान बंद व्हायच्या आत जिलबी घेतली पाहिजे म्हणून पळत आहे!'

अरेच्या, ही जिलबी जड आणि तू चेतन, तर ही इतकीशी जिलबी ह्या 200 किलोला खेचते तरी कशी? हे सुद्धा आश्चर्यच आहे ना?

❖❖❖❖❖

## संगतीचा परिणाम

**दादाश्री :** सत्संग कशाला म्हणतात?

**प्रश्नकर्ता :** ईश्वराच्या चांगल्या गोष्टी जिथे ऐकता येतात अशा ठिकाणाला सत्संग म्हणतात.

**दादाश्री :** ईश्वराला तर ओळखले नाही की तो कोण आहे आणि कोण नाही, मग ओळखल्याशिवाय ईश्वराबाबत कसे बोलता येईल?

सत्संग पुष्कळ प्रकारचे आहेत. पुस्तके वगैरेचे आराधन करतात तो सुद्धा सत्संग आहे. 'संत पुरुषांचे' संग पण सत्संग आहे, आणि सत्‌पुरुष यांचा संग म्हणजे पण सत्संग आहे. आणि 'ज्ञानी पुरुषां'चा संग म्हणजे पण सत्संग आहे, आणि मग शेवटी 'वीतरागींचा' संग हाही सत्संग आहे, पण या सर्व प्रकारात फरक आहे.

संत पुरुष कोणाला म्हणतात? ज्यांचे चित्त निर्मल झाले आहे ते 'संत पुरुष'. पण संत पुरुषांना स्वत:च्या स्वरूपाचे ज्ञान झालेले नसते. ज्यांना स्वरूपाचे ज्ञान झाले आहे, ज्यांना आम्ही स्वरूपाचे ज्ञान देतो त्यांना 'सत्‌पुरुष' म्हटले जातात आणि त्याच्या पुढे 'ज्ञानी पुरुष', की जे मुक्ती देतात, जे मोक्षाचे दान देऊ शकतात ते म्हणजे मोक्षदाता पुरुष, आणि त्यांच्याही पुढे 'वीतराग भगवंत' आहेत. त्यांच्या केवळ दर्शनानेच मोक्ष प्राप्त होतो.

'ज्ञानी पुरुष' स्वत:च सत् आहेत म्हणून त्यांचा संग म्हणजे सत्संग.

याला भगवंतांनी परमहंसांची सभा असे म्हटले आहे. इथे फक्त रियलच्याच गोष्टी बोलल्या जातात. (आत्म्यासंबंधीच बोलले जाते.) ज्याप्रमाणे हंस चोच बुडवताच दूध आणि पाणी वेगवेगळे करतात, त्याचप्रमाणे 'ज्ञानी पुरुषां'कडून ज्ञान मिळताच 'आत्मा' आणि 'अनात्मा' दोन्ही वेगवेगळे होतात, म्हणून भगवंतांनी या सत्संगाला परमहंसांची सभा असे म्हटले आहे. जिथे आत्म्यासंबंधी, दरअसल (मूळ) आत्म्यासंबंधी बोलले जात नाही पण धर्मासंबंधी बोलले जाते, रिलेटिव्ह धर्माच्या गोष्टी बोलल्या जातात ती हंसांची सभा आहे. तिथे हित-अहिताबद्दल बोलले जाते, शुभासंबंधी बोलले जाते, त्यांनादेखील कधीतरी मोक्ष मिळेल. जिथे समजदार लोक एकत्र आलेले नसतात, आणि केवळ वाद-विवादच करत राहतात, एकमेकांचे ऐकायलाही तयार नसतात, अशा सभेला कावळ्यांची सभा म्हणतात! हंसांच्या सभेत तर खूप जन्म घालवत आलेला आहेस, पण एक जन्म जरी 'परमहंसांच्या' सभेत बसलास तरी मुक्ती मिळेल! परमहंसांच्या सभेत फक्त आत्मा आणि परमात्मा, या दोनच गोष्टींबदल बोलले जाते आणि अशा सभेला तर देवी-देवता सुद्धा नेहमी हजर असतात. प्रत्येक जीवमात्राची अंतिम इच्छा आत्मज्ञान हीच असते. लोक तप आणि त्याग करून करून मेले, पण भगवंत भेटले नाहीत. ज्यांची भावना खरी असते त्यांचीच भगवंतांशी भेट होते. इथे आमच्याकडे जे हवे असेल ते मिळते. जिथे सर्व गोष्टींचे सविस्तर खुलासे होतात तो परमसत्संग. आमची पदवी काय आहे? माहीत आहे का? आम्ही 'मोक्षदाता पुरुष' आहोत. तुम्ही जे मागाल ते आम्ही देऊ! फक्त तुम्हाला काम साधून घेता आले पाहिजे.

## अभ्युदय फळ आणि आनुषंगिक फळ

कविराज नी गायले आहे :

*'सत्संग छे पुण्य संचालित, चाहूँ अभ्युदय आनुषंगिक.'*

(सत्संग पुण्यकर्माच्या बळावर मिळतो. मला सांसारिक अभ्युदय आणि मोक्षफळ हवे आहे.)

'ज्ञानी पुरुषांना' भेटलात की तेव्हापासून दोन प्रकाराची फळे

तुम्हाला मिळतात: एक 'अभ्युदय', म्हणजे संसारात अभ्युदय होत जातो, संसारफळ मिळते आणि दुसरे 'आनुषंगिक' म्हणजे मोक्षफळ मिळते! दोन्ही प्रकारची फळे एकदमच मिळतात. जर दोन्ही फळे एकदमच मिळत नसतील तर मग ते 'ज्ञानी पुरुष' नाहीत. इथे तर लोकांचे अगणित 'ओव्हर ड्राफ्ट्स' (पूर्वजन्मीची कर्मे) आहेत म्हणून ते लोकांना समजत नाही. इथे सत्संग करत आहात त्यामुळे ते सगळे 'ओव्हर ड्राफ्ट्स' पूर्ण होतील.

इथे फक्त मोक्षफळच मिळते असे नाही. तसे जर असते तर अंगावर नेसायला कपडेसुद्धा मिळाले नसते. पण नाही, तसे नाही. मोक्षफळ आणि संसारफळ दोन्हीही एकदमच मिळतात.

राजाकडे नोकरी मिळाली आणि राजाला भेटायला गेलो तर दृष्टीफळ मिळते. नोकरीचा पगार मिळतो ते सेवाफळ. पण राजांची दृष्टी पडल्यावर राजा विचारतात, 'तुम्ही कुठे राहता?' ती माहिती मिळाल्यावर राहायला चांगली जागा मिळते हे दृष्टीफळ. फक्त राजाच्या दृष्टीमुळे एवढे फळ मिळते तर 'ज्ञानीं पुरुषाच्या' दृष्टीमुळे काय मिळणार नाही? राजाला तर स्वत:च्याच गरजा आहेत, त्याला राज्य वाढवण्याची हाव आहे, याउलट हे 'ज्ञानी पुरुष' आहेत ते संपूर्ण निरिच्छक दशेत असतात. मग त्यांच्या दृष्टीफळाबद्दल काय बोलावे? इथे सत्संगात आला की निश्चितच दृष्टीफळ घेऊनच जातो. सेवाफळापोटी तर राजाकडून 250 रुपये मिळतात आणि राजाला नमस्कार केल्याने तर दृष्टीफळ मिळते!

'ज्ञानी पुरुषां'चे दर्शन घेतले म्हणून तर सर्वात उत्तम अभ्युदय आणि आनुषंगिक अशी दोन्ही फळे मिळतात आणि म्हणूनच उत्तम प्रकारची शांती लाभते! संसारातील विघ्ने नडत नाहीत आणि मोक्षाचे काम देखील होते, दोन्ही गोष्टी एकदमच होतात.

जर वीतराग भगवंतांचे नीट दर्शन घेता आले तर ती भगवंतांची मूर्ती का असेना, तरी पण त्यापासून अभ्युदय आणि आनुषंगिक दोन्ही प्रकारची फळे मिळतात! पण ते 'दर्शन' कसे घ्यायचे हे 'ज्ञानी पुरुष'

समजावून सांगतील तेव्हाच घेता येते. नाही तर लोकांना दर्शन कसे घ्यायचे तेच समजत नाही ना? 'ज्ञानी पुरुष' मूर्तामूर्त आहेत, म्हणून त्यांच्या दर्शनाने अभ्युदय आणि आनुषंगिक दोन्ही फळे मिळतात. 'ज्ञानी पुरुषां'चे दर्शन मिळण्यासाठी कोटी जन्मांच्या पुण्याचा चेक वटवायला लागतो. हजारो वर्षातून क्वचितच 'ज्ञानी पुरुष' प्रकट होतात आणि त्यात देखील हे तर अक्रमज्ञानी, म्हणजे कुठलेही जप नाही, तप नाही आणि असे कुठलेही कष्ट न घेता मोक्ष! ज्ञानी पुरुषांकडून दृष्टीफळ मिळते आणि त्यापासून मोक्षफळ मिळते आणि सेवाफळातून संसाराचा अभ्युदय होतो. येथे परम विनयात राहणे हीच सेवा! येथे 'ज्ञानी पुरुषांना' काय कमी असते? त्यांना काहीच नको असते, ते कशाचेही भिकारी (इच्छुक) नसतात. फुलांचा विनय तीच सेवा! ज्यांना सांसारिक अडचणी आहेत त्यांनी फुले वाहिली तर त्यांच्या अडचणी दूर होतील. भगवंतानी भावपूजा आणि द्रव्य पूजा दोन्ही एकत्र ठेवल्या आहेत. फूल तोडून तुम्ही त्याचा वास घेतलात किंवा इतर काही उपयोग केलात तर त्यात जास्त नुकसान आहे, आणि जर फक्त तोडले तर तोडण्याचे नुकसान आहे. परंतु जर देवाला वाहाण्यासाठी फुले तोडली तर त्यात विशेष फायदा आहे. भावपूजेची अभ्युदय आणि आनुषंगिक अशी दोन प्रकारची फळे आहेत. ही फळे मोक्षही प्राप्त करवितात आणि सोबत वैभवही मिळते. संसारातील लोकांनी द्रव्यपूजा करावी आणि आत्मज्ञानींनी फक्त भावपूजा करायची आहे. पण या काळात या क्षेत्रातून मोक्ष होणे शक्य नाही अजून दोन-तीन जन्म घ्यावे लागणार आहेत. म्हणून द्रव्य पूजा आणि भावपूजा, दोन्ही प्रकारे पूजा केली पाहिजे.

महावीर भगवंतांच्या काळी अभ्युदय आणि आनुषंगिक दोन्ही शब्द (प्रचलित) होते आणि त्याची फळे पण मिळत होती. पण त्यांच्या पश्चात् हे शब्द केवळ शब्दच राहिले. जर आनुषंगिक फळ मिळाले तर अभ्युदय फळ त्याच्याबरोबर आपोआपच मिळते. कारण अभ्युदय हा तर बाय-प्रॉडक्ट (मूळ उत्पादनाबरोबर निर्माण होणारे दुसरे उत्पादन) आहे. ज्यांनी अंतिम स्टेजची आराधना केली, आत्म्याची आराधना केली, त्यांना तर बाय-प्रॉडक्टच्या रूपाने त्यांच्या सांसारिक गरजेच्या वस्तू

आपोआप मिळतात. 'ज्ञानी पुरुष' मिळाले आणि सांसारिक अभ्युदय झाला नाही तर माणूस बुवा होऊन जाईल.

इथे सत्संगात बसल्या-बसल्या कर्मांचे ओझे हलके होत जाते आणि बाहेर तर कर्मांचे ओझे वाढतच जाते. बाहेर फक्त अडचणीच अडचणी आहेत. 'आम्ही' तुम्हाला गॅरंटी देतो की जितका वेळ तुम्ही 'इथे' सत्संगात बसले असाल तितका वेळ व्यवसायात तुमचे कधीच नुकसान होणार नाही. तुम्ही ताळेबंद (हिशोब) मांडलात तर शेवटी फायदाच झाला आहे असे कळेल. हा सत्संग म्हणजे काही सामान्य सत्संग नाही. केवळ 'आत्म्यासाठी' जो वेळ देतो त्याचे संसारात नुकसान कसे होईल? निव्वळ फायदाच होतो. पण असे समजेल तर काम होईल ना? इथे सत्संगात कधी कधी एक वेळ अशी येते की लाख वर्षांचे देवगतीचे आयुष्य मिळते किंवा महाविदेह क्षेत्रात जन्म होतो! या सत्संगात बसला म्हणजे त्याचे इथे येणे कधीच वाया जात नाही. आणि सध्या तर किती उत्तम काळ आला आहे! महावीर भगवंतांच्या वेळी पायी चालत सत्संगाला जावे लागे, आणि आज तर तुम्ही बसने किंवा ट्रेनने लगेच सत्संगात येऊ शकता! अशा काळात स्वरूपज्ञान मिळाले मग (मोक्षाचे) कामच करून घ्यायचे ना! आत्मानुभवी पुरुष कुठेच नसतात. आणि जर कधी असे पुरुष प्रकट झाले तर कार्यसिद्धी करूनच घ्या. आत्मानुभवी पुरुषाखेरीज दुसऱ्या कोणाचीही वाणी मनाला इतकी शांती देणारी नसते, आणि अशी असणारही नाही.

या जगात फक्त एकच रियल सत्संग आहे, बाकी सर्व ठिकाणी रिलेटिव्ह सत्संग आहे. ज्यांना काही तरी हवेच असते. ते लक्ष्मीचे भिकारी असतात किंवा विषयविकारांचे भिकारी असतात, मानाचे भिकारी असतात किंवा शिष्य मिळविण्याचे भिकारी असतात. जर एखाद्या दुकानावर 'क्रोधाचे दुकान' अशी पाटी लावली असेल तर तिथे शांती मिळेल का? शोधायला गेलो तर काहीही निष्पन्न होणार नाही. म्हणून दुकानदाराला प्रथम विचारून तिथे नक्की काय मिळते याची खात्री करून घ्यावी. गुरुजींना सांगावे की 'तुम्ही सांगितलेत तर इथे सहा महिने, बारा

महिने बसून राहायला मी तयार आहे, पण मला मुक्ती मिळणार असेल, मोक्ष मिळणार असेल, माझ्या सर्व चिंता दूर होणार असतील तरच, नाही तर मी आताच दुसरे दुकान (गुरु) शोधून काढतो.' अनंत जन्म अशा वेगवेगळ्या दुकानातच हप्ते भरले आहेत ना! तरी पण मोक्ष काही मिळाला नाही. म्हणून गुरुजींना प्रथमच सांगा, 'मोक्ष देणार अशी खात्री देत असाल तरच हप्ते भरेन.' असे त्यांना थोडेसे डिवचल्यामुळे काही हिंसा होत नाही आणि तुमच्या अशा बोलण्याने गुरु जर रागावले तर तुम्हाला तुमच्या प्रश्नाचे उत्तर लगेचच मिळाले, असे समजून घ्या! या दुकानात मोक्ष मिळणार नाही हे निश्चित आहे. तरी पण गुरुजींना खुश करून, शंभर-दोनशे रुपये खर्च करून एवढ्यातच भागले असे समाधान मानून तुम्ही तिथून निसटा.

सत्संग कशासाठी आहे? सगळ्यांचे समाधान होण्यासाठी, तुमची सर्व कोडी सोडविण्यासाठी आहे! मोक्षाचा मार्ग जाणून घेण्यासाठी आहे!!

## कुसंग, फक्त दुःखच देतो

दोन प्रकारचे संग : एक कुसंग आणि दुसरा सत्संग. सत्संगात गेल्यामुळे प्रकाश मिळतो, आतील जळजळ (दुःख) दूर होते आणि कुसंगामुळे जळजळ उत्पन्न होते. कुसंग फटाक्यासारखा असतो. जसे फटाके हवेत उडवले तर धोतर जळते आणि सर्व भाजून निघते, तसेच कुसंगाचेही आहे. कुसंग म्हणजे साक्षात आग आहे असे समज. एवढे पथ्य पाळावे. पथ्य पाळले तर रोग परत उत्पन्न होत नाही. हॉटेलमध्ये खाणे, ते वाईट परमाणू आहेत, तेसुद्धा कुसंगच आहे! या संसारात जाणूनबुजून काहीही कापले जात नाही, अजाणतेपणीच कापले जाते. म्हणून सतत सावध राहा.

सगळे जग म्हणजे कुसंग आहे आणि त्यात पुन्हा कलियुगाचा प्रभाव! सत्संगामुळे कुसंगाचे परमाणू निघून जातात आणि नवीन शुद्ध परमाणूंचा प्रवेश होतो.

जेव्हा सगळी दुःखे जातील तेव्हा खरा सत्संग घडला असे म्हणता

येईल. जर दु:खे संपली नाहीत तर मात्र कुसंग घडला असेच म्हणायचे. चहात साखर टाकली तर चहा गोड लागायलाच हवा ना? तसेच सत्संगामुळे सर्व दु:खे जायलाच हवीत!

कुसंगामुळे दु:खे उत्पन्न होतात. कुसंग दु:खे पाठवितो आणि सत्संग सुख देतो. आणि इथला सत्संग तर मोक्ष देतो! ज्ञानी पुरुष साऱ्या जगाची निष्ठा, जगात भटकणाऱ्या वृत्तींना दूर सारून ब्रह्मात बसवतात! आणि मग तुमचे साध्यच पूर्ण होते. हा तर मुक्तीचा धर्म आहे. 'आम्ही' 'स्वरूपाचे ज्ञान' दिले की मग निरंतर स्वत:चे स्वरूपच आठवत राहते. नाही तर कोणालाच स्वत:च्या स्वरूपाची आठवण नसते. पण प्रकट 'ज्ञानी पुरुष' तो दीप प्रज्वलित करतात म्हणून साक्षात्कार होतो.

कुसंगामुळे पापे शिरतात आणि मग ती दु:ख देतात. रिकामा असेल अशावेळी जर कुसंग मिळाला तर त्या कुसंगामुळे दुसऱ्यांची निंदा-नालस्ती करण्यात वेळ जातो आणि त्याचा दोष लागतो. ही सगळी जी दु:खे आहेत ती अशामुळेच आहेत. आपल्याला दुसऱ्यांबद्दल बोलायचा काय अधिकार आहे? आपण फक्त आपले पाहावे. कोणी दु:खी असेल किंवा सुखी असेल, त्याची उठाठेव करण्याची आपल्याला गरज नाही. लोक तर राजाला पण नावे ठेवतात. ज्यांच्याशी आपला काडीमात्र संबंध नाही, अशी ही परकी गोष्ट! त्यातून द्वेष आणि स्पर्धा, आणि याचीच तर ही सर्व दु:खे आहेत. भगवंत म्हणतात की तू वीतराग हो. तू आहेसच वीतराग, मग हे राग-द्वेष कशासाठी? तू नावात पडशील तर राग-द्वेष उत्पन्न होतील ना? आणि निनावी झालास की तू वीतराग होशील!

भगवंतांनी सांगितलेले, जोपर्यंत ज्ञानी पुरुष मिळत नाहीत तोपर्यंत तू ज्या तलावात पडला आहेस तिथेच पडून रहा. दुसऱ्या तलावात जाऊ नकोस. दुसऱ्या तलावात पोहायला गेलास तर तिथल्या चिखलात घुसशील आणि त्या तलावाच्या चिखलाचे पण डाग लागतील. 'ज्ञानी पुरुष' मिळाले तर मात्र आहेस त्या तलावातून ताबडतोब बाहेर निघ. 'ज्ञानी पुरुष' लाभले तर सर्व तलावांचा तू मालक होशील आणि तुझे 'मोक्षाचे' काम पूर्ण होईल. ते तुला तलावातून तारतील.

'ज्ञानी पुरुषां'च्या संगतीत ज्ञानींचा 'पुट' (वास, लेप) लागतो. जर हिंगाचा पुट एखादा पातेल्याला लागला असेल तर सहा महिन्यानंतरही त्या पातेल्यात खीर केली तरी ती नासते. जर साध्या हिंगाचा पुट सहा-सहा महिने टिकत असेल तर कुसंगाचा पुट लागला तर तो तुमचे अनंत जन्म बिघडवेल. त्याचप्रमाणे ज्ञानी पुरुषांच्या सत्संगाचा पुट सुद्धा दीर्घकाळ टिकतो, पण सत्संग मात्र जास्तीत जास्त वेळ मिळाला पाहिजे.

ही दुनिया चालविण्यासाठी असे तर करावेच लागते अशी एकदा जरी भावना उत्पन्न झाली की बस, संपलेच सगळे! संस्कार बिघडल्याशिवाय राहतच नाहीत. हे संस्कार कुठल्या क्षणी बिघडतील ते सांगता येत नाही. हे ज्ञान असेल तरच संस्कार टिकतील.

समजा एखादा संत पुरुष असेल, संपूर्ण आयुष्य संत पुरुषाप्रमाणेच राहत असेल आणि दुधाचा व्यवसाय करत असेल त्याला जर एखादी व्यक्ती म्हणाली, 'जरा बघ तरी, तुझा शेजारी किती पैसे कमावतो आणि तुझे कसे जेमतेम चालू आहे!' त्यावर संत पुरुष विचारतील, 'त्यांनी कसे कमाविले?' मग ती व्यक्ती म्हणेल, 'दुधात पाणी घालून.' या एका वाक्याचा जर त्या संत पुरुषावर परिणाम झाला तर मग झाले! या एकाच वाक्याने त्याच्या आयुष्यभराच्या सर्व संस्कारावर पाणी फिरते!

आपल्याला 'विषयांत' गुंतायचे नसेल तरी लोक गुंतवतात. हा सगळा संगदोषाचा परिणाम आहे. जर चांगला संग लाभला तर असे काही होणार नाही. चांगल्या संगामुळे फुले मिळतात आणि कुसंगामुळे काटे मिळतात! जर कोणी दारू पिण्याचा आग्रह केला तर नकार देण्यासाठी *तायफा* (खूप मोठे नाटक) करावा लागतो. तेव्हा सरळ सांगावे, 'डॉक्टरांनी पिऊ नको म्हणून सांगितले आहे किंवा दारू प्यायलो तर मला घरातच घेणार नाहीत.' काहीही करून ती गोष्ट टाळावी, कुसंगापासून दूर राहणेच उत्तम.

'वीतराग' भगवंत किती पक्के असतील की ते समजून-उमजून सुटले. ज्यांना उन्हाचा ताप सहन होत नाही ते चिखलात पडून राहतात.

भगवंत म्हणतात, 'उन्हात तापलेला बरा पण चिखलात पडला तर संपलेच सगळे!' तापलेला कधी न कधी तरी थंड होईल, पण चिखलात पडलेला कधी सुटेल? एकदा चिखलात पडला की कषायांचे संग्रहस्थान उभे होईल. उलट उन्हात तापला तर कषाय तरी कमी होत जातील. इथे तर जो चिखलात पडलेला आहे त्याचीच संगत मिळते आणि त्यामुळे तर आपले कषाय कमी असतील तरी त्याचे कषाय आपल्याला चिकटतील. एकदा चिखलात पडलात तर पुन्हा खूप जोरदार प्रतिक्रमण करावे की मी पुन्हा कधीही पडणार नाही. आणि जर त्या मिथ्यात्वीच्या संगतीत पडले तर ते कषायी असल्यामुळे आपल्यातही कषाय उत्पन्न झाल्याशिवाय राहतील का?

सत्संग निरंतर मारत राहिला तरी त्यास चांगले म्हणायचे. याउलट कुसंगाने जरी लाडू–आमटी–भात खाऊ घातले तरी त्याचा काही फायदा नाही. एकच तास कुसंग मिळाला तर बऱ्याच काळ केलेल्या सत्संगाला जाळून टाकतो. या जंगलात झाडे वाढविण्यासाठी पंचवीस–पंचवीस वर्षे लागतात पण त्यांना जाळावयास किती वेळ लागतो? 'ज्ञानी पुरुष' तरी किती करणार? रोज काळजीपूर्वक जंगलात रोपे लावतात, त्यांची खूप जोपासना करून त्यांना वाढवितात. मग त्यांना रोज सत्संगरूपी पाणी पाजतात. पण कुसंगरूपी अग्नीला त्या रोपांना जाळून टाकायला किती वेळ लागणार? कुसंग न मिळणे हेच सर्वात मोठे पुण्य. कुसंगी लोक काय आपल्याला असे सांगतात की तुम्ही आमची संगत करा. त्यांना तर दूरून नमस्कार करून वरकरणी वागावे. सच्चिदानंद संग सर्वकाही करू शकतो, केवलज्ञानाची प्राप्ती करवितो!

## प्रकट ज्ञानींचा सत्संग

दादांचा संग, हा संग तर शुद्धात्म्याचा संग आहे. सर्वात शेवटचा संग इथे दिला जातो. इथे केवलज्ञानाखेरीज दुसरे काहीही दिले जात नाही. परंतु हा काळ असा आहे की 360 डिग्री इतके पूर्णत्व आपल्याला गाठता येत नाही. ज्ञान मात्र तेच आहे त्यात फरक नाही, पण काळामुळे जसे प्रवर्तन झाले पाहिजे तसे होत नाही.

या ज्ञानात आम्ही जे पाहिले आहे ते सर्व आमच्याजवळ आहे. ज्ञानी पुरुष क्वचित कधी भेटतात तेव्हा ज्या काही शंका विचारावयाच्या असतील त्या विचारून घ्या. तेव्हा जर स्वत:चे (मोक्षाचे) काम करून घेतले नाही तर काय फायदा? 'ज्ञानी पुरुष' म्हणजे त्यांना जाणायचे काहीच शिल्लक नसते.

'ज्ञानी पुरुषांचा' व्यवहार पाहण्यासाठी एकत्र येणे ते म्हणजे सत्संग.

**प्रश्नकर्ता :** मुक्तीसाठी भक्ती करणे आवश्यक आहे का?

**दादाश्री :** जर मुक्तीमार्गाच्या साधनांसह भक्ती केली तर मुक्तीसाठी आवश्यक साधने लाभतील.

जो कशाचाही भिकारी (तीव्र इच्छुक) असेल त्याचा सत्संग मोक्षासाठी उपयोगी नसतो, देवगती मात्र मिळू शकते. मोक्षासाठी मात्र जो कशाचाही भिकारी नसेल त्याचा सत्संग करणे आवश्यक आहे.

'व्यवस्थित शक्तीला' सांगावे की 'आम्हाला सत्संगाची सोय करून दे.' मग ती तशी व्यवस्था करील. आणि जर आपण तसे सांगितले नाही तर करणार नाही.

आत तर अपार सुख बरसत आहे, पण तरी बघा, बाहेर सुखासाठी लोक कसे धडपडत असतात आणि ते सुद्धा कपट करून!

काहीही करून सत्संगातच राहाण्याचा प्रयत्न करायला हवा, किंवा मग घरी बसून राहायला हवे. पण क्षणभर देखील कुसंगात राहू नये. कुसंग म्हणजे विषच आहे.

आपले कष्ट वाया जाऊ नयेत, आपले दिवस, आपले आयुष्य वाया जाऊ नये यासाठी सतत सत्संगात राहता येईल असा प्रयत्न करीत राहिले पाहिजे. या सत्संगात तुम्ही गुंतलात तर तुमचे कामच झाले समजा. साऱ्या जगातील लोकांवर कुसंगाचाच प्रभाव आहे. देवळात किंवा उपाश्रयात जाऊ शकत नाहीत, व्याख्यान-प्रवचनाला जाऊ शकत

नाहीत आणि त्यासाठी *कढापा-अजंपा* (बैचेनी-अशांती) करत राहतात की इच्छा असूनही देवळात जाऊ शकत नाही. कारण काय? तर जिकडे-तिकडे कुसंग आहे, तो जाऊ देत नाही. आणि आपल्या इथे तर भरपूर सत्संग! इथे आल्यावर जगाचा अगदी विसरच पडतो! जगात खूप गोष्टी अनिवार्य असतात पण ज्याला सत्संग अनिवार्य असेल त्याला अति पुण्यशाली म्हणतात! आणि तुम्हाला तर अलौकिक सत्संग मिळाला आहे! जगात तर अनिवार्यपणे कुसंगच आहे. आता अनिवार्य सत्संग उपलब्ध झाला आहे, अनिवार्य सत्संग आणि तोसुद्धा घरी बसल्या बसल्या!

या सत्संगात तुम्ही चल-बिचल होऊ लागलात तर खूप मोठी जोखीम ओढवेल. प्रापंचिक व्यवहारात चल-बिचल एकवेळ चालेल पण धर्मात जर चल-बिचल केली तर आत्मा हरवून बसेल, आवरणे पडतील.

जगाचा नियम आहे की जिथे रोज सत्संग होतो तिथे दहा-पंधरा दिवसानंतर तो जुना वाटू लागतो पण या ठिकाणी, जिथे प्रत्यक्ष परमात्मा प्रकट झाले आहेत, तिथे शंभर वर्षे बसलात तरी हा सत्संग नित्य अपूर्व वाटेल, रोजच नवीन वाटेल. भगवंत म्हणाले, 'जिथे परमज्योती प्रकट झाली आहे तिथे सत्संग करा.'

बाहेर तर लोक पाच दिवस धोतर नेसतात आणि मग त्यांना त्या धोतराचा कंटाळा येतो. बाहेरचा बोध वासित वाटतो, वासनामय वाटतो. भगवंतांनी सांगितले होते की 'जिथे तीर्थंकर असतात किंवा आत्मज्ञानी असतात तिथला बोध निर्वासनिक (वासनारहित) असतो.' बाकी, त्यांच्यानंतर मात्र बोध वासितच असतो. ज्याला किंचितमात्रही संसाराची वासना आहे त्यांचा बोध 'वासी' म्हटला जातो, वासनायुक्त बोध म्हटला जातो. जो असा बोध देतो त्याला स्वत:लाच जगात मोठे बनण्याची वासना असते. जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' नसतात तोपर्यंत लोकांना अशा वासनामय बोधाचा आधार असतो, अर्थात वासित बोधाचा आधार असतो. पण जेव्हा ज्ञानी प्रकट होतात तेव्हा मात्र वासनारहित बोधाचा आधार मिळतो. आणि त्यामुळे मोक्ष लाभतो! या सत्संगात महात्मा एक-दुसऱ्यांचे

काम करतात पण अभेदभावाने, जणू काही ते आपलेच काम आहे अशाप्रकारे!

हा बाहेरचा बोध 'वासी' (शिळा) नाही पण वासित असतो. शिळे तर जरा उशीरासुद्धा पचते परंतु हा तर वासनायुक्त. जिथे वासना नसेल तिथे मोक्ष मिळतो.

वासनायुक्त बोधाचे दोन प्रकार आहेत, दुसऱ्यांसाठी वासना करणे याला चांगले म्हटले आहे परंतु जर स्वत:साठी वासना केली तर यासाठी भगवंतानीसुद्धा मनाई केली आहे.

जे अगदी मनापासून व्याख्यान ऐकायला जातात त्यांना 'अभ्युदय फळ' मिळते. अशी माणसे व्याख्यानकारांची चूक काढत नाहीत. आणि व्याख्यानकारांची इच्छा पण मनापासून महावीर भगवंतांची आज्ञा पाळण्याचीच आहे ना! मनापासून ऐकायची इच्छा आहे असे केव्हा म्हणायचे? तर जेव्हा तो ऐकणारा कधीही चुका काढणार नाही तेव्हा. पण हे तर अतिशहाणे झाले आहेत त्यामुळे व्याख्यानात चुका काढतात.

जगात कितीही चांगला सत्संग असो, 'श्रद्धा' ठेव असे बुद्धीला कितीही समजावले तरी ती ऐकते का? तिथे मन बुद्धी सर्व वेगळे होतात. याउलट इथे या सत्संगात बुद्धी आपणहून श्रद्धा ठेवते. इथे मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार सर्वच एक होतात जिथे सर्व एकमत होतात तिथे मोक्ष उभा आहे!

या 'दादां'साठी कवी काय म्हणतात?

*'परमार्थे सत्संग देता, पोताना पैसा खरची,*
*जगहिते गाळी काया, जोता ना ठंडी गरमी.'*

(दादाश्री स्वत:चे पैसे खर्च करून परमार्थासाठी सत्संग करतात. जगाच्या हितासाठी देह झिजवितात, थंडी-गरमी याचीसुद्धा पर्वा करत नाहीत.)

लोक देखील थंडी-गरमीची पर्वा कुठे करतात? पहाटे चार वाजता

उठून आई मुलासाठी कांदेपोहे करते. 'माझ्या मुलाला शाळेत जायचे आहे, त्याला खायला नाश्ता तर हवा ना?' म्हणून मी बनवते. असे ती म्हणते. आणि उलट मुलगा काय म्हणतो, 'रोज रोज तेच तेच काय बनवितेस आई?'

पाहा, लोक सुद्धा गरमी–थंडीची पर्वा करतात का? पण केलेले सगळे व्यर्थ जाते ना? सगळी शक्ती चुकीच्या मार्गावर वाया जाते. मोक्षाचेही काम होत नाही आणि संसाराचेही काम होत नाही! घरात पण कोणी केलेल्या कामाची चाड ठेवीत नाही. उलट म्हणतात, 'ही अशीच आहे, ही तशीच आहे!' उलट अपमानच पदरी पडतो!

सत्संगात, 'दादांच्या' परम सत्संगात जाण्याची सतत इच्छा होत राहणे याला अंतराय दूर होण्याची सुरुवात झाली असे म्हणता येईल आणि तिथे जाण्यात अडथळा–विघ्न येत नाही याला अंतराय दूर झाले असे म्हणतात.

इथे सत्संगात बसून समजण्यात जो काही फरक जाणवत असेल तो सविस्तर समजून घ्यावा, तोच पुरुषार्थ आहे. ज्ञान हळूहळू पॉइंट टु पॉइंट नीट समजून घेतले पाहिजे. सत्संगापेक्षा सर्वात आणखी सोपा मार्ग म्हणजे या 'दादांना' खुश ठेवणे!

जर 'आमचा' प्रत्यक्ष संग मिळाला नाही तर 'आमच्या' वाक्यांचा (वाणीचा) संग, तो पण सत्संगच आहे. सत्संग म्हणजे शुद्धात्म्याच्या रिलेटिव्हचा संग. बाकी कोणाचा संग करण्यासारखा नाही. मग ते साधू असोत, संन्यासी असोत की अन्य कोणी असोत. आपल्याला फक्त आतला माल (शुद्धात्मा) पाहायचा. बाकी कुठेच नजर जाण्यायोग्य नाही. गाय, म्हैस यांच्यांत शुद्धात्मा आहे अशी खात्री झाल्यानंतर त्यांच्यात शुद्धात्मा दिसला पाहिजे ना? तसे जर दिसत नसेल तर तो *प्रमाद* (तन्मयता, अजागृतपणा) म्हटला जाईल.

ज्यांच्या घरी 'दादां'ची आरती केली जाते, त्यांच्या घरचे वातावरण खूपच उच्च प्रकारचे असते. आरती म्हणजे विरती आहे! ज्यांच्या घरी

आरती होते त्यांच्या घरचे वातावरण पूर्ण बदलून जाते. तो स्वत: तर 'शुद्ध' होत जातोच आणि शिवाय मुलाबाळांवर पण उत्तम संस्कार होतात. ही आरती जर योग्य प्रकारे केली तर घरात 'दादा' प्रत्यक्ष हजर होतात! आणि 'दादा' हजर झाले की सर्व देवी-देवता पण हजर होतात! आणि सर्व देवी-देवतांची कृपा पण लाभते. घरात आरती तर रोजच केली पाहिजे आणि त्यासाठी वेळ निश्चित केली तर अधिकच उत्तम! एक छोटेसे भांडण देखील घराचे वातावरण बिघडवून टाकते. पण ही 'आरती' त्याची प्रतिपक्षी आहे, त्यामुळे काय होते? तर वातावरण सुधारून शुद्ध आणि पवित्र होते.

आरतीच्या वेळी आम्ही तुम्हाला जी फुले वाहतो ती सगळी आम्ही प्रथम देवी-देवतांना वाहिलेली असतात आणि तीच फुले आम्ही तुम्हाला वाहतो. देवांना वाहिलेली फुले जगात कुठेच माणसांना वाहिली जात नाहीत. ही फक्त तुम्हालाच वाहिली जातात. त्यामुळे मोक्ष तर होतोच, शिवाय सांसारिक विघ्ने पण दूर होतात.

आत्म्याचा स्वभाव तर संगात असूनही असंगी आहे. या असंगी आत्म्यावर कसलाच डाग पडत नाही, पण ते ज्ञानी पुरुष लाभले आणि त्यांनी असंग आत्मज्ञान म्हणजे दरअसल (मूळ) आत्मा प्राप्त करवून दिला तरच. नाही तर या संसारात तू जी जी क्रिया करशील त्याचा मळ बसल्याशिवाय राहणारच नाही आणि मोक्ष मिळणार नाही. म्हणून त्वरा कर आणि 'ज्ञानी पुरुषाला' गाठ.

❖❖❖❖❖

# त्रिमंत्र विज्ञान

ऋषभदेव भगवंत, की जे सर्व धर्मांचे मुख आहेत, सर्व धर्मवाले ज्यांना मान्य करतात त्यांनी सांसारिक विघ्ने टाळण्यासाठी लोकांना सांगितले की त्रिमंत्र एकत्र म्हणत जा. त्रिमंत्रात पंच परमेष्टि नवकार मंत्र, ॐ नमो भगवते वासुदेवाय आणि ॐ नम: शिवाय – हे तीनही मंत्र एकत्र म्हणा असे भगवंतानी सांगितले होते. त्यांनी सांगितले होते, 'तुमच्या सोयीप्रमाणे तुम्ही देवळे वाटून घ्या. पण तीनही मंत्र मात्र एकत्र म्हणा.' प्रत्येक धर्माचे रक्षण करणाऱ्या शासन देवी-देवता असतात. हे तीनही मंत्र एकत्र म्हटलेत तर सर्व धर्माच्या देवी-देवता आपल्यावर प्रसन्न राहतात. जर एकच मंत्र म्हटलात तर इतर धर्मांच्या देवी-देवता खुश राहणार नाहीत. आपल्याला तर सर्वांना खुश ठेवून मोक्षाला जायचे आहे ना! आजकाल लोकांनी मंत्र वाटून टाकले आहेत. मंत्रच काय, एकादशा सुद्धा वाटल्या आहेत! शैव लोकांची एकादशी वेगळी, आणि वैष्णवांची एकादशी वेगळी. जैन लोकांनी देखील तिथींवरती वाद-विवाद करून वेगवेगळे पंथ स्थापन केले आहेत! मोक्ष हवा असेल तर निष्पक्षपाती व्हावे लागते. सर्व रिलेटिव्ह धर्माची सत्ता मान्य करून रियलचे-आत्म्याचे काम साध्य करायचे आहे!

**प्रश्नकर्ता :** मंत्र म्हणजे काय?

**दादाश्री :** मंत्र मनाला आनंद देतात, मनाला शक्ती देतात आणि मनाला 'तर' (शांत) करतात! याउलट भगवंतांनी दिलेले मंत्र सर्व विघ्ने

दूर करतात. आम्ही दिलेला त्रिमंत्र सर्व विघ्नांचा नाश करतो. या त्रिमंत्राच्या आराधनेमुळे भाल्याची जखम देखील सुई टोचल्यासारखी वाटते. बाकी, सर्व मंत्र तर मनाला 'तर' करतात!

**पश्नकर्ता :** या नवकार मंत्रात तर सर्व शास्त्रे सामावतात.

**दादाश्री :** असे जर असते तर 'महावीर भगवंतांनी' गौतमस्वामीकडून 45 आगमे लिहून घेतली नसती. फक्त एकच मंत्र देऊन ते मोकळे झाले असते. नवकार मंत्र काय करतो की तुमच्यावर येणारी संकटे दूर करतो. शंभर मण वजनाचा दगड डोक्यावर पडणार असेल तर एक बारीकसा खडा लागून ते संकट दूर होते.

**प्रश्नकर्ता :** त्रिमंत्र म्हटल्यामुळे कर्मे हलकी होतात?

**दादाश्री :** हो, त्रिमंत्र म्हटल्यामुळे कर्मबंधने हलकी होतात मदतही मिळते. कारण शासन देवी-देवता मदत करतात. पण मंत्र मन-वचन-कायेच्या एकाग्रतेने बोलले पाहिजेत, तरच त्यांचे फळ मिळते. जेव्हा इतर सर्व जण झोपलेले असताना तेव्हा मन-वचन-कायेची स्थिरतापूर्वक विधी वगैरे होऊ शकते. पण जर झोपलेले लोक उठले तर आत अस्थिरता येते. माणसे उठली की त्यांची स्पंदने सुरू होतात. आणि आत्मा स्व-पर प्रकाशक आहे. नगीनदास उठले आणि त्यांनी तुमची आठवण काढली तर लगेच स्पंदने सुरू होतात आणि तुम्हालाही त्यांची आठवण येते. म्हणून तर लोक पहाटे चार वाजता उठून विधी, मंत्र वगैरे बोलण्याचा नियम करतात ना!

**प्रश्नकर्ता :** 'दादा' नवकार मंत्राचा अर्थ काय?

**दादाश्री :** 'नमो अरिहंताणं' याचा अर्थ अरिहंत भगवंत ज्यांनी क्रोध-मान-माया-लोभरूपी सर्व शत्रूंचा नाश केला आहे, आणि तरी देहासहित येथे विचरत आहेत, त्यांना मी नमस्कार करतो. 'नमो सिद्धाणं' म्हणजे सिद्ध भगवंतांना नमस्कार करतो. जे मोक्षात विराजमान आहेत, ते म्हणजे सिद्ध भगवंत. सिद्ध भगवंत आणि अरिहंत भगवंतात काही

फरक नाही, फक्त अरिहंत भगवंतांना देह आहे आणि सिद्ध भगवंत विदेही आहेत. तिसरे आचार्य भगवंत यांना नमस्कार. जे स्वत: संपूर्ण आत्मज्ञानी आहेत आणि दुसऱ्यांना ज्ञानदान देतात ते आचार्य भगवंत. नंतर उपाध्याय भगवंताना नमस्कार. उपाध्याय म्हणजे ज्यांनी आत्मज्ञान प्राप्त केले आहे आणि पूर्णत्वाकडे जाण्यासाठी अजून ज्यांचा स्वत:चा अभ्यास चालू आहे आणि त्याबरोबरच दुसऱ्यांना उपदेश देऊन त्यांच्याकडून अभ्यास करून घेतात ते उपाध्याय भगवंत. 'नमो लोए सव्व साहुणं' म्हणजे या लोकातील सर्व साधूंना नमस्कार. पण साधू कोण? भगवे-पांढरे वस्त्र परिधान करतात ते का? नाही. आत्मदशा साध्य करतात तेच साधू. 'ऐसो पंच नमुक्कारो' या अशा पाचहींना नमस्कार करतो. 'सव्व पावप्पणासणो' म्हणजे सर्व पापांचा नाश करणारा आहे. 'मंगलाणं'च सव्वेसिं', पढमम् हवई मंगलम्-सर्व मंगलात सर्वोच्च असा हा प्रथम मंगल आहे.

भगवंतांनी सर्व प्रकारचे धर्म दिले आहेत. मोक्षाचा मार्ग पण दिला आहे. आणि शुभाशुभाचा मार्ग पण दिला आहे. त्यांनी अशुद्धाचा मार्ग मात्र दिलेला नाही. मंत्र म्हटल्यामुळे कर्मबंधने हलकी होतात. यामुळे चिकट कर्माचा चिकटपणा कमी होऊ लागतो. पण हे मंत्र म्हणणे हाही एक एविडन्स (संयोग) आहे. ज्ञानी भेटतात ते तर एक निमित्त आहे. जर काही परिवर्तन व्हायचे असेल तरच निमित्त मिळते! कर्म कोणाला सोडत नाही, पण विघ्न टळणार असेल तरच ते निमित्त समोर येते. आणि मंत्रात विघ्ने दूर करण्याचे सामर्थ्य असते. ब्राह्मण लोक ज्योतिष पाहून मुलीची पत्रिका बनवितात. नंतर त्यांना विधवा होण्याचा योग दिसला तर ते विवाहाची वेळ बदलतात. तरी पण मुलगी विधवा होणे ठरलेले असेल तर ते होणारच. त्यात ते काहीच बदल करू शकत नाहीत! माणूस जागा आहे तोपर्यंत सावध राहील. पण झोपेत तो काय करणार? असे आहे हे जग!

तुम्ही जैन आहात, मग तुम्ही नवकार मंत्र म्हणता का?

**प्रश्नकर्ता :** हो रोज म्हणतो.

**दादाश्री :** मग काहीच त्रास होत नसेल ना?

**प्रश्नकर्ता :** पण संसारात त्रास तर असणारच ना?

**दादाश्री :** निकाल जज (न्यायाधीश) देतात की कारकून?

**प्रश्नकर्ता :** जज.

**दादाश्री :** मग हा नवकार मंत्र देखील जजने दिलेला असला पाहिजे. नवकार मंत्र समजून म्हणता की न समजताच म्हणता? जर तूप ओळखता येत नसेल तर तूप कसे आणणार? दुकानदार तुम्हाला तूप म्हणून काही पण देतील. मंत्र जर 'ज्ञानी पुरुषांनी' दिला असेल तरच तो योग्य फळ देईल. हे त्रिमंत्र आमच्या आज्ञेनुसार म्हटलेत तर सांसारिक विघ्ने दूर होतील, स्वत: धर्मात राहील आणि मोक्षदेखील प्राप्त करील.

'सर्व साधुभ्यांम् नम:' असे म्हणतात आणि शिवाय नवकार मंत्र पण म्हणतात, परंतु नवकार सध्या इथे नाहीच. आम्ही ज्यांना स्वरूपाचे ज्ञान दिले आहे त्यांचा समावेश नवकारमध्ये होतो. बाकी, नवकार तर तिथे, इतर क्षेत्रात पोहोचतो. म्हणून नवकार म्हणायचे आहे. यांना नवकार मंत्र पोहोचत नाही, कारण ते तर असेच समजतात की 'मी आचार्य आहे.'

**प्रश्नकर्ता :** आम्ही मनातल्या मनात नवकार मंत्र म्हटले तर तो आपोआप पंचपरमेष्टि भगवंताना पोहोचतो का?

**दादाश्री :** नवकार मंत्र असा आहे की तुम्हाला तो ज्यांना पोहोचावा असे वाटते त्यांना तो पोहोचतो.

इतके सगळे लोक नवकार मंत्र म्हणतात आणि विचारतात, 'आमच्या काळज्या दूर कशा होत नाहीत!' अहो, खरा नवकार मंत्र कोणी म्हणतच नाही. हे लोक ज्यांना उद्देशून हा मंत्र म्हणता त्यांना ते स्वीकारण्याचा अधिकार नाही. हे त्यांच्या नावाचे पत्र नाहीच. आता जर त्यांच्या नावाचे पत्र नसेल आणि त्यावर आपण c/o उपाश्रय लिहून

पत्र पोष्ट केले तर साहजिकच तो त्यांच्यापर्यंत पोहोचत नाही. मग ते पत्र डेड लेटर ऑफिसला जाते. म्हणजे आपले पत्र वाया गेले आणि काळज्या मात्र तशाच कायम! म्हणून आपण असे ठरवायचे की हिंदुस्तानात, आपल्या देशात, भरत क्षेत्रात जिथे खरा नवकार असेल तिथे हा नवकार पोहोचो. यथार्थ साधूंना, यथार्थ आचार्यांना आणि यथार्थ उपाध्यायांना मिळो. या तिघांपर्यंतच पोहोचवायचे आहे, सिद्ध आणि अरिहंत यांना तर तो पोहोचतोच.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे नवकार मंत्र असा आपोआप पोहोचतो का?

**दादाश्री :** हो, आपोआपच पोहोचतो. आता हे आपण 'नमो अरिहंताणं' म्हणतो पण आपल्याला हे माहीत आहे की आज भरतक्षेत्रात कोणी अरिहंत नाही, म्हणून मग तो आपोआप अरिहंत जिथे आहेत तिथे पोहोचतो. आणि नमो सिद्धाणं, सिद्धांना पण नक्कीच पोहोचतो, परंतु जितका भावपूर्ण बोलतो त्या प्रमाणात तो पोहोचतो.

हे सगळे नीट समजले पाहिजे. जैन धर्म म्हणजे समजणे, समजून गाणे, असे म्हणतात. हे आपले नरसिंह मेहता झाले ना, ते नागर (ब्राह्मण) वस्तीत राहायचे. ते रोज पहाटे लवकर उठून भूपाळी (भक्तीगीते) गात असत. इतर नागर त्यांची टिंगल करत. ते रोज सकाळी दात घासत घासत नरसिंह मेहताजी जी गीते म्हणायचे तीच गीते मोठ्यामोठ्या आवाजात म्हणत. म्हणजे सगळी गल्ली गाऊ लागे. लोक त्यांची नक्कल करत करत तसेच गाऊ लागले, म्हणून नरसिंह मेहतानी म्हटले,

'मी गायलेले जे गातील, त्यांना खूप मार पडेल, पण माझे गाणे समजून जो गाईल तो वैकुंठात जाईल.'

माझे गायलेले गाऊ नकोस, तुला त्याचा खूप त्रास भोगावा लागेल.

त्याच प्रकारे नवकार मंत्र पण समजून म्हणा. हा मंत्र कुठे-कुठे, कोणा-कोणाला पोहोचतो ते समजून तसा तो पोहोचवा. भगवंतानी साधू

कोणाला म्हटले आहे! जे आत्मदशा साधतात ते साधू. आपण महावीर भगवंतानी सांगितलेले खरे मानावे. आपण 'नमो वीतरागाय' असे म्हटले पाहिजे.

हा नवकार मंत्र तुम्ही म्हणता, तो समजून म्हणा. हे ब्रह्मांड खूप मोठे आहे, वीस तीर्थंकर आहेत, पंच परमेष्टि खूप आहेत. मंत्र नीट समजून म्हटल्याने, मग जरी तो अज्ञानी असेल तरी त्याला ॐ चे फळ मिळेल. तीर्थंकर कोणाला म्हणतात? पंच परमेष्टि कोणाला म्हणतात? हे सगळे समजून म्हणालात तर ॐचे फळ मिळेल.

## ॐची यथार्थ समज

**प्रश्नकर्ता :** दादा, ॐ म्हणजे काय?

**दादाश्री :** नवकार मंत्र पूर्ण एकाग्रचित्ताने म्हणणे म्हणजे ॐ आणि 'मी शुद्धात्मा आहे' या (ज्ञानासहित) नवकार मंत्र म्हणणे म्हणजे ॐकार बिंदु संयुक्तम्.

*ॐकार बिंदु संयुक्तम्, नित्यम् ध्यायन्ति योगीन:*
*कामदम्, मोक्षदम् चैव, ॐकाराय नमो नम:*

(योगी लोक *ॐकार* मंत्राचे बिंदुसह शुद्धात्म्याच्या जाणीवेसह सतत ध्यान करतात. त्यामुळे प्रापंचिक भरभराट आणि आध्यात्मिक भरभराट होते. मोक्ष प्राप्त होतो. अशा या ॐकाराला नमस्कार असो.)

तोंडाने नवकार मंत्र म्हणतो, पण जर खऱ्याखुऱ्या भावाने, एकाग्रतेने तो म्हटला तर सुंदर रीत्या म्हटला जाईल, आणि तो सर्व पंचपरमेष्टि भगवंतांपर्यंत पोहोचेल. नुसते ॐ म्हटले तरी तो पंचपरमेष्टि भगवंतांना पोहोचतो आणि नवकार मंत्र म्हटला तरी त्या सर्व भगवंतांना पोहोचतो. सर्व प्रकारचे शत्रुत्व संपण्यासाठी 'आम्ही' तिन्ही मंत्र एकत्र आणले आहेत. कारण शुद्धात्मा झाल्यानंतर निष्पक्षपातीपणा उत्पन्न होतो. 'मी शुद्धात्मा आहे' हे आपले लक्ष्य 'ॐकार बिंदु संयुक्तम्' आहे आणि त्याचे फळ काय? तर मोक्ष. आता इतर ठिकाणी ॐचे जे काही चालत

आहे ते त्यांच्यासाठी आवश्यकच आहे, कारण जोपर्यंत खरी गोष्ट समजून येत नाही तोपर्यंत स्थूल वस्तूचा आधार घेणे आवश्यक आहे. सूक्ष्म दृष्टीने 'ज्ञानी पुरुष' तेच 'ॐ' आहेत. ज्यांनी आत्मा प्राप्त केला आहे अशा सत्पुरुषांपासून ते पूर्णाहुती स्वरूप पुरुषांपर्यंत त्या सगळ्यांना 'ॐ' स्वरूप म्हणतात. आणि त्याहून पुढे गेल्यावर मुक्ती होते. मुक्ती कधी होते? 'ॐकार बिंदु संयुक्तम्' होते तेव्हा. येथे आम्ही तुम्हाला ज्ञान प्रकाश देतो तेव्हा 'ॐकार बिंदु संयुक्तम्' होतो. आणि एकदा ॐकार बिंदु संयुक्तम् झाला की मोक्ष प्राप्त होते. मग त्या व्यक्तीचा मोक्ष कोणी अडवू शकत नाही!

नवकार मंत्राला संन्यस्त मंत्र म्हटला जातो. जोपर्यंत संसार व्यवहारात आहे तोपर्यंत नवकार, 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' आणि 'ॐ नमो शिवाय' हे तीनही मंत्र म्हणायचे असतात, आणि संन्यास घेतल्यानंतर फक्त नवकार मंत्र म्हटला तरी पुरेसे आहे. इथे मात्र लोक संन्यास घेण्याआधीच फक्त नवकार मंत्र धरून बसले आहेत.

❖❖❖❖❖

# जग - वेड्यांचे हॉस्पिटल

एक व्यक्ती माझ्याकडे आली. मला म्हणाली, 'मी तुमचे दर्शन -बिर्शन सगळे करीन, पण मला मोक्ष नको आहे.' मी म्हणालो, 'ठीक आहे, नाही तरी मोक्ष आमच्याकडे कुठे इतक्या स्वस्तात मिळतो? आणि तुला जे हवे आहे ते तर तुझ्याजवळ आहेच ना - बंधन!'

आपण जर वेड्यांच्या हॉस्पिटलात गेलो, आणि तिथे एखादा वेडा हात हलवून खाणाखुणा करत असेल आणि आपण त्याला सांगितले 'अरे, असे हात वर खाली करू नकोस' तर त्याला वाटेल की हा वेड्यासारखे का बोलत आहे? त्यांना शहाणा कोण वाटतो? त्यांना तर त्यांचे वेडेच शहाणे वाटतात ना! कारण त्या वेड्यांना एकमेकांचे बोलणे समजते आणि शहाण्यांची भाषा त्यांना वेगळी वाटते म्हणून शहाणा माणूस त्यांना वेडा वाटतो! आपल्याला जर त्यांच्या भाषेत बोलणे जमत असेल तरच वेड्यांच्या हॉस्पिटलात राहावे. साऱ्या जगाचेच कन्वर्जन (रूपांतर) वेड्यांच्या हॉस्पिटलमध्ये झाले आहे. मी 1942 मध्ये म्हणत असे की हळूहळू जगाचे कन्वर्जन मेंटल (वेड्यांचे) हॉस्पिटलमध्ये होत चालले आहे. एक दिवस पूर्ण जगच मेंटल हॉस्पिटल होईल! आज आम्हाला तसेच वाटत आहे की हे वेड्यांच्या हॉस्पिटलमधील वेडे आहेत का? होय, तेच आहेत. तुम्ही म्हणता काय आणि ते उत्तर देतात काय? कोणाच्याच प्रश्नात आणि उत्तरात काही सुसंगतीच लागत नाही. असे सगळे हे वेड्यांच्या हॉस्पिटलसारखे झाले आहे. मग ह्या वेड्यांच्या हॉस्पिटलबद्दल काय बोलावे? दिवसभर लोकांचा वेडेपणाच तर चालू

असतो! एक साधा कप फुटला तर त्यावरून केवढा आरडाओरडा करतात, मग यांना वेडे म्हणायचे नाही तर काय म्हणायचे? माणूस तर कसा असावा? मानवतावादी असावा, समंजस असावा. तो तर कप फुटला असेल आणि त्या फुटलेल्या कपाबद्दल पुन्हा जर कोणी बोलू लागला की आज तर कप फुटला, तर तो म्हणेल अरे, पुन्हा पुन्हा ती गोष्ट करू नये. कप फुटला तर फुटला, पुन्हा पुन्हा तीच गोष्ट उगाळत बसणे हा मूर्खपणा आहे, त्यामुळे पुनरुक्ति दोष लागतो. हा तर दिवसभर रडगाणे गात बसतो की कप फुटला.

एखाद्या मिलमालकाचे बूट हरवले तर दिवसभर 'माझे बूट हरवले, बूट हरवले' असे तो करत बसतो. अरे, तू मिलमालक असून एवढ्याशा बुटांची काळजी करत बसतोस? रोजच बूट हरवले तरी त्याबद्दल कोणालाही सांगू नये. माझेच पुण्य वाईट असावे म्हणून बूट चोरीला जातात असे समजावे. उलट ही गोष्ट तू गुप्त ठेवायला हवी. पण इथे तर लोक एक कप फुटला तरी भांडतात, नाही का? बऱ्याच ठिकाणी तुम्ही हे पाहिलेच असेल ना?

अनंतकाळ पितळेलाच सोने समजून खरेदी केली आहेस पण जेव्हा विकायला जाशील तेव्हा तुला कळेल की चार आणे सुद्धा कोणी देणार नाही. स्वत:ची दु:खे संपली तरच समजा की इथे ज्ञानी आहेत. पण जर दु:खे संपली नसतील तर अशा ज्ञानींचा काय उपयोग? आपली दु:खे तशीच राहातात, आपले समाधान होत नाही, तर मग अशा दुकानात बसून राहण्यात काय फायदा? हे सगळे बुद्धीवादाचे तुक्के आहेत त्यांचा दोष नाही. लोकांना सार-असार याचे भानच नाही. ज्योतीवर पाखरे येऊन पडतात त्यात ज्योतीचा काय दोष? ज्ञानाची उच्च प्रकारची गोष्ट सांगितली आणि ती जर त्यांना समजली नाही तर ते म्हणतात, 'इकडे नको, चला आपण दुसरीकडे जाऊ या.' उच्च प्रकारची गोष्ट आहे, पण स्वत:ला समजत नाही म्हणून दुसरीकडे जातात. ही तर बुद्धू माणसांची टोळकी आहेत, मोठमोठे बुद्धीशाली बुद्धू बनून जातात.

**प्रश्नकर्ता :** वेड्यांचे हॉस्पिटल म्हटले आहे तसेच ना?

**दादाश्री :** हो, खरेच वेड्यांचे हॉस्पिटलच आहे, नाही तर वेड्यांचे हॉस्पिटल म्हणणे शोभते का? नाही शोभत. पण अती झाले की बोलल्याशिवाय राहवत नाही. की 'वेड्यांच्या हॉस्पिटलसारखी दशा झाली आहे.' जणू वेड्यांच्या हॉस्पिटलात ठेवले आहेत असे दिसतात. सार-असाराचे भानच राहिले नाही, हित-अहित याचा विचारच केला नाही. माझे हित कशात आहे आणि अहित कशात आहे याचा विचार पण मनात येत नाही. यांना सार-असार, हित-अहित काहीच कळत नाही.

या वेड्यांच्या हॉस्पिटलात मन पण वेडे झाले आहे, वाणी पण वेड्यासारखी झाली आहे आणि देहाची वागणूक सुद्धा वेडी झाली आहे. हे तीनही भाग वेडे झाले आहेत तर ते आता कसे दुरुस्त करणार? एखादा भाग वेडा झाला असेल तर तो दुरुस्त करू शकतो. पण हे तीनही भाग कुठून इंपोर्ट (आयात) करणार? ते कुठे मिळतच नाहीत ना? त्यामुळे वेड्यांच्या हॉस्पिटलात एकमेकांशी आपटून आपटून सगळे भोवरे तुटतील! सगळे भोवरे आदळून-आपटून तुटतील. म्हणजे हे जग वेड्यांचे हॉस्पिटल झाले आहे.

पूर्वी हिंदुस्तानात शंभर घरे असतील तर फार तर त्यातली पन्नास घरे दुर्जनांची असत आणि पन्नास घरे सज्जनांची असत. त्या पन्नासपैकी चार-पाच घरातच थोडे फार क्लेश असत बाकी पंचेचाळीस घरात क्लेश नसत. असा हा हिंदुस्तान! जर समजदार लोकांचा हिंदुस्तान असता तर पंचेचाळीस घरात क्लेश राहिला नसता. शंभरातील पन्नास घरे तर दुर्जनांची असतील, ती तर मान्य आहे. क्लेश-कलहातच जगत. पण बाकीच्या पन्नास घरांपैकी फक्त पाचच घरात थोडेफार क्लेश असत. बाकीची पंचेचाळीस घरे क्लेशरहित असत. शेकडा पंचेचाळीस टक्के, पण आज तर हजार काय लाखातून सुद्धा एक घर क्लेशरहित सापडणार नाही. म्हणून आम्ही वेड्यांचे हॉस्पिटल म्हणतो. कारण धर्मस्थानात तर संपूर्ण शांतताच असली पाहिजे, या उलट तिथे तर आता संपूर्ण अशांतीच आहे!

एक साहेब रोज मोटारीने ऑफिसला जात. एक दिवस त्यांची मोटार बिघडली होती, म्हणून ते चालत निघाले होते. चालता चालता

स्वत: बोलत होते आणि स्वत:च ऐकत होते. मला आश्चर्य वाटले की 'हा कसला नवीन रेडिओ वाजत आहे?' मी त्यांच्याजवळ जाऊन त्यांना विचारले, 'साहेब, आज मोटर नाही? आणि आपण काय बोलत होता?'

तेव्हा ते म्हणाले, 'काही नाही, काहीच नाही.'

ते स्वत:ला लपवत होते.

अहो, मनात विचार करायला हरकत नाही, पण ते विचार तोंडातून बाहेर सुद्धा निघतात? एवढे मोठे ऑफिसर आणि त्यांची ही स्थिती! असे मनातले विचार तोंडातून बाहेर पडले तर किती धोकादायक आहे! लोक विचारतील, 'काय बडबडत चालला आहात?' हा तर विचार करत होता शेठवर गोळ्या झाडायच्या. पण हा विचार जर तोंडातून बाहेर पडला तर काय होईल? सगळी भांडी अशीच गळकी आहेत. एकसुद्धा अखंड भांडे नाही. सासू-सुनेचे भांडण झाले तर दोघीजणी स्वत:शीच मोठमोठ्याने बडबडत बसतात. यांना तर फुटकी भांडी म्हणायची.

आपले भांडे कसे पाहिजे? एक पण भोक नसलेले, लहानसेही भोक असता कामा नये. त्यातून पाणी पण झिरपता कामा नये. झिरपणे कशाला म्हणतात? तर समोर बसलेला व्यक्तीला समजते की 'हा काय बडबडतो आहे?' असे होता कामा नये. अरे, मुलाला देखील बापाला काही विचारायचे असेल तर म्हणेल, 'आता नको, नंतर विचारू,' कारण बाप स्वत:शीच बडबडत असेल तर मुलगा पण समजून जाईल ना!

त्या ऑफिसरचे बॉस (वरिष्ठ)बरोबर काहीतरी भांडण झाले असणार, म्हणून ते बडबडत होते. बॉस म्हणजे कोण? जो वाद घालतो तो बॉस. आपण जर आपल्या हाताखाली कोणाला ठेवले तर मग कोणीतरी आपला बॉस पण होणारच ना?

आजचे जग खरोखरच वेड्यांच्या हॉस्पिटलसारखे झाले आहे. त्यांचे मत कधी बदलेल तेच सांगता येणार नाही. घटकेत म्हणतील, 'तुम्ही खूप हुशार आहात!' आणि थोड्याच वेळाने, 'तुम्ही बेअक्कल आहात!' असे पण सर्टिफिकेट तुम्हाला मिळू शकेल! अशा मेंटल

लोकांच्या सर्टिफिकेटला कशाला घाबरायचे? ते काय बोलतील त्याचा काहीच नेम नाही. वेड्यांसोबत शहाणी माणसे राहायला गेली तर राहू शकणार नाहीत. सध्या तर सगळेच वेडे आहेत, या गाई-म्हशीच शहाण्या आहेत.

रस्त्यावर वेगवेगळे लोक पाहिले तर आपण त्यांच्याबरोबर वर्षभर राहावे असे कधी वाटते का? अरे, सध्या तर वांती होईल अशी माणसे आहेत. चारी युगात चाळून गाळून शिल्लक राहिलेला माल, त्यांच्याशी काय नाते ठेवणार! तू पण कोंडा आणि तो पण कोंडा.

आज तर समक्ष सांगितलेला निरोप पण बरोबर मिळत नाही. यांना विचारतो एक आणि ते सांगतात दुसरेच! असे सगळे विचित्र झाले आहे!

महावीर भगवंतांच्या वेळी लोक खूप सरळ-सौम्य प्रकृतीचे होते, म्हणून भगवंत खूप जपून बोलत. गाईंचा कळप असेल आणि फक्त एकाच आरोळीने जर सगळ्याच गाई पळून जात असतील तर जास्त ओरडावे लागेल का? नाही. भगवंताच्या वेळी असे लोक होते. म्हणून भगवंतानी फक्त भ्रांती म्हटले आणि आणखी काही बोलले नाहीत. कित्येक गाईंच्यासमोर काठी घेऊन गेलो तरी त्या हलत नाहीत. त्यांना मेंटल (वेड्या) म्हणावे लागेल ना? तसेच हे लोक पण मेंटलच आहेत ना! घरचे खातात, घरचे कपडे घालतात आणि तरी काळजी करतात. घरचे का खातात? तर अंत:करण शांत राहावे म्हणून. अंत:करण शांत का ठेवायचे आहे? तर वेडेपणा कमी करण्यासाठी, पण लोक तर घरचे खाऊन-पिऊन चिंता करतात. छान पॅन्ट घालून त्याचा रुबाब दाखवत हिंडतो. अरे, तुझ्याकडे बघायला कोणालाच वेळ नाही. सर्वजण आपापल्या काळजीतच असतात. डोळे उघडे असले तरी त्यांना तू दिसत नाही. तू फाटके कपडे घालून गेलास तरी तुझ्याकडे बघायला कोणी रिकामे नाही. इतके सुंदर मुंबई शहर, तिथे पॅन्टला मागून टपल्या मारत हिंडत असतात. हे मुंबई शहर किती सुंदर आहे! चकचकीत सुंदर रस्ते! भगवंतांच्या काळात तर चालून चालून जीव थकून जायचा. आता इतक्या सुंदर सुखसोयी उपभोगताना

किती मजा वाटते. तरी कोणाला याचा नीट उपभोग पण घेता येत नाही. मुंबईत तू भगवे कपडे घालून गेलास तरी तुझ्याकडे बघायला कोणाला वेळ नाही. त्याच्या नेहमीच्या सहवासातील मित्र देखील विचार करील की दिसतो आहे सात सारखा पण बरोबर नऊ आहे म्हणून हा आपला मित्र नाही, कोणीतरी दुसराच असेल! (मित्रालाच ओळख पटत नाही.)

## हिंदुस्तान - 2005 साली वर्ल्डचे केंद्र

जग वेड्यांचे हॉस्पिटल का झाले आहे? कारण संस्कृत भाषा जाणणाऱ्यांना खूप विकृत शिकविले गेले. संस्कृत भाषावाल्यांना प्राकृत चालू शकते पण विकृत मात्र चालणार नाही. विकृत भाषेमुळे हे वेड्यांचे हॉस्पिटल बनले आहे. पण या हॉस्पिटलमधील जे वेडे आहेत, त्यांना जी मुले होतील ती मात्र शहाणी असतील खरोखरच समजदार निघतील. म्हणून ही वेडी माणसे जिवंत आहेत ते चांगलेच आहे. त्यांची मुले समजूतदार असतील. ती मुले केस वाढवतील, असे करतील, तसे करतील पण शेवटी समंजस निघतील. कारण वेड्यांच्या हॉस्पिटलमधील वेड्यांची मुले आहेत, म्हणून आता सगळी मुले चांगली होतील!

आणि हिंदुस्तान 2005 मध्ये साऱ्या जगाचे केंद्र झालेले असेल! या मेंटल लोकांच्या मुलांना बाहेरची माणसे विचारतील, 'आम्ही कसे खाऊ? आम्ही काय-काय शिकू?' असे विचारायला येतील. या मेंटल लोकांची मुले शहाणी होतील. म्हणून ही माणसे आज मेंटल झाली हे एका दृष्टीने बरेच झाले. ही माणसे मेंटल झाल्यामुळे फायदा काय झाला? तर मागची जी सगळी संस्कृती होती ती पूर्णपणे ॲबॉलिश (नष्ट) झाली, धुऊन साफ झाली. हे सर्व चांगलेच झाले आहे. वाईट काहीच झाले नाही. मागचे संस्कार सडून नष्ट झाले होते!

## तिरस्कार वृत्तीच ऱ्हासास कारणीभूत

**प्रश्नकर्ता :** मी माझ्या आईला पाहतो आणि नातीला पाहतो, त्या दोघांत मला इतका फरक दिसतो की विचारूच नका! आजकालची प्रजा सगळी बिघडलेली वाटते.

**दादाश्री :** आणि तुमच्या आजोबांच्या वेळी, तुमचे आजोबा तुमच्याबद्दल काय म्हणायचे?

**प्रश्नकर्ता :** आता मी जे बोललो तेच ते म्हणत होते.

**दादाश्री :** आपण बाजारातून सुंदर छान दुधीभोपळा घेऊन आलो, तरी भाजी करायची म्हणून तो चिरावा लागेलच ना! आणि जर चिरायला लागलो तेव्हा असे म्हणणार की 'चिरू नका, त्याचे सुंदर रूप बिघडून जाईल.' परंतु जर भाजी खायचीच असेल तर रूप विसरावेच लागेल. कुठल्याच काळी नव्हता अशा प्रकारे आज भारत डेव्हलप (प्रगत) होऊ लागला आहे. हे लोक एकदम अनाचारी आणि दुराचारी झाले होते. शंभरात 2 ते 5 टक्के लोकच चांगले असायचे. बाकीचे सर्व पूर्ण दिवस संशयात आणि क्लेश-कलह व एकमेकांचा तिरस्कार करण्यातच घालवायचे. खालच्या जातीच्या लोकांचा तिरस्कार करत दुसऱ्यांचा तिरस्कार करत, सख्ख्या भावाच्या वागण्यात जरा कमतरता आढळली तर लगेच त्याचा तिरस्कार, शिष्याचे वर्तन किंचित चुकीचे वाटले की त्याचा तिरस्कार, ठायी-ठायी तिरस्कार. तिरस्कार करण्यातच लोक वेळ घालवायचे. इतका हा देश बिघडलेला होता. आजकालच्या लोकात सुधारणा आढळते त्यामुळे पूर्वीच्या लोकात जो बिघाड होता तो बिघाड आजच्या लोकात कमी होत चालला आहे. त्यांच्यातील पहिल्या प्रकारचा जंगलीपणा कमी झाला आहे आणि दुसऱ्या प्रकारचा जंगलीपणा उत्पन्न झाला आहे. पूर्वीच्या लोकांना हे पसंत पडले नाही. जुन्या काळात केवळ तिरस्कारच तिरस्कार होता. हिंदुस्तानची परिस्थिती फारच बिघडलेली होती. त्यांना धर्मनिष्ठ म्हणणे शक्यच नव्हते. कारण विचारसरणीच योग्य नव्हती. पीठ नीट दळलेलेच नव्हते. असेच भरडून लाडू बनवून टाकले! नीट दळल्या-मळल्या शिवायच. पण आता नीट दळले जात आहे. (सुधारत आहे).

आजकालच्या मुलांकडे बघून 'असे' वाटते पण ते तसे नाहीत. आता त्यांची नीट घडवणूक होत आहे. जेव्हा योग्य देखभाल केली जाते, शिस्त लावली जाते तेव्हा असेच होत असते. आता तुमचा मुलगा जरी हॉटेलमध्ये खायला निघाला तरी तुम्ही त्याचा तिरस्कार करीत नाही.

आणि पूर्वी तर मुलगा हॉटेलमध्ये गेला तर तुम्ही घरी जाऊन विष खाण्याची तयारी करत असा, किंवा त्याला विष देत असा, अरे, हॉटेल बरोबर तुमचे काय वैर आहे? कशी माणसे आहात तुम्ही? महावीर भगवंतानी असे डिप्रेस (निराशवादी) व्हायला सांगितले होते का? वीतरागांनी काय सांगितले आहे? अबॉव्ह नॉर्मल इज दी पॉइजन ॲन्ड बिलो नॉर्मल इज दी पॉइजन. (प्रमाणापेक्षा जास्त हेही विषसमान आहे, प्रमाणापेक्षा कमी हे सुद्धा विषसमान आहे.) सगळ्याच गोष्टी अबॉव्ह नॉर्मल (असंतुलित) झाल्या होत्या. नुसता द्वेष, द्वेष आणि द्वेषच, दुराचार इतका अधिक वाढला होता की त्याला पारावरच राहिला नव्हता. त्यापेक्षा आजकालचा हा दुराचार चांगला म्हणावा लागेल. हा खुला दुराचार आहे. सगळा देशच असा झाला होता आणि त्यामुळे इतका त्रास भोगावा लागला. संपूर्ण देशाला अजूनही भयंकर कष्ट पडत आहेत.

एखादी स्त्री विधवा झाली की तिच्या बद्दल तिरस्कार तिरस्कार आणि तिरस्कारच. विधवेचा तर जंगली लोक देखील तिरस्कार करत नाहीत. कारण ती बिचारी विधवा झाली आहे, तिचा सगळा आधार तुटला आहे, निराधार झाली आहे, सर्व प्रकारे दुःखी आहे. पतीच्या आधारे सुख होते तेही राहिले नाही. म्हणून तिच्या बद्दल सर्वांना करुणा वाटली पाहिजे. पण तिचासुद्धा या लोकांनी भयंकर तिरस्कार केला. अरे, जगात कुठेही नसेल असा तिरस्कार इथे या लोकांनी हरिजनांसाठीही केला! सगळीकडे तिरस्कारच. सख्ख्या भावाचाही तिरस्कार-भयंकर तिरस्कार केला. आता अशा देशाला सुधारलेला देश कसे म्हणणार?

आम्ही जेव्हा लहान होतो तेव्हा सगळी म्हातारी माणसे काय म्हणायची? 'अरे, ही मुले किती बिघडली आहेत?' मग मी त्यांना विचारायचो, 'तुम्हाला तुमचे आजोबा काय म्हणत?' त्यांचे असे म्हणणे असते की, 'जसे आम्ही केले तसेच तुम्ही करा.' अनादीकाळापासून असेच चालत आलेले आहे. म्हणतात 'आम्ही केले तसे तुम्ही करा.' अहो, पण तसे करून तुमच्या चेहऱ्यावर कुठे तेज दिसत आहे? दिवसभर नुसते कषायच तर करत असता. कोणाकडे जेवायला बोलावले तर त्यांना

असेच वाटते की आज तर आपल्याला फुकट जेवण मिळणार आहे. हाच विचार त्यांच्या मनात येतो. या भारतातील डेव्हलप्ड माणसे जेव्हा कोणाकडे जेवायला जातात तेव्हा आज मोफत जेवण आहे! चांगले भरपूर जेवूया! असे ज्ञान त्यांना लगेच प्रकट होते. अशी आहेत ही डेव्हलप्ड (सुधारलेली) वृद्ध मंडळी! ही सर्व मंडळी अशी डेव्हलप्ड होती. यांच्यातील काही जण तर एवढे हुशार की असे जेवणाचे आमंत्रण मिळाले तर घरी एक-दोन दिवस उपास करत, तेवढेच घरचे वाचले! असा विचार ते करत. आणि मग जेवायला बसत तेव्हा एवढे खात की दोन दिवस खायची गरजच पडत नसे. इतके भरपूर खात. त्यांना असेच वाटत असे की मी फुकटच खात आहे, फ्री ऑफ कॉस्ट! बघा त्यांची दानत कशी होती ती! आणि त्याचीच सगळी दुःखे ते आज भोगत आहेत. आणि ज्या विधवांचा छळ केलेला त्या स्त्रिया आज त्यांच्या घरात मुली होऊन जन्माला आल्या, आणि त्यांनीच घटस्फोट घेऊन माहेरची धूळधाण केली, माहेर बरबाद करून टाकले. अरे, बापाला मारले सुद्धा आहे, त्या सर्व विधवा बायकाच आता या सर्वांना छळत आहेत! माझ्या घरी का नाही अशा मुली आल्या? कारण मी तसा नव्हतोच ना!

विधवा स्त्रियांना पूर्वी गंगास्वरूप असे म्हणत. त्यांचा तिरस्कार का करावा? आणि म्हणतात काय? 'गंगास्वरूप'. आणि एखादी विधवा स्त्री समोरून गेली तर म्हणतात, 'मला अपशकुन झाला. चांगले शुभ काम करायला निघालो होतो पण अपशकुन झाला.' असे हे लोक! अशा लोकांना कुठली शिक्षा द्यायची? पण भगवंत काय म्हणतात, 'हा अधिकार आपल्या हातात घेऊ नका. भगवंत लोकांना सांगतात की हा अधिकार तुम्ही तुमच्या हातात घेऊ नका.' निसर्गनियमच आहे. निसर्ग म्हणतो, 'अशा लोकांचा हिशोब मी पूर्ण करतो, तो आमचा नियमच आहे, तो अधिकार तुम्ही आपल्या हातात घेऊ नका.' आज हे सर्व लोक खूप त्रास सोसत आहेत. हे जे सर्व त्रास सोसत आहेत ते स्वतः दिलेला त्रासच सोसत आहेत. आणि हे तर डेव्हलप (प्रगत) होत आहेत, अंडरडेव्हलप्ड तर नाहीत. तरीपण आपण योग्य आचरण शिकवले पाहिजे. जर घरी एखादी मुलगी वयात येत असेल तर तिला म्हटले

पाहिजे, 'तू आता मोठी होत आहेस, हे जग खूप फसवणारे आहे. तुला सुख हवे असेल तर प्रत्येक पाऊल विचारपूर्वक उचल. आणि पाऊल उचलण्यापूर्वी मला विचार. तू विचारलेस तर मी रागावणार नाही. सल्ला म्हणून विचार.' जर तुम्ही वकीलाचा सल्ला घ्यायला तयार असता तर मग वडील काय वकीलांपेक्षा वाईट आहेत का? वकीलापेक्षा तर वडिलांवर जास्त विश्वास असतो ना?

हिंदुस्तान सुधारलेला नव्हता. अगदी मनातून काढून टाकण्यासारखा होता. एकदम पॉइजनस-विषारी झाला होता. या देशाची दशा तरी पाहा कशी झाली आहे ते! पण त्यात कोणाचा दोष नव्हता. कोणीही दोषी नसतो. एविडेन्सेस निर्माण होतात त्यातून सरकमस्टेंसीस निर्माण होतात. आता हळूहळू बदल होऊ लागला आहे.

आता एकदम उच्च कोटीचे घडू लागले आहे. अजब स्थानावर जाऊ लागले आहे! जगात हिंदुस्तान खूप उंचावर जाऊ लागला आहे! नाही तर आज आपण इथे मोक्षाबद्दल बोलू शकलो असतो का? मोक्ष हा शब्द बोलण्याचा आणि लिहिण्याचा पण अधिकार कोणाला राहिला नव्हता. हे सर्व साधू, आचार्य, महाराज होते ना, ते सगळे अति शहाणे झाले होते. कदाचित त्यातील दोन-पाच जण अपवाद असतीलही. बाकी इतके अतिशहाणे की भिंत बांधायला वीट म्हणून पण उपयोगाला येणार नाहीत असे! खेंगार (जास्त भाजलेल्या) विटांसारखे! अतिशहाणे म्हणजे खेंगार वीट. कच्च्या विटेला, शहाण्याला आमरस वीट म्हणतात.

भगवंताकडे तर शहाणपणाची गरज आहे. याउलट सगळे जण अतिशहाणे झाले होते, जनावरांपेक्षाही वाईट आचरण झाले होते. जनावरांना दुराग्रह नसतो, कदाग्रह नसतो, हठाग्रह नसतो, मग माणसात तर ते असूच नयेत. आणि असले तरी ते मर्यादित प्रमाणात असेल तोपर्यंत मनुष्यपणा आहे, कारण डेवलप्ड आहेत. जनावरांपेक्षा यांच्यात अधिक प्रमाणात आग्रह असतो, तो जर काही मर्यादेपर्यंत असला तर ठीक आहे, नाही तर जनावरांपेक्षाही वाईट असे म्हणावे लागेल! या स्थितीला मनुष्यपणा कसे म्हणायचे? चुकीचे आग्रह, चुकीचे दुराग्रह, चुकीचे

कदाग्रह धरून बसणे, स्वत:च्या मान्यतेनुसार धर्म समजून धर्माचे मूल्यांकन करणे! 'धर्म' कसा असला पाहिजे? लहान मुलापासून पण शिकण्याचा प्रयत्न केला पाहिजे, जनावरांपासून पण हे शिकण्याचा प्रयत्न केला पाहिजे की, त्यांच्यात कोणकोणते गुण आहेत?

ह्या कुत्र्याकडे पाहा, त्याला फक्त एकच दिवस पुरी दिली तर तीन दिवस आपण दिसले की तो शेपटी हलवत येतो. यात त्याचा हेतू लोभाचा आहे, पुन्हा पुरी मिळावी अशी त्याची इच्छा आहे हे खरे, पण तो उपकार विसरत नाही ना! उपकार ध्यानात ठेवून तो मनात लोभ धरतो, आणि माणूस? असो! पण आज हा भारत डेव्हलप झाला आहे. नाही तर मोक्षाबद्दल काही ऐकूच आले नसते! अरे, समकितचाही ठिकाणा नव्हता ना! महावीर भगवंत होऊन गेल्यावर दोन-दोन हजार वर्षे या गोष्टी ऐकूच येत नव्हत्या, त्यांच्यापूर्वी पण या गोष्टी नव्हत्या. महावीर भगवंतांचा जन्म झाला त्यावेळी 250 वर्षात दोन वेळा वीज चमकली, पार्श्वनाथ आणि महावीर बस, फक्त दोनच वेळा! त्यावेळी फक्त काही लोकांचे (मोक्षाचे) काम झाले. इतर कोणाला काहीच लाभ झाला नाही. महावीर भगवंतांचा प्रभाव वाटू नये म्हणून त्यावेळी लोकांनी खूप उपाय केले. महावीर ज्या रस्त्यावरून जात त्या रस्त्यावर लोक काटे उभे करून ठेवीत! बाभळीचे टोकदार काटे उभे करून पसरत असत. पण महावीर भगवंत जेव्हा त्या रस्त्यावरून जात तेव्हा ते काटे आपोआप आडवे होत. लोक हे प्रत्यक्ष पाहतसुद्धा, पण तरीही हिंदुस्तानातील इतर धर्मांच्या लोकांनी महावीरांना स्वीकारले नाही, ते म्हणत, 'ही तर जादू आहे. (काळी) विद्या आहे.' असे मानले पण सत्याचा स्वीकार केला नाही! असे अद्भुत शास्त्रज्ञ! पण त्यांचा स्वीकार केला नाही. अशी जंगली माणसे. पाखंड! पाखंड! पाखंड! व्यापार कुठे सुरू केला? तर धर्मातच व्यापार सुरू केला. म्हणून जी जुनी डेव्हलपमेंट होती ती टाकून देण्याचा लायकीचीच होती! एकदम मोडकळीला आलेले बांधकाम होते. ते पडू दे, नवीन निर्माण होत आहे! नाही तर मोक्षासंबंधी गोष्ट ऐकलाच आली नसती.

जसेजसे हे कल्चर्ड (सुसंस्कृत) होत जाईल तशीतशी जुनी पुस्तके

बाजूला सारली जातील किंवा रद्दीत टाकली जातील कारण जोपर्यंत आपण डेव्हलप होत नाही तोपर्यंतच पुस्तकांचा उपयोग आहे. गीता समजणारे आणि वेदांत समजणारे लोक आता सापडू लागतील! कारण आता डेव्हलप होत आहेत. आणि याला निमित्त बनले आहेत इंग्रज. या सगळ्या गोष्टीला निमित्त ठरले आहेत ते इंग्रज.

**प्रश्नकर्ता :** त्यांनी ज्ञान उघड केले?

**दादाश्री :** नाही. ज्ञान नाही, पण लोक जे ॲबनॉर्मल झाले होते, त्यांना त्यांनी सामान्य स्थितीत आणले, नॉर्मालिटीकडे आणले. आपले लोक काय म्हणत, 'हे लोक आपला धर्म आणि आपले आचार नष्ट करायला आले आहेत.' त्यांनी एवढे सगळे नष्ट केले म्हणून तर लोक आता नॉर्मालिटीवर येत आहेत. आपले लोक काय बोंबलायचे की, हे आपला धर्म आणि आपले आचरण नष्ट करून टाकतील. नाही, त्यांनी आपल्यातल्या ॲबनॉर्मलपणा कमी केला. आपला ॲबनॉर्मलपणा 85 डिग्रीपर्यंत पोहोचला होता. नॉर्मालिटीसाठी 50 डिग्रीची गरज होती. इंग्रजांनी 30-35 डिग्री काढून टाकली, जड बनवून टाकले. जड म्हणजे दारू प्यायला शिकवले, मांसाहार करायला शिकवले, कपडेलत्ते सर्वकाही मोहनीय बनवले. त्यामुळे पूर्वीचे दुर्गुण निघून गेले! तिरस्काराचे दुर्गुंण भरून ठेवले होते ते निघून गेले, फ्रॅक्चर झाले. त्यांनी हे फार मोठे उत्तम काम केले.

## इंग्रजांचा एक उपकार

इंग्रज आले आणि त्यांच्याबरोबरच त्यांची भाषा आली, ती आपले परमाणू सोबत घेऊन आली. प्रत्येक भाषा स्वतःचे परमाणू सोबतच आणते. म्हणून त्यांचे जे गुण होते ना, त्यांचे सहज गुण, टाईम-बाईम सर्व एक्जॅक्ट असले पाहिजे असे सर्व सहज गुण आपल्याकडे नव्याने आले. इथले लोक तर स्वार्थी बनले होते. प्रत्येकाला फक्त स्वतःच्या घराचीच काळजी होती. इतरांची घरे जळत असतील तरी हे मजेत झोपून राहत. ढोंगी, स्वार्थी! प्रत्येक गोष्टीचा तिरस्कार करणारे, एकदम युजलेस-टाकाऊ झाले होते.

ब्राह्मण म्हणत, 'आम्ही म्हणजे ईश्वराचे मुख आहोत, हे क्षत्रिय छातीपर्यंत आहेत आणि हे जे सर्व वैश्य आणि शूद्र लोक आहेत ते त्याहून खालचे आहेत.' म्हणजे निव्वळ दुरुपयोगच केला. ज्याचा सदुपयोग करायचा होता त्याचाच दुरुपयोग केला. आम्ही ब्राह्मण म्हणजे आम्ही मुखारविंद, म्हणून आम्ही जे बोलू त्यात तुम्ही हरकत घ्यायची नाही. त्यांनी हा पॉवर – व्हेटो पॉवर वापरला त्यामुळे त्यांना भयंकर यातना भोगाव्या लागल्या. या प्रजेचे जे काय व्हायचे असेल ते होईल, पण त्यांनी व्हेटो पॉवर वापरला त्यामुळे आज त्यांना पायात घालायला चपलासुद्धा मिळत नाहीत! आज त्यांना कोणी विचारत पण नाहीत, त्यांची किंमत पण राहिली नाही आणि चपला पण राहिल्या नाहीत, दोन्ही गोष्टी एकदमच गेल्या. दुराचरणामुळे झालेली त्यांची दैना तरी पाहा!

लोभ-लालसेमुळे साऱ्या जगाला त्रास होत आहे. लालसा का असावी माणसाला? लालसेमुळे दीनता येते आणि दीनता शिरली की मनुष्यपण जाते.

पूर्वीच्या काळी लोकांनी खालच्या जातीच्या लोकांवर भयंकर अत्याचार केले. त्यांना रस्त्याने जायचे असेल तर छातीवर मडके आणि पाठीमागे झाडू बांधून जावे लागे. मडके अशासाठी की थुंकायचे असेल तर त्यांनी रस्त्यावर थुंकू नये, मडक्यात थुंकावे. आणि झाडू अशासाठी की त्यांच्या पावलांच्या खुणा पुसल्या जाव्या. असा आतंक त्यांनी माजविला होता. माझ्यासारखा कोणी तोंडावर बोलणारा जर त्यावेळी असता तर त्यांना सणसणीत उत्तर दिले असते की, कुत्र्यांना रस्त्यावर थुंकायची आणि इतर सगळी सूट, त्यांची पावले चालतात, मग यांची का नाही चालत? हा कसला वेडेपणा आहे? हा तर अतिरेक झाला होता.

मुलींचा जन्म झाला तर लगेच त्यांना 'दूध पाजून' (दुधात त्यांचे तोंड बुडवून) मारून टाकत असत. राजपूत प्रजेत काय पद्धत असे की मुलीच्या लग्नात खूप हुंडा द्यावा लागत असे, ते आवडत नसे. आणि मुळात शिक्षण नव्हते. स्त्रिया पण अशिक्षित आणि पुरुष पण अशिक्षित, पण स्वत:ला खूप मोठे समजत. या लोकांनी दुसऱ्यांवर खूप अत्याचार केले.

मांजराने येऊन तुमच्या दुधात तोंड घातले तर ते दूध तुम्हाला चालते मग इथेही चालवून घ्यायला नको का? काय चालवायचे आणि काय नाही याची सीमा नको का?

गावचा ठाकूर असेल व त्याचा चुलत भाऊ असेल तर तो घोड्यावर बसून त्याला भेटायला जाऊ शकत नसे. त्याला घोड्यावरून उतरून चालत गावात यायला लागे! घोडा आणि तो, दोघेही सोबत गेले तर काय हरकत होती? यात तुझा अहंकार जखमी होत होता की काय? जर घोड्यावरून आला तर मारामारी आणि खुनापर्यंत पाळी येत असे.

अशा लोकांना 'आर्यपुत्र' असे कसे म्हणता येईल? भेसळयुक्त सोने आणि खरे सोने, दोन्ही असतील पण त्यातील भेसळयुक्त सोन्यात सोन्याचे गुण जाणवत नसतील तर त्या सोन्याचा काय उपयोग? खरे तर एका हिंदुस्तानी माणसात अनंत शक्ती आहेत, पण त्या सगळ्या चुकीच्या दिशेने वापरून वाया जात आहेत. जर 'ज्ञानी पुरुष' भेटतील तर या शक्ती योग्य मार्गावर येतील आणि त्या कामी लागतील. या शक्ती वाया का गेल्या? एक जण आय.ए.एस. चा अभ्यास करत आहे. तर त्याचे बघून दुसरा निश्चय करतो, 'मला पण आय.ए.एस व्हायचे आहे.' अशा तऱ्हेने नक्कल करून शक्ती फुकट घालविल्या. फक्त मेन्टेनेन्स (जीवन निर्वाहा)साठी अफाट शक्ती वाया घालविली! आणि तीसुद्धा कलुषित भावाने! नक्कल केल्यामुळे तर आत जी काही थोडी शिल्लक होती ती पण निघून गेली. अंतरसुखाचे संतुलन बिघडवू नका. पण इथे तर वाटेल तशी शिल्लक खर्च करून टाकतात. मग अंतरसुखाचे संतुलन कसे राहणार? नक्कल करून जगणे चांगले की अस्सल जगणे चांगले? अर्थातच अस्सल. याउलट ही मुले-मुली एक-दुसऱ्यांची नक्कलच करत राहतात. हिंदुस्तानाच्या लोकांनी तर कुणी अस्सल लिहून आणले तरी त्याची नक्कल करू नये. कोणाचीच नक्कल करू नये. उलट परदेशी लोकांनी आपली नक्कल करायला हवी असे आपले आचरण हवे. पण इथे घडते उलटेच. थोडे परदेशातील हिप्पी इथे आले तर इथले भारतीय लोक लगेच त्यांची नक्कल करू लागले! तरी पण त्यामुळे हिंदुस्तानाचे काहीही बिघडणार नाही, सर्व सुधारणारच आहे.

आजकालच्या ज्या नटव्या मुली आहेत ना, त्यांना बघून लोकांना वाटते की या मुली मोहात गुरफटलेल्या आहेत, मूर्च्छित आहेत, परंतु या मुलींच्या पोटी चांगली मुले जन्माला येतील.

**प्रश्नकर्ता :** त्याचे कारण काय, दादा?

**दादाश्री :** कारण तो तिरस्काराचा भाग निघून गेला आहे, खूपच कमी झाला आहे, त्यामुळे आता तिरस्कार केला जात नाही. तिरस्कार निघाला की नॉर्मालिटी येते. लोक सुधारलेले तर होतेच पण तिरस्कारमुळे टाकाऊ झाले होते, युजलेस झाले होते. तिरस्कार निघून गेला की आपली नॉर्मालिटी आली, सर्व ऑल राइट झाले.

बुद्धीचा उपयोग त्या लोकांनी तिरस्कार आणि कावेबाजी करण्यासाठीच केला. बुद्धीचा दुरुपयोग केला, कारण ज्ञान तर नव्हतेच. बुद्धी होती त्याचा दुरुपयोग केला. बुद्धी का वाढली? कारण ते महावीर ब्रेन टॉनिक प्यायले होते, कृष्ण ब्रेन टॉनिक प्यायले होते! जीवजंतूंना मारत नसत. कोणालाही मारत नसत. म्हणून बुद्धी वाढते. मग जीवजंतूंना सोडून माणसांवर हल्ले करू लागले.

आता हिंदुस्तान फार चांगली दशा गाठत आहे. संस्कृतीसाठी हा प्रलयकाळ आहे. कुठली संस्कृती? आदर्श संस्कृती? नाही. विकृत संस्कृतीचा प्रलयकाळ आहे. आपल्या संस्कृतीत संस्कृत भाषा होती, ती जर निम्न झाली तर फार तर प्राकृतपर्यंत चालवून घेता येईल परंतु विकृत मात्र चालणार नाही. यामुळे फायदा काय झाला? तर हे जे विकृत संस्कार होते ते धुऊन साफ झाले. आता तर नव्याने सुरुवात! आता सगळेच नवीन सुरू होईल आणि काही वेगळ्याच प्रकारची आश्चर्यकारक, महावीर भगवंतांच्या वेळी होती तशी शांती पुन्हा प्रस्थापित होईल! आणि आजची ही केस वाढविणारी वेडी मुले, तीच शहाणी म्हटली जातील. ज्यांना आपण चक्रम म्हणतो तेच समजदार होऊन फिरतील. केस कापणारे लोक म्हणजे मेंटल हॉस्पिटलचे लोक! या केसामुळे दोन भाग झाले. केस कापणारे ते वेडे आणि केस वाढविणारे ते शहाणे!

आजच्या मुलांनी तर उलट केस वाढवून ही गोष्ट ओपन (उघड) केली की जे केस कापतात ते मेंटल हॉस्पिटलचे लोक आहेत आणि आम्ही मेंटल हॉस्पिटलच्या बाहेर आहोत. आणि मेंटल हॉस्पिटलचे लोक यांना म्हणतात कसे, 'हे तर मेंटल आहेत!' म्हणजे भारताचे काहीही नुकसान होणार नाही. हा 'ज्ञानी पुरुषांचा' आशीर्वाद आहे.

## निसर्गाच्या बाबतीत बुद्धी वापरू नका

द वर्ल्ड इज द पझल इटसेल्फ. (हे जग स्वत:च कोडे झालेले आहे.) ते कोडे लोकांना कसे समजणार? सगळे जग हे कोडे सोडवण्याच्या मागे लागले आहे. ते म्हणतात, 'भारताची लोकसंख्या 1974 साली एवढी होती. म्हणून 2000 साली एवढी होणार!' अरे मूर्खा! महामूर्खा! (लग्नानंतर) पहिल्या वर्षी एक मूल झाले, तिसऱ्या वर्षी दुसरे मूल झाले म्हणजे काय 80 वर्षात 30-40 मुले होतील? असा हिशोब तुम्ही कसा करू शकता? मूर्ख आहात की गाढव आहात? घनचक्कर! मनुष्यांचा आणि इतर सर्वांचा असा हिशोब करता येतो का? पाच वर्षाचा होता तेव्हा मुलाची उंची 2 फूट होती, आणि सोळाव्या वर्षी पावणे पाच फूट झाली, म्हणून 80 व्या वर्षी इतकी उंची वाढेल! अरे मूर्खांनो, माणसांचा असा हिशोब कसा करता? 2000 साली एवढी लोकसंख्या होईल, 3000 साली एवढी होईल. तुम्ही जर असे म्हणत असाल की 2000 साली एवढी लोकसंख्या असेल तर मग 5000 वर्षांपूर्वी किती होती सांगा बरे? तुम्हाला जर गणित मांडता येत असेल तर तेव्हा किती माणसे होती ते सांगा की! मग तेव्हा म्हणणार, 'ते आम्हाला माहीत नाही.' अरे! तुला तर ठीक प्रकारे बायकोचा नवरा पण होता येत नाही! मग बायकोला आई अशी हाक मार की! काय ही वेडी माणसे! तुझ्या बायकोला तू आई म्हण म्हणजे झाले! मुलगा आई म्हणतो आणि तूसुद्धा आई म्हण, नवरा-बायको नकोच मग मधे! मूर्ख माणसे! लोकसंख्येचा हिशोब करायला निघाले आहेत, मोठे शहाणे, 1980 साली इतकी, 1990 साली इतकी आणि 2000 साली तितकी....! आणि यांना कोणी पकडणाराही नाही. सरकार पण यांचे म्हणणे मान्य

करते. जे असे मूर्खासारखे बोलतात त्यांना तर पकडून तुरुंगात टाकले पाहिजे! का असे वेड्यासारखे बोलता! त्यामुळे लोक बिघडून जातात.

हिंदुस्तानचे काहीच बिघडणार नाही, आणि ज्या देशात संतपुरुष आहेत, सत्पुरुष आहेत आणि प्रकट 'ज्ञानी पुरुष' आहेत तिथे काय बिघडणार? हे तीनही उपस्थित असतील तिथे काहीही बिघडणार नाही, उलट बिघडलेले सुधारू लागले आहे. इथली स्थिती फारच बिघडलेली होती. हिंदुस्ताना इतकी अधोगती जगात कोणत्याच देशाची झाली नव्हती. भयंकर वाईट परिस्थिती झाली होती. अनाचारालाच सदाचार मानले होते. सदाचार या देशातून हद्दपार झाला होता, एक्सपोर्ट (निर्यात) झाला होता. आता हा निर्यात माल आयात होत चालला आहे म्हणून तर (आजकालचे तरुण) केस वाढवू लागले आहेत ना! हे जे केस वाढवीत आहेत, ते आयात करीत आहेत! पूर्वी केस कापून निर्यात करून टाकले होते.

संपूर्ण जग मेंटल हॉस्पिटल झाले आहे, तेव्हा ही मुले सुद्धा वेडीच म्हणायची ना! काय करणार? पूर्ण हॉस्पिटलच मेंटल, त्यामुळे 'ज्ञानी पुरुष' पण 'बाहेरून' तर वेडेच म्हटले जातील ना? संपूर्ण हॉस्पिटल मेंटल म्हटल्यावर 'ज्ञानी पुरुष' पण त्यात आलेच ना! कारण 'ज्ञानी पुरुषां'चा देह पण या मेंटलच्या कालखंडातच जन्माला आला आहे, म्हणून तोसुद्धा मेंटलच ना! सर्वच मेंटल, मेंटल हॉस्पिटलच आहे हे! पण आता मात्र परिवर्तन होत आहे.

2005 साली हिंदुस्तान साऱ्या जगाचे केंद्र बनले असेल आता 31 वर्षे राहिली आहेत. ही मुले तेव्हा 55-60 वर्षांची होतील आणि तेव्हा त्यांच्यात हा वेडेपणा राहणार नाही, निघून जाईल. त्यांचे लांब केस होते ते एकदिवस कापून टाकतील आणि मग त्यांचा वेडेपणा पूर्ण निघून जाईल. एक लांब केसवाला मुलगा मोटारीत माझ्या पुढे बसला होता. तेव्ही मी त्याला म्हटले, 'अरे बाळा, तू केस इतके का वाढविले आहेत की ते उडून मागच्या माणसांना त्रासदायक होत आहेत.' खरे म्हणजे त्याच्या केसांचा मला काहीच त्रास होत नव्हता, पण मी आपले सहजच त्याला म्हटले. तो मुलगा लगेच केस कापून आला आणि मला नमस्कार

करून गेला, एवढेच नाही तर त्याने 'मी असे केस पुन्हा वाढविणार नाही' असा दृढ निश्चय देखील केला.

आजची हीच मुले शहाणी आणि समजदार होतील आणि एक दिवस केस कमी करतील आणि त्यांचा वेडेपणा निघून जाईल. आणि आजची ही माणसे केस कापून स्वतःला शहाणे आणि समजदार मानतात, अनाचाराला सदाचार मानतात! अनाचाराला सदाचार, भाषाच बदलून टाकली या लोकांनी! 'मेंटल!' दिवसभर वाद–विवाद, भांडणे, प्रत्येक घरी हेच. काही ना काही भानगड चालूच असते. घरात तीन माणसे, त्यात तेहतीस प्रकारचे मतभेद, म्हणजे प्रत्येकाच्या वाट्याला अकरा अकरा आले ना!

## मतभेद, मनभेद आणि तनभेद

**दादाश्री :** मतभेद होतात तेव्हा चांगले वाटते का? तेव्हा काही वाटते का तुला?

**प्रश्नकर्ता :** हो, काळजी वाटते.

**दादाश्री :** नुसते मतभेद झाले तर इतका त्रास होतो, मग मनभेद झाले तर काय होईल? मतभेद झाले तर भांडणे होतात पण मनभेद झाले तर घटस्फोट घेतात. आणि तनभेद झाला तर अंत्ययात्रा निघते! असे हे भेद, भेद, आणि भेद असलेले जग आहे.

कंटाळायुक्त जीवन तुला आवडेल का?

**प्रश्नकर्ता :** देवाने आयुष्य दिले आहे तर जगावे तर लागेलच ना? मग ते कसेही का असेना?

**दादाश्री :** आयुष्य देणारा कोण आहे? सर्व लोकांना अशा तऱ्हेने दुःखाच्या आगीत जळण्यासाठी आयुष्य देणारा असा कोण मूर्ख माणूस असेल? असा कोणी असेल का? असा कोणी मालक असेल तर तो काय वेडा झाला आहे का? पन्नास टक्के वेडे असतील तरी चालेल पण इथे तर सगळेच वेडे, मग काय तो मालकच वेडा झाला आहे की काय? असे हे सगळे चालविणारा कोण असेल?

**प्रश्नकर्ता :** देव.

**दादाश्री :** तुम्ही देवाचे नाव घेता का कधी?

**प्रश्नकर्ता :** कधी कधी घेतो.

**दादाश्री :** कोणत्या नावाने तुम्ही देवाला हाक मारता?

**प्रश्नकर्ता :** देवाची तर हजारो नावे आहेत. कोणत्याही एक नावाने हाक मारतो.

**दादाश्री :** तुम्हाला कोणते नाव आवडते?

**प्रश्नकर्ता :** श्रीकृष्ण.

**दादाश्री :** मग त्या देवाला विचारा की त्याने जग बनविले ते असे का बनविले? देवा! तुझ्या सगळ्या राण्या अजून आहेत ना? कोणी पळून तर गेली नाही ना? मग आम्हाला असा त्रास का देत आहेस? आपण त्याला असे रागवावे लागते पण आपण रागवत नाही, उलट त्याला नैवेद्य दाखवतो. मग त्याला वाटते की हे सगळे सुखी आहेत! किंवा तो बहिरा झाला आहे म्हणून आपण काय सांगू इच्छितो ते त्याला ऐकू येत नाही? म्हणून आपण त्याला रागावले पाहिजे की देवा, तुझ्या राण्या-बिण्या पळून गेल्या आहेत का? तुझी मुले-बाळे भरकटली आहेत का? असे विचारले पाहिजे, मग तो म्हणेल 'नाही सगळ्या राण्या ठीक आहेत.' तेव्हा आपण त्याला विचारायचे, 'हे सगळे का जळत आहे, सगळे जग (दु:खांच्या) आगीत होरपळत आहे आणि तू मात्र खुशाल एकटाच इकडे-तिकडे हिंडत आहेस! तुझ्या राण्यांना इथे घेऊन ये.' देवाला असे बोलायला हवे, नाही तर बहिऱ्या कानाने त्याला कसे ऐकू येणार?

या प्रकारे देवाला रागवावे लागते. तुमची भक्ती खरी असेल तर देवाला का नाही रागवू शकत? आणि तुम्ही रागावलात तरच तो ऐकेल. पण देवाला कोणी रागावतच नाही ना! सर्वजण फक्त नैवेद्य दाखवत राहतात.

❖❖❖❖❖

# संयोगाचे शास्त्र

जगात शुद्धात्मा आणि संयोग, अशा दोनच गोष्टी आहेत. बाहेर भेटतात ते सगळे संयोग आहेत, हवा थंड वाटते, मनात विचार येतात, अशा सर्व गोष्टी म्हणजे संयोग, पण बुद्धीमुळे 'हे चांगले आहे, आणि हे वाईट आहे' असे दिसायला लागते आणि त्यामुळे राग-द्वेष करत राहतो. ज्ञान काय सांगते, दोनही संयोग (चांगले आणि वाईट) एकसारखेच आहेत. संयोगापासून 'तू स्वत:' मुक्तच आहेस, मग तू कशाला ढवळाढवळ करतोस? हे संयोग तुला काय करणार आहेत? हे सर्व तर संयोग आहेत ते काहीच करणार नाहीत. पण बुद्धी ढवळाढवळ करते. बुद्धी सांसारिक गोष्टीसाठी उपयोगी आहे. ती मोक्षाला जाऊ देत नाही. याउलट ज्ञान मोक्षाला नेते. जगात जी बुद्धी वापरली जाते ती सम्यक् बुद्धी नाही, ती विपरीत बुद्धी आहे. स्वत:च्या हिताहिताचे भान नाही म्हणूनच लोक वाटेल तसे वागतात! स्वरूपाचे ज्ञान प्राप्त झाल्यावर बुद्धी सम्यक् होते, हित-अहित कळू लागते. सम्यक् बुद्धी काय सांगते की, 'आता हा संयोग आला आहे, तर आता गप्प बसा, नाही तर नुकसान होईल' असे सांगते. याउलट विपरीत बुद्धी अशा प्रसंगी गप्प तर राहूच देत नाही, आणि मार पण खायला लावते. विपरीत बुद्धीचे जे शेवाळ पसरले आहे, ते जरा दूर सारावे लागेल तर थोडा उजेड होईल! 'माझ्यातील' विपरीत बुद्धीचे सगळे शेवाळ निघून गेले आहे.

या बुद्धीमुळे प्रत्येक संयोगात भेद निर्माण झाले आहेत. कोणी म्हणते हे चांगले आहे, तर कोणी म्हणते हे वाईट आहे. एकाला

जिलबीचा संयोग आवडतो, म्हणून तो त्याला चांगला म्हणतो आणि दुसऱ्याला आवडत नाही म्हणून तो त्याला वाईट म्हणतो. त्यात आणखी अभिप्राय देतात की हे चांगले आणि हे वाईट, त्यामुळे मग राग-द्वेष निर्माण होतात, यातूनच संसार चक्र चालू राहते. एका लहान मुलाला जर एक काच आणि एक हिरा दिला तर लहान मुलगा काच घेतो आणि त्याचे वडील हिरा घेतात. कारण वडिलांजवळ बुद्धी आहे. बुद्धीमुळे संसार फळ मिळते.

खरे म्हणजे, संसारात बुद्धीचा उपयोग हित-अहित ठरविण्यापुरताच असायला हवा. नोकरीत कुठे जमा करायचे, कुठे उधार करायचे, शेठजींची बोलणी खावी लागणार नाही असे करायचे, जेवणाच्या ताटात किडा पडला की तो काढून टाकायचा, असे सर्व बुद्धी दाखविते, आणि बुद्धीचा तेवढ्यापुरताच उपयोग असावा, आणि गरज असेल तेव्हा बुद्धीचा प्रकाश सहजच पडतो आणि त्यामुळे प्रापंचिक कामे होतात. पण रात्रंदिवस प्रत्येक गोष्टीत जर बुद्धी ढवळाढवळ करू लागली तर कसे चालेल? आम्हाला जर कोणी म्हटले 'दादा, तुम्हाला अक्कलच नाही.' आणि दुसऱ्या एखाद्याने म्हटले 'दादा, ते तर 'ज्ञानी पुरुष आहेत' तर आम्हाला हे दोन्ही संयोग सारखेच वाटतात. कारण आम्ही 'अबुध' आहोत, म्हणून आम्हाला हे दोन्ही संयोग फक्त सारखेच वाटतात. आणि बुद्धी काय सांगते? 'दादा तर ज्ञानी पुरुष आहेत,' हा संयोग आवडतो आणि 'दादांना अक्कल नाही' हा संयोग आवडत नाही. म्हणून आम्ही अगोदरच 'अबुध' झालो आहोत. हे सगळे फक्त संयोगच आहेत. कधी म्हणतील, 'दादा ज्ञानी आहेत.' आणि कधी म्हणतील 'दादांना अक्कल नाही' आणि तेही 'व्यवस्थित'च आहे. 'व्यवस्थित' तुला कुठल्याही संयोगातून सोडणारच नाही. त्यात जर बुद्धीचा वापर केलास तर आवडते आणि नावडते या दोन्ही गोष्टींचा त्रास झाल्याशिवाय राहणारच नाही. म्हणून त्यांना बोलू द्या ना, आपल्याला काय? असे कोणी बोलले तर आपण म्हटले पाहिजे ''बोल रेकॉर्ड, 'आम्ही' तुला ऐकत आहोत!'' ते तर रेकॉर्ड झालेले आहे, त्यात कोणी बदल करू शकत नाही. मूळ मालक बोलत नसतो. ही तर जी टेप झालेली आहे ती रेकॉर्डच बोलत असते, त्यात बदल करता येत नाही.

लोकांना अनिष्ट (भोजन) आवडत नाही आणि इष्ट (भोजन) आवडते. पण दोन्हीही संयोगच आहेत, सारखेच आहेत. तरी ते एका संयोगाला अनुकूल मानतात – इष्ट मानतात आणि दुसऱ्या संयोगाला प्रतिकूल – अनिष्ट मानतात. मग एखादा अनिष्ट संयोग आला तर म्हणेल, 'हा कशाला चहा प्यायला कडमडला?' आणि इष्ट संयोग आला असेल तर मात्र चहा नको असे म्हणणाऱ्याला जबरदस्तीने ओढून चहा पाजील. याच्या मागचे रूट कॉज (मूळ कारण) काय आहे? हे चांगले आणि ते वाईट, असे म्हणतात ते? नाही. मिथ्या दृष्टीमुळे बरोबर काय आणि चुकीचे काय हे समजतच नाही.

आत्मा आणि संयोग अशा दोनच गोष्टी आहेत आणि त्यात संयोग अनंत आहेत. संयोग आत्म्याला आपल्या बरोबर जोडून घेतात. ते कसे, हे मी तुम्हाला समजावून सांगतो. समजा, एक हिरा आहे तो पांढरा प्रकाश देतो. त्या प्रकाशातून पांढरी किरणे निघतात. आता त्या हिऱ्याच्या खाली लाल कापड ठेवले की हिरा लाल दिसतो, आणि हिरवे कापड ठेवले तर हिरा हिरवा दिसतो. आणि त्यातून बाहेर पडणारा प्रकाश पण हिरवाच निघतो. आत्म्याचेही तसेच आहे, जसे संयोग येतात तसा तो होऊन जातो. क्रोध येतो तेव्हा गरम होतो. वास्तवात शुद्धात्मा स्वतः तर कधीच बिघडत नाही. तेल आणि पाणी एकत्र करून त्या मिश्रणाला कितीही हलवा तरी तेल आणि पाणी कधीच एक होत नाहीत. त्याच प्रकारे आत्मा कधीच बिघडला नाही. अनंत जन्म घेऊन देखील आत्मा कापला गेला नाही, चिरडला गेला नाही, सापात जावो, मांजरात जावो किंवा कोणत्याही योनीत जावो, पण तो किंचितदेखील बिघडला नाही. फक्त त्याचे वेगवेगळे घाट झाले ती घडणावळ वाया गेली आहे.

काही माणसांना दिवसा चांगले वाटते आणि रात्री चांगले वाटत नाही. पण हे दोनही संयोग रिलेटिव आहेत. रात्र आहे म्हणून दिवसाला किंमत आहे आणि दिवस आहे म्हणून रात्रीला किंमत आहे!

वीतराग भगवंत म्हणतात की, 'हे सगळे संयोगच आहेत, आणि दुसरा आत्मा आहे. या खेरीज तिसरे काहीच नाही.' त्यांच्यासाठी खरे–

खोटे, चांगले वाईट, असे काहीही नसते. 'व्यवस्थित शक्ती' काय सांगते? 'या संयोगात कोणाचेच काहीही चालत नाही. हा सगळा मागील खातेवहीचा (कर्मांचा) हिशोब आहे.' वीतराग भगवंत सांगतात की सर्व संयोग सारखेच आहेत. द्यायला आला की घ्यायला आला, हे सगळे सारखेच आहे. मात्र इथे बुद्धी ढवळाढवळ करते. संयोगांच्या बाबतीत फक्त 'ज्ञाता-दृष्टा'च राहण्यासारखे आहे. हे सगळे संयोग परत वियोगी स्वभावाचे आहेत. एकत्र होण्याचा संयोग संपला की सगळे विखुरले जाते. तेव्हा जो संयोग 40 शेरांचा होता, तो नंतर 38 शेरांचा होतो, 36 शेरांचा होतो, नंतर क्रमश: संपतो.

संयोग पूर्णपणे वियोगी स्वभावाचे असतात. एक संयोग येतो आणि 11 वाजून 5 मिनिटे झाली की जाऊ लागतो! त्याला आपण सांगितले 'थांब थोडा वेळ, जेवूनच जा', तरी पण तो थांबत नाही. त्याची वेळ संपली की तो जाऊ लागतो. पण होते काय, तर एखाद्या संयोगाचा दोन मिनिटानंतर वियोग होणार असतो, तिथे तो वाट पाहतो की, 'अजून गेला नाही, अजून गेला नाही,' कधी जाणार? तर ती दोनच मिनिटे दहा मिनिटांसारखी वाटतात! या वाट पाहण्यामुळे काळ मोठा झाल्यासारखा वाटतो. नाही तर प्रत्येक संयोग वियोगी स्वभावाचाच असतो.

प्रत्येक संयोगाबरोबर आपण स्वत: तन्मयाकार होता कामा नये. आपण फक्त त्याचे ज्ञाता-दृष्टाच आहोत. संयोगाशी आपण भांडायचीही गरज नाही आणि त्यांच्याबरोबर बसून राहायचीही गरज नाही. कोणताही संयोग आला की त्याला सांगायचे 'गो टु दादा'-'दादां'कडे जा. प्रत्येक संयोग सतत बदलणारे असतात आणि आपण त्यापेक्षा वेगळे आहोत. विचार आला तो संयोग आणि त्याच्याशी तन्मयाकार होऊन विचलित होणे ही मात्र भ्रांती आहे, विचारांना फक्त पाहायचे आणि जाणायचे असते.

संसारात रिलेटिव्हमध्ये एखादा मोठा भीतीदायक संयोग आला तर तेव्हा तो माणूस पूर्णपणे आत्म्यात शिरतो आणि मग त्याला आत्म्याचा अनुभव येतो! लहान मूल असेल तर तो उगाच स्वत:चे खेळणे सोडत

नाही, आपण घ्यायला गेलो तर तो हट्टाला पेटतो! आणि एवढ्यात जर मांजर आले तर तो घाबरून सगळे टाकून पळून जातो! ज्याला स्वरूपाचे ज्ञान मिळाले आहे त्याच्यावर जर खूप मोठे भीतीदायक संकट आले, तर त्याला आत्म्याचा संपूर्ण अनुभव होईल. केवलज्ञान स्वरूपी आत्म्याचा पूर्ण अनुभव! आपल्यालाही संयोग मिळतात, पण आपण कुठले संयोग पसंत करावेत? ज्या संयोगामुळे 'रियल'ला मदत होईल, 'रियल'ला मार्गदर्शन मिळेल, असे संयोग आपण पसंत करायला हवेत. 'रिलेटिव्ह'ला मार्गदर्शन मिळेल असे संयोग आपण पसंत करू नये. जगातली लोक संयोगाची दोन भागात वाटणी करतात. एक फायदा करून देणारे आणि दुसरे नुकसान करणारे, पण आपल्याला तर माहीत आहे की फायदा आणि नुकसान, ती कोणाची सत्ता आहे? ती आपली सत्ता नव्हे! आपण मात्र सत्संग मिळेल असे संयोग पसंत करावेत. इतर सर्व संयोग तर संयोग आहेत. अरे, सगळ्यात मोठे म्हणजे दिवस-रात्र सोबतच राहणारे संयोग, मन-वचन-काया यांचे संयोग, तेच दुःखदायी झाले आहेत, मग दुसरा कोणता संयोग सुख देईल? संयोग आपल्याला सोडतील असे नाहीत, पण आपण या सर्व संयोगांचा समभावाने निकाल केला पाहिजे! जसजसे विपरीत संयोग वाढतात तसतसे आपले 'ज्ञान' अधिकाधिक विकसित होते. याचा अर्थ विपरीत संयोग घडवून आणावे असा नाही, पण जे आहेत त्यांचा समभावाने निकाल करून टाकावा.

## संयोगांना सुधारून पाठवा

**दादाश्री :** तुमच्या आईची तब्येत कशी आहे?

**प्रश्नकर्ता :** तशी ठीक आहे, पण काल जरा बाथरूममध्ये पडली, म्हातारपण आहे ना?

**दादाश्री :** संयोगांचा नियम असा आहे की एक कमजोर संयोग आला की इतर कमजोर संयोग एकत्र धावत येतात आणि एक बलवान संयोग आला की इतर बलवान संयोग पण एकत्र धावत येतात. म्हातारपण, एक कमजोर संयोग आहे, त्यामुळे त्याला इतर कमजोर संयोग भेटतात.

जरासा धक्का लागला तरी माणूस पडतो, त्याची हाडे मोडतात. कमजोर व्यक्तीमागे कमजोर संयोग येतात. काहीही करून त्याचा निकाल लावायचा असतो. जगातील लोक कसे असतात? एखादी कमजोर व्यक्ती भेटली तर त्याला खडसावत राहतात. भगवंत म्हणतात, तू जितके दुसऱ्यांचे संयोग बिघडवण्याचा प्रयत्न करतोस तितकेच तू तुझे संयोग बिघडवतोस. मग तुमच्या वाट्याला पण तसेच (वाईट) संयोग येतील.

संयोग हे तर फाइलस् आहेत आणि त्यांचा समभावाने निकाल करायचा आहे. अनंत जन्मात संयोगांचा तिरस्कार करत आला आहात त्यामुळे या काळात जिकडून-तिकडून तिरस्कारच मिळेल असे संयोग भेटतात! संयोग 'व्यवस्थित शक्तीच्या' हिशोबाच्या परमाणूंमुळेच एकत्र येतात. कटू संयोगांना लोक ढकलून देण्याचा प्रयत्न करतात, त्यांना शिव्या देतात. संयोग काय म्हणतात, ''आम्हाला 'व्यवस्थित शक्तीने' पाठविले आहे. तू आम्हाला शिव्या देतोस पण मग 'व्यवस्थित शक्ती' तुला पकडेल.'' आणि जेव्हा गोड संयोग येतो तेव्हा लोक 'या, या' असे बोलावत असतात. हे कसे आहे, की तू जर संयोगासोबत राहिलास तर संयोग विनाशी आहेत म्हणून तू पण विनाशी होशील. पण संयोगापासून वेगळा, 'स्व'मध्ये राहिलास तर तू अविनाशीच राहशील.

हे कसे आहे, कटू संयोग 'नको, नको' म्हटले तरीही ते येतातच आणि गोड संयोगांना 'या, या' म्हटले तरीही थांबत नाहीत! असे करून करून तर अनंत जन्म बिघडविले. कुध्यान केले आहे. मोक्ष हवा असेल तर शुक्लध्यानात रहा आणि संसार हवा असेल तर 'सर्वांचे भले कसे करू' या भावनेने धर्मध्यानात रहा. धर्मध्यान म्हणजे कुणी जर वाईट बोलले तर तो असे मानतो की, माझा काही हिशोब बाकी असेल म्हणून असा कटु संयोग आला आहे! आणि मग तो कटू संयोगाला देखील गोड करतो. एखादी व्यक्ती भांडत आली की, 'तुम्ही मला पंचवीस रुपये कमी दिले' आणि वाद करू लागली तर त्याला पंचवीस अधिक पाच रुपये देऊन खुश करावे, कसेही करून संयोग सुधारून घ्यावा. संयोगांना सुधारून परत पाठविले तर पुढच्या जन्मी चांगलेच संयोग

येतील. जिथे-जिथे गुंता झाला आहे तिथे-तिथे संयोग गुंतागुंतीचे येतात, तेच बाधा आणतात. म्हणून वाईट संयोगाला वाईट मानू नका, पण त्यांना सरळ आणि गोड करून पाठवा, त्यामुळे पुढील जन्मी गुंता नसलेले संयोग मिळतील.

लोक म्हणाले, 'तुम्ही शांताबाई, यांच्या विहीणबाई, यांची आई,' आणि तुम्ही पण तसेच खरे मानले आणि तसेच वागू लागलात. माणूस जेव्हा खूप गहन विचारात बुडतो, तेव्हा स्वत:चे नाव देखील विसरतो. याच प्रकारे संयोगांच्या गराड्यात 'स्वत:'लाच विसरला! याचेच नाव संसार. यात अज्ञानतेचे ॲग्रीमेंट आणि अज्ञानतेलाच पुष्टी दिली.

तो म्हणतो, 'मी यांचा जावई आणि याचा सासरा!' अरे, तू कसला जावई? तर म्हणतो 'मी लग्न केले ना?' मार खाऊन भोगायचे, म्हणजे लग्न! लग्न म्हणजे एका जन्मापुरता करार आहे. पण लोक ते कायमचा आहे असे समजून चालतात! आणि शिवाय बक्षीस म्हणून एकाच जन्मात भरपूर मार खातात! हे तर भगवंत स्वत:चे भान विसरले म्हणून हा संसार निर्माण झाला आहे!

'हे संयोग चांगले आहेत आणि हे वाईट आहेत' असे मानल्यामुळे संसार टिकून राहिला आहे, त्याऐवजी 'सर्व संयोग दु:खकारक आहेत' असे मानले तर मोक्षाच्या मार्गावर याल. वीतराग भगवंतांचे सायन्स (विज्ञान) आहे. महावीर भगवंत किती महान सायंटिस्ट होते! वीतराग हे जाणत होते की जग केवळ संयोगांमुळे उभे झाले आहे! लोकांनी संयोगांना अनुकूल व प्रतिकूल मानले आणि त्यांच्यावर राग-द्वेष केले. पण भगवंतानी सर्वच संयोग प्रतिकूल मानले आणि त्यामुळे ते मुक्त झाले!

*'एगो मे शाषओ अप्पा, नाण दंश्शण संज्ूओ!'*

मी एक शाश्वत आत्मा आहे. ज्ञान-दर्शनवाला असा शाश्वत शुद्धात्मा आहे, मी सनातन आहे, केवळ सत् आहे.

*'शेषा मे बाहिराभावा, सव्वेसंजोग लख्खणा!'*

बाकी सर्व उरतात ते बाह्य भाव आहेत. त्या भावांचे लक्षण कोणते? ते संयोग लक्षणवाले आहेत. 'बाहिराभाव' कोणते? संयोग लक्षण, म्हणजे उलट-सुलट विचार तो संयोग, लग्न करायचा विचार येतो तो संयोग, विधवा होण्याचा विचार येतो तो संयोग. हे सर्व बाहिराभाव आहेत, आणि ते संयोग लक्षणवाले आहेत. या सर्वांचे लक्षण संयोग स्वरूप आहेत. ज्याचा वियोग होणार आहे ते सर्व संयोग आहेत, त्यांना चुकून बोलावले होते म्हणून आले आहेत.

*'संजोगमूला जीवेण पत्ता दुःखम् परंपरा,*
*तम्हा संजोग संबंधम् सव्वम् तीवीहेण वोसरियामी.'*

सर्व संयोग जीवांच्या दुःखांच्या परंपरेच्या मुळाशी आहेत. हे सर्व संयोग 'दादा भगवानां'ना-वीतरागांना अर्पण करतो, आणि म्हणून आपण त्यांचे मालक उरलो नाही, हे संयोग किती आहेत? तर अनंत आहेत. या अनंत संयोगांना एकामागून एक असे करत सोडले तर ते कधी सोडता येतील का? त्याऐवजी एकदाच सर्व संयोग दादांच्या चरणी अर्पण केले की आपण सुटलो!

आत्म्याच्या अनंत शक्ती आहेत. त्या इतक्या आहेत की एका तासात आत्मा अनंत संयोग कमावू शकतो, त्याचप्रमाणे तो एका तासात अनंत संयोग संपवूही शकतो. पण संपविण्याचा अधिकार कोणाला आहे? फक्त 'ज्ञानी पुरुषा'ला!

संयोग आणि संयोगी अशा दोनच गोष्टी आहेत. ज्या प्रमाणात संयोगी सरळ प्रमाणात त्याच प्रमाणात संयोग पण सरळ, आणि जर संयोग वाकडे आले तर आपण वाकडे होतो म्हणूनच वाकडा संयोग आला. संयोगाना सरळ करण्याची गरज नाही. उलट आपल्यालाच सरळ व्हायची गरज आहे. संयोग तर अनंत आहेत, ते केव्हा सरळ होतील? जगातील लोक संयोगांना सरळ करण्याचा प्रयत्न करतात, त्याऐवजी स्वतः सरळ झाला तर संयोग आपोआपच सरळच होतील. स्वतः सरळ झाल्यावर देखील काही काळ संयोग वाकडे आहेत असे वाटते पण नंतर सरळच येतील. आपल्याला *उपरी* (वरिष्ठ) कोणीही नाही मग

वाकडे संयोग का येतील? हे तर स्वतः वाकडा झालेला म्हणून वाकडे संयोग येतात. जर आमांश झाला असेल, तर त्याचे कारण नुकतेच पेरलेले बी असते का? नाही, बारा वर्षांपूर्वी त्याचे बी पेरले होते त्या कारणामुळे आता आमांश झाला आहे. आता आमांश झाला म्हणजे बारा वर्षांची चूक आता दुरुस्त होणार ना? आणि यानंतर पुन्हा ती चूक केली नाही तर पुन्हा आमांश होणारच नाही. ट्रेनमध्ये चढल्यानंतर गर्दीवाली जागा मिळते, कारण स्वतःच गर्दीवाला आहे म्हणून. स्वतः जर गर्दीवाला नसेल तर बिनगर्दीची जागा मिळेल. स्वतःच्याच चुका स्वतःच्या *उपरी* आहेत. हे एकदा कळले की मग कसली भीती? आम्हाला पाहून सर्व खुश होतात. आम्हीच खुश होतो म्हणून मग समोरचाही खुश होतो. समोरचा आम्हाला बघून खुशच काय आफ्रीन होऊन जातो. समोरची व्यक्ती म्हणजे आपलाच फोटो!

## संयोगामध्ये स्वतः कोण?

स्वतःचे पुण्य असेल तर येणारे सर्व संयोग तुम्हाला मदत करून जातात. आणि पाप कर्माचा उदय झाला तर विपरीत संयोग येतात आणि शिवाय ते संयोग दंडुके मारून जातात! काही लोक म्हणतात 'माझे संयोग चांगले नाहीत' हे तर ज्ञानींचे वाक्य आहे, पण त्यात तू कोण आहेस? आणि हे सगळे काय आहे? अन्य सर्व संयोग आहेत. मग 'तू' कोण आहेस? हे शोधून काढ!

जेव्हा आजारी पडतो, तेव्हा आजार बरे करणारेही संयोग असतात आणि आजार वाढविणारेही संयोगच असतात. जर आजार वाढायचेच संयोग असतील तर आजार बरे करणारे औषधसुद्धा त्याचा आजार वाढवेल. एक कमजोर संयोग आला तर त्याच्या जोडीला इतर कमजोर संयोग पण एकत्र येतात. दुष्काळाचा संयोग येतो, त्यातच म्हैस पण मरते, असे एकापाठोपाठ कमजोर संयोग येत जातात. जर हे सर्व संयोग आहेत तर मग तू कोण?

हे सर्व संयोग निरंतर समसरण (परिवर्तीत) होतच राहतात. त्याचे

एक उदाहरण सांगतो. संध्याकाळी पाचच्या सुमारास तुम्ही जात असाल, तर तुम्हाला समोर आलेले ढग दिसतात. पण थोड्याच वेळात त्यातील एका ढगातून इंद्रधनुष्य दिसते, तर ते कोणी बनविले? थोड्या वेळापूर्वी ते का नव्हते? कारण ढग आहेत, सूर्य एक विशिष्ट जागी आहे, हे असे सर्व संयोग एकत्र आले आणि आपण सुद्धा एका विशिष्ट ठिकाणी असू, तरच ते इंद्रधनुष्य दिसेल!

आत्मा आणि संयोग, हे दोनच आहेत. पण आत्मा त्या संयोगात गुंतून पडतो. 'गुंतून पडणे' हा आत्म्याचा नैसर्गिक गुणधर्म नाही, पण उपाधी भावामुळे आहे. आत्मा आणि संयोग यांचे सतत घर्षण होत असते आणि मग स्पर्शाने (कर्मे) चार्ज होतात, आणि तीच पुढील जन्मात डिस्चार्ज होत असतात. 'ज्ञानी पुरुष' जर भेटले तर ते तुमची चार्ज होणारी बॅटरी आठ फुट दूर ठेवून देतात. त्यामुळे नवीन चार्ज (कर्मबंधने) होत नाहीत आणि मग संसार चक्र बंद होऊन जाते!

अनुकूल संयोग ते फूड (जेवण) आहे आणि प्रतिकूल संयोग ते व्हिटॅमिन्स आहेत. म्हणून आम्ही म्हणतो की व्हिटॅमिन्स वाया जाऊ देऊ नका.

स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग आणि वाणीचे संयोग, हे सर्व पर आहेत आणि पराधीन आहेत.

❖❖❖❖❖

# तप

भगवंतांनी म्हटले आहे, 'ज्ञान, दर्शन, चारित्र्य आणि तप, हे मोक्षाचे चार आधारस्तंभ आहेत.' पण याचा लोकांनी वेगवेगळा अर्थ लावला. 'मी शुद्धात्मा आहे' हे ज्ञान आहे, 'मी शुद्धात्मा आहे' याची प्रतीती राहणे म्हणजे 'दर्शन' आणि ज्ञाता-दृष्टा पदात राहणे म्हणजे चारित्र्य. जर बाहेर काही घडले आणि त्यामुळे जो त्रास होतो त्याला पाहायचे आणि जाणायचे ते म्हणजे तप. याला अंतरतप, अदीठ (न दिसणारे) तप असे म्हणतात. मोक्षाला जाण्यासाठी अशा अंतरतपाची गरज आहे, बाह्य तपाची गरज मोक्षासाठी नाही. बाह्य तपामुळे पुढील जन्मात चांगली गती मिळते, पण मोक्ष मिळत नाही. अदीठ तप दिसत नाही. 'फॉरेन' मध्ये (अनात्म्यात) प्रवेश न करणे आणि 'होम' मध्ये (आत्म्यात)च राहणे यालाच भगवंतांनी खरे तप म्हटले आहे. 'आत्मा आणि अनात्मा' यांना एकत्र येऊ न देणे हेच खरे तप आहे. आणि हे तप का करावे लागते? कारण अनादिकाळापासून 'फॉरेन' मध्ये राहण्याचाच अध्यास आहे, म्हणून तप करणे आवश्यक आहे, तरी पण या तपामुळे तापायचे नसते.

मोक्षाचा मार्ग म्हणजे एकदम सहज मार्ग, यात कोणतेही कर्मकांड नाही, कष्ट नाहीत. तप, त्याग, जप, या सगळ्या क्रिया फळ देणाऱ्या आहेत. फळ मिळेपर्यंत बसून राहायचे असेल तर बसा आणि नंतर फळाचा आस्वाद घ्या, पण फळ मिळेल तेव्हा मनात काय विचार असतील याचा काय भरवसा? जेव्हा बी पेरले असेल तेव्हा त्यागी दशेत

असतो आणि फळ मिळते तेव्हा गृहस्थ दशेत असतो, आणि पंचेन्द्रियांच्या विचारात गुंतलेला असतो. तप, त्याग यामुळे देवगती मिळू शकते पण मोक्ष मिळत नाही. मोक्ष तर जेव्हा सहज होतो तेव्हाच मिळतो. तप, त्यागाची मेहनत करण्यात तर हॅन्डल मारावे लागतात.

आपण विचारले की, 'तुमची तब्येत बरी नाही म्हणून तुम्ही उपाशी राहता का? तुम्हाला बरे वाटत नाही का?' तर तो म्हणेल, 'नाही, मी तप करत आहे.' त्याला विचाराल 'किती दिवस उपाशी राहाल?' त्यावर तो म्हणेल, 'चार दिवस.' मग असे तप केल्यावर तुम्ही तापलेले असाल की थंड असाल? तो तर तापलेलाच राहतो. अशा तापलेल्या व्यक्तीला मुलाने काही विचारले तर तो असा संतापतो की मुलाला वाटते असे वडील असण्यापेक्षा नसलेले बरे! भगवंत म्हणाले, 'पोटात दुखत असेल, अजीर्ण झाले असेल तर एकच वेळा जेव.' जास्त जेवले तरी ते विषासारखे आहे आणि नाही जेवले तरी ते विषासारखे आहे. म्हणून भगवंतांनी *'उणोदरी'* (जेवढी भूक असेल त्यापेक्षा निम्मे खाणे) तप करायला सांगितले होते, *उणोदरी* म्हणजे रोज चार पोळ्या खात असाल तर तीनच खाऊन सुरुवात करा आणि भात नेहमी खाता त्यापेक्षा निम्माच खा. मग तुम्हाला (वेगळे) तप करायची आवश्यकता नाही. जगायला आवश्यक आहे तेवढे जेवलेच पाहिजे. अंगावर येईल, इतके जेवणे गुन्हा आहे. खीर खाल्ली असेल आणि सत्संगात तुम्हाला सांगितले की, 'एवढे एवढे वाचा.' तो पडल्या पडल्या पठन करतो आणि त्याला गुंगी येते. झोपेची गुंगी येईल इतके खाऊच नये.

जे बरेच दिवस उपाशी राहतात त्यांना भगवंतांनी 'ढोरलांघण' (गुरांनी बाहेर खाऊ नये म्हणून मालक त्यांच्या तोंडाला फडके बांधतात, आणि ते रात्री काढायला विसरतात त्यामुळे गुरे उपाशी राहतात ते ढोरलांघण) म्हटले आहे. पण त्यात अपार कष्ट होतात. म्हणून त्याचे पण फळ मिळेलच, देवगती मिळेल. तुम्ही मौजमजा कराल त्याचेही फळ मिळेल. भगवंतांनी 'नॉर्मल' राहायला सांगितले आहे. 'सहज मार्गाने चालत राहा' असे म्हटले आहे. पण भगवंताचे सांगणे कोणाला समजले नाही आणि समजल्याशिवायच लोक तप करत बसतात.

## प्राप्त तपच करण्यास योग्य

दुसऱ्या कुणाकडून शिकून तप करणे योग्य नाही. रात्रंदिवस तुझे मन तापलेलेच असते ना! तुझे मन, वाणी आणि वर्तन जे तापलेले आहेत त्यालाच तू शांतपणे सहन कर, म्हणजेच खरे तप होय. जेव्हा मन, वाणी आणि वर्तन तापलेले असतात तेव्हा त्यात तन्मयाकार असतो आणि जेव्हा काही तापलेले नसेल तेव्हा तप करायला बसतो, पण त्यावेळी त्याचा काय उपयोग? भगवंतांनी तप केव्हा करायला सांगितले आहे, जेव्हा सगळे विष देणारे येतात, तेव्हा अंतरंग तापते, हृदय लाल लाल होते, तेव्हा शांत राहून सहन करावे. तपाला बोलावून तप करा असे भगवंत म्हणत नाहीत. पण पुढ्यात येणाऱ्या तपाला हसत हसत स्वीकार करण्यास सांगितले आहे. याउलट लोक पुढ्यात येणाऱ्या तपाला इकडे-तिकडे ढकलतात, तोंड वाकडे करतात. त्यामुळे जो तप द्यायला आला असेल त्यालाच ते तप अनेक पटीने परत करतात, आणि न आलेल्या तपाला बोलावतात, कसेही करून बोलावतात. कोणाचे तरी पाहून शिकतात आणि तप करायला बसतात! अहो, तप ही गोष्ट अशी कोणाकडून तरी शिकण्याची गोष्ट आहे का? तुझा तपाचा प्रकार वेगळा, त्यांचा वेगळा, प्रत्येकाचा वेगळा. प्रत्येकाची कारणेसुद्धा वेगवेगळी असतात, आणि आजकालच्या काळात तर तप अगदी सहजपणे समोर येऊन उभे राहते.

महावीर भगवंत म्हणाले होते, 'कलियुगात सावध होऊन चाला. तुला जे तप प्राप्त झाले असेल ते तप भोगून घे आणि अप्राप्त तप उभे करू नकोस.' समोरच्या व्यक्तीशी टक्कर झाली आणि तुला जर काही इजा झाली तर तेव्हा शांतपणे तप कर. उलट अशा वेळी भांडत बसतो आणि नंतर घरी येऊन सांगतो, 'उद्या माझा उपास आहे.' अरे, तू असे का वागतोस? तुझी तब्येत चांगली नसेल (पोट बिघडले असेल) तर एक वेळ किंवा दोन वेळा जेवू नकोस, उपास कर, त्याला हरकत नाही. हा सहज स्वभाव आहे. प्राणीदेखील असे करतात. पण असा अनावश्यक त्रास करून घेण्याची गरज नाही. भगवंत म्हणतात, 'व्दापारयुग, त्रेतायुग

आणि सत्‌युग, या तीन काळात त्याग करा, तप करा पण चौथ्या काळात–कलियुगात, तुला मुद्दाम तप आणि त्याग शोधण्याची गरजच पडणार नाही, विकत घेण्याचीही गरज पडणार नाही.' ज्या काळात तप विकत घ्यावे लागत असे त्या काळात असे तप करावे लागत असे. कारण दिवसभर शोधूनसुद्धा तप सापडत नसे! पण तो काळ आता गेला. आता तर कितीतरी तपे सहज मिळतात.

महावीर भगवंतांना त्या काळात देखील तप शोधण्यासाठी जावे लागे. लोकांना तप येत असे पण भगवंतांना तप येत नसे ना! भगवंतांना येत नसे म्हणून त्यांना वाटले, 'ही सर्व माणसे मला भिक्षा वाढतात. मुद्दाम ध्यानात ठेवून माझ्यासाठी खाणे बनवतात आणि देतात. कोणीच मला त्रास देत नाही, शिव्याही देत नाही, काहीच त्रास नाही, पण आत तर अजून माझ्या कर्मांचे उदय बाकी आहेत,' ते त्यांचे त्यांना कळत असे. एखाद्याला ओकारी येणार असेल तर त्याचे त्याला अगोदरच कळते. तसेच ज्ञानींना पुष्कळ काळानंतर कर्मांची ओकारी होणार असेल तर ते अगोदरच समजते. अशा कर्मांची ज्ञानी *उद्दीरणा* करतात. ( *उद्दीरणा* म्हणजे भविष्यात फळ देणाऱ्या कर्मांना अगोदरच बोलावून वर्तमान काळातच त्यांना भोगून पूर्ण करायचे.) मनुष्यांना उद्दीरणा करण्याचे सामर्थ्य आहे. म्हणून महावीर भगवंतांनी विचार केला 'चला, आपण हा आर्य देश सोडून अनार्य देशात जाऊ या, म्हणजे मग माझी कर्मे गळून पडतील. कर्माचा हिशोब आहे.' आर्यदेशात सगळे लोक भगवंतांना आदरपूर्वक 'या, या' असे म्हणत आणि त्यांच्यावर पुष्पवर्षाव करत असत म्हणून त्यांनी अनार्य देशात जायचे ठरविले. अनार्य देश साठ मैल दूर होता, मुख्य रस्त्यावरुन त्यांना जाता आले नाही. सगळा गाव त्यांना निरोप देण्यासाठी आला होता. लोकांनी भगवंतांना विनंती केली की तुम्ही अरुंद वाटेने जाऊ नका. या वाटेत चंडकोशीया नावाचा नाग राहतो. तो कोणालाही त्या जंगलात प्रवेश करू देत नाही. जो या रस्त्याने जाईल त्याला तो जिवंत सोडणार नाही. भगवंत, तो तुमच्यावर उपसर्ग करील. भगवंत म्हणाले, 'तुम्ही सगळे मला नको नको म्हणत आहात, पण मला याच रस्त्याने जाण्याची आवश्यकता आहे. मला माझ्या ज्ञानात तसे दिसत

आहे. माझा आग्रह नाही पण माझ्या ज्ञानात तसे दिसत आहे, तेव्हा तुम्ही काळजी करू नका, शांत राहा. आणि मला जाऊ द्या.' मग गावचे लोक तिथेच उभे राहिले, कोणीच जंगलात घुसले नाही! एकदा चंडकोशियाचे नाव ऐकल्यावर कोण जीव धोक्यात टाकील? 'भगवंतांना जायचे आहे तर जाऊ दे' असेच म्हणणार ना लोक शेवटी! चंडकोशियाचे नाव ऐकताच देव-बिव सगळे सोडून देणार! सोडतात की नाही लोक?

भगवंत तर जंगलाच्या रस्त्याने निघाले. तिथे चंडकोशियाला लगेच महावीरांचा सुगंध आला मग तो खवळल्याशिवाय कसा राहील? तो तर कोणा जनावराला पण जंगलात येऊ देत नसे. तो संतापून फूत्कार टाकत भगवंतासमोर आला आणि त्याने भगवंताच्या पायाला दंश केला. दंश मारताच भगवंतांचे थोडे रक्त त्याच्या तोंडात गेले. ते रक्त तोंडात जाताच त्याला त्याच्या मागील जन्माची आठवण झाली. तेव्हा भगवंतानी त्याला उपदेश केला 'हे चंडकोशिया! बूझ, बूझ! आणि तुझा हा क्रोध आवर.' पूर्वजन्मी चंडकोशिया एक साधू होता आणि शिष्यावर प्रचंड कोप केला म्हणून त्याची ही अवस्था झाली होती! 'तेव्हा आता शांत हो. तुला आता ज्ञान झाले आहे तसाच तू शुद्धात्मा आहेस.' चंडकोशिया भानावर आला. त्याला मागील जन्माचे ज्ञान झाले मागील जन्मात तो साधू होता. तो शिष्यावर अतिशय क्रोधित झाला होता. भयंकर क्रोध! साधासुधा क्रोध नाही. नवरा बायकोवर रागावतो तसा नाही. शिष्य बिचारा अडकलेला मग काय, गुरु त्याला सोडणार का! त्या शिष्याला गुरु सतत मारत राहायचे. चंडकोशियाला ही आठवण होताच तो तिथेच तडफडून कोसळला आणि रक्तबंबाळ अवस्थेत मरण पावला. तो तडफडून कोसळला म्हणून रक्त आले आणि म्हणून त्याच्या शरीराला खूप मुंग्या लागल्या. त्या मुंग्या ओढाताण करू लागल्या. चंडकोशियाला प्रचंड आगआग होऊ लागली, पण त्याने शांतपणे तप केले आणि त्याला चांगली गती प्राप्त झाली.

भगवंत तिथून मग अनार्य, अनाडी देशात गेले. लोक त्यांना पाहून 'अरे हे पाहा, बुवा आला, त्याला दगड मारा. हा कसला बुवा कपडे

पण घालत नाही. मारा त्याला.' असे म्हणत. त्यांना आतमध्ये येऊच देत नसत. अशा तऱ्हेने भगवंतांना आत प्रवेश करण्यापूर्वीच प्रसाद (त्रास) मिळू लागला! पण भगवंत तर जाणत होते 'मी कुठे प्रसाद खात आहे?' म्हणजे त्यांना 'हवा तसा प्रसाद' मिळू लागला! एखादे ठिकाणी जर कोणी दयाळू व्यक्ती असेल ती त्यांना भाकरीचा तुकडा देई. आर्य देशात त्यांना मिठाई मिळत असे पण इथे त्यांना तसे कोण देणार? भगवंतांनी काही काळ या अनाडी क्षेत्रात व्यतीत केला. त्यांचा कर्मक्षय झाल्यानंतर ते परत आर्यदेशात परतले. सध्या तर घरी बसल्या बसल्या सर्वांना अनाडी देश लाभला आहे. तरी लोक कटकट करतात! अहो, महावीर भगवंतांना तर तप करण्यासाठी साठ मैल दूर जावे लागले होते ना!

तुम्ही तर किती पुण्यशाली आहात की, तुम्हाला घरी बसल्या बसल्या अनाडी देश उपलब्ध आहे! आपण घरात शिरलो की आलाच अनाडी देश! जिथे खातो-पितो, जेवतो, तिथेच अनाडी देश आहे. तर आता इथेच तप करून तापायचे आहे. भगवंतांना तप शोधण्यासाठी साठ मैल दूर जावे लागले होते, अनाडी देश शोधण्यासाठी! तुम्हाला घरबसल्या लोकांचा अनाडीपणा लक्षात येत नाही का? मग फुकटात तप मिळत आहे तर 'शांतपणे' सहन करा ना! या काळातील लोकही किती पुण्यशाली आहेत! अशा तपाला प्राप्त तप असे म्हणतात. शेजारी-पाजारी, भागीदार, भाऊ, पत्नी, मुले सगळेच तप करायला लावतात! पूर्वीच्या काळात घरात अनुकूल परिस्थिती असायची. आता प्रतिकूल काळ आला आहे. घरबसल्याच प्रतिकूल गोष्टी मिळतात, त्या शोधण्यासाठी बाहेर जावे लागत नाही. हा काळच असा आहे की कुठेही ॲडजस्टमेंट होऊच शकत नाही. घरी, बाहेर, शेजारी सर्व बाजूंनी डिसॲडजस्टमेंटस (प्रतिकूल गोष्टी) येऊन धडकतात. त्यांना तू सहन कर आणि ॲडजस्ट हो.

प्राप्त तप म्हणजे आपणहून समोर आलेले तप, त्याला तो शांतपणे आरामात भोगतो, समोरच्या व्यक्तीला अजिबात दु:ख होत नाही. आपल्या निमित्ताने समोरच्या व्यक्तीला दु:ख तर होत नाही, पण आपले मनोभाव देखील त्या व्यक्तीसाठी बिघडत नाही, ते म्हणजे प्राप्त तप. दुसऱ्या

कुठल्याही तपासाठी भगवंतांनी मनाई केली आहे. असे असूनही पाहा ना लोक किती वेगवेगळी तपे करत बसतात! अहो, जरा समजून वागा. दिवसभर शिष्याला रागावतो आणि दुसऱ्या दिवशी उपवास करतो, आता याला काय अर्थ आहे? या सगळ्या गोष्टी निरर्थक आहेत! तुम्हाला निरर्थक नाही का वाटत? म्हणणार 'मला दोन दिवस उपवास करायचा आहे.' अहो, सध्याची परिस्थिती अशी आहे की ज्या दिवशी रेशनवर पुरेसे धान्य मिळाले नाही तेव्हा थोड्या तांदळात भागवून घ्यावे लागते. 'महाराज आज इतकेच', तर तितकेच भोजन, असे थोडेसे अधिक–उणे करून टाका. एक दिवस अजिबात काहीच न खाण्यापेक्षा रोज थोडेसे अधिक–उणे करून ॲडजस्ट व्हा ना! एखाद्या दिवसी दुपारी दोन वाजेपर्यंत जेवणाची सोय झाली नाही तर शांतपणे सहन करून घ्या की! किंवा कधी जेवणच मिळाले नाही तरी अशा वेळी तुम्ही शांत राहा. पोटात थोडेसे गेले की ते बोंबा मारत नाही. रात्री थोडी खिचडी, आणि भाजी दिली की मग तक्रार करेल का? नाही करणार. मग तुम्हाला ज या प्रकारच्या ध्यानात राहायचे असेल तसे राहू देईल. पोटाला काहीच हरकत नसते. या सर्व चुका स्वतःच्या असतात. मनाची पण चूक नाही. स्वतःच अनाडी आहे. अनाडी आहे म्हणून स्वतः तर दुःख भोगतोच, पण दुसऱ्यांनाही दुःख भोगायला लावतो. केवळ अनाडीपणा!

लोक समोरासमोर म्हणतात ना की हा अनाडी आहे? अरे, या मुंबईत अनाडी नाही असा माणूस शोधून देखील सापडणार नाही, म्हणून ते एकमेकांना अनाडी म्हणतात. अहो, असे म्हणता कामा नये. भगवंत जे शोधत होते ते अनाडीपणा तुम्हाला घरबसल्या मिळत आहे. म्हणून हे दादा तुम्हाला म्हणत आहेत खा, प्या, मजा करा आणि जे तप वाट्याला येईल त्या तपाला शांतपणे भोगा. या काळात 'तपाला' मुद्दाम बोलावणे पाठवायची गरजच नाही. सतत तपातच तापत असतात हे लोक! आणि ते दुसरे, तप करणारे लोक काय करतात? समोर आलेल्या तपाला भोगत नाहीत आणि जे तप आलेले नसते त्याला मुद्दाम बोलावतात, बोलावून तप करतात. आता अशा वेळी जर आपण त्याच्याशी बोलायला गेलो तर ते इतके तापलेले असतात की आपल्याकडून बोलण्यात

किंचितदेखील चूक झाली तर ते आपल्यावर तुटून पडतात! तप करणारे कसे असतात? तापलेले असतात. जणू काही घुमसती आग! जरासा आपल्या विडीचा स्पर्श झाला की लगेच भडका उडतो! म्हणून तिथे चुकून सुद्धा असे काही करू नये. भगवंत असे नव्हते, भगवंत तर खूपच समंजस होते.

सध्या प्राप्त तपाची कमतरता आहे का? काहीच नाही शेवटी तर दात दुखतो, असा दुखतो की दम घुटतो. दाढ दुखते, पोट दुखते, डोळे दुखतात, किंवा समोरची व्यक्ती येऊन भांडते, या सगळ्या गोष्टी म्हणजे प्राप्त तप! नाही तर समजा कधी सत्संगाहून घरी जाताना उशीर झाला तर बायको म्हणणार यायला काही काळवेळ? कुठेतरी भटकत असणार? कुठे गेला होता भटकायला? आता आपण सत्संगात बसलो होतो की भटकत होतो तिला काय ठाऊक? आता बायको जेव्हा असे बोलेल तेव्हा आपण गप्प बसलो नाही तर तो आपलाच मूर्खपणा ना! आपण समजून घ्यायला हवे की आज तप करण्याची पाळी आली आहे! तेव्हा जर तप केले नाही आणि बायकोला बोललो, 'गप्प बस, एक अक्षर बोलू नकोस.' की लगेच बायको तिच्या बंदुकीत गोळ्या भरणार! कुणी विचारले 'ताई, तुम्ही गोळ्या बंदुकीत का भरत आहात?' तर म्हणेल, मी गोळ्या झाडेन. मग जेवण झाल्यावर बायको बंदुकीचा बार उडवते. आणि रात्री परत त्या एकाच खोलीत झोपतात! दुसऱ्या खोलीत झोपायचे असते तर आपण समजू की सुटलो या कटकटीपासून. पण इथे तर कटकटीसोबतच झोपायचे! अरे बाबा, झोपायच्या जागी कोणी फटाके पेटवते का? जर कोणी पेटवलाच आणि तो आपल्या पायावर पडला तर आपण तो ताबडतोब विझवायला हवा ना! बाहेर जे करायचे असेल ते करा, पण ज्या घरात रात्रंदिवस एकत्र राहायचे आहे तिथे असे करू नये. ज्ञानी खूप समजदार असतात. स्वत:चे हित कशात आहे ते ते जाणतात, त्यांना लगेच समजते की हिने फटाका फोडला आहे. ती खूप संतापली आहे, म्हणून फोडला आणि माझ्या पायावर टाकला, पण जर आता मी परत तिच्या पायावर टाकला तर ती पुढचा फटाका थेट माझ्या डोक्यावरच टाकेल. हा मूर्खपणा सोडून द्या. एकदाच हे सर्व कायमचे विसरून जा.

तप केले आणि ते कोणालाही कळू दिले नाही, तेच खरे तप! तपासंबंधी आपण कोणाशी बोललो तर तो ऐकतो आणि मग आपल्याला आश्वासन देतो, म्हणजे तो आपल्या तपातून दोन आणे कमिशन कापतो. एवढेच नव्हे, तर कधी कधी तो आपल्याला चुकीच्या वाटेवरदेखील नेतो. म्हणून आपल्या तपासंबंधी दुसऱ्यांशी का बोलावे? उगाच कमिशन का द्यावे? प्राप्त तपात जितके आश्वासन घ्याल तितके जास्त तप करावे लागेल. आम्ही कधीच कुणाकडून आश्वासन घेतले नाही. आश्वासन घेतले तर तप करावे लागते, नाही तर आत सर्व तापत राहते म्हणून तप होते, आणि त्या तपाचे आतल्या आत शमन करत राहायचे. ते उसळी मारेल, पण नंतर शांत होईल. त्याची वेळ आली की तो उफाळणारच. याला ज्ञान-दर्शन-चारित्र्य आणि तप म्हटले आहे. तर तप म्हणजे आपण समोर आलेले तप करायचे. अशा प्रकारची तपे करायची आहेत. बटाटे वडे खायची इच्छा झाली आणि ते मिळाले नाहीत तर त्या दिवशी तप करायचे.

**प्रश्नकर्ता :** दादा, आपल्या या पायावर खुणा कसल्या?

**दादाश्री :** ते तर आम्ही आत्मा मिळविण्यासाठी तप करत होतो. ते कसे तप की बुटाचा एक खिळा वर आला तर त्याला न ठोकता तसेच चालत असू. नंतर आमच्या लक्षात आले की हे तर आम्ही चुकीच्या रस्त्याने चालत आहोत. आम्ही जैनांसारखे तप करू लागलो आहोत. बुटाचा खिळा बाहेर निघाला आणि टोचला, तेव्हा जर आत्मा हलला, आणि आत्म्यावर परिणाम झाला तर आत्मा प्राप्त झालेलाच नाही असे मी समजत होतो. म्हणून मी तसे तप करत होतो, पण त्या तपाचा डाग पायावरून अजूनही गेलेला नाही! तपाचे डाग आयुष्यभर जात नाहीत. हा मार्ग चुकीचा आहे हे आम्हाला नंतर समजले. खरे तर, आंतरतप असले पाहिजे.

## तप, क्रिया आणि मुक्ती

**प्रश्नकर्ता :** तप आणि क्रिया, यामुळे मुक्ती मिळते का?

**दादाश्री :** तप आणि क्रिया यांचे फळ मिळते. मुक्ती मिळत नाही. कडूलिंबाचे बी पेरले तर कडू फळे मिळतात आणि आंब्याचे बी पेरले तर गोड फळे मिळतात. तुला ज्या प्रकारची फळे हवी आहेत तसे बी तू पेर. मोक्षप्राप्तीचे तप तर वेगळेच असते, ते आंतरतप असते.

मोक्षाचे चार आधारस्तंभ आहेत. ज्ञान, दर्शन, चारित्र्य आणि तप. काही लोक हे समजून न घेता फक्त एकच खांब पकडून बसतात. जसे पलंगाच्या चार पायांपैकी एकाच पायाला धरले तसे या एकाच तपाला धरून बसले आहेत. देहाला तापवायचे नसते तर मनाला तापवायचे असते आणि ते देखील अशा प्रकारे की इतर कोणालाही ते कळता कामा नये. पण आजकाल तर लोक बाह्य तपच करतात. म्हणजे जे स्टेशन आले त्यालाच पकडले. बाह्य तप करून संन्याशाला कोणते फळ मिळाले? तर देह तेजस्वी झाला. देहाला (तपाने) तापवले तर देह प्रकाशमान होतो. पण मृत्यूनंतर देह थोडाच बरोबर येणार आहे? देह तर जाळला जाणार आहे? जोपर्यंत हा देह आहे तोपर्यंत आपले (मोक्षाचे) काम करून घ्यायला हवे, त्याग करणाऱ्यांनी त्यागाची कसरत केली. हे तप, त्याग करणे म्हणजे नुसत्या व्यायामशाळा आहेत, त्यातून आत्म्यासाठी काहीच केले जात नाही, आत्म्यावर काहीच उपकार होत नाहीत, बायकोवाचून जगू शकतो की नाही याचा सराव करणारे बायकोला सोडून पळून जातात. बायको वर्षभर माहेरी नाही का जात? म्हणजे घरी पण बायकोशिवाय जगू शकता, मग बायकोला सोडून पळून जायची काय आवश्यकता आहे? आई-वडील रोज भांडतात असे पाहून मुलगा मनात ठाम ठरवतो 'आता असे असता कामा नये. बायको नसावीच.' असे रोज ठाम ठरवल्यामुळे ते कर्म उदयास येते आणि तो पळून जातो. त्याऐवजी हे सहन कर की! या प्राप्त तपाला सहन करता करता मोक्ष मिळेल. प्राप्त दु:ख, त्याला तर 'बक्षीस' म्हणायचे. मग जरी सहन करावे लागले तरी हरकत नाही, पण काही गमावत तर नाही ना? आपल्याला काहीतरी मिळाले म्हणजे त्याला बक्षीसच म्हणायचे ना?

तप आणि त्याग करतात ते विषयच आहेत, सब्जेक्टस् आहेत.

त्याने फक्त हिम्मत वाढते. तपामुळे शरीरात शक्ती आहे याची जाणीव होते. पण 'त्यागे सो आगे' ज्याचा त्याग केला जातो तेच नंतर अनंतपटीने आपल्या वाट्याला येते, आणि मग मोक्ष मिळत नाही. परंतु जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' मिळत नाहीत तोपर्यंत मात्र शुभात पडून राहा.

## त्याग कशाचा करावा?

भगवंतांनी अशा प्रकारे तप आणि त्याग करायला सांगितलेले नव्हते. त्यांनी तर वस्तूंच्या मूर्च्छेचे त्याग करायला सांगितले होते. त्याला ज्ञान मंदिराचा त्याग म्हणतात. आणि लोक जे मानतात तो बाल मंदिराचा त्याग आहे. ही पर्स आहे, ती जर हरवली तरी अस्वस्थ होत नाही, अशी अवस्था म्हणजे मूर्च्छेचा (मोहचा) त्याग. बालमंदिराच्या त्यागात काही तरी सोडून द्यायचे आहे, एवढेच ध्येय असते, पण त्याचेसुद्धा काहीतरी फळ मिळेल. बायको-मुलांचा त्याग केलात तर लोक 'गुरुजी, गुरुजी' म्हणत पूजतील. वस्तूंच्या मूर्च्छेचा त्याग हाच खरा त्याग. बायको-मुलांचा त्याग केला तो तर दुसऱ्या नियमांच्या आधारावर केलेला त्याग आहे. उदय कर्मांच्या आधारे प्रकृती त्याग करवून घेते, पण बघा, तांब्यावर मूर्च्छा आहेच शेवटी?! मग शिष्यांवर द्वेष करीत बसतात, तर त्याला त्याग म्हणायचेच कसे?

खरा मार्ग मिळालेला नाही म्हणून लोक गटांगळ्या खातात. पण त्यात त्यांचा दोष नाही. मग दोष कुणाला द्यायला हवा? तर जो अहंकार करतो त्याला, नीट समजल्याशिवायच आपल्या बायको-मुलांचा त्याग केला. म्हणजे घरच्या तीन घंटा सोडल्या आणि इथे 108 शिष्यांच्या घंटा गळ्यात बांधून घेतल्या, म्हणून आम्हाला असे म्हणावे लागते.

भगवंत म्हणतात, बंगल्यात राहत असाल, पण बंगल्याची मूर्च्छा नाही, मूर्च्छेचा असा त्याग म्हणजे खरा त्याग. खिसा कापला गेला तरी मूर्च्छा होत नाही, म्हणून तो त्यागी आहे. जर मूर्च्छेच्या त्यागाला त्याग म्हटले नसते तर संसारी माणसांना केवळज्ञान होणारच नाही. भगवंत काय म्हणाले, की वस्तूचा त्याग कोणी करूच शकत नाही. वस्तू अनंत

आहेत, कशाकशाचा त्याग करणार? आणि नुसते वस्तूंचा तिरस्कार करून त्या थोड्याच दूर जाणार आहेत? पण अनंत वस्तूंवरच्या मूर्च्छेचा त्याग जर झाला तर तो वस्तूंच्या त्याग केल्यासमान आहे.

जे त्याग करतात ते अहंकारानेच त्याग करतात, पण ग्रहण-त्याग करण्यात मूर्च्छा नसणे, यालाच भगवंतांनी खरा त्याग म्हटला आहे. जो सहज वर्ततो (घडून येतो), असा त्याग हाच खरा त्याग.

## त्यागात विषमता

लोक बाह्य कितीही गोष्टींचा त्याग करोत पण त्यागामुळे जर विषमता आली तर स्वत:चे दोष दिसत नाहीत, पण जर त्यागात समता आली तर स्वत:चे दोष दिसू लागतात. महाराज भिक्षा मागायला गेले आणि त्यात जर त्यांना एखादा बटाटा दिसला तर लगेच विषमता येते (मनात संताप येतो)! असे असेल तर आपल्या चुका कशा दिसतील? त्यागात समता असली पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** त्यागात विषमता म्हणजे काय?

**दादाश्री :** समजा एखाद्या व्यक्तीने काही गोष्टींचा त्याग केला असेल की मला कांदा-लसूण खायचे नाही, पण चुकून कांद्याचा तुकडा उडून जेवणात पडला आणि जेवताना तो त्याच्या हातात आला तर लगेच त्याच्या रागाचा पारा चढतो. तो किंचाळूच लागतो. काही लोक कांदे पाहायलासुद्धा तयार नसतात, नुसते कांदे पाहिले तरी ते अस्वस्थ होतात, अशा लोकांची अवस्था कुठली? त्यांना समता भाव राहू शकतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही. विषमता राहते.

**दादाश्री :** या त्यागाच्या फळस्वरूपात विषमता उत्पन्न झाली, त्यापेक्षा तर असा त्याग न केलेलाच बरा. भगवंत म्हणाले, जर चुकून एखादा बटाट्याचा तुकडा जेवणात आला तर त्यात तुमचे असे काय मोठे नुकसान होते? शेवटी हे सगळे बटाटेच आहेत. जे भोगले जातात ते सर्व बटाटेच म्हणायचे. अज्ञानामुळे बुद्धी वापरून भेद निर्माण करतात.

चुकून एखादा बटाट्याचा तुकडा ताटात आला तर त्यावर योग्य तो उपाय करावा. एवढे तर जमलेच पाहिजे ना! समता, कधीही सोडता कामा नये. त्यागात समता राहिली तर ती मोक्षाला नेईल. त्याग कशासाठी? समता वाढविण्यासाठी की विषमतेसाठी? त्याग हा समता वाढविण्यासाठी करावयाचा आहे आणि जर समता राहिली नाही तर त्याग म्हणजे केवल मूर्खपणा आहे. म्हणूनच ज्ञानींकडून हे सर्व नीट समजून घे आणि मगच त्याग कर, अन्यथा त्याग करू नकोस. हे एक खूप मोठे हॉस्पिटल आहे, म्हणून 'ज्ञानीं'ना विचार 'मी काय करू?' मग तो म्हणेल, ''नाही, 'हे' तर संसारी आहेत.'' मग तू स्वतःच औषध बनवून पी ना! तुला कोणीही अडवलेले नाही. पण जर तुला मोक्ष हवा असेल, त्यागात समता आणायची असेल तर ज्ञानींना विचार. नाही तर स्वतःच औषध बनविण्याची सौदेबाजी चालूच ठेव. वीतराग भगवंत देखील कोणावर रागावले नाहीत. किती समंजस होते वीतराग! वीतराग मुळातच वाद–विवादात पडत नसत. त्यांच्या शिष्यांनी दगा दिला तरी ते रागवायचे नाहीत. आपले ध्येय पण तेच आहे ना? हे तर आता आमच्या वाट्याला आले आहे! चोवीस तीर्थंकर हा माल ठेवून गेले आहेत, की तुम्ही जा, नंतर 'दादा' येणार आहेत, त्यांच्याकडे जा.' म्हणजे ते सर्व आमच्या वाट्याला आले आहे. 'आमचा' ठपका तर करुणेचा ठपका असतो. 'आम्ही' स्वभावाने वीतरागी आहोत पण *'जेवा रोगो तेवा औषध, श्रीमुख वाणी झरते.'* अर्थात समोरच्या व्यक्तीचा जसा रोग (दोष) असेल त्याला अनुरूप अशी नैमित्तिक वाणी बाहेर येते.

आमच्या करुणा बुद्धीमुळे कटू शब्द निघतात, कारण काळच तसा आला आहे. जर फ्रीजमध्ये भाजी गारठली असेल तर शिजण्यासाठी त्यात थोडा सोडा टाकावा लागतो तरच ती भाजी नीट शिजते! म्हणून आम्हाला सोडा वगैरे टाकावा लागतो. आम्हाला हे असे करणे थोडेच आवडते?

एवढ्या सगळ्या अडचणी असल्या तरी पण तुम्हा महात्म्यांना येथे निर्विकल्प समाधी प्राप्त होते. बटाट्याचा तुकडा आलाच तर हळूच

कुणाला समजणार नाही अशा तऱ्हेने बाजूला काढून ठेवावा, समतापूर्वक. परंतु ज्यांना विषमता येते ते काय करतात? 'कुठून आले हे तुकडे? जा फेकून दे.' आमच्या आमटीत मांसाचा तुकडा आला तरी आम्ही तो लगेच काढून ओटीत घालतो. कपडे खराब झाले तरी चालेल पण आम्ही कोणालाही दुखावणार नाही, दुखावले तर जो ती आमटी खाईल तो आजारी पडेल. या अनेक लोकांनी नकळत कितीतरी झुरळे आणि पाली खाल्या असतील. त्यातून मग रोग होतात, कोड फुटते, अनेक तऱ्हेचे रोग होतात. जे बाहेरचे खातात, तिथे कोणीच सावधगिरी बाळगत नाहीत, त्यात जीवजंतू पडतात आणि सर्वजण ते मोठ्या चवीने खातात. आम्ही मांसाचा तुकडा लपवतो आणि बाकी सारे 'व्यवस्थित शक्ती' वर सोडतो, जणू काही झालेच नाही असे वागतो. आणि शेठ लोकांचे तर लगेच रक्तच खवळते, ते खूप आरडाओरड करतात, त्यामुळे घरात बायका-मुले हादरून जातात. 'आम्ही' तर समजतो की या बाईने 'मांसाचा तुकडा' जाणूनबुजून थोडाच घातलेला असणार? नाही, ती काही तरी घ्यायला गेली असेल आणि नेमका त्या वेळी कावळा भाकरीचा तुकडा पळवायला घरात घुसला असेल आणि त्याच्या तोंडातून मांसाचा तुकडा आमटीत पडला. संयोग कसे निर्माण होतात! म्हणून माणसाने सर्व गोष्टींसाठी तयारी ठेवायला हवी. ज्या ज्या गोष्टी घडतात त्या सर्व लक्षात हव्या ना?

माणूस जेवढा त्याग करतो तेवढा त्याचा अहंकार वाढतो आणि क्रोधही जबरदस्त वाढतो. 'मी, मी' करतात त्यापेक्षा तर विलासी चांगला, तो सरळ म्हणतो 'मला यातले काहीच कळत नाही.' सर्व माणसे जातिभेद करतात. त्यांना वाटते, 'हे लोक त्यागी आहेत. ते काहीही करू शकतात. आणि आपण तर संसारी आहोत. (आपल्याला हे कसे शक्य आहे?)' असा लिंगभेद राहतो. असा फरक राहिला तर संसारी माणूस सुटणार कसा? म्हणून आमचे उदाहरण समोर ठेवा 'आम्ही पण गृहस्थलिंग आहोत, आयकर भरतो,' मग तुम्हाला लिंगभेद जाणवणार नाही आणि तुमची हिम्मत वाढेल!

भगवंत म्हणतात, त्यागी लोकांना देखील मोक्ष मिळत नाही आणि

संसारी लोकांना देखील मोक्ष मिळत नाही. एखाद्याने चहाचा त्याग केलेला नाही, आणि तो चहा ग्रहण करतो, तर तो ग्रहण करण्याचा अहंकार करतो. या उलट दुसरा कोणी चहाचा त्याग करतो आणि चहा ग्रहण करत नाही, तर तो त्याग करण्याचा अहंकार करतो हे दोनही प्रकारचे लोक अहंकार करतात आणि जोपर्यंत अहंकार आहे तोपर्यंत मोक्षमार्ग नाही. तरी पण क्रमिक मार्गात अहंकारानेच अहंकार धुवायचा असतो. साबण स्वत:चा मळ सोडतो आणि कपडे धुतले जाते, आणि मग साबणाचा मळ घालविण्यासाठी टिनोपॉल वापरावा लागतो. टिनोपॉल साबणाचा मळ घालवितो पण त्याचा स्वत:चा मळ ठेवत जातो. असे सतत चालूच राहते. गुरु स्वत:चा 'मळ' शिष्यावर ठेवत जातो तर आता गुरुचा मळ शिष्यावर बसल्यामुळे मळाने मळ काढावाच लागतो ना! कारण 'गुरु,' ते सुद्धा मळलेलेच आहेत ना! या उलट 'ज्ञानी पुरुष' पूर्ण शुद्ध असतात, म्हणून त्यांच्यावर किंचितही मळ बसत नाही. क्रमिक मार्गात गुरु शिष्यावर मळ चढवत जातात आणि अक्रम मार्गात सरळ शुद्धच प्राप्त होते. ज्याची संगत केली तो स्वत:चा मळ चढवतोच. 'ज्ञानी पुरुष' मात्र संपूर्ण शुद्ध असतात म्हणून कसलाही मळ बसत नाही.

## खरा त्यागी

सर्व संसारी लोकांची दु:खे मला मिळोत आणि माझी सर्व सुखे संसारी लोकांना लाभोत, अशी ज्याची भावना असते तोच खरा त्यागी. जो स्वत:च *अशाते* मध्ये (दु:खात) राहत असेल तो दुसऱ्यांना सुख कसे देणार? धर्ममार्गावर चालले तरी शांती लाभेल.

जग उपभोग घेण्यासाठी आहे, तर उपभोग घ्या पण कुणाला दु:ख देऊ नका. ज्याला त्यागी व्हायचे असेल त्याने त्यागी व्हावे पण कुणाला दु:खी करू नये. पत्नीकडून सही करवून घे की, 'माझ्या संपूर्ण राजीखुशीनी पती जात आहेत' पण लोक पत्नीची सही जबरदस्ती करून मिळवितात. सर्वांना राजी केल्यानंतरच त्यागी होता येते.

भगवंत काय म्हणाले? खरा त्यागी पुरुष कसा असतो? तर त्यांचा

चेहरा पाहाताच आपल्याला आनंद होतो, त्यांचा पाया पडावे असे वाटते, त्यांना पाहाताच इन्कमटॅक्सची काळजी असेल तरी ती काळजी विसरून आनंद मिळतो, मन शांत होते, अशा व्यक्ती त्यागी पुरुष.

आत्मा क्षणभर देखील 'अनात्मा' झालेला नाही. त्याला एक क्षणभर देखील 'अनात्मा' व्हायची इच्छा झाली नाही. 'आत्म्याला' त्याग नाही, जप नाही, तप नाही. त्यागी लोकांना आत्म्याचा त्यागाची भ्रांती आहे आणि संसारी लोकांना आत्म्याचा संसाराची भ्रांती आहे. (त्यागीला वााटते मी त्यागी आहे, मी त्याग केला तरच आत्मा प्राप्त होईल. आणि गृहस्थिला वाटते मी गृहस्थी आहे, मला संसारात ग्रहण करावे लागते.)

## ज्ञानींची आज्ञा हाच धर्म आणि हेच तप

मोक्ष प्राप्त करण्यासाठी काहीही खर्च करण्याची गरज नाही. तप, त्याग असे काहीही करण्याची गरज नसते. फक्त 'ज्ञानी पुरुष' लाभतील तर त्यांची आज्ञा म्हणजेच धर्म, त्यांची आज्ञा म्हणजेच तप. 'ज्ञानी पुरुष' लाभले की एका नव्या प्रकारच्या तपाची सुरुवात होते - आंतरिक तप, आंतरिक तपामुळे मोक्ष लाभतो आणि बाह्य तपामुळे संसार (भौतिक सुख) लाभते! कोणी शिव्या दिल्या तर ताबडतोब तुम्ही रोख प्रतिक्रमण करता, त्याला आंतरिक तप म्हणतात.

जन्माबरोबरच मन-वचन-काया घेऊन आला आहे. या तीन गोष्टीच मुख्य मोह आणि मुख्य परिग्रह आहेत. या तिन्हीमुळेच इतर अनेक मोह आणि परिग्रह उत्पन्न होतात. म्हणून सर्व गोष्टींचा त्याग करता येत नाही. जग क्रमाने बांधलेले आहे, आणि तो क्रम कधीच तुटत नाही. एखाद्या व्यक्तीला क्रमात त्याग मिळाला तर तो त्याग करतो. पण त्याचे फळ म्हणून कालांतराने त्याला संसारच प्राप्त होतो. परिग्रह तर अनेक आहेत, तू जरी लाख परिग्रह घेऊन आलास तरी 'आम्ही' तुझ्या डोक्यावर हात ठेवून तुला 'अपरिग्रही' बनवू! अपरिग्रह म्हणजे फक्त समजूतीत फरक आहे. हा अक्रम मार्ग आहे आणि तो क्रमिक मार्ग आहेत. क्रमिक मार्गात भले सर्व काही सोडून जंगलात गेला, तरी

पण मन-वचन-काया सोबत असतात, त्यामुळे परिग्रह सतत बरोबरच असतो. आणि त्यामुळे एक नवीन संसार सुरू होतो. याउलट अक्रम मार्गात परिग्रहात अपरिग्रही राहून मोक्ष आहे. भरत राजे कसे होते? त्यांच्याकडे महाल, राजवाडा, आणि तेराशे राण्या होत्या, तरी पण ॠषभदेव भगवंतांनी त्यांना 'अक्रम ज्ञान' दिले. त्यामुळे त्यांना वैभवात राहून देखील मोक्ष लाभला!

काही लोक कपड्यांना 'परिग्रह' मानतात आणि आणि एकशे आठ शिष्य ठेवतात! कपडे काय चावतात का? खरे तर हाच खरा जिवंत परिग्रह आहे!

आमचे कसे असते? हे घर जळत असेल तरी आम्हाला त्याचा परिग्रह नसतो! आम्ही सहज स्थितीत राहतो. आमच्यासमोर कोणी जेवणाची थाळी ठेवली असेल, आणि ती कोणी उचलून घेऊन जाऊ लागला तर आम्ही त्याला विनंती करतो की, 'भाऊ, सकाळपासून मी उपाशी आहे' जर उपाशी असू, तर विनंती करून त्याला थाळी तिथेच ठेवायला सांगू, पण तरीही तो घेऊन गेला तर आम्ही हरकत घेणार नाही. मागणे म्हणजे परिग्रह नाही. आम्ही जरी 'ज्ञानी' असू, तरी मागावे लागते. आम्हाला 'ज्ञानींना' जेवणाच्या थाळीची मूर्च्छा नसते. हे सगळेच परिग्रह आहेत, त्यात जो अपरिग्रही झाला तर अंत येईल. सत्सुख प्राप्त होईल. पण आजकालचे लोक आड वाटेत (चुकीच्या रस्त्यावर) शिरले आहेत, पण त्यात त्यांचा काहीच दोष नाही. हे सगळे कालचक्रानुसारच होत आहे. आम्हाला कोणीच दोषी दिसत नाही. आमच्या आत जे विराजमान आहेत ते दरअसल (खरे) संपूर्ण वीतराग आहेत! हे खरोखर एक अद्‌भुत नवल वर्तले आहे! हे अक्रम ज्ञान उत्पन्न झाले आहे आणि ते 'विक्रम' शिखरावर पोहोचले आहे!!

हे ज्ञान मिळ्यानंतर जर तुमच्याकडे कोणी आला आणि त्याने तुम्हाला खूप कडू पाजले (अपमान वगैरे केला) तर आत हृदय तापून लाल होते, अशा वेळी तुम्ही ज्ञानात स्थिर राहून रागाने तापलेल्या हृदयाला पाहत राहिले की ते किती तापत आहे, तर याला भगवंतांनी 'ज्ञान-तप'

असे म्हटले आहे. संसारात अवस्था ही नैसर्गिक रचना आहे, त्यात कशाला अस्थिर व्हायचे?

भगवंतांनी म्हटले आहे ज्ञान नसेल पण भान असेल तरी चालेल. भगवंतांनी भान नसेल तरी चालेल असे म्हटलेले नाही. भान आले की मगच ज्ञान-तप सुरू होते. भगवंतांनी प्रयत्न दशेत अबॉव्ह नॉर्मल (असंतुलीत) होण्यास मनाई केली आहे. पण त्याचप्रमाणे अप्रयत्न दशेतसुद्धा अबॉव्ह नॉर्मल होण्यास मनाई केली आहे. भगवंत म्हणतात सर्वच बाबतीत नॉर्मल राहा. (संतुलित राहा) तू ॲबनॉर्मालिटीत जे करतोस त्याला भगवंतांनी विषय असे म्हटले आहे.

तुम्ही जे तप-त्याग करता ते समष्टि तुमच्याकडून करवून घेते आणि तुम्ही मात्र 'मी तप करत आहे' असे मानता. ह्या सगळ्या रिलेटिव्ह गोष्टी आहेत. रिलेटिव्हमध्ये कोणीही काहीच करू शकत नाही. हे आम्ही तुम्हाला अंतिम सत्य सांगत आहोत की, 'तू तप करशील, जप करशील की वेश बदलशील जे काही करशील ते सर्व तुझे भोवरा स्वरूप आहे! जोपर्यंत शुद्धात्मा प्राप्त होत नाही तोपर्यंत सर्व प्रकृती करवीत आहे, म्हणून तू एक भोवराच आहेस.'

❖❖❖❖❖

## त्याग

त्याग दोन प्रकारचे आहेत, 1) अहंकारपूर्वक केलेला त्याग 2) सहजपणे वर्तनात घडून आलेला त्याग.

खरे म्हणजे, त्याग शब्दातच अहंकार सामावलेला आहे. अहंकाराशिवाय त्याग होऊच शकत नाही आणि म्हणून 'मी त्याग केला' असे सतत लक्षात असते. याउलट वर्तत असलेला त्याग लक्षातच राहत नाही. ज्या वस्तूंचा त्याग केला त्याची आठवण सुद्धा आली नाही तर त्यागावर विजय मिळविला असे म्हणता येईल. तसेच अत्याग केलेल्या वस्तूंचीही आठवण आली तर अत्यागावर विजय मिळवला असे म्हणता येईल. त्याग वर्तत आहे असे कधी म्हणता येईल? ज्याच्या मनात त्याग करायचा विचारच येत नाही अशा व्यक्तीला त्याग वर्तत आहे असे म्हणता येईल. आणि अत्याग वर्तत आहे असे कधी म्हणता येईल? तर परिग्रह ज्यांच्या स्मृतीत-आठवणीत सुद्धा नसते! मोक्षमार्गात त्यागाचीही अट नाही आणि अत्यागाचीही अट नाही.

भगवंतांनी दोनच गोष्टींचा त्याग करायला सांगितल्या आहेत, त्या म्हणजे 1) अहंकार आणि 2) ममता, म्हणजे 'मी' आणि 'माझे' - या दोन गोष्टींचा त्याग केल्यानंतर तुला संसारात त्याग करायला काही शिल्लक उरतच नाही ना!

उदयकर्मामुळे जो घडून येतो तो एक प्रकारचा त्याग आहे, पण तो खरा त्याग नाही, वीतरागतेचा नाही असे भगवंत म्हणतात. उदयकर्म

उपास करविते, सामायिक करविते आणि म्हणतो 'मी केले' प्रकृती जे जबरदस्तीने करून घेते ते सगळे उदयकर्मांच्या आधीन आहे. प्रकृती जे त्याग करविते, त्यात आत्म्यावर काय उपकार झाले? त्याला वीतरागतेने त्याग केला असे म्हणता येत नाही. अंतर त्याग म्हणजे वीरतागतेचा त्याग. त्यात नशा नसते. म्हणजे जेव्हा उदयकर्मांच्या आधीन त्याग केला जातो आणि म्हणतो 'मी त्याग केला' तर तो फक्त अहंकारच आहे. अशा त्यागामुळे केवळ नशा चढते. त्यागाची ही जी नशा असते ती अत्यंत सूक्ष्म असते. खूप खूप कष्ट करून देखील ही नशा उतरत नाही, मग मोक्ष कधी होणार? ज्याला किंचितही नशा नसते त्याचा मोक्ष होतो, नशा असलेल्याचा नाही. त्यापेक्षा दारुड्या माणसाची स्थूल (उघड) नशा बरी, त्याच्या तोंडावर पाणी मारले तर लगेच ती नशा उतरते. लोक त्याग-वैराग्य करूनही भटकतच असतात. याप्रकारे मोक्ष मिळवणे सोपे नाही.

ज्याला कसलाच मोह उत्पन्न होत नाही, त्यालाच त्याग प्राप्त झाला असे म्हणता येईल. हे त्यागी लोक तर त्याग करण्याचा मोहातच असतात. अशाला त्याग कसे म्हणायचे? त्याग हे मोठ्या शौर्याचे काम आहे. त्याग सहज वर्तत असतो, करावा लागत नाही. तोच खरा त्याग. त्याग-अत्यागाची मूर्च्छा पूर्णपणे समाप्त होते तोच खरा त्याग. तादात्म्य अध्यास तोच राग, आणि तादात्म्य अध्यास नसणे तो त्याग. प्रचलित भाषेत म्हटल्या जाणाऱ्या त्यागाला त्याग म्हणतात खरे, पण तो अंतरंग त्यागाच्या हेतू स्वरूप आहे, तरी पण तो खरा त्याग नाही.

एक साधू रोज गात असे, 'वैराग्याशिवाय त्याग टिकू शकत नाही.' मी त्यांना विचारले, 'पण महाराज वैराग्य कशाशिवाय टिकू शकत नाही?' तेव्हा महाराज म्हणाले 'ते तर मला माहीत नाही.' तेव्हा मी त्यांना सांगितले, 'विचारांशिवाय वैराग्य टिकू शकत नाही.' हे विधान क्रमिक मार्गाला लागू आहे. क्रमिक मार्ग फार फार कठीण आहे. अनंत जन्मांत 'चुलीतून' 'भट्टीत' आणि परत 'भट्टीतून' 'चुलीत' येण्याची परंपरा चालत आली आहे. केवळ त्यागाने आत्मा प्राप्त होत नाही. त्याग

तर कष्टसाध्य आहे. जर त्यागाने मोक्ष मिळत असता तर मोक्ष पण कष्टसाध्य असता. पण भगवंत म्हणतात, 'मोक्ष सहज साध्य आहे.'

जर क्रोध, मान, माया आणि लोभ समाप्त करण्याच्या हेतूने क्रमिक मार्गाने त्याग करत असलात तरच करा. ज्या त्यागामुळे क्रोध-मान-माया-लोभ वाढत असतील तर तो त्याग नाहीच.

भगवंतानी काय सांगितले की, 'शुद्ध उपयोगात राहा.' तरीही संसाराचा लोभ असेल, भौतिक सुख हवे असेल तर ज्या गोष्टी लोकांना आवडत नाहीत त्या करू नकोस आणि लोकांना सुख वाटेल असे कर, तसे ग्रहण कर आणि लोकांना दु:ख वाटेल अशा गोष्टी करण्याचा त्याग कर, पण मोक्ष हवा असेल तर मात्र शुद्ध उपयोगातच रहा.

आपल्याला आवश्यक एवढ्याच वस्तू बाळगणे म्हणजेच त्याग. चार शर्ट आवश्यक असतील तर चारच शर्ट ठेवणे, बारा न ठेवणे म्हणजेच त्याग. जे खपवून घेतात त्यांना त्यागी म्हणतात. त्याग कोण करू शकतो? ज्यांना 'ज्ञानी पुरुषांचा' आशीर्वाद असतो तेच फक्त त्याग करू शकतात. बाकी कोणी त्याग करू लागले, तर त्यांना त्याची नशा चढते.

त्यागीलींग आणि गृहस्थीलींग, असे दोन प्रकारचे लींग म्हटले आहेत. जेव्हा त्यागीलिंगाची नशा वाढते तेव्हा गृहस्थलिंगाद्वारे (ज्ञान) प्रकाश होतो आणि गृहस्थलिंगाची नशा वाढली तर त्यागीलिंगात ज्ञान प्रकाश होतो. भगवंतांनी म्हटले आहे, कोणत्याही दशेत असून वीतराग होता येते आणि कोणत्याही लिंगावस्थेत वीतराग होता येते. स्त्रियासुद्धा संपूर्ण वीतराग होऊ शकतात, फक्त मनुष्य देह असणे आवश्यक आहे, यात कोणत्या लिंगाचा किंवा दशेचा विशेष अधिकार आहे असे नाही.

मोक्षासाठी त्याग करण्याची गरज नाही. त्याग वर्तत असला पाहिजे. मग इतर कसलाही त्याग करण्याची आवश्यकता नाही. दुसरा त्याग तर भ्रांतीच्या भाषेचा त्याग आहे. भगवंतांचा त्याग शुद्ध भाषेचा त्याग होता. भ्रांतीच्या भाषेचा त्याग म्हणजे काय? विडी ओढणाऱ्याला वाटते की

मी विडीचा त्याग केला, विडी न ओढण्याची प्रतिज्ञा करवणाऱ्याला वाटते की मी त्याच्याकडून त्याग करवून घेतला. हा भ्रांतीचा त्याग तर लहान मुलालाही समजते की आजपासून या काकांनी विडी ओढणे सोडले आहे.

## हा कसला त्याग?

एक स्थानकवासी शेठ होते, ते मला म्हणाले, 'तुम्ही रोज फिरायला जाता तेव्हा तास-अर्धातास आपण बरोबर बसत जाऊ.' शेठजी चांगले गृहस्थ होते. म्हणून आम्ही पण त्यांच्याबरोबर 15-20 मिनिटे बसू लागलो. एक दिवस शेठजींनी एवढी मोठी (बारा इंचांची) विडी स्वत: बनवली. रोज त्यांची विडी छोटी असे, पण एक दिवस एवढी मोठी विडी बनवून ओढू लागले! मी त्यांना विचारले, 'शेठजी, एवढी मोठी विडी का ओढत आहात?' तेव्हा शेठजी म्हणाले, 'महाराज मला म्हणाले आहेत, रोज चारच विड्या ओढत जा.' मी त्यांना म्हटले, 'मला हे जमणार नाही, अवघड जाईल.' तेव्हा महाराज म्हणाले, 'नाही, तुम्हाला माझी आज्ञा पाळावीच लागेल.'

'असे होय! म्हणून तुम्ही त्यांच्या आज्ञेचे असे पालन करत आहात?' ते पाहून मला आश्चर्यच वाटले, धन्य आहे या काळाची (!) थोड्याच वेळात माझ्या समोर ती विडी अर्धी ओढून पण झाली. मग शेठजींनी त्याच विडीला मागून आणखीन दोन पाने जोडायला सुरुवात केली! मी म्हटले, 'शेठजी हे काय करत आहात?' शेठजी म्हणाले, 'चार ने भागत नाही, म्हणून.'

धन्य आहे शेठजींची! असे ज्ञान तर महावीर भगवंत देखील जाणत नव्हते! भगवंताना केवलज्ञानात जे समजले नाही ते ज्ञान तुम्हाला आहे! धन्य आहे! धन्य आहे! असेही मन असू शकते? हे मला आजच कळले. धन्य आहे तुमच्या या व्यापारी बुद्धीची! चारच विड्या ओढीन असे एकदा बोलले की बोलले, नाही तर असे बोलायचे नव्हते. महाराजांना सरळ सांगून टाकायचे होते की मला तुमची आज्ञा पाळणे

जमणार नाही आणि एकदा बोलले की मग क्षत्रियासारखे असावे. बघा ना, केवढी मोठी विडी बनविली!! ती विडी पाहून माझ्या लक्षात आले की वाणी लोक असेच असतात. पण त्या मोठ्या विडीला देखील अजून मागून दोन पाने जोडताना पाहून तर मी फारच थक्क झालो, की असे ज्ञान तर महावीर भगवंताना केवलज्ञानात पण झाले नव्हते. असे ज्ञान तुम्हाला आहे! हा काय प्रकार तुमचा? मला तर आश्चर्यच वाटणार ना? एवढे सगळे झाल्यावर त्यांनी मला नाश्ता दिला! असे लोक असतात!

पुष्कळ प्रकारचे लोक मी पाहिले आहेत, पण भगवंताना केवलज्ञानात देखील जे दिसले नाही असे मी या शेठजींकडेच पाहिले. मानले पाहिजे शेठजींना! त्या शेठजींची मला अजून आठवण येते! मग शेठजी मला म्हणू लागले, 'तुमची समताधारी गोष्ट ऐकतो तेव्हा आम्हाला असेच वाटते की अंबालालभाई बरोबरच बसून राहावे.' धन्य आहे या शेठजींची आणि धन्य आहे त्या महाराजांची! मग शेठजी मला म्हणाले, 'महाराज तर माझ्या मागे हात धुवून लागलेत!' महाराजांना वाटत आहे की या शेठजींना थोडा संयम प्राप्त करवून देऊ. संयम शब्दाचा अर्थच समजलेला नाही.

त्याग कशाला म्हणतात, तर जो वर्तत असतो तो, ज्याची आठवणच येत नाही, तो खरा त्याग. भगवंत त्याग कशाला म्हणतात? मनात जे जे विचार उत्पन्न होतात, वाणीचे जे जे परमाणू उडतात, त्यात तन्मयाकार न होणे म्हणजे शुद्ध त्याग. मनात जे जे विचार येतात, मग ते कितीही चांगले असोत, आवडते असोत किंवा नावडते असोत, पण त्यात तन्मयाकार होत नाही, वेगळा राहतो त्याला भगवंतांनी त्याग म्हटले आहे. तसेच वाणीचे जे जे परमाणू उडतात, त्या एकाही परमाणूमध्ये तन्मयाकार होत नाही त्याला भगवंतानी सर्वस्व त्याग म्हटले आहे, आणि तोच मोक्ष देणारा आहे. भ्रांत भाषेत बाह्यत्यागाला त्याग म्हटले जाते पण, त्यागाचा अर्थ वेगळाच आहे. रियल भाषेत त्याला त्याग म्हणत नाहीत. 'इथला' एक आणा देखील 'तिथे' उपयोगी नाही. 'तन्मयाकार न होणे' असे कधी शक्य आहे? तर जेव्हा स्वत: शुद्ध होतो तेव्हा.

स्वत: जो अशुद्ध आहे, त्याला जेव्हा ज्ञानी पुरुष शुद्ध पद देतात, तेव्हा भगवंताच्या भाषेत असलेला त्याग घडून येईल. ज्ञानी पुरुष शुद्ध पदात बसवतात त्यानंतर मोक्ष मिळतो. हे तर किती सोपे आहे! नाही तर अनंत जन्म पण हे शक्य नाही!

'बाह्य त्यागाचा' खरा अर्थ जरी समजला तरी तो किती सार्थक ठरेल? एकीकडे बायको-मुलांचा तिरस्कार करतो आणि दुसरीकडे मोक्ष शोधत बसतो, याची हरकत आहे. म्हणतात, 'हे तर माझे उदयकर्म आहे.' अहो, तिरस्कार करणे याला उदयकर्म म्हणत नाहीत. शेजारी-पाजारी, बायको-मुले, आई-वडील, सगळ्यांना राजीखुशी ठेवून नंतर गेला तर ते खरे उदयकर्म. आणि बायको-मुलांचा तिरस्कार करून त्याग केला तो सुद्धा उदयकर्मच पण तिथे बायको-मुलांची परवानगी नाही म्हणून ते खरे उदयकर्म नाही. महावीर भगवंताना देखील भावानी परवानगी दिली तेव्हाच त्यांनी दीक्षा घेतली. घरातील सर्वांचाच बायकोचा, छोट्या मुलीचा कोणत्याही जीवाचा तिरस्कार करून मोक्षाला जाता येत नाही. जिथे किंचितदेखील तिरस्कार आहे तो मोक्षाचा मार्गच नाही.

❖❖❖❖❖

# भावहिंसा

जग म्हणजे थाप नाही. पण लोकांची समजूत चुकीची आहे. बहुतेक लोक समजतात की ईश्वर वरती आहे, पण हे खरे नाही. लोकांची समजूत चुकीची आहे. म्हणून मला असे स्पष्ट सांगावेसे वाटते की या जगातील प्रत्येक परमाणूमधून मी फिरून आलो आहे. जिथे मी गेलेलो नाही असा एक पण परमाणू नाही. मी ब्रह्मांडाच्या आत राहून आणि ब्रह्मांडाच्या बाहेर राहून 'जसे आहे तसे' पाहून सांगत आहे आणि गॅरंटी देत आहे की वरती कोणीच नाही. हे तर ईश्वर वर आहे, वर आहे असे ओरडून घोळ घातला आहे. म्हणून तुमचे पत्र ईश्वराला कधीही पोहोचणार नाही, पत्राचे पैसे पण वाया जातील आणि भावना पण वाया जाते. तो जिथे आहे, तुझ्या आतच बसलेला आहे त्याच्याशी बोल ना! मग कधी तरी तुझा अर्ज त्यांच्यापर्यंत पोहोचेल. नाही तर सरळ मूर्तीची पूजा कर, दगडाची का असेना, पण ती प्रत्यक्ष दिसते आणि लोकांनीही मान्य केली आहे. तुला जरी मान्य नसेल, पण लोकांना ती मान्य केली आहे. लोकांचा आरोपित भाव आहे, तिथे चैतन्यवाल्यांचा आरोपित भाव आहे. ईश्वर वरती आहे ती पण चुकीची मान्यता आहे, चुकीचा पत्ता आहे. खरा पत्ता नसलेले पत्र कोणाला पोहोचणार? आतील ईश्वराला पाहा ना! ईश्वर तुझ्या आतच बसलेला आहे. इतर कुठेही नाही. त्या ईश्वराचा खरा पत्ता मी तुला देतो – गॉड इज इन एव्हरी क्रीएचर, व्हेदर व्हिजिबल ऑर इनव्हिजिबल. (भगवंत प्रत्येक जीवमात्रात आहे, मग तो जीव डोळ्यांना दिसू शकेल असा असो किंवा नसो.)

एवरी क्रीअेचरमध्ये (जीवमात्रात) ईश्वर पाहिलास ना तर तुझ्या मनात कोणत्याही जीवाला मारण्याचा भाव उत्पन्नच होणार नाही, आणि मग तू भावहिंसेपासून वाचशील. निरंतर भावहिंसाच करत आहेस. क्रोध, मान, माया, लोभ म्हणजे काय? तर भावहिंसा, भगवंतांनी या बाबतीतच अहिंसक बनायला सांगितले आहे. याउलट ही माणसे गाईंना, हत्तींना वाचविण्यासाठी आटापिटा करत आहेत! हत्तीला वाचविणारा तू कोण? मग त्यांना जन्माला कोण घालते? मोठा आला वाचविणारा! 'मी त्या ढेकणांना मारणार आहे.' असे कोणीही तोंडाने म्हणू नये. 'ढेकणांना मी मारीन' हा भाव मनातून काढून टाक. नाही तर तू तुझ्या आत्म्याचीच हिंसा करत आहेस. ढेकूण तर मरायचे असतील तेव्हा मरतील, आणि मारायचा अधिकार कोणाला आहे? तर जो कोणी एक ढेकूण बनवू शकेल त्यालाच तो अधिकार आहे. भगवंत काय म्हणाले होते, 'तू जे कन्स्ट्रक्ट (निर्माण) करू शकतोस त्याला तू डिस्ट्रक्ट (नाश) करू शकतोस. तू जे निर्माण केले आहेस त्याचा नाश करण्यात आम्ही हस्तक्षेप करणार नाही, म्हणून तू ढेकणाला डिस्ट्रक्ट करू नकोस.' ही साधी-सरळ भाषा समजेल अशी आहे ना? एक ढेकूण निर्माण करायचा असेल तर तो करता येणार नाही. आणि ही मूर्ख माणसे काय पाहिजे ते करतात! कितीतरी जीवजंतूंना मारतात! कितीतरी जंतूंचा जीव घेतात.

## जसे भाव, तसे निमित्त बनतो

या जन्मात भाव करण्याखेरीज नवीन काहीच होत नाही. पण जन्मोजन्मी (मारण्याचा) भाव केल्यामुळे, ज्या जंतूंचा मरणकाळ जवळ आला आहे ते त्याच्या वाट्याला येतात! बाकी काही घडत नाही. जीवजंतूची मृत्यूची वेळ आली की, ज्यांनी त्यांना मारण्याचा भाव बाळगला होता त्यांच्या वाट्याला मारण्याचे येते. कुणालाही मारण्याची सत्ता हातात नाही, पण प्रत्येक जीवाची मरण्याची वेळ ठरलेलीच असते ना? काही ढेकूण सतरा दिवस जगतात, तर काही ढेकूण तीन महिने जगतात, काही पांच वर्षही जगतात. तर या सर्वांची मरणाची वेळ ठरलेलीच असते ना? म्हणजे जेव्हा त्यांची मरणाची वेळ आली असेल

तेव्हा ते चंदुलालच्या वाट्याला येतात, कारण चंदुलालनी मनात ठरवले होते, 'आपण त्यांना मारायचे' असे दुकान उघडले होते, आणि जैन लोकांनी 'मारायचे नाही' असे ठरवले होते, त्यामुळे त्यांच्या वाट्याला ढेकूण मारण्याचे येत नाही, बस, इतकेच आहे. तेव्हा या गोष्टीसाठी अहंकार करण्यासारखा नाही. कारण यात तर भावच केलेला की 'मारायचे नाही' तो भावच आज काम करत आहे.

जीवजंतूना कोणी वाचवतही नाही तसेच त्यांना कोणी मारतही नाही. जीवजंतूना मारावे अशी जी भावना जोपासली असेल, त्यानुसार तसे योग जुळून येतात, कारण वेळ निश्चित असते. प्रत्येक जीवाची मरण्याची वेळ पूर्वनिश्चित असते, त्याअगोदर तो जीव मरू शकतच नाही. जीवाच्या मरणकाळा अगोदर जर त्याला कोणी मारू शकत असेल तर त्याने मारले असे म्हणता येईल. पण नाही, असे होतच नाही. मरणकाळा अगोदर कोणी मारूच शकत नाही. जेव्हा ती वेळ येते तेव्हा त्याला मारण्याचे चंदुलालच्या वाट्याला येते. दुष्कर्मीच्या वाट्याला 'दुष्कर्मी भाव असलेला' येतो. सत्कर्मीच्या वाट्याला 'सत्कर्मी भाव असलेला' येतो.

**प्रश्नकर्ता :** पण चंदुलाल निमित्त तर होतोच ना?

**दादाश्री :** होय, चंदुलाल निमित्त होतो, पण फक्त निमित्तच होतो. मारण्याचे भाव केलेले म्हणून निमित्त बनतो. नाही तर जीवजंतूंच्या जन्मापूर्वीच त्यांचा मृत्यू केव्हा होणार हे ठरलेले असते, जीवमात्रांचा! पण हा तर खोटा अहंकार करतो.

भगवंत काय म्हणतात, 'कोणताही मनुष्य कोणाही जीवाला मारू शकतच नाही.' फक्त भाव–मरण करतो बस, एवढेच होते. 'जेवढे जीवजंतू असतील तेवढ्यांना मारून टाकायचे आहे असे निश्चित करतो तेच भाव–मरण.' शेतात चार साप आहेत, त्यांना मारायचे आहे, मग मारता येईल की नाही याचा काहीच अंदाज नाही, ते सापडतील की नाही हेही निश्चित नाही, पण जेव्हापासून त्याने हे ठरविले तेव्हापासून त्याच्या स्वतःच्या आत्म्याचे मरण होत राहिले आहे. त्या सापांची मरायची वेळ येईल तेव्हा ते मरतील, त्यांचा मरणकाळ असेल तर मरतीलच.

म्हणून आम्ही एकाच वाक्यात सांगतो की सर्व जीवांचा मृत्यू कधी होणार हे त्यांच्या जन्मापूर्वीच ठरलेले आहे. आता एवढी जर गोष्ट समजून घेतलीत तर कल्याणच होईल ना! जन्मापूर्वीच ज्यांचा मृत्यू निश्चित असतो त्यांना मारणारे आपण कोण? हे तर ज्यांनी ज्यांनी मारण्याची भावना बाळगली होती, 'सापांना मारलेच पाहिजे' असे ठाम ठरवले असेल, आणि जर गावात साप दिसला, तर असे दोन-तीन साप मारणारे लोक त्या गावात जन्माला आलेलेच असतात. म्हणजे तुम्ही फक्त हाक मारण्याची खोटी की ते लगेच धावत येतात. कारण त्यांनी तसे दुकानच उघडले आहे!

अहिंसक भाव असलेल्या माणसाने बाण मारला तर थोडे सुद्धा रक्त येत नाही, याउलट हिंसक भाव असलेला माणसाने फूल टाकले तरीदेखील एखाद्याला रक्त येऊ शकते. भावना जेवढ्या परिणामकारक असतात तेवढे फूल आणि बाण परिणामकारक नसतात! म्हणून आमच्या प्रत्येक शब्दात 'कोणालाही दु:ख न होवो, कोणत्याही जीवमात्राला दु:ख न होवो,' असा भाव आम्हाला निरंतर राहत असतो. जगातील कोणाही जीवमात्राला माझ्या मन-वचन-कायेने किंचितदेखील दु:ख न होवो, याच भावनेने 'आमची' वाणी निघत असते. वस्तू काम करत नाहीत, तीर काम करत नाहीत, फुले काम करत नाहीत, फक्त भाव काम करत असतो. म्हणून आपण सर्वांनी भाव कसे करावे? तर रोज सकाळी निश्चित करावे की, 'माझ्या मन-वचन-कायेने जगातील कोणाही जीवाला किंचितदेखील दु:ख न होवो,' असे पाच वेळा म्हणून घराबाहेर पडावे, अगदी मनापासून असा भाव करून निघालात आणि तरीही जर तुमच्याकडून गुन्हा घडला तर यू आर नॉट ॲट ऑल रिस्पोन्सिबल, (तुम्ही किंचितदेखील जबाबदार नाही,) असे भगवंत म्हणतात. भगवंत असे का म्हणतात? तुम्ही म्हणता 'साहेब, माझी तर अशी भावना नव्हती.' तर भगवंत म्हणतात, 'एस, यू आर राइट!' हे जग असे आहे! तुम्ही कोणालाही, एकाही जीवाला मारले नसेल पण जर तुम्ही असे म्हणालात की, 'जेवढे जीवजंतू आहेत त्यांना मारलेच पाहिजे' तर मात्र तुम्ही दिवसभराच्या जीवहिंसेचे वाटेकरी होता. म्हणजे हे जग असे आहे.

## दया, आत्मभावाची ठेवा

जग नीट समजून घेतले पाहिजे. भगवंत म्हणतात की 'जीवजंतू मारण्याची, न मारण्याची सत्ता तुमच्याकडे नाही, संडास करण्याची पण तुझी स्वत:ची स्वतंत्र शक्ती नाही.' जेव्हा अडकते तेव्हा लक्षात येते की ही सत्ता पण माझी नाही.' एकदा तू तुझी सत्ता किती आहे ते जाणून घे. 'एका जीवाला मारणे म्हणजे त्यासाठी कितीतरी कारणे एकत्र आली तरच ते कार्य घडू शकते.' असे भगवंत म्हणतात. मारणारा फक्त भाव नक्की करतो की 'मला मारायचे आहे.' हे जग काय तुझ्या बापाचे नाही. जर तुझ्या बापाचे हे जग असते तर केव्हाच रिकामे करून घेतले असते ना? इथे तर कधी 'टप' होणार त्याचा पत्ता नाही. बस इतकेच, की अहंकार बदनाम होत असतो. विनाकारण अहंकार उघडा पडतो. भगवंत तर इथपर्यंत म्हणाले की तुम्ही फक्त भाव-दया बाळगा. भावदया म्हणजे काय, तर जंतूना वाचविणे असे नव्हे, पण त्या जीवांना मारण्याचे भाव होतात ना, त्यामुळे तुमच्या आत्मभावाचे मरण होते. आपल्या आत्मभावाचे मरण झाले म्हणून सांगतात की 'तू तुझे भावमरण होऊ नये यासाठी दया बाळग.' यालाच भावदया म्हणले आहे. तू तुझी भावदया बाळग, प्रत्येक जीव आपले आपले (भाग्य) बरोबर घेऊनच आलेला आहे, स्वतंत्र आहे. तसे नसते तर अमेरिका आणि रशिया यांचे शीतयुद्ध वर्षानुवर्षे चालले असते का? अमेरिका म्हणेल, आम्ही एका तासातच रशियाला संपवू शकतो.'

## वाचवतो तो पण अहंकार

म्हणजे यात तुझी स्वत:ची काहीच सत्ता नाही, म्हणून सावध हो आणि तुझ्या आत्मभावाचे मरण होऊ नये याची तू खबरदारी घे. तू जर दुसऱ्यांना मारण्याची भावना केलीस तर तुझ्याच आत्मभावाचे मरण होईल आणि म्हणून भावदया बाळग. समोरच्यावर दया कर असे सांगितलेले नाही, पण इथे तर लोक समोरच्या व्यक्तीवर दया दाखवितात. अरे वेड्या, तुझाच काही ठिकाणा नाही मग तू समोरच्यावर दया कशी करशील? त्यात आणि अहंकारी झालेले असतात! म्हणतात, 'मला त्याची

फार दया येते, फार दया येते!' अरे, दुर्भागी तू स्वत:वरच दया कर ना! कसा माणूस आहेस तू?

भगवंतांपाशी एक कसाई गेला आणि एक संघपति गेले. कसायाकडून दहा गाई सोडवून आणणारे ते संघपति म्हणाले, भगवंत, 'मी दहा गाईंना साडविले आहे.' त्यावर भगवंत म्हणतात. 'तुमचे म्हणणे खरे आहे की तुम्ही दहा गाईंना सोडविले.' कसाई म्हणतो, भगवंत, 'मी दहा गाईंना मारले आहे. आता आम्हा दोघांमध्ये प्रथम कुणाला मोक्ष मिळेल?' तेव्हा भगवंत म्हणाले, मोक्षाची गोष्ट तर तुम्ही करूच नका. तुम्ही दोघेही अहंकारी आहात, म्हणून मोक्षासाठी लायक नाही. हे वाचविण्याचा अहंकार करत आहेत आणि तुम्ही मारायचा अहंकार करत आहात. तुमचे वडील म्हातारे झाले आहेत त्यांना वाचवा ना! या गायींना का वाचवत आहात? वडील ऐंशी वर्षाचे म्हातारे झाले आहेत, त्यांना का मरू देता? तू जर वाचविणारा आहेस, कायम वाचवू शकणारा आहेस तर आधी वडिलांनाच वाचव की! हा तर अतिशहाणपणा आहे. याला ओव्हरवाइज-मॅडनेस म्हणतात. या जगाच्या घडामोडीत हात घालू नकोस, त्यात काही मर्यादेपर्यंतच लक्ष घाल. पण इथे तर सगळे दीडशहाणे झाले आहेत. सर्व कीर्तीच्या मागे आहेत. त्यांना काय पाहिजे? कीर्ती. कदाचित ती इथे मिळेल सुद्धा, पण तिथे त्यांचा बाप चांगलाच चोप देईल. तिथे खरा न्याय होतो. तिथे कोणाचे काहीच चालत नाही. भगवंत काय म्हणाले 'तू दहा गाई वाचवण्याचा अहंकार करत आहेस आणि तो दहा गाई मारण्याचा अहंकार करत आहे. म्हणून तुम्ही दोघांनीही इथे मोक्षाच्या गोष्टीबद्दल बोलायला किंवा ऐकायला येऊ नये. तुला वाचविण्याचे फळ मिळेल आणि त्याला मारण्याचे फळ मिळेल. ज्या जीवांना तू वाचविले आहेस ते तुझ्यावर उपकार करून परतफेड करतील आणि ज्यांनी जीवांना मारले आहे तेच जीव तुला दु:ख देतील. बस, एवढाच हिशोब आहे. आम्ही यात ढवळाढवळ करत नाही. मोक्षाचा आणि या गोष्टीचा काहीही संबंध नाही.'

जर तू कॉलेजमध्ये दोन विद्यार्थ्यांना पास केले असशील तर तेच

विद्यार्थी मोठेपणी येऊन म्हणतील, 'यांनी आम्हाला पास केले.' तर ते त्याचा लाभ तुला देतात. स्वाभाविक रीत्या तसेच या जीवांना वाचवण्यातही आहे. तुम्ही जीव वाचवा किंवा वाचवू नका, भगवंतांनी ते मोक्षासाठी आवश्यक म्हटलेले नाही. हे तर अतिशहाणे झाले आहेत, इतके अतिशहाणे की गाईंना वाचविण्यासाठी कसायाला चारशे-चारशे रुपये देऊन गाय सोडवून आणतात. मग नंतर ते काय करतात. ते त्या गाईला उपाश्रयात किंवा मंदिरात थोडीच बांधून ठेवतात! ते मग एखाद्या ब्राह्मणाला ती गाय मोफत देऊन टाकतात की, 'भाऊ घे, तू घेऊन जा.' कसायाचे या सर्व गोष्टींकडे लक्ष असते की हा गाईला कोणाकडे बांधत आहे! ब्राह्मणाला गाय दिल्यानंतर तो कसाई त्या ब्राह्मणाकडे जातो आणि म्हणतो, 'तुम्हाला काही कर्ज-बीर्ज झाले आहे का?' तेव्हा ब्राह्मण म्हणतो, 'हो शंभर-दीडशे रुपयांचे कर्ज आहे.' मग कसाई म्हणतो, 'मी तुम्हाला पन्नास रुपये देतो.' ब्राह्मण म्हणतो, 'दीडशे रुपये दे तर तुला गाय देतो.' मग कसाई ब्राह्मणाला दीडशे रुपये देऊन गाय परत घेऊन जातो. म्हणजे कसायाने चारशे रुपयांना गाय विकली आणि तीच गाय दीडशे रुपयांना परत मिळवली. अशा प्रकारे या लोकांना मूर्ख बनवतो. अशी ही माणसे केवळ कीर्तीच्या मागे आहेत, अतिशहाणे झाले आहेत!

अरे, जन्म कसा होतो आणि मृत्यू कसा होतो त्यात तू लक्ष घालू नकोस. तू तुझे भावमरण वाचव. 'सब सबकी संभालो.' तुझे भावमरण आणि भावहिंसा उत्पन्न होणार नाही, याची खबरदारी घे. तुम्ही कोणावर रागावता, तेव्हा ज्याच्यावर रागावता त्याला तर दुःख होते पण तुमच्याकडून हिंसा तर झाली, भावहिंसा! म्हणून 'भावहिंसा' घडू नये याची खबरदारी घ्या असे भगवंत म्हणतात. एवढेच म्हणाले आहेत ते, यापेक्षा जास्त काही नाही. मी काय सांगत आहे तो व्ह्यू पॉइंट (दृष्टीकोन) तुम्हाला समजतो का? जगात ह्या बद्दल सगळा गोंधळ माजला आहे. हा गोंधळ कसा दूर करणार? ह्या काळ्याकुट्ट झालेल्या भांड्यांना स्वच्छ करायला कुठले ॲसिड वापरावे तेच मला समजत नाही. फार वर्षे झालेली नाहीत. 2500 वर्षेच झाली आहेत, महावीर भगवंतांना जाऊन. त्यातील 500 वर्षे चांगली गेली पण गेल्या 2000 वर्षात एवढा गंज चढला? श्रीकृष्णांना

जाऊन 5100 वर्षे होऊन गेली. एवढ्या काळात तर किती गंज वाढला? आम्हाला इतके 'कठोर' का बोलावे लागत आहे? आम्हा 'ज्ञानी पुरुषां'ची इतकी कठोर वाणी नसते. पण अत्यंत करुणा असल्यामुळे समोरच्या व्यक्तीचा रोग दूर करण्यासाठी अशी कठोर पण करुणामयी वाणी बोलावी लागते.

## मृत्यूवेळच मारते

मी काय सांगत आहे ते तुम्हाला समजत आहे का? ही खूप सूक्ष्म गोष्ट आहे, सामान्य गोष्ट नाही. ही अशी गोष्ट आहे की ती सर्व शास्त्रांचा तोल करून त्यांना एकीकडे बसवते. कारण मृत्यूची वेळ आल्याशिवाय कोणी मारूच शकत नाही. म्हणून भगवंतांचे म्हणणे असे आहे की तुम्ही भावबीज पडू देऊ नका. जर असे बी पेरले नाही तर तुम्ही डोळे मिटून चाललात तरी तुमचे कोणी नाव घेणार नाही. आणि डोळे उघडे ठेवून चाललात आणि चालताना पायाखाली काही आले तरी तो मरणार नाही. तुमच्या पायाखाली चिरडला गेला असेल तरी तो मरणार नाही पण हिंसकभाव असलेल्याकडून मरेल. इतके हे गहन विज्ञान आहे. वेळ आल्याशिवाय या जगात काहीच घडत नाही. कधी ना कधीतरी ही खरी गोष्ट समजून घ्यावी लागेलच ना!

❖❖❖❖❖

## ज्ञान-योग, अज्ञान-योग

**प्रश्नकर्ता :** आम्ही योग-साधना करतो त्यामुळे विकास होतो ना?

**दादाश्री :** प्रथम आपण हे निश्चित केले पाहिजे की योगसाधना करून आपल्याला काय मिळवायचे आहे, कोणत्या प्राप्तीसाठी आपण योगसाधना करत आहोत, पैसे मिळविण्यासाठी की शिकण्यासाठी?

**प्रश्नकर्ता :** सर्व प्रकारच्या शारीरिक विकासासाठी.

**दादाश्री :** ही सगळी जी साधना करतात ती तर मनाची की देहाची साधना करत आहेत ना?

**प्रश्नकर्ता :** आचार्यांसोबत राहून साधना केली तरी पण?

**दादाश्री :** मार्गदर्शन दोन प्रकाचे असते, एक रिलेटिव्हसाठी आणि एक रियलसाठी. रिलेटिव्हसाठी बाहेर पुष्कळ मार्गदर्शक आहेत. म्हणून आपण प्रथम आपल्याला कुठले मार्गदर्शन हवे हे ठरवले पाहिजे. जर सर्व प्रकारच्या दु:खातून मुक्त व्हायचे असेल तर हे 'रियल' मार्गदर्शन प्राप्त करावे. पण तुम्हाला नक्की काय हवे आहे? पैसा-बैसा हवा असेल तर बाहेर रिलेटिव्हमध्ये मिळेल. कारण कष्ट केल्याने फळ मिळेलच ना? पण इथे आत्म्याची योगसाधना केली जाते, त्यामुळे इथे सर्व प्रकारे काम पूर्ण होईल!

**प्रश्नकर्ता :** ध्यान आणि योग यात काय फरक आहे?

**दादाश्री :** चार प्रकारचे योग आहेत : एक देहयोग, शरीरात मागच्या बाजूस चक्रे असतात, त्यावर एकाग्रता करणे म्हणजे देहयोग. त्या योगाची किंमत किती? तर व्यग्रतेचा रोग आहे म्हणून एकाग्रतेचे औषध लावतात. एकाग्रतेची गरज तर ज्याला व्यग्रतेचा रोग आहे त्याला आहे. ज्याला जो रोग असेल त्याप्रमाणे त्याला औषधाची गरज असते. पण ही केवळ टेम्पररी-तात्पुरती उपाय योजना आहे आणि त्यामुळे तात्पुरती रिलीफ मिळते. (बरे वाटते.) आता अशी तात्पुरत्या रिलीफलाच जर अंतिम स्टेशन मानलेत तर तो कसा सुटेल? जर या एकाग्रतेच्या औषधामुळे क्रोध-मान-माया-लोभ दूर होत असतील तर ते उपयोगी आहे. पण पंचवीस वर्षे एकाग्रता करून, योग साधना करून जर क्रोध-मान-माया-लोभ तसेच राहत असतील तर त्याला काय अर्थ आहे? ज्या औषधाने क्रोध-मान-माया-लोभ दूर होतील तेच खरे औषध आहे. तू योगसाधना करतोस ती कोणाची करतो? जे जाणले आहे त्याची की जे जाणले नाही त्याची? आत्मा तर जाणला नाहीस तर मग आत्म्याची साधना कशी करणार? तू देहालाच जाणतो आणि देहाचीच योगसाधना तू करतोस त्यात आत्म्यावर काय उपकार केला? मग तू मोक्ष कसा मिळवणार?

दुसरा योग, तो वाणीचा योग, जपयोग : यात दिवसभर जप करत राहतो. वकील वकीली करतात तो सुद्धा वाणीचा योग म्हणायचा!

तिसरा योग म्हणजे मनोयोग, कोणत्याही प्रकारचे मानसिक ध्यान करणे म्हणजे मनोयोग. पण ध्येय निश्चित केल्याशिवाय ध्यानाला काहीच अर्थ नाही. ट्रेनने जायचे असेल तर स्टेशन मास्टरला सांगावे लागते ना की मला या स्टेशनचे तिकीट द्या. स्टेशनचे नाव तर सांगावे लागेल ना? लोक म्हणतात, 'ध्यान करा, ध्यान करा,' अहो, पण कसले ध्यान करा ते तरी सांगा! पण तिथे तर सावळा गोंधळ आहे. ध्येय निश्चित केल्याशिवाय केलेल्या ध्यानाला तर गोंधळच म्हणावे लागेल ना? या ध्यानात आकाशात एक रेडा आणि त्याची लांब शेपटी पण दिसू शकेल. अशा ध्यानाचा काय उपयोग? गाडी चालू आहे पण कोणत्या स्टेशनाला

जाणार आहे त्याचाच पत्ता नाही! ध्येय फक्त ज्ञानी पुरुषांजवळच असते. तिथे जिवंत ध्येय प्राप्त होते. त्याच्याशिवायच जर 'मी आत्मा आहे, असे म्हणत राहिला तर काम होणार नाही.' जेव्हा 'ज्ञानी पुरुष' पाप जाळून टाकतात, ज्ञान देतात तेव्हाच ध्येय निश्चित होऊ शकते. स्वरूपाचे ज्ञान देतात, तेव्हाच ध्येय प्राप्त होते. त्याशिवाय 'मी शुद्धात्मा आहे' या म्हणण्याला काहीही अर्थ नाही. ते कसे आहे, तर झोपेत 'मी पंतप्रधान आहे' असे म्हटले तर त्यापासून काही लाभ होईल का? मनोयोगात ध्यान करतो, धर्म करतो, पण ते सर्व केवळ रिलीफ रोड (तात्पुरते मदतीचे रस्ते) आहेत. अंतिम आत्मयोग, तो झाल्याशिवाय काहीच निष्पन्न होत नाही. आत्मयोग प्राप्त झालेला नाही म्हणून तर सगळे लोक पझलमध्ये डिसोल्व झाले आहेत ना! (कोड्यातच अडकून पडले आहेत ना!)

आपण इथे 'शुद्धात्म्यात' राहतो, तो आत्मयोग आहे. स्वरूपाचे ज्ञान हे आत्मयोग आहे, म्हणजे स्वतःचे स्थान आहे. बाकी सर्व देहयोग आहेत. उपास करणे, तप करणे, त्याग करणे हे सगळे देहयोग आहेत! हे तिन्ही योग, (मन-वचन-काया) हे सर्व फिजिकल आहेत. पण याच फिजिकल योगांना जग अंतिम योग मानून चालले आहे. सर्व योग फक्त फिजिकल गोष्टी मिळवण्यासाठी आहेत. तरी पण या फिजिकल योगाला चांगले म्हटले आहे. जर असे काही केले नाही तर हे लोक दारू पितील, जुगार खेळतील त्यापेक्षा हे करतात ते चांगलेच आहे. याचा फायदा काय? तर बाहेरचा कचरा आत घुसत नाही, आणि रिलीफ मिळते आणि मनोबळ वाढते. शेवटी मात्र आत्मयोगात आल्याशिवाय मोक्ष प्राप्त होत नाही.

## योगामुळे आयुष्य वाढते का?

**प्रश्नकर्ता :** योगामुळे मनुष्य हजारो-लाखो वर्षे जिवंत राहू शकतो का?

**दादाश्री :** लाखो नाही, पण हजार-दोन हजार वर्षे जगणे योगामुळे शक्य आहे. पण हा योग कसा असतो? सामान्यपणे आत्मा पूर्ण शरीरात

व्यापलेला असतो, पण योगामुळे हे आत्मतत्त्व वर खेचले जाते, ते थेट वर ब्रह्मरंध्रापर्यंत खेचून घेतो. या स्थितीत हृदय, नाडी सर्व बंद पडते. आत्मा कंबरेपर्यंत असतो तोपर्यंत हृदय, नाडी सर्व चालू असते पण आत्मा त्याहून वरती गेला की शरीराच्या सर्व मशीनरी बंद पडतात. एखाद्याने हा योग 15 वर्षे, 3 महिने, 3 दिवस, 3 तास आणि 3 मिनिटांच्या वयात सुरू केला आणि एक हजार वर्षे या स्थितीतच राहून तो योग पूर्ण केला तर त्याचे आयुष्य परत 15 वर्षे, 3 महिने, 3 दिवस, 3 तास आणि 3 मिनिटे या स्थितीपासून पुढे सुरू होईल. कारण इथे जितके हृदयाचे ठोके पडले तितके आयुष्य खर्च झाले आणि जितके ठोके वाचले तितके आयुष्य वाचले. तुम्हाला आयुष्य वाचविणे जमणार नाही. पण योगवाल्यांना हे जमते. जोपर्यंत शरीरात आत्मा हजर आहे तोपर्यंत शरीर सडत नाही, कुजत नाही, वास येत नाही, शरीर जसे आहे तसेच्या तसे राहते! जरी योगामुळे हजार वर्षे दगडासारखे पडून राहिला असेल तरी शरीर तसेच्या तसे राहते.

**प्रश्नकर्ता :** त्या काळात आत्म्याची स्थिती काय असते?

**दादाश्री :** पोत्यात भरल्यासारखी. त्याने आत्म्यावर काय उपकार झाला? हे तर एवढेच की मी हजार वर्षे योगस्थितीत राहिलो, असा अहंकार मात्र तो करू शकतो. तरी पण सांसारिक दुःखे बंद होतात पण सुख तर उत्पन्न होतच नाही. सुख तर आत्म्याचा उपयोग केला तरच उत्पन्न होते, आणि आत्म्याचा उपयोग कधी होतो? हृदय चालू असेल तरच. त्याशिवाय काहीच निष्पन्न होत नाही.

काही योगी शिष्यांना आधीच सांगून ठेवतात की मी आत्मा ब्रह्मरंध्रांत ओढल्यानंतर तुम्ही माझ्या टाळक्यावर नारळ फोडा, पण असे करून मोक्ष मिळतो का? हे लोक असे मानतात की टाळूमधून प्राण बाहेर पडला तर ती व्यक्ती मोक्षाला जाते म्हणून ते असे प्रयोग करतात. पण असे मानून काही होऊ शकत नाही. नैसर्गिकपणे प्राण टाळूतून जायला हवा. कोणी म्हणेल डोळ्यातून प्राण गेला तर मोक्ष मिळतो. मग काय त्यासाठी डोळ्यात तिखट घालणार? नाही, नैसर्गिकपणे होऊ दे ना!

**प्रश्नकर्ता :** शरीराला जिथे जिथे दारे आहेत डोळे, नाक वगैरे तिथून प्राण जातो का?

**दादाश्री :** होय, त्यांना लक्षणे म्हणतात. लक्षणे पाच आहेत आणि लक्षित अनंत आहेत, मग कसा मेळ बसेल? तोंडावाटे जीव गेला तर तो अनंत ठिकाणी जाऊ शकतो. या सर्व अस्पष्ट गोष्टी आहेत. त्याचे एकही उत्तर मिळणार नाही.

## कुंडलिनी म्हणजे काय?

**प्रश्नकर्ता :** 'कुंडलिनी' जागृत केली की प्रकाश दिसतो? म्हणजे काय?

**दादाश्री :** तो प्रकाश पाहणारा शुद्धात्मा आहे आणि त्या प्रकाशाशी जो तन्मयाकार होतो तो प्रतिष्ठित आत्मा आहे. दोन-तीन तास त्या प्रकाशाशी तन्मयाकार राहिल्यामुळे आनंद वाटतो पण तो प्रकाश संपला की मग परत पूर्वीसारखे होता, तुम्हाला कोणत्या रंगाचा प्रकाश दिसतो?

**प्रश्नकर्ता :** पूर्वी कधीच दिसला नाही असा पांढरा शुभ्र प्रकाश दिसतो.

**दादाश्री :** ज्यात तन्मयाकार होतो, त्यात आनंद वाटतो. जर एखाद्या लुटारूची कादंबरी वाचली तरी देखील आनंद मिळतो. पण त्यामुळे वाईट कर्मबंधने घडतात. याउलट या एकाग्रतेमुळे चांगली कर्मबंधने निर्माण होतात. ही कुंडलिनी जागृत करतोस त्याऐवजी आत्म्यालाच जागृत कर की! हे तर फक्त कुंडलिनीच्या स्टेशनवरच पडून राहतात. यांना जर गुरु महाराजांनी मध्येच काळ्याशार जमिनीवर पाऊस पडत असेल अशा स्टेशनवर उतरून दिले तर त्याचा काय उपयोग? आपल्याला तर इथे अंतिम स्टेशन मिळाले आहे. अनंत प्रकारची स्टेशन्स (स्थानके) आहेत. त्यात गुरु गुंतवून सोडतात. त्यामुळे स्थैर्य वाटेल. पण मोक्षासाठी त्याचा उपयोग नाही.

कुंडलिनी जागृत करतो पण त्यामुळे दृश्य दिसते, पण ते दृश्य

तर तिथे पूर्वीपासून होतेच ना! जेव्हा दृष्टी दृष्ट्यात पडेल आणि 'ज्ञान' ज्ञात्यात पडेल, तेव्हाच निर्विकल्प होईल!

**प्रश्नकर्ता :** दादा, माझ्यात कुंडलिनीचा प्रकाश उत्पन्न होतो.

**दादाश्री :** कुंडलिनी हे एकाग्रतेचे एक साधन आहे त्यामुळे प्रकाश उत्पन्न होतो आणि आनंद होतो. लोक त्या प्रकाशाला आत्मा समजतात पण तो प्रकाश आत्मा नाही, तो प्रकाश जो पाहतो तो आत्मा आहे. तो प्रकाश म्हणजे दृश्य आहे आणि त्याला पाहणारा दृष्टा, तो आत्मा आहे. तुम्हाला इथे जो यथार्थ आत्मा दिला आहे तो या प्रकाशाचा दृष्टा आहे.

**प्रश्नकर्ता :** एकाग्रता करतो म्हणून प्रकाश दिसतो आणि त्यामुळे आनंद होतो!

**दादाश्री :** पण तो आनंद रिलेटिव्ह आनंद आहे. तो कसा आहे? बर्फी खाल्यावर जसा आनंद वाटतो तसाच तो आनंद आहे. तरी पण हे चांगलेच आहे. या संसाराच्या अपार दु:खात शांती मिळवण्यासाठी काही तरी साधन हवेच ना! जोपर्यंत खरा मार्ग मिळत नाही तोपर्यंत हा मार्ग बरोबरच आहे.

## अनाहत नाद

**प्रश्नकर्ता :** अनाहत नाद म्हणजे काय?

**दादाश्री :** शरीराच्या कोणत्याही भागाचा नाद (आवाज) पकडणे, मग तो हृदयातून, खांद्यातून, मनगटामधून, कुठूनही येत असेल त्या नादाच्या आधारे एकाग्रता होते आणि त्यातच मग पुढे जातो. हे कुठल्या प्रकारचे स्टेशन तेच कळत नाही! अशी अनेक प्रकारची स्टेशन्स असतात. पण त्यामार्गाने आत्मा प्राप्त होत नाही. तो मार्ग आत्मप्राप्तीचा मोक्षमार्ग नव्हे, ते ध्येय नाही, ती रस्त्यात लागणारी स्टेशन्स आहेत, कॅन्टिन्स् आहेत. जर आत्मा झाला, ब्रह्म झाला तर ब्रह्मनिष्ठ होईल. आणि मगच काम पूर्ण होईल. जर महाराज स्वत:च ब्रह्मनिष्ठ झाले नसतील, तेच जर जगत्‌निष्ठेत असतील मग आपले भले कसे होईल?

ब्रह्म तर प्रत्येकात आहेच पण त्यांना जगत्‌निष्ठा आहे. सध्या जगातील लोकांची निष्ठा जगातच असते. जगातील सर्व सुखांचा उपभोग घेण्यातच निष्ठा आहे. पण 'ज्ञानी पुरुष' ती संपूर्ण निष्ठा उचलून ब्रह्मात बसवतात, म्हणून जगत्‌निष्ठा फ्रॅक्चर होऊन जाते. आणि त्यानंतरच अंतिम स्टेशन गाठता येते आणि मग सगळीकडे आरामात फिरू शकतो. या अशा मधल्या मधल्या स्टेशनात बसून काहीही निष्पन्न होत नाही. त्याने एकही अवगुण जाणार नाही. अवगुण जाणार तरी कसा? त्यांना 'हे मीच आहे' असेच वाटते ना! तोपर्यंत अवगुण कसे जातील? वेदांतात सुद्धा हेच म्हटले आहे, 'आत्मज्ञान प्राप्त झाल्याशिवाय काहीही निष्पन्न होत नाही.'

हा अनाहत नाद काय सूचित करतो? शेवटी तो पौद्‌गलिक आहे. त्यामुळे आत्म्याला काय फायदा होणार? तो आत्मा नाहीच. आत्म्याचा अनाहत नाद असेल किंवा आत्म्याचे काही आनुषंगिक असेल तर मग कोणीच त्रास देणारा नाही. परंतु जर पूरण–गलनाची वंशावळ असेल तर ती त्रास देईल! आत्मा आणि आत्म्याचे आनुषंगिक यात कोणी विघ्न घालू शकत नाही. आणि पूरण–गलनाची वंशावळ असेल तर विघ्न घातल्याशिवाय राहणारच नाही. तेव्हा ही कोणाची वंशावळी आहे हे ओळखायला नको का?

तरी पण ज्याला अनाहत नादातच अडकून राहायचे आहे, त्याला आम्ही उठवणार नाही. त्याला जे स्टेशन मिळाले आहे तेही ठीक आहे. जोपर्यंत आत्मज्ञान मिळत नाही तोपर्यंत अनाहत नादाचा आधार घेणे ठीक आहे.

❖❖❖❖❖

# ध्यान

यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी–ही सर्व योगाची आठ अंगे आहेत, अष्टांग आहेत. तुम्ही येथे ज्ञान घेतलेत म्हणजेच तुम्ही ही सारी अंगे पूर्ण केलीत. तुम्हाला तर त्याच्याही पुढचे, आत्म्याचे लक्ष्य बसले आहे. आपण तर देहालाही सहज राखावे आणि आत्म्यालाही सहज राखावे. तुम्हाला आत्म्याचा अनुभव, लक्ष्य आणि प्रतीती राहील. प्रतीतीच्या खालच्या स्टेजवर तुम्ही कधीच जाणार नाही.

जगातील लोक ध्यानात बसतात, पण त्यासाठी त्यांनी काय ध्येय निश्चित केलेले असते? ध्येयाचे फोटो पाहून आलेला नाहीस. मग कशाचे, रेड्याचे ध्यान करतोस का? ध्येयाशिवाय ध्यान म्हणजे अपध्यान आहे. भगवंतांनी शब्द स्वरूपात आत्म्याचे ध्यान करण्यास सांगितले नव्हते. 'ध्यान' कशाला म्हटले जाते? आत्म्याचे सर्व गुण एकत्र एकाच वेळी ध्यानात असणे म्हणजे ध्यान. आत्म्याचे गुण हे ध्येय आणि त्याचा ध्याता तू स्वतःच झालास तर ते तुझे ध्यान झाले. असे सर्व एट–ए–टाईम, एकाच वेळी राहत असेल का? या लोकांना समाधीची काय गरज आहे? दिवसा आधीत, रात्री व्याधीत, आणि लग्नात उपाधीत राहतात, मग त्यांना समाधी का हवी आहे?

**प्रश्नकर्ता :** श्वास्–उच्छवासावरती ध्यान करायला सांगतात, त्यातून काय मिळते?

**दादाश्री :** याच्यात (श्वासोच्छवासात) ध्यान करा असे ते सांगतात

म्हणजे काय? नाकातून श्वास बाहेर पडतो त्याच्यावर लक्ष ठेवा आणि नाकात श्वास जातो त्यावर लक्ष ठेवा, असे ते म्हणतात. श्वास येतो आणि जातो, त्यावर ध्यान करून काय मिळणार? नाकपुड्यांचे ध्यानाशी काय देणेघेणे? सोड आता हे सर्व! जेव्हा दम्याचा त्रास होतो तेव्हा ध्यान कर ना! तो कसे करणार? ते म्हणतात, श्वास घेतला की 'सो', आणि सोडला की 'हम', म्हणजे हमसो, हमसो, 'सोहम' असे होते. त्याचे ध्यान करा असे म्हणतात. पण आत्मा म्हणजे सोहम्ही नाही आणि हमसोही नाही. आत्मा शब्दात नाही. ती तर वीतराग भगवंतांनी 'आत्मा' या शब्दाने संज्ञा केली आहे. पण आत्मा पुस्तकात नसतो आणि शास्त्रातही नसतो, त्यात तर शब्द आत्मा आहे! रियल आत्मा फक्त ज्ञानी पुरुषांजवळ असतो. हे श्वास, उच्छ्वास पाहत राहतात तर काय त्यांना त्याद्वारे समाधी मिळेल का? नाही. त्याने काय होते? मन तुटते (मनाचा नाश होतो) पण मन हे तर नाव आहे. संसार सागर तरून किनाऱ्यापर्यंत पोहोचण्यासाठी मनाच्या नावेची गरज आहे.

स्वतःच्या स्वरूपाचे ध्यान म्हणजे ध्यान. दुसरे ध्यान म्हणजे खिचडीचे ध्यान, ते ध्यान केले तर खिचडी होईल. ही दोनच ध्याने करावी. या 'दादां'च्या ध्यानात राहायचे असेल तर राहू दे, मग जरी त्याला इतर काहीही समजो ना समजो, तरी पण तो हळूहळू 'तद्‌रूप' (दादांसारखा) होत राहतो. 'ज्ञानी पुरुष' म्हणजे स्वतःचाच आत्मा. आणि म्हणून तो स्वतःच तद्‌रूप होत जातो.

आत्मा प्राप्त झाला, ते आत्मध्यान आणि संसारी ध्यानात खिचडीचे ध्यान करावे. लोक जे ध्यान शिकवतात ते तर केवळ ओझे आहे. ज्याला व्यग्रतेचा रोग झाला असेल त्याला एकाग्रतेचे ध्यान शिकवण्याची गरज आहे, इतरांना अशा ध्यानाची काय गरज? ते ध्यान त्यांना कुठे पोहोचवील त्याचा काय भरोसा?

भगवंत म्हणाले, की तू इतके ध्यान ठेव, खिचडीचे ध्यान ठेव आणि पतीचे ध्यान ठेव, नाही तर स्वरूपाचे ध्यान ठेव. या व्यतिरिक्त आणखी कसले ध्यान करायचे? समाधीसाठी आणखी कुठले ध्यान

करायचे? इतर सर्व ध्यान तर परध्यान आहेत. फक्त कानाला गोड वाटते की किती छान आवाज आहे. काही लोकांच्या मनाला प्रिय वाटते तर कित्येकांच्या बुद्धीला प्रिय वाटते. सगळ्यांना आपल्या मतीनुसार वाटते. महावीर भगवंतांच्या सभेला शेठ लोक त्यांची वाणी ऐकायला येत. त्यांची (सर्वज्ञांची) वाणी इतकी गोड आणि मधुर असे की कानांनाही अत्यंत प्रिय वाटे. ते शेठ ऐकायला बसूनच राहायचे आणि तिथे त्या सभेतच पोळी-भाजी मागवून जेवायचे. जेवायला पण घरी जात नसत, ती त्यांच्या कानांनाच प्रिय वाटायची. आज पण मी त्या शेठजींना ओळखतो. ते सुद्धा दुकानात कापड विकताना ताणून-ताणूनच विकतात! अरे, तू कोणाला विचार तरी की हे मी कुठले ध्यान करत आहे? हे तर रौद्रध्यान आहे. शेठजींना विचाराल तर ते म्हणतील की बाकी व्यापारी कापड ताणूनच विकतात. अरे, दुसऱ्या व्यापाऱ्यांनी विहीरीत उडी टाकली तर तू पण टाकणार का?

## चित्तशुद्धीचे औषध

आमची वाणी तर कोणत्याही काळात ऐकली नसेल अशी आश्चर्यकारक आहे. ही वाणी जर ऐकून ऐकून आत धारण केली, आणि धारण करून तेच शब्द स्वतः बोलला आणि ते धारण झाले तर त्यावेळी चित्ताची विलक्षणपणे एकाग्रता होऊ लागते! शुद्ध चित्त तर शुद्धच असते, पण व्यावहारिक चित्त, ही वाणी धारण केल्यामुळे ताबडतोब शुद्ध होऊन जाते. सिनेमाची गाणी ऐकतो तेव्हा तितका वेळ चित्त अशुद्ध होत राहते, मुळात अशुद्ध होतेच आणि ते आणखी अशुद्ध होते. आणि दुसरे म्हणजे कवीची भक्ती पदे गाताना ती धारण होतात तितका वेळ चित्तशुद्ध होते! अशी गीते एखाद्या लहान मुलाने जरी धारण करून गायली तरी त्याला सुद्धा त्याचा अतिशय फायदा होईल. धारण झाल्याशिवाय असे बोलता येते का? धारण करून बोलतो तितका वेळ आत पापे धुतली जातात. बाहेरचे कपडे तर धुता येतात पण आतले कसे धुणार? या जगात चित्तशुद्धी करण्यासाठी खूप कमी औषधे आहेत. इतर ठिकाणी वीस-वीस वर्षे गाऊन देखील चित्त जेवढे शुद्ध होणार नाही, तेवढी

शुद्धी माझ्या उपस्थितीत फक्त एक पद गायल्याने होऊन जाते! स्वतः बोलतो आणि मग धारण करतो आणि तसेच पुन्हा बोलला ना, तर अद्‌भुत चित्त शुद्धी होईल!

ध्याता, ध्येय आणि ध्यान हे तिघे एकरूप होतात त्यानंतरच 'लक्ष्य' बसते. म्हणून इथे माझ्या उपस्थितीत तुम्हाला ध्यान करण्याची आवश्यकता नाही. लक्ष्य अधिक राहिले तर त्याला अनुभव म्हणतात. शुद्धात्म्याच्या ध्यानात राहिले तर ते शुक्लध्यान होय. आपण शुद्धात्म्याच्या ध्यानात राहतो आणि 'फाइल' आली तर तिचा समभावाने निकाल करतो. ते धर्मध्यान आहे. साध्य प्राप्त झाल्यानंतर साधनाची काय आवश्यकता? एकदा ध्येय प्राप्त झाले की मग ध्याता आणि ध्यान यांची काय गरज?

जगातील सर्व मार्ग हे साधनेचे मार्ग आहेत आणि आपला हा साध्य मार्ग आहे! ध्याताचा पत्ता नाही आणि ध्येय निश्चित करायला जातात! ध्याता कधी होऊ शकतो? जेव्हा जगाचे विस्मरण होते तेव्हाच ध्याता होता येते. हा तर ध्यानात बसला असेल आणि कोणी विचारले, 'तुम्ही कोण आहात?' तर म्हणेल, 'मी मॅजिस्ट्रेट आहे.' म्हणजे त्याचे ध्यान अजून मॅजिस्ट्रेट पदातच आहे, मग ध्याता कसे बरे होणार?

तरी पण जगातील लोकांना जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' प्रत्यक्ष लाभत नाहीत, आणि त्यांच्याकडून स्वरूपाचे भान जोपर्यंत होत नाही तोपर्यंत मनःशांतीसाठी कुठल्या ना कुठल्या साधनाची गरज असते. कुणी गुरुजी असतील, जरी त्यांना आत्मज्ञान नसेल पण मनाने चोख असतील, लक्ष्मी आणि विषय विकाराची भूक नसेल, तर त्यांच्या फोटोचे ध्यान केले तरी चालेल, मग जरी त्यांचा अहंकार गेला नसेल तरी पण त्यांच्या ध्यानामुळे शांती मिळेल. याला रिलेटिव्ह ध्यान किंवा टेम्परररी ध्यान म्हणतात. आणि 'रियल ध्यान' मात्र ज्ञानी पुरुष भेटले तरच प्राप्त होऊ शकते आणि नंतर परमनन्ट शांती मिळते. या रिलेटिव्ह ध्यानात जी शांती मिळवता ती तर सासू जर 'तुला काहीच अक्कल नाही' असे म्हणाली तर ध्यान लगेच तुटते आणि उपाधी निर्माण होते! टेम्परररी ध्यानाचा उपयोग होत नाही. 'ज्ञानी पुरुष' काय करतात? कायम समाधी राहील

असे निर्लेप ज्ञान देतात. जेव्हा ज्ञानी मिळतात तेव्हा काय करावे लागते? क्रियाकांड वगैरे काहीच करायचे नाही, फक्त त्यांची आज्ञा तोच धर्म, त्यांची आज्ञा तेच तप!

नाभी प्रदेशात आत्मा मोकळा असतो. आम्ही आवरण तोडून टाकतो तेव्हा भगवंत दिसतात. जेव्हा नाभी-प्रदेशात भगवंत प्रकट होतात तेव्हा स्वतः निर्लेप होतो. पिंपळावर जसा चीक चिकटलेला असतो तशी आत्म्याला कर्मे चिकटलेली असतात, म्हणून त्यातून प्रकाश बाहेर पडत नाही. पाच छिद्रे (पंचेंद्रिये) आहेत त्यातून पण खरे दिसत नाही. इंद्रिय प्रत्यक्ष ज्ञान खरे नसते. ज्ञानी पुरुष अतींद्रिय सुखात-शाश्वत सुखात असतात. आत्म्याला जागृत करण्यासाठी 'ज्ञानी पुरुषांचीच' आवश्यकता असते, तिथे दुसऱ्या कोणाचाच उपयोग नाही.

## हॅन्डल समाधी

**प्रश्नकर्ता :** दादा, मला चार-चार तास समाधी लागते.

**दादाश्री :** समाधी लागते तेव्हा तर ठीक आहे पण नंतर ती थोडी जाते की टिकते?

**प्रश्नकर्ता :** नाही, ती निघूनच जाते ना!

**दादाश्री :** मग या समाधीला टेम्परी म्हणणार की परमनन्ट?

**प्रश्नकर्ता :** तिला टेम्परीच म्हणावे लागेल ना?

**दादाश्री :** या जगात सगळीकडे जी चालू आहे ती टेम्परी समाधी आहे, जड समाधी आहे. समाधी तर निष्क्लेश आणि निरंतर टिकणारी असली पाहिजे. हे सर्व तर सगळी टेम्परी समाधी करतात. तुम्ही समाधीचा काय अर्थ समजता?

**प्रश्नकर्ता :** समाधीत मन एका जागी काही काळ स्थिर ठेवायचे असेल तर ठेवता येते.

**दादाश्री :** पण त्यापासून काय फायदा? प्राणांवर नियंत्रण ठेवले

तर लाभ होतो, पण कायमस्वरूपी शांती मिळते का? शेगडी जवळ बसले तर तितका वेळ थंडी कमी होते, पण तिथून उठले की परत थंडी वाजतेच ना? शेगडी अशी हवी की जिच्यापासून कायमस्वरूपी थंडी वाजणार नाही. समाधी खूप वेगळी गोष्ट आहे. हाताने पंखा फिरवला तर गार वाटते पण हात दुखू लागतात. अशी हॅन्डल समाधी काय कामाची? जर नाक दाबून समाधी मिळत असेल तर लहान मुलाचे पण नाक दाबून समाधी मिळायला हवी. मग जरा एखाद्या लहान मुलाचे नाक दाबून बघा तो काय करील, लगेच चिडेल आणि तुम्हाला चावेल. यावरून काय लक्षात येते? यावरून असे समजते की यात कष्ट आहेत. अशी कष्ट करून मिळालेल्या समाधीचा काय फायदा? समाधी सहज लागायला हवी. उठता, बसता, खाता, पिता समाधी लागली तर ती सहज समाधी. आता मी तुमच्याबरोबर बोलत आहे आणि मी नाक दाबले नाही, मग मला समाधी असेल की नाही? मी तर निरंतर समाधी अवस्थेतच असतो आणि कोणी शिव्या दिल्या तरी माझी समाधी ढळत नाही. ही जी नाक दाबून समाधी करतात, त्याला हठयोग असे म्हणतात. हठयोग करून कधी कुठे समाधी मिळत असते का? जर समोर ठेवलेला गुरूंचा फोटो कोणी उचलला तर लगेच त्या व्यक्तीला आतल्या आत क्लेश निर्माण होतो. समाधी ही निष्क्लेश असावी आणि ती सुद्धा निरंतर हवी, ढळता कामा नये. जी उतरत नाही ती समाधी आणि ढळते ती उपाधी. सावलीत बसल्यानंतर उन्हात गेला तर बेचैन वाटते तसे! आधि, व्याधी आणि उपाधीत देखील जर समाधी राहिली तर ती खरी समाधी. समाधी परमनन्ट असली पाहिजे.

## खरी समाधी

**प्रश्नकर्ता :** समाधी परमनन्ट असू शकते असे मला माहीतच नव्हते!

**दादाश्री :** साऱ्या जगाला मिटलेल्या डोळ्यांनी समाधी लागते, तीसुद्धा काहींना लागते, सर्वांना नाही. याउलट येथे आपल्याला उघड्या डोळ्यांनी समाधी चालू असते. खाताना, पिताना, गाताना, पाहताना सगळे

काही चालू असताना सहज समाधी लागते! डोळ्यावर पट्टी बांधल्यावर बैलाला पण समाधी असते पण ती कृत्रिम आहे आणि आपल्याला तर उघड्या डोळ्यांनी भगवंत दिसतात. रस्त्यावर चालता चालता भगवंत दिसतात. बंद डोळ्यांनी तर सगळे जण समाधी करतात पण उघड्या डोळ्यांनी लागेल तीच खरी समाधी. डोळे बंद करण्यासाठी नसतात, डोळे सगळे पाहण्यासाठी असतात, ज्यांच्यात भगवंत आहेत त्यांच्यात भगवंत पाहता आले तर. खरे तर, 'जसे आहे तसे' बघ, 'जसे आहे तसे ऐक', 'जसे आहे तसे चाल.' असे सगळे करत देखील समाधी राहते अशी दादांची समाधी आहे! डोळे बंद करून समाधी करण्यासाठी तर त्याला वेगळी जागा शोधावी लागते. येथे तर एकांत नाही, मग जगात कुठे जाशील? वस्ती एवढी वाढली आहे, तर गर्दीत सुद्धा एकांत शोधता आला पाहिजे, त्याला ज्ञान म्हणतात. ट्रेनमध्ये चारी बाजूंनी प्रचंड गर्दी असते, तेव्हा मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार गप्प बसतात, अशा वेळी पाहिजे तेवढा एकांत अनुभवा. खरा एकांत प्रचंड गर्दीतच मिळतो. गर्दीतील एकांत हाच खरा एकांत!

साधू समाधी लावून बसतात, पूर्वाश्रम (संसार) सोडून हिमालयात जाऊन बसतात आणि म्हणतात , 'मी अमुक नाही, मी तमुक नाही, मी साधू नाही, मी हा नाही.' वगैरे.. त्यामुळे थोडे सुख वाटते. पण त्याला निर्विकल्प समाधी म्हणत नाहीत. कारण ते समजपूर्वक आत उतरलेले नाहीत.

**प्रश्नकर्ता :** एका व्यक्तीला उभ्या उभ्या समाधी लागते, हे मी पाहिले आहे, हाक मारली तरी त्याला ती ऐकू येत नाही.

**दादाश्री :** त्याला समाधी म्हणत नाहीत, तो एक प्रकारचा बेभानपणा आहे. समाधी कशाला म्हणतात? सहज समाधी अवस्थेत पाचही इंद्रिये जागृत असतात. देहाला कसलाही स्पर्श झाला तरी समजते. देहाचे भान उरलेले नाही, याला समाधी म्हणत नाहीत. याला कष्ट म्हणतात. कष्ट करून समाधी लागते त्याला समाधी म्हणत नाहीत. समाधीत असणारा माणूस पूर्ण जागृत असतो!

## निर्विकल्प समाधी

जगातील महात्म्यांनी 'निर्विकल्प समाधी' कशाला म्हटले आहे? चित्ताच्या चमत्काराला. देह बेभान होतो आणि ते समजतात की त्यांचे इंद्रियभान गेले आहे. पण त्यांच्यात अजून अतींद्रिय ज्ञान उत्पन्न झालेले नाही म्हणून मध्येच काही काळ निरिंद्रिय चमत्कारात भटकतात! काहींना चित्ताचे वेगवेगळे चमत्कार दिसतात. कोणाला प्रकाश दिसतो, पण ती खरी समाधी नाही. ती निरिंद्रिय समाधी आहे! देहाचे भान जात असेल ती खरी समाधी नाही. निर्विकल्प समाधीमध्ये तर उलट देहाची अधिक तीव्र जाणीव असते. देहाचेच भान गेले तर ती निर्विकल्प समाधी कशी?

**प्रश्नकर्ता :** 'निर्विकल्प समाधी' म्हणजे काय?

**दादाश्री :** 'मी चंदुलाल आहे' म्हणजे विकल्प समाधी. हे सर्व पाहतो तीसुद्धा विकल्प समाधी. एखाद्या मुलाने काही वस्तू फोडली तर ती विकल्प समाधी मोडते.

**प्रश्नकर्ता :** संकल्प आणि विकल्प म्हणजे काय?

**दादाश्री :** विकल्प म्हणजे 'मी' आणि संकल्प म्हणजे 'माझे' स्वत: कल्पतरु आहे. जशी कल्पना करेल तसा होईल. विकल्प करतो तेव्हा विकल्पी बनून जातो. 'मी' आणि 'माझे' असे सतत करत राहणे म्हणजे विकल्प आणि संकल्प. जोपर्यंत स्वरूपाचे भान होत नाही तोपर्यंत विकल्प तुटत नाहीत आणि निर्विकल्प होता येत नाही. 'मी असा असा त्याग केला, मी इतक्या शास्त्रांचा अभ्यास केला, हे वाचले, भक्ती केली,' हे सगळे विकल्प आहेत. शेवटपर्यंत हे विकल्प चालूच राहतात आणि 'मी शुद्धात्मा आहे' असे बोलले जाऊ शकत नाही. 'मी चंदुलाल आहे, मी महाराज आहे, मी साधू आहे' हे भान राहते पण 'मी शुद्धात्मा आहे' हे भान झालेले नाही, म्हणून 'मी शुद्धात्मा आहे.' असे कसे बोलता येईल? आणि तोपर्यंत निर्विकल्प समाधी कशी उत्पन्न होईल? हा शब्द वरून (शास्त्रातून) आलेला आहे एवढेच! फक्त वीतराग भगवंत आणि त्यांचे अनुयायीच निर्विकल्प समाधीत होते. त्यांना सर्व समजत

असे. सरळ काय आणि वाकडे काय ते सर्व त्यांना समजत असे! फुले वाहिली तेही जाणत असत. दगड वाहिले तेही जाणत असत. जाणले नाही तर त्यांना वीतराग कसे म्हणायचे? आणि इथे तर देहाचे भान हरपले की 'आपल्याला निर्विकल्प समाधी मिळाली' असेच समजतात! झोपेत पण शरीराचे भान हरपते मग झोपेलाही निर्विकल्प समाधीच म्हणायची ना? या समाधीवाल्याचे जागे असताना देहाचे भान जाते, आणि चित्ताचे चमत्कार दिसतात, प्रकाश दिसतो, बस एवढेच. पण ही अंतिम दशा नाही. यालाच अंतिम दशा मानणे हा भयंकर गुन्हा आहे! आत्म्याचे भान तर राहिलेच पाहिजे पण या पुद्‌गलाचेही संपूर्ण भान राहिले पाहिजे, यालाच निर्विकल्प समाधी म्हणतात. अन्यथा वीतराग भगवंतांना 'केवलज्ञानात' काहीच दिसले नसते ना?

निर्विकल्प समाधी म्हणजे काय ते कोणाला समजतच नाही. लोक आपआपल्या भाषेत त्याचा वेगवेगळा अर्थ लावतात आणि आत्म्याचा पण तसाच वेगवेगळा अर्थ लावतात. आणि तरी म्हणतात, 'मला आत्मज्ञान जाणायचे आहे.'

जे संत झालेले असतात त्यांच्या चित्ताची मलीनता खूप कमी झालेली असते. जेव्हा त्यांच्या मनात संसाराची इच्छा उत्पन्न होते तेव्हा 'तुला अशी इच्छा का बरे होत आहे?' देहाला असे विचारून खूप कष्ट देतात. डोळ्यात तिखट देखील घालतात. आता अशा ज्ञाना संबंधी फॉरेनचे लोक काय बोलतात? ते म्हणतात, 'हे लोक तर जंगली वाटतात.' इतरांनाही असे लोक विचित्र वाटतात. पण हिंदुस्तानातील लोकांना ते समजदार वाटतात! डोळ्यांच्या दोषासाठी ते डोळ्यात तिखट टाकतात. अहो, पण त्यात डोळ्यांचा काय दोष? दोष तर पाहाणाऱ्याचा आहे.

हिंदुस्तानातील लोक तर तोंडाला कुलूप लावतील असे आहेत! या लोकांना तर शरीराचे भान हरपले की निर्विकल्प समाधी मिळाली असे वाटते, कारण इंद्रियांचे भान गेले की त्यांना वाटते आपण अतींद्रिय अवस्थेत पोहचलो. नाही, अतींद्रिय अवस्था तर खूपच दूर आहे. तुम्ही इंद्रियांचे भान सोडले आणि अतिंद्रिय अवस्था अजून आली नाही, तर

मग तुम्ही कुठल्या अवस्थेत आहात? तर निरिंद्रिय. निरिंद्रिय अवस्थेतच 'हम, हम' करतात आणि यालाच निर्विकल्प समाधी मानतात!

तरी पण त्यांची दानत चांगली आहे, डोळ्यात तिखट घालतात त्यात त्यांची दानत चांगली आहे, म्हणून त्यांना कधी ना कधी तरी मोक्ष मिळेलच.

क्रमिक मार्गात तर अगदी शेवटी, थेट मोक्ष जवळ आला की निर्विकल्प समाधीची सुरुवात होते. याउलट या अक्रम मार्गात तुम्हाला निर्विकल्प समाधी प्राप्त झाली आहे! क्रमिक मार्गात तर शेवटपर्यंत केश लुंचन (डोक्याचे केस उपटून काढणे) करावे लागते. अन्य जे त्याग लिहिलेले असतील ते करावे लागतात. 'हा विधी करायचा आहे, हा त्याग करायचा आहे,' असे सगळे करावे लागते. तिथे कर्ता वेगळा, कर्म वेगळे, ज्ञाता वेगळा आणि तरी ते म्हणतील, 'मला अजून ध्यान करायचे आहे.' त्या मार्गात कर्ता वेगळा, ध्येय वेगळे आणि ध्यानही वेगळे. जेव्हा ह्या तीनही गोष्टी एक होतील तेव्हा निर्विकल्प समाधीचा स्वाद चाखायला मिळतो; पण क्रमिक मार्गात शेवटपर्यंत कर्ताभाव राहतोच. म्हणून तो 'ध्यानाचा कर्ता मी आहे' असेच म्हणतो.

ध्येय निर्विकल्पी आणि ध्याता मात्र विकल्पी, मग ध्यान कसे होणार? तरी पण शास्त्रे म्हणतात, निर्विकल्पीचे ध्यान विकल्पी करत आहे म्हणून एक न एक दिवस तो निर्विकल्पी होईल. पण तो निर्विकल्पी होऊ देत नाही, आणि म्हणतच राहतो, 'मला हे करायचे आहे, ते करायचे आहे.' जरा झोप आली तर तो लगेच जेवण कमी करायचे आहे, जेवणाचा त्याग करायचा राहिला, असे म्हणतो! अशा तऱ्हेने विकल्पी अवस्थेच्या खड्डयातून बाहेर पडण्यासाठी निर्विकल्पीचे ध्यान करतो.

आम्ही येथे तुम्हाला केवळ निर्लेप आत्माच दिलेला नाही तर निर्विकल्प समाधी पण दिली आहे. क्रमिक मार्गात संपूर्ण सर्वांग शुद्ध आत्मा झाल्यानंतरच निर्विकल्प समाधी होत असते. जिथे काही त्याग-ग्रहण करायचे आहे तिथे विकल्प चालू आहे. छोट्या वस्तूंचा त्याग

केला आणि मोठी वस्तू ग्रहण केली, त्यामुळे विकल्प निर्माण झाल्याशिवाय राहत नाहीत. आणि विकल्प फक्त एकच नसतो तर अनेक असतात. शिष्यांवर खूप संतापणे म्हणजे पण विकल्प.

ज्यांना पाहूनच समाधी वाटते त्या दर्शनालाच 'दर्शन' म्हणता येईल, पाहूनच समाधी वाटते ते खरे दर्शन. उलट काही लोकांना पाहूनच ओकारी येते, मालच तसा! पाहिल्या पाहिल्या समाधी वाटते, असे म्हणजे दर्शन खरे दर्शन. हे सगळे 'आमचे' दर्शन का करत राहतात? हे जे दिसतात तेच त्यांना समाधी करवितात. आणि ती समाधी पण कशी? ती सोडवायची म्हटली तरी सुद्धा सुटत नाही. त्या समाधीला आपण सांगितले, 'हे समाधी, थोडे दिवस माहेरी जा' तर ती म्हणते, 'नाही, मला हे सासरच खूप आवडते.' समाधीला म्हटले, की, 'देहाला जरा डिवचायचे आहे म्हणून तू जा ना!' तर ती म्हणेल, 'मग आधी सांगायचे होते ना! आता हे शक्य नाही.' आता ही सहज समाधी सोडली तरी सुटणारच नाही. आता तर 'खातो, पितो, उठतो, बसतो, त्यास पाहतो ज्ञानाकार.'

भगवंत म्हणाले, 'जर तू कल्पनेत आहेस आणि तेव्हा जर विचार केले नाहीस तर तू गुन्हेगार आहेस आणि जर तू निर्विकल्प आहेस आणि विचार केलेस तर गुन्हेगार आहेस.'

आठ मिनिटांपर्यंत ज्याचे 'मन-वचन-काया' बंद होतात त्याला सामायिक सुरू झाले असे भगवंत म्हणतात आणि आठ मिनिट ते अठ्ठेचाळीस मिनिटे जर ही अवस्था राहिली, तर त्याला सामायिक पूर्ण झाले असे म्हणता येईल. अठ्ठेचाळीस मिनिटांपेक्षा जास्त कोणी राहू शकत नाही. सामायिक म्हणजे आत्म्यात राहणे.

*''भगवान् अंगे भाषीओ, सामायिक अर्थ*
*सामायिक पण आतमा, धरे सीधो अर्थ!''*

सामायिकचा अर्थ तर भगवंतांनीच सांगितला आहे. 'सामायिक म्हणजेच आत्मा, आणि आत्मा म्हणजेच सामायिक,'

❖❖❖❖❖

# मन

**प्रश्नकर्ता :** एकेंद्रिय जीवांना मन असते का?

**दादाश्री :** एकेंद्रिय जीवांना मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार काहीही नसते. ज्यांना पाच इंद्रिये आहेत, त्यांच्यापाशी पाच इंद्रियांचे पुण्य जमा होते, त्यांनाच मन उत्पन्न होते. पण या पंचेंद्रिय जीवांपैकीही गाय, म्हैस किंवा आकाशात उडणारे प्राणी आहेत अशांचे मन सीमित असते, एका मर्यादेपर्यंतच असते. जर मर्यादेबाहेर गेले तर माकडे घरात राहिली असती आणि पोलिस वगैरे सगळ्यांना चावू लागली असती, पण त्यांचे मन मर्यादित असते.

**प्रश्नकर्ता :** एकेंद्रिय ते पंचेंद्रिय या प्रकारच्या जीवात मनाचे डेव्हलपमेंट (विकास) कसे होत असते.

**दादाश्री :** जशीजशी डेव्हलपमेंट होत जाते तशीतशी आवरणे कमी होत जातात आणि (आत्म्याचा) प्रकाश वाढतो, आणि त्यांना अधिक दिसू लागते.

ज्यांना नाकाची तीव्रता असते ते तीन इंद्रियात असतात, डोळ्यांची चटक लागली ते चार इंद्रियात आणि कानाची चटक लागली असेल ते पाच इंद्रियात असतात. या मुंगीला तर तूप छताला टांगून ठेवले असेल तरी त्याचा वास येतो, एवढेच नाही तर ते किती दूर आहे आणि कुठल्या मार्गाने गेले की कमीत कमी मार्ग चालून तिथपर्यंत जाता येईल ते समजते.

## मनाचे स्वरूप

**प्रश्नकर्ता :** मन म्हणजे काय असते?

**दादाश्री :** 'मी' चंदुलाल आहे हा आरोपित भान आहे (मान्यता आहे) पण रियली 'मी' कोण आहे हे समजण्याची आवश्यकता आहे. 'चंदुलाल' हा रिलेटिव्ह आत्मा आहे. तो जे जे पाहतो, जे जे करतो त्यातून मनाच्या गाठी (ग्रंथी) निर्माण होत जातात. त्या गाठीमधूनच विचार निर्माण होतात पण आरोपित भावामुळे गाठींचे पोषण होते आणि त्या मजबूत होत जातात, मन सतत वेगवेगळे पॅम्फ्लेटस् (पत्रके) दाखविते. घटकेत म्हणेल, 'बसने जाऊ.' घटकेत म्हणेल, 'टक्सीने जाऊ' मनाचा स्वभाव काय आहे? पॅम्फ्लेटस् दाखविणे आणि त्याचे चिंतवन करणे. वेळ आली की ते पॅम्फ्लेट दाखविते, मग त्याचे चिंतवन करत राहते की, 'नाही, बसनेच जायचे आहे,' मग बुद्धी निर्णय घेईल आणि तिला अहंकार येऊन मिळेल. म्हणजे आतमध्ये पार्लमेंट प्रमाणे काम चालते. या सगळ्यांना ओळखणे खूप कठीण आहे. आत बरीच वंशावळ आहे. एक म्हणेल, 'हिला घटस्फोट दिला पाहिजे.' दुसरे म्हणेल, 'नाही, घटस्फोट घ्यायचा नाही,' या दोन्हींना दाढी नाही मग त्यांना कसे ओळखणार? एखाद्याला दाढी असती तरी ओळखता आले असते!

## मनाचा विलय करण्याचा मार्ग

**प्रश्नकर्ता :** मन रोज नवीन नवीन गोष्टी मागते. तेव्हा मी काय करावे?

**दादाश्री :** तुला मनाला मारून टाकायचे आहे की जिवंत ठेवायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** दादा, माझे मन काढून टाका.

**दादाश्री :** अरे नाही, मनाला काढून टाकायचे नसते. या शरीरातून मन काढून टाकले तर ॲबसेन्ट माइंडेड होशील, आणि ॲबसेन्ट माइंडेडला वेड्यांच्या हॉस्पिटलात देखील घेणार नाही. कारण वेड्यांना

सुद्धा मन असतेच ना! नव्या नव्या गोष्टी मागणे हेच मनाचे जेवण आहे. घटकेत म्हणेल, 'मुसलमान व्यक्तीशी लग्न कर' तर घटकेत म्हणेल, 'हिंदूशी लग्न कर.' या मनाला आपण विचारले पाहिजे 'तू कुठे राहतोस?' ते कुठल्या गल्लीत राहते त्याचा शोध घ्यायला नको का?

**प्रश्नकर्ता :** या मनाचा शोध कोण करू शकतो?

**दादाश्री :** या जगात काही मनोयोगी पुरुष असतात ते मनाचा शोध घेऊ शकतात. पण त्यामुळे मन विलय होत नाही. ते मनाला वाढू देत नाही पण तरीही त्यांना ज्या गोष्टी आवडतात त्या विषयीच्या गाठी तर मोठ्या होत जातात. मनाचा विलय करण्यासाठी योग्य औषध मिळाले तरच विलय होतो.

एका बाजूने मन डिस्चार्ज होत असते पण त्याच वेळी भ्रांतीमुळे नवीन मन चार्ज होणे पण चालू असते. डिस्चार्ज मनाला थांबवता येत नाही. पण 'ज्ञानी पुरुष' मन चार्ज होणे थांबवतात. चार्ज होण्याऱ्या मनाला सील (बंद) करतात. मग डिस्चार्ज मनाचा क्रमशः विलय करता येतो. ते केवळ 'ज्ञानी पुरुषांनी' दिलेल्या ज्ञानशस्त्राद्वारे. ज्ञानी पुरुषांनाही मन असते आणि महावीर भगवंतांनाही मन होते. पण त्यांचे आणि त्यांच्या मनाचे नाते कसे असते? लग्न मंडपाच्या दारापाशी एक व्यक्ती पाहुण्यांच्या स्वागतासाठी उभी असते आणि ती येणाऱ्या एक एक पाहुण्यांना नमस्कार करत असते. त्याचप्रमाणे ज्ञानींच्या मनाच्या गाठी फुटतात आणि विचार स्वरूपात एक एक विचार येतो आणि सलाम करून पुढे जातो. नंतर दुसरा येतो. ज्ञानींचा विचारांशी ज्ञाता–ज्ञेयाचा संबंध असतो, ते विचारात तन्मय होत नाहीत. विचारांबरोबर लग्न करत नाहीत. 'ज्ञानी पुरुष' भेटले नाहीत म्हणून वाटेल तसे विचार येऊ लागले आणि त्याच विचारात तन्मयाकार झाल्यामुळे मनाच्या गाठी निर्माण झाल्या. त्या गाठीतून पुन्हा नवीन विचार येतच राहतात, आणि त्याचाच स्वतःला त्रास होतो. पण 'ज्ञानी पुरुष' भेटले की ते त्या गाठी कशा विरघळाव्यात ते शिकवतात आणि मग गाठी विरघळून जातात.

## मनावर नियंत्रण

**प्रश्नकर्ता :** मनावर कंट्रोल कसे करू शकतो?

**दादाश्री :** मनावर कंट्रोल होऊच शकत नाही. मन हे कंप्लीट फिजिकल आहे, एखाद्या मशीनीसारखे आहे. कंट्रोल झाले असे वाटते पण ते तर पूर्वजन्मीच्या हिशोबामुळे. पूर्वी जर असे मांडले असेल, पूर्वजन्मी भावात असेल तर या जन्मात द्रव्यात येते. नाही तर या जन्मात मनावर कंट्रोल करता येत नाही. कोणत्याही प्रकारे बांधून ठेवता येईल अशी मन ही गोष्टच नाही. जसे 'पाणी' बांधून ठेवायचे असेल तर भांडे पाहिजे तसेच 'मन' बांधून ठेवायचे असेल तर ज्ञान पाहिजे. मन फक्त ज्ञानींनाच वश राहते! मनाला फ्रॅक्चर करायचे नाही पण मनाचा विलय करायचा आहे. मन हे तर संसार समुद्राची नाव आहे. संसार-समुद्रातून किनाऱ्यावर जाण्यासाठी नावेची गरज आहे. सगळे जग या संसार समुद्रात डुबक्या खात आहे. पोहतात आणि परत डुबक्या खातात आणि त्यामुळे ते कंटाळतात. म्हणून प्रत्येकाला नावेद्वारे किनाऱ्यावर जाण्याची इच्छा तर असते, पण योग्य समज नसल्यामुळे मनरूपी नावेला नष्ट करू लागतात. पण मनाची आवश्यकता आहे. मन हे ज्ञेय आहे आणि 'स्वत:' ज्ञाता-दृष्टा आहोत. मनरूपी फिल्म नसेल तर आपण करणार काय? मन ही तर फिल्म आहे, पण स्वरूपाचे भान नसल्यामुळे आपण त्यात एकाकार होतो आणि मग 'मला चांगले विचार येत आहेत' असे वाटते. आणि वाईट विचार येतात तेव्हा आवडत नाही! चांगले विचार आले की रागाचे बीज पडते आणि वाईट विचार आले की द्वेषाचे बीज पडते. या प्रकारे संसारचक्र चालू राहते! ज्ञानी पुरुष 'स्वत: कोण आहे?' या रियल स्वरूपाचे, (आत्म्याचे) भान करून देतात. तेव्हा दिव्यचक्षु प्राप्त होतात. त्यानंतर मनाच्या गाठी ओळखता येतात. आणि मग त्या गाठींना पाहत राहिल्याने त्या विरघळत जातात.

**प्रश्नकर्ता :** मला या संसारात खूप नीरसता वाटते. काहीच चांगले वाटत नाही. मी काय करू?

**दादाश्री :** एखाद्या माणसाला पाच-सहा दिवस ताप आला की

मग तो म्हणतो, 'मला काहीच खायला आवडत नाही.' तेव्हा जर कोणी त्याच्याकडून करार करून घेतला आणि त्याने कागदावर करार लिहून दिला की, 'मला काहीच आवडत नाही.' तर काय तो करार कायमसाठी ठेवेल? नाही. तो सरळ म्हणेल, 'हा करार फाडून टाका, त्यावेळी मला ताप आला होता म्हणून मी सही केली, पण आता मला ताप नाही!' या प्रकारे मनाची गती *समय-समय* बदलत असते. संसाराची गोडी जाते तशीच ती परत येते. जेव्हा अशी (वाईट) परिस्थिती येते तेव्हा म्हणतो 'मला संसार नकोसा वाटतो.' आणि अशी सही करतो. पण ही परिस्थिती तर सतत बदलत असते.

## संसाराचा कंटाळा, म्हणजेच राग

**दादाश्री :** या संसाराचा कंटाळा येतो का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** म्हणजेच हा संसाराचा राग (आसक्ती, मोह) आहे. जिथे राग असतो तिथेच कंटाळा पण येतो. हे सगळे संयोगानुसार असते. कंटाळा वगैरे हे सर्व मनाचे विचार आहेत. आपण विचारांना सांगितले पाहिजे, 'या, तुम्हाला जितके यायचे असेल तितके या' मनात हे जे विचार येतात त्याचे कारण आतमध्ये भरपूर स्टॉक साठलेला आहे, तो आता बाहेर पडत आहे आणि तो बाहेर पडला आहे ती निर्जरा होत आहे. (निर्जरा = आत्मा आणि कर्म यांचे वेगळे होणे) पण निर्जरा केव्हा होते? जर आपण शुद्धात्म्यात राहिलो तर. तन्मयाकार झालो तर ती कर्मे चिकट होतात. मन तर तऱ्हे तऱ्हेने दाखवीत राहील. पण आपण तन्मयाकार होता कामा नये. आपण फक्त पाहतच राहायचे की असे झाले, तसे झाले.

एका बाजूने वैराग्य येते आणि दुसऱ्या बाजूने राग (मोह) होतोच. तेव्हा कुठल्या बाजूस राग आहे याचा शोध घे. माणूस जेव्हा म्हातारा होतो तेव्हा त्याला विचार येतात अजून थोडे जगता आले तर बरे! पण ते त्याच्या हातात आहे का? असे तऱ्हेतऱ्हेचे विचार येतात त्यांना फक्त

पाहत राहायचे आणि जाणत राहायचे. काहीजण तर स्वप्नात आपलाच मृत्यू पाहातात! जग खूपच वेगळे आहे!

साऱ्या बाजूंनी वैराग्य आणि फक्त 'ज्ञानी पुरुषां'बद्दल राग (मोह), याहून उत्तम काहीच नाही! हा राग तर सर्व रोगांपासून मुक्ती देणारा आहे. हा मनुष्य जन्म कसा आहे? देवी-देवतांना सुद्धा दर्शन करण्यायोग्य वाटेल असा हा मनुष्य जन्म आहे! देवी-देवतांनाही हे दुर्लभ आहे. पण पूर्ण प्रकाश झाला तरच! आणि पूर्ण प्रकाश केव्हा होतो? जेव्हा मनाचे सगळे रोग संपतील तेव्हा पूर्ण प्रकाश होईल. मनाचे रोग लोकांना समजतच नाहीत. मनाचा कुठला भाग रोगी आहे आणि कुठला निरोगी आहे तेच लोकांना समजत नाही. जर मन निरोगी होईल तर वाणी पण निरोगी होईल आणि देह पण निरोगी होईल.

मन व्यग्र झालेले असते म्हणून एकाग्रतेचे औषध लावतात, त्यामुळे व्यग्रतेचा रोग तर बरा होतो पण त्याचा मोक्षासाठी काहीच उपयोग नाही. मन जर निरंतर आपल्याला वश राहत असेल तरच रोग बरा झाला असे म्हणता येईल. निरंतर वश, म्हणजे कधी विचलित होत नाही. मन फक्त ज्ञानामुळेच बांधले जाऊ शकते, आणि ते 'ज्ञानी पुरुष'च करू शकतात. ज्ञान नसेल तर मन जिथे जाईल तिथे संसार उत्पन्न होईल. हिमालयात गेला तरी तिथे गुलाबाचे रोप लावेल, बकरी पाळेल आणि संसार उभा करेल. मन तर एकांतात पण गर्दी निर्माण करते.

## मनाचा स्वभाव

मनाचा स्वभाव कसा आहे? की, 'मला डिप्रेशन आले आहे' असे म्हटले की एक किलोचे ओझे दहा किलोचे होऊन जाते, आणि 'मला अजिबात डिप्रेशन नाही' असे म्हटले की दहा किलोचे ओझे एक किलोचे होऊन जाते. इथे रेडिओ चालू असेल आणि मन म्हणाले, 'आवाजाने मला झोप येणार नाही.' मग झोप येतच नाही आणि जर वाटले 'आवाज असला तरी मला झोप येते' की मग आरामात नीट झोप लागते. असे आहे जग! आपण स्वतः मनापासून वेगळे आहोत, देहापासून वेगळे आहोत आणि वाणीपासून सुद्धा वेगळे आहोत. शेजाऱ्यांनी

भांडी वाजवली तर आपण त्याला काय म्हणणार? स्वत: आणि शेजारी जर एकच असते तर सांगावे लागते पण आपण तर त्याची क्रिया जाणणारे आहोत.

हे मन मनाच्या धर्मात आहे. आपल्या कानात शब्द शिरलेच नाहीत तर मनावर काही परिणाम होईल का? काहीच होणार नाही आणि कानात शब्द शिरले तर? प्रत्येक गोष्टीत लक्ष घालणे हा मनाचा धर्म आहे. सार काढणे हा बुद्धीचा धर्म आहे. मन, बुद्धी सर्वच आपापल्या गुणधर्मात आहेत. त्याच्यात आपण कशाला लुडबुड करावी? आपण आपल्या स्वधर्मात राहावे.

**प्रश्नकर्ता :** मी खूप प्रयत्न करतो मन शांत राहावे याचा, पण स्थिरता येतच नाही.

**दादाश्री :** कोणत्या धर्माचे पालन करता?

**प्रश्नकर्ता :** वैष्णव धर्म.

**दादाश्री :** मग वैष्णव धर्म चुकीचा आहे का? नाही, श्रीकृष्ण चुकीचे असतील का?

**प्रश्नकर्ता :** नाही, माझीच चूक आहे.

**दादाश्री :** काय चूक असेल?

**प्रश्नकर्ता :** दादा, तुम्हीच ते जाणू शकता.

**दादाश्री :** तुमचे नाव काय?

**प्रश्नकर्ता :** चंदुलाल

**दादाश्री :** खिशात जर वीस–पंचवीस रुपये असतील तर मुंबईच्या बाजारात हिंडताना मन स्थिर राहते पण दहा–वीस हजार असतील तर? मन स्थिर राहत नाही? खरे तर ते स्थिर राहू शकते. पण आपणच त्याला बिघडवितो. जसे रोज मुलाला बिघडविले आणि मग त्याला म्हणालो, 'स्थिर हो', तर तो स्थिर होणार नाही. तसेच जर मनाला बिघडवल्यानंतर त्याला स्थिर व्हायला सांगितले तर ते कसे स्थिर होईल? मनाच्या गरजा

तर पान किंवा विडी ह्याच असतात पण हे तर त्याला बिघडवून ठेवतात. रेडिओ घ्या, फ्रिज घ्या आणि तो टेलिविजन पण घ्या. मनाला असे बिघडवल्यानंतर ते सरळ होत नाही. इतर काही बिघडविलेत तरी चालेल, पण मनाला बिघडवू देऊ नका. बायकोला बिघडवली असेल तर हे ज्ञानी तिला एका तासातच शहाणी करतील. जर बायको तणतणत असेल आणि तिला दुसऱ्या खोलीत ठेवली तर बारा तास वेगळे राहू शकतो. पण मन तर रात्रंदिवस सोबतच राहते. बिघडलेले मन सरळ वागणार नाही. पण ज्ञानी पुरुष लाभले आणि त्यांच्याकडून ज्ञान मिळाले तर बिघडलेले मन देखील ताळ्यावर येऊ शकते.

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी दहा वर्षे मेहनत करत आलो आहे.

**दादाश्री :** मग काय मागच्या जन्मी मेहनत केली नव्हती? अनंत जन्म हेच करत आला आहात. मन काय आहे? हे समजायला तर हवे ना? त्याचे आई वडील कोण? त्याचे घर कुठे? त्याला जन्म कुणी दिला? त्याचा विलय कसा होतो? हे सगळे समजायला हवे ना? हे मन तुम्हाला कोणी दिले?

**प्रश्नकर्ता :** ईश्वराने.

**दादाश्री :** कशासाठी? दु:खासाठी दिले की सुखासाठी? ईश्वराने असे का केले? सगळ्यांनी एरंडेल तेल चोपडावे म्हणून? नाही, ईश्वर यात पडतच नाही. अशा निर्मितीत ईश्वर हात घालतच नाही. मन तर बट नेचरल (नैसर्गिक) आहे. आणि तुमच्यातील ईश्वर हे सर्व आत बसून ऐकत आहे आणि हसत पण आहे! तो म्हणतो आहे, 'चंदुलालने हा काय वेडेपणा चालविला आहे?' आपण सर्वच जण समसरण मार्गाने चाललो आहोत. समसरण मार्ग म्हणजे सतत परिवर्तन होत राहते. त्यातले सर्वात शेवटचे स्टेशन म्हणजे मन. आज तुमचे जे स्टेशन आहे तेच तुमच्या पुढच्या जन्माचे मन होईल. 'ज्ञानी पुरुष' जाणतात की मन काय आहे? मन कसे काय ठिकाणावर येईल? मन ठिकाणावर येण्यासाठी तुम्ही स्वत: प्रयत्न करत नाही?

**प्रश्नकर्ता :** तसे प्रयत्न तर मी रोजच करतो.

**दादाश्री :** प्रयत्न 'तुम्ही' करता की चंदुलाल करतात? कंट्रोल करण्यासाठी प्रयत्न 'तुम्ही' करत नाही, ते तर चंदुलाल (चंदुलालाच्या जागी वाचकाने स्वतःचे नाव समजावे) करतात. 'तुम्ही' कंट्रोल कराल तर मन कंट्रोल होईल असे आहे. पण त्यासाठी तुम्ही 'स्वतः कोण आहात' हे प्रथम निश्चित करावेच लागेल ना? एकदा ते निश्चित झाले की मग तुमचे काम झालेच समजा. आता तुमचे मन कसे आहे? आता ठीक आहे ना?

## मन, ही तर मोक्षाची नाव

**प्रश्नकर्ता :** आता तर अपार शांती वाटत आहे.

**दादाश्री :** मन ही तर नाव आहे, मन मोक्षालाही घेऊन जाऊ शकते आणि संसारात भटकत पण ठेवू शकते, कारण अजून होकायंत्र (दिशा दाखविणारे यंत्र) मिळालेले नाही. मोक्षाला केव्हा नेते? जर 'ज्ञानी पुरुष' भेटले तर ही नाव मोक्षाच्या मार्गाने चालते. 'ज्ञानी पुरुषांच्या' उपस्थितीमुळे तुमचे मन इतके सुंदर राहते मग ज्ञानी पुरुषांचे मन किती सुंदर असेल! त्यांचे मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार सगळेच फार सुंदर असतात. त्यांचा अहंकार असतो पण तो देखील फारच सुंदर असतो, वेडा नसतो, अहंकार पण मनोहर असतो. एका व्यक्तीमध्ये एवढ्या शक्ती असतात तर इतर लोकांमध्ये किती असतील! तेवढ्याच शक्ती इतर लोकात पण असतात पण त्या प्रकट नसतात. प्रकट केव्हा होतील? जेव्हा त्यांना तरणतारण 'ज्ञानी पुरुष' लाभतील तेव्हा.

बडोद्यात एका ताईंनी विचारले, 'दादा, आयुष्यात सगळे चांगलेच केले. आयुष्यभर दुसऱ्यांचे भलेच करत आहोत तरी पण मनाला शांती का मिळत नाही? ईश्वराशी संधान बांधायचा कितीही प्रयत्न केला तरी जीव का जळत राहतो?' ताईंनी एकदम सुंदर प्रश्न विचारला. ही तर 'आमच्या' हातची गोष्ट आहे, 'आमच्या' अधिकारातील गोष्ट आहे. लोकांना कायम हेच दोन प्रश्न पडतात. ताईंनी फार सुंदर सारांश काढला.

जगातील सर्व धर्मात मनोरंजन होत असते, पण या इथे 'ज्ञानी

पुरुषां'कडे आत्मरंजन होते. मनोरंजनामुळे उत्तेजनाचा अनुभव मिळतो, पण स्थिरतेचा अनुभव मिळत नाही. ज्यामुळे मन स्थिर होते अशा ठिकाणी धर्म ऐकावा, पण जिथे मन चंचल होते, मनोरंजन होते असे ऐकून काय फायदा? आतमध्ये थोडा जरी बदल घडवून आणत असेल असे धर्म प्रवचन कामाचे. लोक वयाची ऐंशी वर्षे होईपर्यंत उपाश्रयात व्याख्यान ऐकतात, प्रवचन ऐकतात पण त्यांच्यात थोडासुद्धा बदल होत नाही, मग हे सगळे निरुपयोगी नाही का? याला करमणूक म्हणता येईल. त्याने स्थैर्य लाभत नाही. आत्मरंजनामुळे आत्मा आइस्क्रीमसारखा स्थिर होतो आणि मनोरंजनात तो पाण्यासारखा उकळतो. मनोरंजनात मनात एक जोश भरला जातो, मग तिथे आत्मरंजन कसे काय होणार? इथे याल तर आत्मरंजन होईल. इथे येताक्षणीच आत्मा स्वीकार करतो की 'आता मुक्ती मिळेल.' त्यामुळे उल्हास होतो. एखाद्या कैद्याला सांगितले की, 'थोड्याच दिवसात तू मुक्त होणार आहेस' तर आज जरी तो मुक्त झालेला नसला तरी त्याला आनंद वाटू लागतो. त्याचप्रमाणे इथे आत्मरंजन होते. इथे बोलला जात असलेला प्रत्येक शब्द खूप सूक्ष्मतेने ऐकण्यासारखा आहे. 'ज्ञानी पुरुषां'चा एकच शब्द मोक्षाला नेणारा आहे!

## मन, जग-स्वरूप

या देहाचा आत्म्याशी कुठलाच 'रियल' संबंध (खरे नाते) नाही. हे मन म्हणजे सगळे जगच आहे. म्हणून कोणाला त्रास दिला तर मनात दु:ख उत्पन्न होते आणि कोणाला सुख दिले तर सुख मिळतो. मन म्हणजेच जग आहे. जगाला सुख दिले तर मनाला सुख वाटेल. तू दुसऱ्यांना सुखी केलेस तर तू मागशील तरी देखील तुला दु:ख मिळणार नाही. मन म्हणजे जग आहे. तुम्ही जे द्याल तेच तुम्हाला मिळेल. *'मनमंदिर ना आंगणियामां कल्पतरुवर उगिया रे'* (मनमंदिराच्या अंगणात कल्पतरु उगवले आहेत.) म्हणून तुला जर संसारी सुख हवे असेल तर तुला जे-जे आवडत नाही ते-ते दुसऱ्यांना देऊ नको. तुला जेवढी समज आहे त्यानुसार तुला जे-जे पसंत नाही, तुला ज्या-ज्या गोष्टींपासून दु:ख

होते त्या त्या गोष्टी तू दुसऱ्यांना देऊ नको. तू ज्याला दुःख मानतोस, त्याच्याहून देखील कितीतरी प्रकारची दुःखे अस्तित्वात असतात. पण तू ज्याला दुःख मानतोस ते दुःख जर तू दुसऱ्यांना दिलेस तर तुझ्यासारखा मूर्ख दुसरा कोण? मग तुला सुख मिळेलच कसे? जाणूनबुजून देणे आणि अजाणता देणे यात फरक नाही का?

लहान मुलाच्या हातून काचेचा ग्लास फुटला तर त्याला दुःख होते का? पण जर वडिलांच्या हातून फुटला तर? वडिलांना खूप दुःख होते. तू ज्याला दुःख मानतोस, तसे दुःख दुसऱ्यांना देऊ नकोस, तर तू सुखी होशील. मग सुखी होण्यासाठी इतर शास्त्रे शिकण्याचीही गरज नाही.

ही गोष्ट ज्याला ज्ञान मिळालेले नाही त्यालाही समजू शकते. त्यामुळे होते काय? तर दुःख येणे बंद होते आणि सुख येणे सुरू होते. एवढा धर्म तर स्वतः जवळच आहे. त्यासाठी शास्त्रे शिकण्याची गरज नाही, एवढे केले तर सुखी होणारच. स्वतःवर जो परिणाम होतो तोच परिणाम समोरच्या व्यक्तीवर सुद्धा नक्कीच होईल ना? तुला माझ्या डोळ्यात तुझ्याबद्दल काही भाव दिसले नाहीत तर तू तुझ्या डोळ्यात असे भाव निर्माण करू नकोस की ज्यामुळे समोरच्या व्यक्तीला दुःख होईल. ज्यामुळे आपल्याला दुःख होते तसेच दुसऱ्यांशी कसे वागू शकतो?

## विचार

विचार कशाला म्हणतात? मनातील गाठ फुटते, आणि गाठ फुटते ती विचाराच्या रूपाने असते. विचारांना स्वतः वाचू शकतो. विचार उठायला लावतात, बसायला लावतात, इकडे नेतात, तिकडे नेतात, पळवितात याला विचार म्हणतात. आणि जे उठ-बस करायला लावत नाहीत, पळवत नाहीत ते पाळीव विचार आहेत. उठ-बस करायला लावतात ते मात्र पाळीव नाहीत.

आतमध्ये जो कोलाहल चालू आहे त्याचे कारण मन बोलत आहे, विचार बोलत आहेत आणि ते सगळे विचार स्वतःच गोळा केले आहेत.

असे कितीतरी प्रकारचे विचार असतात जे आपल्या मनात येतच नाहीत, कारण आपण तसा माल गोळा केलेला नाही. ज्या प्रकारचा माल भरला असेल तसेच विचार मनात येतात. तुम्ही जितके गोळा केलेले, तितकेच कल्ला करतात. जे गोळा केलेत, जे साठवलेत, ते तर कल्ला करतीलच ना?

विचार बिघडले तर डाग पडतो म्हणून विचार बिघडवू देऊ नका, इतके समजून घ्या. आपल्या या सत्संगात तर विचार बिघडता कामा नयेत, या गोष्टीवर विशेष लक्ष द्या. विचार बिघडले तर सगळे काही बिघडते. आपण पडणार असे विचार आले की आपण पडतोच. म्हणून लगेच प्रतिक्रमण करा, आत्मस्वरूप होऊन जा. आपला धर्म सांगतो की गैरसोयीत सोयी शोधा. रात्री झोपताना मला विचार आला की 'ही चादर फार मळली आहे,' तर लगेच ॲडजस्टमेंट केली तेव्हा चादर इतकी मऊ वाटली की विचारू नका. पंचेंद्रिय ज्ञान गैरसोय दाखवते आणि आत्मा सोय दाखवतो. म्हणून आत्म्यात राहा.

कोणी मित्र आजारी असेल तर त्याच्या घरच्यांना सांगावे लागते की 'ह्याचा औषधोपचार करा.' कधीकधी तुमच्या मनात 'हा वाचण्याची शक्यता फार कमी आहे' असा विचार पण येईल. असे नकारात्मक विचार आपल्याला जास्त कमजोर करतात. ते विचार उपयोगाचे नाहीत. असे विचार म्हणजेच संसार, विचारांचा स्वभावच चंचल आहे पण आपण त्यात चंचल होता कामा नये. विचार तर येत राहतील, आपण फक्त ते येतील तेव्हा त्यांना पाहत राहायचे आणि जाणत राहायचे. विचारांना जाणले याचा अर्थ 'शुद्धात्मा' हजरच आहे. म्हणजे जाणायचे की आधी चंदुलाल गेले आणि नंतर चतुरलाल गेले.

**प्रश्नकर्ता :** विचार खूप आले पण नंतर ते समजते की हे तर विचार आले. याचा अर्थ मी त्या विचारांशी तन्मयाकार झालो का?

**दादाश्री :** विचारांबरोबर वहावत गेला नाहीत याचा अर्थ तुम्ही वेगळेच राहिलात. विचारांना धरून बसला नाहीत तर आत्मा आत्माच

राहिला. कित्येकदा असे होते की एकदम खूप विचार हल्ला करतात तेव्हा जागृती राहत नाही. पण नंतर थोड्या वेळाने समजते की आपण विचारात गुरफटलो होतो, याचा अर्थच 'आत्मा' हजर आहे.

स्वरूप प्राप्तीनंतर असा विचारांचा हल्ला झाला तर त्यात दुसरे काही नुकसान नाही, पण आपले सुख येण्याचे थांबले हे मात्र नुकसान आहे.

जेव्हा शाळा सुटते, तेव्हा किती मुले एकदम पळत पळत बाहेर पडतात? घंटा वाजली की सुरुवातीला मुलांची एकदम गर्दी होते आणि त्यानंतर एक-दोन एक-दोन मुलेच बाहेर पडतात. तसेच या विचारांचेही आहे! पण आत्मा यात सुद्धा आपले ज्ञाता-दृष्टा हे पद सोडत नाही, फक्त सुख येण्याचे थांबते. आत्मा कधीच आपला स्वभाव सोडत नाही आणि विभावात येतच नाही. 'ज्ञानी पुरुषां'कडून हे सगळे नीट सविस्तर समजून घेतले पाहिजे, म्हणजे मग नंतर कसलाच त्रास होणार नाही.

## विचारांचे आश्रव, निर्जरा

आत खूप विचार येतात आणि त्यात जर तन्मयाकार झाला तर *आश्रव* (उदयकर्मात तन्मयाकार होणे म्हणजे आश्रव) होते आणि त्यामुळे कर्मबंधन होते. पण जर विचारांचे ज्ञाता-दृष्टा राहिला तर *निर्जरा* होत जाते, आणि 'संवर' (शुद्ध उपयोगपूर्वक कर्मांची निर्जरा होणे ज्यामुळे नवीन कर्म चार्ज होत नाहीत.) राहते. येणाऱ्या कर्मांसाठी झाकण लागते. विचार तर सगळ्यांनाच येतात. गाठी फुटतात, ज्यात आपल्याला जास्त गोडी असते तशा विचारांच्या गाठी फुटतात, त्या सुद्धा अनटाईमली बॉम्बसारख्या केव्हाही फुटतात. रात्री तीन वाजता देखील फुटतात. पण त्या फुटण्यापूर्वी आपल्याला जागे करतात. स्वप्न पडते किंवा इतर काही तरी होते पण आपल्याला जागे करून गाठी फुटतात आणि हे सगळे क्रमाने घडते. संयोग जुळतात तेव्हा स्वत:ला आवडणाऱ्या गाठी फुटतात तेव्हा ते विचार वाचून त्यात तन्मय झाला तर कर्मे चिकटतात आणि ते विचार वाचून त्यांना जाऊ दिले तर मग ती गाठ परत येत नाही. विचार मनातून येतात, ते आपल्यापासून अगदी वेगळे आहेत पण तो आवडत्या विचारांशी

तन्मयाकार होऊन जातो. तन्मयाकार झाला नाही तर तिथे आत्मधर्म हजर असतो. संयोग जुळतात तेव्हा मनातील गाठी फुटतात. या गाठी लोभाच्या पण असतात आणि विषय-विकारांच्या पण असतात. गाठींचा आकार लहान-मोठा वेगवेगळा असतो. ज्याची जास्त गोडी असते त्याच्या गाठी मोठ्या असतात. त्यामुळे त्यासंबंधी विचार पण खूप जास्त येतात. त्या विचारांना छेदण्यासाठी त्यांना सतत 'पाहत' राहावे लागते. हे विचार आपण वाचू शकतो. आवडत्या विचारांशी तन्मयाकार होतो आणि नावडते विचार आले की लगेचच हे विचार माझ्यापासून वेगळे आहेत असे वाटते.

## नावडत्या परिस्थितीत चोख मन

नावडती परिस्थिती चोख मनाने सहन करू शकाल तेव्हा वीतराग होता येईल.

**प्रश्नकर्ता :** चोख (शुद्ध, निर्मल) मन म्हणजे काय?

**दादाश्री :** चोख मन म्हणजे समोरच्या व्यक्तींबाबत वाईट विचार न येणे. म्हणजे काय? तर निमित्ताला दोष न देणे. कदाचित समोरच्या व्यक्तीसाठी वाईट विचार आला तर ताबडतोब प्रतिक्रमण करून तो डाग धुवून टाकणे.

**प्रश्नकर्ता :** मन चोख होणे ही तर अंतिम पायरीची गोष्ट झाली ना! म्हणजे जोपर्यंत मन चोख झाले नाही तोपर्यंत प्रतिक्रमणे करावी लागतील ना?

**दादाश्री :** होय, हे खरे आहे. पण काही बाबतीत मन चोख झालेले असते आणि काही बाबतीत ते झालेले नसते. या सगळ्या पायऱ्या आहेत. ज्या बाबतीत मन चोख झालेले नाही त्या बाबतीत प्रतिक्रमण करावे लागेल.

आम्हाला तर सुरुवातीपासूनच जगाच्या प्रत्येक शब्दांबद्दल विचार येत असे. पूर्वी ज्ञान नव्हते पण विपुलमति होती. त्यामुळे बोलताक्षणीच मला शब्दांचा अर्थ स्पष्टपणे समजत असे. कोणी बोलताक्षणीच त्या

बोलण्याचे संपूर्ण सार काढता येणे त्याला 'विपुलमति' म्हणतात. कोणालाच अशी विपुलमति नसते. 'ही' तर अगदी ॲक्सेप्शनल-अपवादात्मक गोष्ट घडली आहे! विपुलमति केव्हा म्हणता येईल? तर अशी मती की जी एवरीव्हेर ॲडजस्ट करून देत असेल तेव्हा. पण इथे तर लोक जी वस्तू कच्ची खायची तिला शिजवून खातात आणि जी शिजवून खायची ती कच्ची खातात, मग कसे ॲडजस्ट होणार? पण सर्वत्र ॲडजस्ट होणे आवश्यक आहे.

## कार्याची प्रेरणा कोण देते?

**प्रश्नकर्ता :** कार्य करण्याची प्रेरणा कोण देते?

**दादाश्री :** प्रेरणा तर, मागच्या जन्माचे जे कॉजेस आहेत त्याचा फक्त इफेक्टच आहे. मनातील विचारांमुळे प्रेरणा होते. जी काही कामे होतात ती सर्व प्रतिष्ठित आत्मा करतो, शुद्धात्मा काहीच करत नाही.

मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार हे अंत:करणाचे अंग आहेत. जे विचार करते, ते मन आहे; इथे बसल्याबसल्या जे बाहेर भटकते ते चित्त आहे. मन जे दाखविते ते पॅम्फ्लेटस् (पत्रके) आहेत आणि ती पॅम्फ्लेटस् पाहून काय करायचे असे ठरविते ती बुद्धी आणि या निर्णयावर सही करतो तो अहंकार. अंत:करण ठरवते त्यानुसार बाह्यकरण (बाह्यक्रिया) होते. कोणी दुसरे प्रेरक नाहीच. मागच्या जन्मात जे जे परमाणू आपण गोळा केले आहेत त्यानुसार विचार छापले जातात आणि तेच परमाणू उदयास येतात. जर आपण स्वत:च विचार करायला स्वतंत्र असतो तर फक्त आवडेल असेच विचार मनात आले असते, पण जसे परमाणू भरले आहेत तसेच विचार येणार. विचार संयोगांवर अवलंबून आहेत. माल भरतानाच विचार केला पाहिजे, हितकारी सुविचारच भरले पाहिजेत, आत काही वाकडा विचार आला तर त्याला घुसूच देता कामा नये. नाही तर तो घरात घुसून बसेल. ऑफिसात जर कोणी चोरासारखा येताना दिसला तर काय आपण त्याला विचारत बसतो का की तू कोण आहेस? तुझा व्यवसाय काय आहे? त्याला तर घुसूच द्यायचे नाही. हा

तर एखाद्या अर्धांगवात झालेल्या माणसाला भेटायला जातो आणि नंतर मनात विचार येतो, 'आपल्याला पण अर्धांगवात असे झाले तर?' यांना उलटे विचार म्हणतात. त्यांना घुसूच द्यायचे नाही. या 'आपल्या' स्वतंत्र खोलीत कोणाला घुसूच द्यायचे नाही. घुसू देणे हे फार धोकादायक आहे, त्यामुळेच तर हा संसार उभा आहे. अनंत प्रकारचे विचार येतात त्यांना येताक्षणीच 'गेट आऊट' म्हणायचे. 'दादां'चे नाव घेतले तर ते घुसणार नाहीत. दरोडेखोर रात्री दंगा करतात पण रात्र संपतेच ना? हे तात्पुरते आहे, रात्र संपणारच. आपण तर अनंत शक्तीवाले आहोत.

मनाचा स्वभाव कसा आहे? सरळ सांगून वळत नाही पण जर त्याला नीट व्यवस्थित समजावून सांगितले तर मग ते वळते आणि एकदा वळल्यानंतर मात्र ते तिथून सरकत नाही, पुन्हा बदलत नाही. म्हणून या मुला-मुलींवर लहानपणीच चांगले संस्कार करावे, मग ते चांगले संस्कार परत कधीच पुसले जाणार नाहीत.

लहान मुलांच्या मनात जे विचार येतात ते कार्य-कारण विचार येतात, ते विचार आले की ते लगेच कार्यकारी होतात. मोठा झाल्यावर क्रिकेटचे विचार येतात, तरी अभ्यास करत असतो.

## मन:पर्याय ज्ञान

सगळ्या माणसांचा स्वभाव कसा आहे, तर त्यांच्या मनात विचार आला की ते म्हणतात, 'मला विचार आला आहे.' अरे, तू आणि विचार दोघे वेगळे आहात. 'मला विचार आला' ह्या वाक्यावरूनच 'मी' आणि 'विचार' दोघे वेगळे आहेत हे ध्यानात येते. 'मी विचार करीत आहे' असे म्हणत नाही, 'मला असे विचार येत आहेत किंवा माझे असे विचार आहेत' असे म्हणतो, म्हणून विचार स्वत:पासून पूर्ण वेगळेच आहेत. हे ज्ञान तर अलौकिक आहे! हे तर मन:पर्याय ज्ञान उत्पन्न झाले आहे, विचार येतात आणि स्वत: ज्ञाता-दृष्टा राहतो. या ज्ञानामुळे तर बुद्धीचे पर्याय देखील पाहता येतात!

अज्ञानी व्यक्तीला देखील मनातील विचार दिसतात, अज्ञानी त्या

पर्यायांना जाणतो तरी पण याला मन:पर्याय ज्ञान म्हणता येत नाही. मनाचे पर्याय निरंतर बदलत असतात, त्याचा ज्ञाता–दृष्टा राहणे तेच मन:पर्याय ज्ञान आहे.

जे मनाच्या अवस्था पाहू शकतात त्यांना ज्ञानी म्हणतात. मनाचे कॉम्प्रेशन किंवा टेन्शन (ताण) किती वाढले, किती कमी झाले, किती उल्हास झाला, किती नैराश्य आले, या सगळ्या पर्यायांना पाहणे, यालाच मन:पर्याय ज्ञान असे म्हणतात. 'स्वरूप ज्ञान' नसेल तर मन जे काही दाखविते त्यात लगेच 'मला झाले, मला झाले' असे म्हणत तन्मयाकार होऊ लागतो. मन:पर्याय ज्ञान मिळविण्यासाठी लोक लाखो वर्षे शिष्य व्हायला तयार होतील! क्रमिक मार्गात साधारण मन:पर्याय ज्ञान असते आणि आपल्या या अक्रम मार्गात मात्र सुदृढ मन:पर्याय ज्ञान होत असते, आणि बुद्धीचे पर्याय पण पाहू शकतो, ते पण ज्ञानच आहे. चित्त तर अज्ञानी देखील पाहू शकतो. पण ते अशुद्ध चित्त असते, तो ज्ञानाचा भाग नाही. कारण अहंकार देखील चित्त पाहू शकतो.

हा अक्रम मार्ग आहे म्हणून मन:पर्याय ज्ञान उत्पन्न झाले आहे! त्यामुळे जर कोणाबद्दल मनात द्वेष उत्पन्न होत असेल तर लगेच मन:पर्याय ज्ञानाने ते लक्षात येते आणि लगेच तिथे सील करता येते. त्यामुळे जेव्हा ती व्यक्ती पुन्हा भेटते तेव्हा विस्फोट होण्याचे आपोआपच थांबते. जर हे मन:पर्याय ज्ञान नसेल तर मात्र तो विस्फोट झाल्याखेरीज राहणार नाही. हे तर आपण दुकानात बसलो असू तरी पण कळते की नगीनभाईसाठी मन असे पर्याय दाखवित आहे आणि लल्लूभाईसाठी असे पर्याय दाखवित आहे. मग तिथे सावध राहावे. अनेक मोठमोठ्या साधू आचार्यांना देखील मन:पर्याय ज्ञान नसते, ते फक्त श्रुतज्ञानातच असतात.

इथे तुम्हाला तासाभरात 'आम्ही' स्वरूपाचे भान करून देतो म्हणून तुम्हाला हे सर्व सहज प्राप्त होते. नाही तर लाखो जन्मांत देखील ते मिळण्यासारखे नाही.

❖❖❖❖❖

## बुद्धी आणि ज्ञान

**दादाश्री :** बुद्धी आणि ज्ञान यात काही फरक आहे का?

**प्रश्नकर्ता :** प्रत्यक्ष सिद्ध केली जाऊ शकते अशी समज म्हणजे बुद्धी, आणि ज्ञान म्हणजे बुद्धीपलीकडचे, ज्याला सुपर-नॉलेज म्हणतात, पराविद्या असेही म्हणतात.

**दादाश्री :** ज्ञान आणि बुद्धी यांची व्याख्या मी सांगतो. सर्वसाधारण जगात बरेच सब्जेक्टस् (विषय) असतात, त्यातील 3-4 सब्जेक्टस् समजले की नॉलेज मिळाले असे लोक म्हणतात, पण जगातील सगळे सब्जेक्टस् जाणणे हे सुद्धा बुद्धीमध्येच धरता येते. कारण हे सगळे अहंकारी ज्ञान आहे. अहंकारी ज्ञान म्हणजे बुद्धी आणि निर्अहंकारी ज्ञान म्हणजे 'ज्ञान'. बुद्धी हा इनडायरेक्ट -अप्रत्यक्ष प्रकाश आहे, हे मी तुम्हाला उपमा देऊन सांगतो. सूर्याचा डायरेक्ट प्रकाश हा डायरेक्ट ज्ञानासारखा आहे आणि दुसरा सूर्याचा इनडायरेक्ट प्रकाश, म्हणजे डायरेक्ट प्रकाश आरशावर पडतो आणि त्यामुळे खोलीत प्रकाश पसरतो तो इनडायरेक्ट-अप्रत्यक्ष प्रकाश. आत्म्याचा डायरेक्ट प्रकाश म्हणजे ज्ञान. बुद्धीचा प्रकाश माध्यमाद्वारे येतो, तो इनडायरेक्ट आहे. आत्मा स्व-पर प्रकाशक आहे. आणि बुद्धी पर-प्रकाशक आहे. बुद्धी विकल्प करविते. तुम्हाला संकल्प-विकल्प होतात का?

**प्रश्नकर्ता :** संकल्प-विकल्प म्हणजे नेमके काय ते मला समजत नाही.

**दादाश्री :** जगात इतरत्र संकल्प–विकल्प कशाला म्हणतात, माहीत आहे का? मनात जे चांगले–वाईट विचार येतात त्यांना ते संकल्प–विकल्प म्हणतात, पण ही समज चुकीची आहे. 'मी चंदुलाल आहे' हा पहिला विकल्प, 'मी हिचा पति आहे' हा दुसरा विकल्प, 'मी याचा बाप आहे, मी वकील' आहे, हे सगळे विकल्प आणि 'हे शरीर, मोटार, बंगले माझे आहेत' म्हणजे संकल्प. 'मी' म्हणजे विकल्प आणि 'माझे' म्हणजे संकल्प.

ज्ञान आणि बुद्धीत काय फरक आहे? बुद्धी भेद निर्माण करते, तुझे–माझे करते, याउलट ज्ञान अभेद करते. बुद्धी–ज्ञान म्हणजे या जगतील सगळ्या शास्त्रांचे ज्ञान जाणतो पण स्वत:ला मात्र जाणत नाही, अशा अहंकारी ज्ञानाला बुद्धी म्हणतात, आणि स्वरूपाचे ज्ञान झाले म्हणजे निर्‌अहंकारी ज्ञान झाले, ते खरे ज्ञान आहे. बुद्धी तर स्वत:ची पत्नी आणि मुले यात पण भेद निर्माण करते.

## भेदबुद्धी

जोपर्यंत भेदबुद्धी असते तोपर्यंत 'मी चंदुलाल आणि हा रायचंद' आणि महावीर वेगळे, नेमिनाथ वेगळे, श्रीकृष्ण वेगळे, असा सगळ्यांच्यात भेद दिसतो. 'ज्ञानी पुरुषां'जवळ भेदबुद्धी नसते, ते स्वत: आत्मस्वरूपात राहतात आणि सगळ्यांना अभेद स्वरूपाने पाहतात. 'आम्हाला' तर सगळ्यांच्यात मीच बसलो आहे असे वाटते. रियल स्वरूप जाणले की ही अभेदता येते.

वीतरागी निष्पक्षपाती असतात, त्यांना सगळ्यांच्यात अभेदता वाटते. लोक कालचक्राच्या आधारावर दु:ख सोसत राहतात, जर 'ज्ञानी पुरुष' भेटले तर दु:खे संपतात. ज्ञानी भेटले की सुटका होते.

बुद्धी ही प्रकाशक आहे, पण ती पर–प्रकाशक, इनडायरेक्ट लाईट आहे, आरशात जशी सूर्याची किरणे परावर्तीत होतात (आणि प्रकाश मिळतो) तसा. ज्याचा आरसा जेवढा मोठा तेवढा त्याचा प्रकाश मोठा पडतो. कोणी बॅरिस्टर असतात ते रोज हजारोंमध्ये कमावतात, कारण

त्यांचा आरसा मोठा आहे आणि कोणाचे घोडे तर अजिबात चालत नाही. बुद्धीचे फळ काय आहे? बुद्धी खूप वाढली की माणूस बुद्धू होतो!

आमच्यात किचिंतदेखील बुद्धी नाही, 'आम्ही' अबुध आहोत. कवीने म्हटलेच आहे ना,

*'भाव, नो, द्रव्यनां जाळा खंखेरी जाणजो अबुध अध्यासे.'*

(बुद्धीपासून मुक्त होऊन, अबुधपणे भावकर्म, द्रव्यकर्म आणि नोकर्म यांचे जाळे कसे दूर करायचे ते समजून घ्या.)

अबुध-अध्यास असेल तर ती जाळी दूर होतील. बुद्धीने ती जाळी दूर होणार नाहीत. बुद्धी आपले काम करीत राहील, पण तिचा उपयोग करावयाचा नाही. हा तर जिथे साप असतो तिथे बुद्धीच्या प्रकाशाने बघतो, तेव्हा मग बेचैनी, अशांती वाटते आणि 'व्यवस्थित शक्ती' सांगत असते, 'तू जा, तुला कोणी चावणार नाही!' तेव्हा शांती वाटते. संसारात जेव्हा जेव्हा जरूरी असते, तेव्हा तेव्हा तेवढा प्रकाश बुद्धी सहज देतच असते आणि सांसारिक कामे होतात. पण हा तर विपरीत बुद्धीचा वापर करतो की जर साप चावला तर? हा विचारच उपाधी निर्माण करतो. सम्यक् बुद्धीने सर्व दुःखे समाप्त होतात आणि विपरीत बुद्धी सर्व दुःखांना आमंत्रण देते.

तीन प्रकारची बुद्धी : एक अव्यभिचारिणी बुद्धी, दुसरी व्यभिचारिणी बुद्धी आणि तिसरी सम्यक् बुद्धी. जर एखाद्या जन्मात जिन ('वीतरागीं')चे दर्शन झाले असेल तर त्याची सम्यक् बुद्धी विकसित होते. शुद्ध 'जिन'चे दर्शन झाले असेल आणि त्यांच्यावर श्रद्धा बसली असेल तर ते बीज वाया जात नाही, त्यामुळे आता सम्यक् बुद्धी उत्पन्न होते आणि मग सहज भावाने (मुक्तीचा) मार्ग मिळतो.

किराणा मालाचा दुकानदार ग्राहकाने बिलचे दोन हजार रुपये दिले नाही तर त्याच्याबरोबर भांडण करतो, मग ग्राहक दुकानदाराला थोबाडीत मारतो आणि मग फौजदारी केस उभी राहते. म्हणजे पैसे तर

मिळालेच नाहीत, शिवाय फौजदारी केस झाली, मग तो म्हणतो, 'मी तर आता एकदम दु:खात बुडलो.' खरे तर, तो स्वत:च दु:खांना बोलावतो! दु:खांना जर बोलविले नाही तर एकपण दु:ख येणार नाही. विपरीत बुद्धीमुळेच दु:खे निर्माण होतात. विपरीत बुद्धी म्हणजे सुरीची धार उलटी धरून भाजी चिरणे. भाजी तर चिरली जात नाहीच उलट बोट कापून त्यातून रक्त वाहते.

ज्या व्यक्तीकडे अक्कल आहे त्याचा मोक्ष होत नाही. जग ज्याला अक्कलवंत समजते तो खरे म्हणजे बिन अकलेचा आहे. अक्कलवाला आपली कबर स्वत:च खोदतो, त्याला आम्ही कमी बिन अकलेचा म्हणतो. आम्ही स्वत: बिन अकलेचे आहोत! अबुध आहोत! आमच्यात एक थेंब जरी बुद्धी शिल्लक असेल तरी लगेच (रौद्रध्यान, आर्तध्यान) सर्व प्रकारची ध्याने सुरू होतील. व्यापारात असे वाटेल की, 'हा जास्त पैसे घेऊन गेला, याने असे केले,' अशाने तर ज्ञान नष्ट होईल.

## बुद्धीच्या उपयोगाची मर्यादा

आम्ही सकाळी सात वाजता दादर स्टेशनवर बसलो होतो, तेव्हा लोकांनी एकदम सर्व लाईटस् बंद केल्या. आता अशावेळी बुद्धीवाला काय विचारील, 'असे का केले?' आता सूर्यनारायण उगवले आहेत, त्यांचे तेज सर्वत्र पसरत आहे मग आता या लाईटस्चा काय उपयोग? तसेच आम्ही म्हणतो, 'ही' फुल लाइट आल्यावर बुद्धीची लाईट बंद करा! जसे हे लोक जागरूक आहेत की यात इलेक्ट्रिसिटी खर्च होते. तसेच आपल्या लाईटमध्ये, आपल्या मूळ शक्तीत, बुद्धीचा उपयोग केल्यामुळे पॉवर वाया जाते. आणि जर या बुद्धीच्या लाईटचा वापर केला नाही तर मूळ लाईट वाढेल.

**प्रश्नकर्ता :** बुद्धीचा प्रकाश तर राहीलच ना?

**दादाश्री :** हो, जरूरी असेल तेव्हा बुद्धी काम करीलच पण सतत बटण चालू ठेवण्याची गरज नाही. गरज पडेल तेव्हा ते आपोआप चालू होईल, पण बटण चालू राहता कामा नये. बुद्धी सांसारिक हित

कशात आहे तेच दाखविते. कुठल्याही सांसारिक क्रियेत बुद्धीचाच उपयोग होतो आणि 'मी शुद्धात्मा आहे' हा ज्ञानाचा उपयोग आहे.

आत्मा सहजस्वरूपच आहे पण प्रकृती सहज होते तेव्हाच आत्मा सहजस्वरूपात राहू शकतो, त्याचे फळ मिळते. प्रकृती सहज केव्हा होते? जर बुद्धीताईने विश्रांती घेतली तर प्रकृती सहज होते. कॉलेजमध्ये शिकत होतो तेव्हा बुद्धीताई मदतीला येत असे पण आता शिक्षण पूर्ण झाले आहे, आता बुद्धीताईची काय गरज? आता तिला सांगा, 'तुम्ही आता घरीच थांबा, मला तुमची गरज नाही.' आता तिला पेन्शन देऊन टाका. बुद्धी आपल्याला चंचल बनवते त्यामुळे आत्म्याचा जो सहज स्वभाव आहे त्याचा आस्वाद घेता येत नाही. बाहेरचा भागच चंचल आहे, पण बुद्धीला एका बाजूला बसवले तर सहज सुख लाभेल! कुत्रा दिसला तर लगेच बुद्धी म्हणेल, 'काल एक कुत्रा त्या माणसाला चावला होता, हा कुत्रा पण तसाच दिसत आहे, मला चावला तर?' अहो, त्याच्या हातात सत्ता कुठे आहे? 'व्यवस्थित'मध्ये असेल तर चावेल. बुद्धी तू आता एका बाजूला बस. स्वतःकडे जर सत्ता असती तर लोकांनी स्वतःचेच नसते का सुधारले? पण तसे तर सुधारलेले दिसत नाही. बुद्धी फक्त शंका उत्पन्न करते. शंका आली की सगळी गडबड सुरू होते. आपण तर आपल्या निःशंक पदातच राहावे. जग तर सतत शंका, शंका आणि शंकाच घेत राहणार!

## बुद्धीची नॉर्मालिटी

**प्रश्नकर्ता :** दादा, बुद्धीला 'डिम' (मंद) कसे करायचे?

**दादाश्री :** बुद्धीला डिम करण्यासाठी सम्यक् बुद्धीचा जोर असला पाहिजे.

जशीजशी बुद्धी वाढते तशीतशी स्मृती वाढते आणि तशीतशी दुःखे वाढतात! बुद्धीला तर एका बाजूला ठेवून द्यायला हवे. ती सांगते ते ऐकताच कामा नये. समजा चाळीत अशी एक व्यक्ती असेल की जिचे ऐकले की आपली फजिती होते, तर मग अशा व्यक्तीचे आपण

किती वेळा ऐकू? एक वेळ, दोन वेळा पण त्यानंतर आपण त्या व्यक्तीचे ऐकणारच नाही ना! बुद्धी आपल्याला सेन्सिटिव (संवेदनशील) बनविते, इमोशनल (भावनात्मक) बनविते. मग आपण तिने सांगितलेले का स्वीकारावे?

व्यवहारात वाइज (शहाणे) असणे आवश्यक आहे. उद्देश असा की कोणाचेही किचिंत देखील नुकसान होऊ नये, बुद्धीची गरज नाही. बुद्धी जास्त वाढली तर डोके जाग्यावर राहत नाही, बुद्धू बनतो. म्हणून बुद्धीला थोडेसे कापायला हवे. शहाणे होणे आवश्यक आहे, अतिशहाणे व्हायची गरज नाही. अतिशहाणे झाले की मग ट्रिक्स करायला शिकतो. ट्रिक म्हणजे आपल्या जास्त बुद्धीने आपल्यापेक्षा कमी बुद्धीच्या व्यक्तीला फसवून आपला फायदा करणे. ट्रिक केली तर तुझ्यात आणि चोरात काय फरक? हा तर चोरांपेक्षाही जास्त मोठा गुन्हा. ट्रिक तर बुद्धीने समोरच्याला फसवते. भगवंत म्हणाले होते, 'बुद्धीने मारता मारता तू हळूहळू निर्दयी होशील. त्यापेक्षा प्रत्यक्ष हाताने मारलेले बरे, कारण त्यामुळे कधीतरी दया येईल.' सारे जग बुद्धीने मारत असते, हे तर सगळ्यात मोठे रौद्रध्यान! त्याचे फळ म्हणजे सरळ नरकगती. कोणाचेही सुख कशाही प्रकारे ओरबाडण्याची इच्छा, कुणालाही कशाही प्रकारे दु:ख देण्याची इच्छा म्हणजे रौद्रध्यान. व्यापारी कापड ताणून ताणून विकतात ते पण रौद्रध्यान. 'एवढे कापड तरी वाचेल' असे तो मनात म्हणतो. हा हिशोब कसा असतो? जर 9999 रुपये मिळणार असतील तर असे रौद्रध्यान करून देखील एवढेच मिळणार आणि रौद्रध्यान न करून देखील तेवढेच मिळणार. उलट कापड ताणून ध्यान बिघडवितो आणि म्हणतो, 'पैसे मिळविण्यासाठी असेच तर करावे लागते.' हे व्यापारी अशी श्रद्धा ठेवत नाहीत की लक्ष्मी येणारच. अहो, ज्या श्रद्धेने तुम्ही दुकान काढलेत ती श्रद्धा न मोडता, ध्यान न बिघडविता दुकान चालवा. अशा श्रद्धेनेच लक्ष्मी येईल असा भाव मनात बाळगा.

जगात सगळेच अंधश्रद्धेने चालत आहेत. मोटार चालविणारा पण

अंधश्रद्धेने चालवीत असतो. 'ज्ञानी पुरुष' मोटारमध्ये बसतात तेव्हा म्हणतात, 'ही मोटार नीट चालेल किंवा धडकेल. जे घडणार असेल ते घडेल.' बाकी, लोक तर ज्ञान नसले तरी अंधश्रद्धेने चालवतच असतात.

## बुद्धी संसारानुगामीच

भटकणाऱ्याच्या दोषामुळे त्याला भटकविणारे उत्पन्न होतात. भटकविणाऱ्यांना खूप जास्त सोसावे लागेल, कारण ते स्वतःच्या बुद्धीने लोकांना फसवून फायदा मिळवितात. बुद्धीचा उपयोग तर समोरच्या व्यक्तीचा फायदा कसा होईल यासाठी व्हायला हवा, पण हे तर बुद्धीचा दुरुपयोग करीत आहेत. अशा बुद्धीला व्यभिचारी बुद्धी असे म्हटले आहे. श्रीकृष्णानी गीतेमध्ये बुद्धीला व्यभिचारिणी सांगितले आहे. बुद्धीने असे काहीच करायची गरज नाही, सर्व सहज मिळेल असे हे जग आहे. खरे तर, उपभोग घेता येत नाही, नाही तर मनुष्य जन्मात उपभोग घेता येईल असे शक्य आहे. पण स्वतः सुख भोगत नाही. एवढेच नाही तर त्याच्या संपर्कात आलेले सर्व प्राणी पण त्याच्यामुळे दुःखी होतात. इतर कोट्यवधी जीव आहेत पण फक्त मनुष्यच सतत दुःखी आहे. कारण बुद्धी, मन सगळ्यांचाच तो दुरुपयोग करतो. फक्त मनुष्यच एकटा निराश्रित आहे. समोरून दरोडेखोर आले तर 'माझे कसे होईल' असा विचार फक्त माणसांनाच येतो. 'मी हे सर्व कसे चालवीन? माझ्याशिवाय कसे होईल?' अशी काळजी जे करतात ते सगळे निराश्रित आहेत. याउलट पशु भगवंताचे आश्रित आहेत. त्यांना खायला, प्यायला सहज आरामात मिळते. त्यांच्यासाठी डॉक्टर, हॉस्पिटल असे काही नसते. त्यांच्यासाठी दुष्काळ वगैरे असे सुद्धा काही नसते. मात्र जे माणसांच्या सहवासात आले आहेत असे जनावर-गाय, बैल, घोडे वगैरे मात्र दुःखी होत आहेत.

जसजसा आहार कमी होतो, तसतशा आळस कमी होत जातो आणि बुद्धीचा विकास होतो. चहामुळे शरारीची बांधणी बिघडली, आहार कमी झाले. पूर्वीच्या काळी चहा नव्हता तेव्हा लोकांचे जेवण खूप जास्त होते, लोक बैलासारखे असत. बुद्धी पण म्हशीसारखी असे. तरीही ते

लोक खूप चांगले कष्ट करीत. हातात घेतलेले काम खूप मेहनत करून सुद्धा पूर्ण करीत. अधिक आहारामुळे बुद्धी जाड होते, तिची सूक्ष्मता नष्ट होते.

बुद्धी संसाराचे काम करते, मोक्षासाठी उपयोगी नाही. एकच व्ह्यू पॉइंट म्हणजे बुद्धी आणि दोन्ही व्ह्यू पॉइंटस् म्हणजे रियल आणि रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट उत्पन्न होतात तेव्हाच प्रज्ञा उत्पन्न होते, आणि प्रज्ञा उत्पन्न झाल्यानंतर व्यक्ती दोन्ही व्ह्यू पॉइंटस्मधून, रियल आणि रिलेटिव्ह, दोघांना वेगवेगळे पाहू लागते आणि त्यामुळे मोक्ष मिळतो. जिथे प्रज्ञा उत्पन्न होते तिथे सनातन सुख असते. बुद्धीमुळे तर काल्पनिक दुःख मिळते आणि ते सुद्धा निरंतर मिळते! सुखाच्या मागे दुःख भरलेले असते आणि त्यातून सध्याचा हा दूषमकाळ! सगळीकडे अपार दुःख आणि संपूर्ण मोहनीय व्याप्त आहे. त्यामुळे सर्व लोक निरंतर मूर्च्छेतच भटकत आहेत!

❖❖❖❖❖

# चित्त

चित्त म्हणजे ज्ञान + दर्शन, चित्ताचे हे दोन गुण आहेत. हे दोन्ही गुण अशुद्ध असतील तर त्याला अशुद्ध चित्त म्हटले जाते आणि शुद्ध असतील तर शुद्ध चित्त म्हटले जाते.

शुद्ध ज्ञान + शुद्ध दर्शन = शुद्ध चित्त = शुद्धात्मा.
अशुद्ध ज्ञान + अशुद्ध दर्शन = अशुद्ध चित्त = अशुद्धात्मा.

इथे बसल्याबसल्या जे परदेशात जाऊन तिथल्या गोष्टी पाहून येते, घर-बिर सगळे काही पाहून येते ते चित्त. पाहण्याचा आणि जाणण्याचा स्वभाव चित्ताचा आहे. याउलट मनाचा स्वभाव पॅम्फ्लेटस् दाखविण्याचा आहे. मन एकापाठोपाठ एक अशी पॅम्फ्लेटस् दाखविते. लोक एकाचा दोष दुसऱ्यावर टाकतात. ते म्हणतात, 'माझे मन भटकत आहे!' मन शरीर सोडून कधीही बाहेर जाऊ शकत नाही. जे बाहेर जाते ते चित्त आहे. लोकांना मन म्हणजे काय, चित्त म्हणजे काय, त्यांना बुद्धी म्हणजे काय आणि अहंकार म्हणजे काय हे ओळखता येत नाही. अरे अंत:करण, अंत:करण असे म्हणता, पण अंत:करण म्हणजे काय ते त्यांना माहीतच नाही. जेव्हा ग्लास फुटतो तेव्हा तो प्रथम अंत:करणात फुटतो आणि नंतर बाहेर फुटतो.

या प्रकारे मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार, याबाबतीत कोणत्याही शास्त्रात नीट समजावून सांगितलेले नाही.

हे चित्त आतही भटकते आणि बाहेरही भटकते. मेंदूत काय चालले आहे हे चित्त पाहून येते.

## चित्त गैरहजर असल्याचा परिणाम

एक गिरणीमालक सांताक्रुजला माझ्याकडे आले होते. त्यांना मी विचारले, 'शेठजी, तुम्ही नीट जेवता का कधी? चित्त जाग्यावर ठेवून जेवता का? हे ब्लडप्रेशर का होते? चित्त जाग्यावर न ठेवता जेवल्यामुळे?' शेठजी बिचारे रडवेले झाले, आणि माझ्या मांडीवर डोके ठेवून म्हणू लागले, 'होय दादा, कधीच चित्त जागेवर ठेवून जेवलो नाही.'

श्रीकृष्णानी काय म्हटले आहे, 'प्राप्त आहे ते भोग आणि अप्राप्तची काळजी करू नकोस.' हे जेवणाचे ताट समोर आले तर ते एकाग्रचित्ताने शांतीपूर्वक जेव. जर चित्त जाग्यावर असेल तर जेवण स्वादिष्ट लागेल आणि चित्त जाग्यावर नसेल तर बत्तीस प्रकारची पक्क्वान्ने सुद्धा आवडणार नाहीत. या देहाला थोडीशी खिचडी मिळाली तरी सारी रात्र तो शांत राहील, समाधीत राहील असे आहे. इथे मात्र 'शरीर' जेवत आहे आणि 'स्वतः' जातो गिरणीत.

या माणसांचे मग हार्टफेल होते. शाळेत फेल होत नव्हते मग आताच कसे फेल होते? ही जनावरे जेव्हा खातात तेव्हा त्यांचे चित्त कुठे बाहेरगावी जाते की नाही याची एकदा माहिती काढा बरे! कुत्रासुद्धा खाताना चव घेऊन शेपटी हालवत असतो! सगळ्या प्राण्यांचे चित्त खाताना फक्त खाण्यातच असते. आणि हे शेठजी, डॉक्टर, वकील यांचे चित्त मात्र खाताना ॲबसेन्ट (गैरहजर) असते, यामुळे तर हार्टफेल आणि ब्लडप्रेशर असे आजार होतात. हार्टफेल आणि ब्लडप्रेशर हा तर खाताना चित्त गैरहजर असल्याचा परिणाम आहे. चित्त हजर नसताना खाल्ल्यामुळे त्यांच्या शरीरातील सगळ्या नसा कडक होतात. या डॉक्टरांचे चित्त ऑपरेशनच्या वेळी जर बाहेर भटकू लागले तर रोग्याची स्थिती काय होईल? खाताना सुद्धा शरीरात खूप ऑपरेशन्स् चालू असतात म्हणून जेवताना चित्त हजर ठेवून जेवा. जेवताना हजेरी घ्या की, 'चित्त हजर आहे का?'

कधी असेही होईल की डॉक्टरांचे चित्तसुद्धा कुठल्या कुठे भटकेल. पण ऑपरेशन करताना ते चित्त हजर राहते, तेवढे मात्र चांगले

आहे. जर चित्त हजर न ठेवता ऑपरेशन केले तर रोग्याच्या मृत्यूनंतर त्याला जाळल्यानंतर त्याच्या पोटातून कात्री निघेल! म्हणून घाबरून डॉक्टर ऑपरेशनच्या वेळी चित्त हजर ठेवून ऑपरेशन करतात.

कदाचित सगळ्या ठिकाणी चित्त हजर राहिले नाही तरी चालेल, इतर वेळी चित्त गैरहजर असले तरी चालेल पण जेवताना मात्र चित्त हजर ठेवा.

**प्रश्नकर्ता :** 'वर्क व्हाइल यू वर्क आणि प्ले व्हाइल यू प्ले' (कामाच्या वेळी फक्त कामच करा, आणि खेळाच्या वेळी फक्त खेळ) असेच ना दादा?

**दादाश्री :** हे वाक्य परदेशी सहज प्रकृतीच्या लोकांसाठी आहे, विकल्पी लोकांसाठी नाही. 'ज्ञानी पुरुष' तर सदैव 'वर्क व्हाइल यू वर्क अॅन्ड प्ले व्हाइल यू प्ले' असेच राहत असतात, कारण त्यांचा आतील भाग आणि बाहेरील भाग, दोन्हीही सहजपणे चालू असतात, त्यांचे चित्त कधीच गैरहजर नसते.

भारतीयांसाठी हे वाक्य उपयोगी नाही. हे वापरून काय उपयोग? तरी पण आम्ही म्हणतो की जेवतांना मात्र चित्त हजर ठेवाच. ऑफिसला जाण्यासाठी अकरा ऐवजी साडे अकरा वाजले तर 'दादां'ना आठवा. म्हणा, 'दादा, तुम्ही तर म्हणता की जेवताना चित्त हजर ठेवा, पण आता तर सव्वाअकरा वाजले, मला काही समजत नाही. पण तुम्ही म्हणता त्याप्रमणे चित्त हजर ठेवूनच जेवण करीत आहे. पुढे काय होईल ते तुमच्यावर सोपवतो.' असे बोललात तर चित्त जाग्यावर राहील आणि ऑफिसात बॉसला जे काही म्हणायचे असेल ते खुशाल म्हणू दे. शेवटी बॉससुद्धा निसर्ग नाचवेल तसे नाचणारा भोवराच आहे ना? तो स्वसत्तेत आलेलाच नाही. पुरुष बनलेलाच नाही! सगळे जग परसत्तेतच वावरत असते ना!

जेवताना चित्त हजर ठेवा, मग तुम्हाला समजेल की भज्यांमध्ये मीठ जास्त आहे की कमी, तिखट जास्त आहे की कमी! सगळे जण

तर चित्ताच्या गैरहजेरीतच जेवण करतात, चहा गुळाचा आहे की साखरेचा आहे हे पण त्यांना कळत नाही! अहो, आता संयोग जुळला आहे त्याचा चांगल्याप्रकारे उपभोग घ्या. हे तर शेठजी जेवत असतात इथे, पण त्यांचे चित्त सात मैल दूर असलेल्या कारखान्यात असते! जो भेटतो त्यालाच आपण नमस्कार करतो ना? सात मैल दूर असलेल्याला तर कोणी अक्कलवान नमस्कार करत नाही.

सारा वेळ पैसा, पैसा असे केल्यामुळे कुत्र्यासारखे मरण येईल. कषायांमध्येच मराल. एक शेठजी म्हणतात, 'एकदा हार्टअटॅक येऊन गेला आहे.' अहो, एकदा घंटा वाजली आहे, नंतर दुसरी आणि तिसरी घंटा वाजली की गाडी निघून जाईल. हार्टअटॅक हे कशाचे फळ आहे? भयंकर कुचारित्र्याचे फळ आहे. तेव्हा आता सरळ हो आणि ज्ञानींकडे जा. तुझ्या कृत्यांची खाजगीपणे माफी माग तरी देखील तू सुटशील.

चित्त हजर नसेल तर जेवण करू नका, आणि चित्त हजर असेल तेव्हाच जेवण करा, याचा जेव्हा जोरदार प्रचार होईल तेव्हा रोग कमी होऊ लागतील.

जनक विदेही यांना ज्या ज्ञानींकडून ज्ञान प्राप्त झाले होते त्या ज्ञानींच्या तपस्वी मुलाला अहंकार झाला, 'मी कोणीतरी (श्रेष्ठ) आहे.' त्याचा हा अहंकार दूर करण्यासाठी गुरुदेवांनी मुलाला सांगितले, 'तू काही उपदेश घेण्यासाठी जनक राजाकडे जा.' मग ते मुनी राजाकडे गेले. गुरुदेवांनी जनकराजांना अगोदरच पूर्व सूचना देऊन ठेवली होती. जेव्हा मुनीने राजमहालात प्रवेश केला तेव्हा त्यांने राजवैभवाचा थाट पाहिला. जनक राजे सोन्याच्या झोपाळ्यावर बसले होते. त्यांच्या दोन्ही बाजूला राण्या बसल्या होत्या, त्यांच्या खांद्यावर हात ठेवून राजे मस्तीत बसले होते. मुनीने ते पाहिले आणि मनात म्हणाले 'या विलासी पुरुषाकडून मी काय उपदेश घेणार?' पण वडिलांची आज्ञा होती म्हणून ते उघड काही बोलले नाही, चुपचाप राजे सांगतील तसे ते करत गेले. राजाने जेवणासाठी बसवले, सोन्याचे ताट आणि बत्तीस पक्वान्ने! मुनी आसनावर बसले आणि त्यांची नजर वर गेली, त्यांच्या काळजात धस्स झाले! 'अरे!

हे काय? त्यांच्या डोक्यावर एक घंटा लटकत होती आणि ती घंटा आता पडेल की मग पडेल असे वाटत होते.' राजानी किमया केली होती, घंटा अगदी बरोबर मुनीच्या डोक्यावर होती आणि ती अगदी बारीक, दिसणार नाही अशा पारदर्शक दोरीने बांधली होती. मुनी बिचारे खूप घाबरले आणि कसे-बसे जेवले. जेवताना राजानी खूप आग्रह केला पण त्यांचे चित्त जेवणात होतेच कुठे? ते तर सतत त्या लटकणाऱ्या घंटेवरच होते! 'ती दोरी तुटली आणि घंटा माझ्या डोक्यावर पडली तर माझे काय होईल?' जेवल्यानंतर पान देताना राजानी विचारले, 'महाराज, जेवण आवडले का? कोणता पदार्थ तुम्हाला जास्त आवडला?' मुनी सरळ बोलणारे! तपस्वी मुनींकडे कपट वगैरे असे काही नसते फक्त एक अहंकाराचीच भानगड असते. त्यांने जसे होते तसे सांगितले, ते म्हणाले, 'हे राजन्, तुम्हाला खरे सांगू का? डोक्यावर ती घंटा बांधली होती त्यामुळे माझे चित्त भीतीने त्या घंटेलाच चिकटले होते. त्यामुळे मी काय खाल्ले ते मला समजलेच नाही.' तेव्हा जनक विदेही म्हणाले, 'महाराज, जेवण करताना जसे तुमचे चित्त जेवणात गैरहजर होते, तसेच आमचे चित्त संसारात निरंतर गैरहजर असते! या वैभवांत आमचे चित्त नसतेच. आम्ही निरंतर आमच्या स्वरूपातच असतो!' असे होते जनक विदेही!

जगाचे विस्मरण कसे होईल? त्यासाठीच तर आपण सर्व इथे सत्संगात बसलो आहोत. इथे तुम्हाला सहजपणे जगाचा विसर पडतो. नाही तर एक क्षणभरदेखील जगाचे विस्मरण होईल असे शक्य होत नाही. हे मोठे-मोठे शेठजी जगाचा विसर पाडण्यासाठी हजारो रुपये खर्च करायला तयार असतात, तरी पण जगाचा विसर पडेल असे नाही. खरे तर असे आहे की ज्याला विसरावे असे वाटते त्याचीच आठवण प्रथम येते. अरे, शेठजी सामायिक करायला बसले आणि त्यांनी ठरविले, कोण्या एखाद्याची सामायिक करताना आठवण काढायचीच नाही, मग सर्वप्रथम त्याचीच आठवण येते. याउलट आपल्या या सत्संगात जगाचे विस्मरण अगदी सहज होते. तुम्ही इथे बसलेले असताना किती वेळा तुमचे चित्त घरी किंवा दुकानात जाते?

**प्रश्नकर्ता :** एकदाही नाही, दादा.

**दादाश्री :** जर चित्त सतत जवळ राहिले तर खूप शक्ती वाढते. मग आपल्या ध्यानात असायला नको का की चित्त कुठे-कुठे जाऊन आले, कधी कधी जाऊन आले?

ज्यांचे चित्त कुठेही जात नाही त्यांना नमस्कार. या 'दादां'चे चित्त क्षणभर देखील पुढे-मागे होत नाही, याचेच नाव मुक्ती! चित्ताचे बंधन तुटणे आणि मुक्ती होणे, या दोन्ही गोष्टी एकदमच घडतात.

## अनंत चित्ताकडून एक चित्ताकडे

इथे आपण सत्संगात कवींची भक्तीपदे गाऊन घेतो. ते कशासाठी? तर त्यामुळे तितका वेळ चित्त 'एक चित्त' होत असते. साऱ्या जगातील लोक अनंत चित्तात अडकलेले आहेत आणि साधू-संन्यासी अनेक चित्त अशा स्थितीत आहेत, आणि तुम्हाला आमच्या उपस्थितीत किंवा इथे भक्तीपदे गात असाल तेव्हा एक चित्त राहते. एक चित्त कोणाचेही होऊ शकत नाही ना! सारे जग चित्त एकाग्र करण्यासाठी प्रचंड कष्ट करत असते, पण चित्त जेव्हा शुद्ध होईल तेव्हाच ते एकाग्र होईल, आणि जेव्हा ज्ञानी पुरुष लाभतील तेव्हाच चित्त शुद्ध होईल.

व्यवहारिक चित्त तीन प्रकारचे असते :

1) 'अनंत चित्त' - यात अजिबात स्थिरता नसते.

2) 'अनेक चित्त' - यात थोडी स्थिरता असते म्हणून तो जैन मंदिरात किंवा देवळात जाते.

3) 'एक चित्त' - ही स्थिती जमली तर मग मुक्तच व्हाल.

**प्रश्नकर्ता :** दादा, आत्मा म्हणजेच परमात्मा आहे का?

**दादाश्री :** जर 'आत्मा हाच परमात्मा आहे' अशा प्रकारे परमात्म्याचा अनुभव आला तर आत्मा परमात्मा आहे आणि 'आत्मा शुद्धात्मा आहे' असा अनुभव आला तर तो शुद्धात्मा आहे आणि जगातील लोकांना तर मूढात्म्याचा अनुभव आहेच ना! 'हे माझे काका, ही माझी मावशी, हा माझ्या सासूच्या काकूचा मुलगा' अशा प्रकारे 'अनंत चित्त'

झालेले आहे. हे अनंत चित्त झाले म्हणून तर हे सगळे आठवते. या नातेवाईकांच्या ओळखीबाबत सतर्क राहतात पण स्वत: कोण आहे याची ओळखच नाही! जर स्वत:ची ओळख पटली तर (मोक्षाचे) कामच झाले!

'दादां'ची स्वप्ने पडतात ती कधी पडतात जेव्हा एकचित्त होते तेव्हा. हे संसारी लोक चित्ताकडे एक नजर पण टाकीत नाहीत. फक्त मनालाच सतत इकडे-तिकडे ओढत असतात. या चित्तामुळेच तर सारा संसार उभा झाला आहे. लोकांचे चित्त सगळीकडे विखुरले गेले आहे.

**प्रश्नकर्ता :** चित्त कशा प्रकारे उत्पन्न झाले?

**दादाश्री :** बुद्धी जो प्रकाश देते त्या प्रकाशाने (इंद्रियगम्य) ज्ञेयाला पाहते ते अशुद्ध चित्त आहे. ते चित्त ज्ञेयाकार होऊनच ज्ञेयाला पाहते, ते घरातील टेबल, खुर्ची या साऱ्या गोष्टींना एक्जॅक्ट पाहू शकते, पण ते शुद्धात्म्याला मात्र पाहू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** चित्त कर्माच्या आधीन असते का?

**दादाश्री :** हो, पण त्याचे चित्त चिकटले नाही तर कार्य होईल, पण चित्त जर चिकटले तर मात्र तो फसेल. जरी कितीही मन वळविण्याचा प्रयत्न केला तरी चित्त तिथेच चिकटून बसते. 'अनंत चित्त' तर आहेच त्यातून 'अनेक चित्त' स्थितीत येणे ही फार कठीण गोष्ट आहे. आणि 'एक चित्त' झाले तर (मोक्षाचे) काम होईल! आपले 'ज्ञान' आहे त्यामुळे 'एक चित्त' या स्थितीत येऊ शकतो.

'अनंत चित्त' मधून 'अनेक चित्त' मध्ये येणे याचा अर्थ की चित्त कुठे-कुठे गेले ते आपण मोजू शकू. या अठ्ठेचाळीस मिनिटांच्या सामायिकनंतर चित्ताच्या स्थितीत बदल होत असतो. आठ मिनिटांपासून ते अठ्ठेचाळीस मिनिटांपर्यंत चित्त बांधले जाते. आठ मिनिटांपासून चित्त बांधले जायला सुरुवात होते. दुधापासून आइस्क्रीम बनते तेव्हा प्रथम दूध घट्ट होते आणि त्यामुळे नंतर आइस्क्रीम घट्ट होण्याची सुरुवात होते आणि मग आइस्क्रीम बनून तयार होते. या 'अनंत'मधून 'अनेकात' आलो आणि जर या 'दादां'चे स्वप्न पडले, म्हणजे चित्ताची 'रीळ'

(फिल्म) सुरू झाली की मग काम फत्ते झाले. आणि तेव्हा मग या दादांचे विलक्षण दर्शन होऊन जाते.

## शुद्ध चित्त-अशुद्ध चित्त

**प्रश्नकर्ता :** चित्ताला निजघरी येण्यासाठी कसे वळवायचे?

**दादाश्री :** चित्त शुद्ध होईल तेव्हाच ते निजघरी येईल. सर्वात पहिली अशुद्धी काय आहे? तर 'मी चंदुलाल आहे, मी तरुण आहे, मी पती आहे' हे सगळे अशुद्ध चित्त आहे. याच्यावरून हे लक्षात येते की चित्ताचे परमाणू ठिकठिकाणी विखुरले गेले आहेत आणि आज तर लोकांचे चित्त पण द्वि-चित्त झाले आहेत! अनंत चित्ताच्याही पुढे गेले तर माणूस द्वि-चित्त होतो! या दोन चित्तवाल्यांना मग सर्व गोष्टी दोन-दोन दिसू लागतात. एक जण मला म्हणाला, 'मी चित्त शुद्धी करायला चाललो आहे.' कल्हईवाल्याकडे गेलात तर तो कल्हई करून देईल! पण हे तर दोन-चित्तवाले लोक आणि तू त्यांच्याकडेच चित्त शुद्धी करायला जातोस, ते तर तुझे जे चित्त आहे त्यालाही द्वि-चित्त करतील. त्यापेक्षा जे आहे ते राहू दे ना! मग हा द्वि-चित्तवाला म्हणणार, 'मला हे दिवे दोन-दोन दिसत आहेत.' झाले! तुझे कल्याणच झाले! एका दिव्याचे तुला दोन कसे दिसतात?

चित्तशुद्धीचा सर्वात उत्तम उपाय म्हणजे दादांचा प्रत्यक्ष सत्संग, आणि येथे तर सतत चित्त शुद्धीच होत असते. इथे 'दादा' हजर आहेत आणि तू मात्र घरीच चित्त शुद्धी करत राहिलास तर ते योग्य नाही.

अशुद्ध चित्त अशुद्ध का आहे? तर 'स्व'ला पाहू शकत नाही, फक्त 'पर'लाच पाहू शकते म्हणून. शुद्ध चित्त मात्र 'स्व' आणि 'पर' दोघांना पाहू शकते!

**प्रश्नकर्ता :** मनाने आज्ञा दिली, तरच चित्त भटकते का?

**दादाश्री :** नाही. सगळे स्वतंत्र आहेत. चित्तात विचार नसतात आणि विचार म्हणजे चित्त नाही. मन जर बाहेर गेले तर व्यक्तीचा मृत्यू होईल. चित्त बाहेर भटकत असते.

**प्रश्नकर्ता :** चित्त बाहेर का भटकते?

**दादाश्री :** चित्त स्वत:चे सुख शोधत असते. इंद्रिये मनाच्या ताब्यात आहेत. चेतन शब्द चित्त वरून बनला आहे. चित्त म्हणजे ज्ञान आणि दर्शन. इथे सत्संगात बसल्या-बसल्या तुम्हाला दुकानातील टेबल अंधुक-अंधुक दिसते, त्याला दर्शन म्हणतात आणि टेबल जर स्पष्ट दिसले तर त्याला ज्ञान म्हणतात. चित्त टेबलाला बघून येते. सामान्य भावाने दिसेल तेव्हा चित्त दर्शन रूपात आहे असे म्हणतात, आणि जर विशेषभावाने दिसेल, विस्तारपूर्वक दिसेल तेव्हा चित्त ज्ञान रूपात आहे असे म्हणतात.

ज्याचे आपण निदिध्यासन करतो, त्याच रूपाचे आपण होतो. एखादा ग्रॅज्युएट असेल आणि शेतात जाऊन तो बैलाबरोबर काम करेल तर बैलासारखा होईल, कारण तो बैलाचेच निदिध्यासन करतो. म्हणजे ज्याच्या संगतीत येतो आणि ज्याचे निदिध्यासन करतो त्याच रूपाचा होऊन जातो.

चित्त तर चैतन्याचा अंश भाग आहे, हा तर चैतन्याचा किल्लोल भाग आहे.

## फक्त चित्तच चिकटते

**प्रश्नकर्ता :** चित्ताची शक्ती मनापेक्षा जास्त असते का?

**दादाश्री :** मन शरीराच्या बाहेर कधीच जाऊ शकत नाही. चित्त शरीराच्या बाहेरही जाते आणि शरीराच्या आतही काम करते. खांदा दुखत असेल तर चित्त तिथेही जाते, आणि जिथे पाठवायचे असेल तिथेही जाते. पायाला डास चावला तर खुशाल चावू दे, चित्त जर त्या पायापासून काढून घेतले तर काहीही त्रास होणार नाही. हिशोब असेल तरच चावेल ना? चित्ताचा स्वभाव कसा आहे? ज्या जागेवरून त्याला काढून घेतो त्या जागेची आठवण राहत नाही. आत्मा सर्व शरीरभर पसरलेला आहे, पण जर चित्त त्या भागातून काढून घेतले तर हेड-ऑफिसला फोन जात नाही. चित्त जर तिथेच अडकले तर हेड-ऑफिसला फोन जातो, आणि मग फोन डी.एस.पी. ला जातो. हात सुद्धा जिथे डास चावला आहे

तिथे जातो! दोन लाख रुपये येतात ते पण डासच आहेत आणि दोन लाख रुपये जातात ते पण डासच आहेत.

एखादा माणसाला खूप भूक लागली असेल तर तो काय कापडाच्या दुकानासमोर बघेल? नाही, तो मिठाईच्या दुकानासमोरच बघेल. भुकेला माणूस बाहेर पडला तर भजी कुठे मिळतात ते पाहील. जिला साडीची भूक लागलेली आहे ती जेव्हा घराबाहेर पडते तेव्हा दुकानात टांगलेल्या साड्याच पाहत जाते. जेव्हा देहाची भूक नसते तेव्हा मनाची भूक उभी राहते आणि या दोन्हीही नसतील तेव्हा वाणीची भूक उत्पन्न होते. काही जण म्हणतात ना, 'मी त्याला हे सांगितल्याशिवाय राहणार नाही.' ही वाणीची भूक! जेव्हा घरी बसून आपण जेवत असू आणि दारासमोरून भिकारी गेला तर घरातील म्हातारी माणसे म्हणतात, 'अरे, जरा सांभाळा, नाही तर दृष्ट लागेल.' हे दृष्ट लागणे म्हणजे काय? ज्याची भूक लागते त्यात चित्त चिकटते. एखाद्या स्त्रीला एखाद्या पुरुषाची भूक (आसक्ती) निर्माण झाली तर तिचे चित्त त्या पुरुषाला जाऊन चिकटते. तसेच एखाद्या पुरुषालाही एखाद्या स्त्रीची भूक निर्माण झाली तर त्याचे चित्त त्या स्त्रीला चिकटते, अशा तऱ्हेने या दृष्ट लागण्यामुळे सगळीकडे बिघाड झाला आहे!

लहान मूल जर सुंदर दिसत असेल तर घरातील लोक त्याच्या चेहऱ्यावर आणि कपाळावर तीट लावतात. उद्देश हा की कोणाची दृष्ट लागू नये. जे भुकेले असतील त्यांचे चित्त चिकटेलच ना? तीट लावली की दृष्टी त्या तीटेवर जाते. लक्ष तिथे केंद्रित होते! त्यामुळे दृष्ट लागत नाही.

फक्त 'ज्ञानी पुरुषा'लाच कोणाची दृष्ट लागत नाही. कोणी टक लावून पाहिले तर 'ज्ञानी पुरुष' लगेच त्या माणसाचा शुद्धात्मा पाहतात. ही सगळी टेलिपथीसारखी मशिनरी आहे. त्यात जर आत्मा एकाकार झाला तर सगळे बिघडते. जर चित्त निर्मळ असेल तर एकदा वाचून देखील पाठ होते. अभ्यास करण्याचा हेतू चित्त निर्मळ करणे हाच आहे.

## चित्तशुद्धीच महत्त्वाची

अभ्यास करताना जर चित्त हजर असेल तरच तो लक्षात राहतो.

मी लहानपणी अभ्यास करत असे तेव्हा माझे चित्त गैरहजर असे म्हणून मी नापास होत होतो का? नाही, नापास झालो नाही, पण लोक मला मूर्ख म्हणायचे. तसा मी ब्रिलियंट (हुशार) होतो. मी एकदा गुरुजींना म्हटले होते, 'पंधरा वर्षे एक भाषा शिकण्यात घालविण्याऐवजी ही पंधरा वर्षे मी ईश्वर शोधण्यात घालविली असती तर नक्कीच ईश्वरप्राप्ती झाली असती!' माझ्या आयुष्याची अमूल्य वर्षे मी फक्त एक भाषा की जी एखादा लहान मुलालाही येते, ती भाषा शिकण्यात खर्च केली! पण शिक्षकाला हे समजत नाही ना!

**प्रश्नकर्ता :** या सर्वात, अंत:करणात चित्तच मुख्य आहे ना? या सगळ्यांचा पुढारी चित्तच आहे ना? चित्तच सगळ्यांना ओढून आणते ना? चित्तावर नियंत्रण आवश्यक आहे की मनावर? हे सगळे लोक चित्ताला विसरून मनाच्या मागे का लागले आहेत?

**दादाश्री :** तुमचे म्हणणे बरोबर आहे. ज्ञानींनी पण चित्तालाच जास्त महत्त्व दिले आहे. पण लोकांना चित्ताची आणि मनाची पूर्ण माहितीच नाही! हे सर्व लोक मनाला आणि चित्ताला एकच समजतात. चित्त जाग्यावर राहत नाही आणि मन पॅम्फ्लेटस् - पत्रके दाखविते. पण लोकांना मन म्हणजे काय आणि चित्त म्हणजे काय याचे भानच नाही.

सत्संगात चित्त डळमळत नाही. चित्त म्हणजे रिलेटिव्ह आत्मा आहे. चित्त ठिकाणावर राहिले तर पूर्ण रिलेटिव्ह आत्मा स्थिर राहतो. दादांनी तर तुम्हाला 'रियल आत्मा' दिलेला आहे! हा रियल आत्मा आणि रिलेटिव्ह आत्मा दोन्ही जर समोरासमोर येऊन स्थिर बसले की मग तुम्हाला मोक्षाचाच अनुभव येईल ना? यासाठीच तर सत्संगात बसायचे असते ना! नाही तर खूप बाग-बगीचे आहेत. पण सत्संगात बसल्यामुळे चित्त स्थिर होते आणि आत्मा स्थिर होतो. हे तर 'संघबळ' आहे ना? संघाशिवाय तर काहीच शक्य नाही. संघबळ पाहिजे, आणि जिथे संघबळ असते तिथे मतभेद नसतात. म्हणून महावीर भगवंत बऱ्याच माणसांचा एक संघ करीत असत. लोक जितके वाढतात तितका संग वाढतो आणि तितका तितका आत्मा जास्त स्थिर होतो. तीन व्यक्ती असतील तर तेवढे

संघबळ, आणि जास्त व्यक्ती असतील तर जास्त संघबळ. 'या' सत्संगाची एका तासाची किंमत खूपच आश्चर्य वाटेल एवढी आहे.

चित्त जाग्यावर ठेवण्यासाठी देवळात घंटा लावतात! भगवंताला आंगी कशासाठी? श्रृंगार कशासाठी? सुगंधित पदार्थ कशासाठी? चित्त जाग्यावर आणण्यासाठी. घंटा वाजली की बाहेरचा आरडाओरडा ऐकू येत नाही. पण आजकालचे लोक तर घंटा वाजत असेल तरीपण भगवंताचे दर्शन घेताना सोबत चपलांचाही फोटो काढतात! अहो, 'व्यवस्थित शक्तीला' समजून घ्या ना! त्याच्या असतील तर तो घेऊन जाईल आणि घेऊन गेला तरी एकदाच घेऊन जाईल, परत परत तर घेऊन जाणार नाही ना? मग घेऊ दे ना! 'हिशोब' चुकता होईल.

संसार म्हणजे रोग आहे, जितका वेळ आपण रोग विसरू, तितका रोग कमी होतो, असा नियम आहे. जितका वेळ चित्त रोगाकडे जाते तितका रोग वाढत जातो. हे जग विसरण्याचे साधन कुठेच नाही ना! फक्त 'ज्ञानी पुरुष'च जगाचे विस्मरण करून देण्याचे साधन आहेत.

रात्री आपण शुद्ध चित्ताला जे करायला लावतो त्याप्रमाणे ते रात्रभर करत राहते आणि झोप पण लागते. 'आम्ही' जेव्हा रात्री विधी करत असतो तेव्हा कधी कधी विधी चालू असताना झोप लागते आणि जेव्हा परत डोळे उघडतात तेव्हा जिथे विधी थांबला होता तिथून तो परत सुरू होतो. पुन्हा जर डोळा लागला तरी तसेच होते. सकाळपर्यंत विधी पूर्ण झालेला असतो. अशा प्रकारे शुद्ध चित्ताला रात्री जे करायला लावाल ते सकाळपर्यंत चालू राहते.

## चित्ताचे चमत्कार

**प्रश्नकर्ता :** पूजा करते वेळी क्षणभर वीज चमकल्यासारखे वाटते, ते आत्मओजस् आहे का?

**दादाश्री :** हा प्रकाश म्हणजे चित्ताचा चमत्कार आहे. त्याच्यावर श्रद्धा बसली तर तो स्थिरता आणतो. आत्म्याचा प्रकाश, त्याची तर कल्पना पण करता येणार नाही, असा असतो. मला जर कोणी म्हटले,

'मला महावीर भगवंत दिसतात' तर मी सांगेन, 'तुम्हाला तर तुम्ही बाहेर जी मूर्ती बघितली आहे तीच दिसते. पण ते तर केवळ एक दृश्य आहे. त्या दृश्याचा दृष्टा शोधून काढ! दृष्टीला दृष्ट्यात राहू दे, आणि ज्ञानाला ज्ञात्यात राहू दे तरच साध्य पूर्ण होईल.'

**प्रश्नकर्ता :** अनाहत नाद म्हणजे काय?

**दादाश्री :** या शरीरात जिथे जिथे स्पंदने होत असतात तिथे चित्त एकाग्र होणे, म्हणजे अनाहत नाद.

कुंडलिनीमध्ये पण तसेच करतात, पण त्याने मोक्ष मिळत नाही. मोक्षाच्या वाटेवर अशी कित्येक स्टेशने लागतात, पण अंतिम स्टेशनपर्यंत पोहोचल्यानंतरच काम पूर्ण होईल. कुंडलिनीत सगळे चित्त चमत्कार आहेत. त्यात आत्म्याचे काहीही नाही. जैनांनी म्हटले आहे, 'आत्मज्ञानाशिवाय मुक्ती नाही.' वेदांती पण असेच म्हणतात, 'आत्मज्ञानाशिवाय मुक्ती नाही.' अनाहत नाद हा तर एक नाद आहे. आणि तो नाद पौद्‌गलिक आहे, त्यात आत्मा नाही.

कित्येक म्हणतात, 'मला आतमध्ये श्रीकृष्ण दिसतात.' तिथे आत्मा नाही, तो चित्ताचा चमत्कार आहे. त्या कृष्णाला पाहणारा आत्मा आहे. अखेरीस दृष्टी दृष्ट्यात टाकायची आहे. परंतु इथे तर दृष्टी दृश्यात टाकतात! या अनाहत नाद वगैरे मध्ये दृष्टी दृश्यात टाकतात. ज्ञान ज्ञात्यात आले आणि दृष्टी दृष्ट्यात आली तर कामच झाले! कित्येक म्हणतात, 'आतमध्ये श्रीकृष्णांचे दर्शन होते.' अरे, योगेश्वर कृष्णाचे दर्शन आतमध्ये कसे होईल? ते दिसतील तर होईल ना? ते तर तुम्हाला दुसरेच कोणी दिसतात. तुम्ही जसे फोटोत पाहिले आहेत तेच तुम्हाला दिसतात.

'आपण कोण आहोत?' हे ज्ञान जेव्हा 'मी शुद्धात्मा आहे' या ज्ञात्यात येते, आले की मग विकल्प राहत नाहीत. जोपर्यंत ज्ञान ज्ञात्यात येत नाही तोपर्यंत विकल्प राहतात. दृष्टी जोपर्यंत दृष्ट्यामध्ये येत नाही तोपर्यंत 'संकल्प' पण राहतात!

❖❖❖❖❖

# अहंकार

जेव्हा ट्रेन मध्येच थांबते, तेव्हा एखादा मूर्ख म्हणतो, 'रेल्वेवाले नालायक आहेत. सगळ्यांना डिसमिस केले पाहिजे.' अहो, तुम्ही कोणाला बोलत आहात? ट्रेन आणि ट्रेनमध्ये नोकरी करणारे दोन्ही वीतराग आहेत. (!) पण अहंकार आपली भूमिका पार पाडल्याशिवाय राहतच नाही ना! आपण या सर्व अज्ञानतेपासून मुक्त झालो आहोत. बाहेर तर अज्ञानतेचा कहरच माजला आहे. जर गटारे तुंबली तर लोक लगेच सफाई कामगारांना शिव्यांच्या लाखोल्या वाहतात. म्हणतात 'गटारांची झाकणे उघडत नाहीत आणि साफही करत नाहीत.'

घरी कुठून तरी तूरडाळ आणली आणि ती जर शिजली नाही तर व्यापाऱ्यांना शिव्या घालतात किंवा कधीकधी आणखी पुढे जाऊन शेतकऱ्यांनाही शिव्या देतात. असे उगीचच कोणाला तरी बोल लावतात. जर त्याला म्हटले, 'जरा शेजाऱ्यांना जाऊन विचार, त्यांची डाळ तर शिजली आहे.' पण असा हल्ला करायचा स्वभावच झाला आहे ना? घरी जर चांगले जेवण बनवले तर सगळ्या शेजाऱ्यांना जाऊन सांगेल. हा अहंकार आहे. सगळ्यांवर हल्ला करणे हाही अहंकार आहे. हा अहंकार तर असे बोलतो की, 'मी कोणीतरी (विशेष) आहे' त्याला जर विचारले 'तू कोण आहेस?' तर म्हणेल, 'ते तर माहीत नाही, पण मी कोणीतरी आहे!'

कोणाच्या घरी गेला आणि त्यांनी प्रेमाने चिवडा दिला तर तो

म्हणतो, 'मला चिवडा आवडत नाही. मला नको.' असे तो चिडून बोलतो. हाच कुरूप अहंकार. दिवाळीच्या शुभ दिवशी जर दोन चमचे चिवडा खाल्लास तर समोरच्याची भावना दुखावणार नाही.तर मग तो अहंकार सुंदर दिसेल. आम्हाला जरी विष दिले तरी पण देणाऱ्याची भावना असेल, तो भावपूर्वक देत असेल तर आम्ही विषसुद्धा पिऊ! पण आमच्याकडे त्याचा इलाज असतो!

'अक्रम ज्ञानी' याचा अर्थ काय? तर त्यांचा अहंकार एकदम सुंदर असतो. असे लोक साध्या वस्तीत पण जाऊन बसतात आणि तुमच्याबरोबर पण बसतात, पण ते कुठेच कुरूप दिसत नाहीत! सुंदरच दिसतात. क्रमिक मार्गातील ज्ञानी तर आपल्यापेक्षा खालच्या श्रेणीच्या लोकांकडे जात नाहीत. म्हणतात, 'मी माझे बघून घेईन, पण त्यांच्याकडे जाणार नाही.' त्यांचा अहंकार असा कुरूप असतो.

आपल्याला हेच पाहायचे आहे की आपला अहंकार सुंदर वाटला पाहिजे. 'दादा' इथे आले तरी त्यांचा अहंकार किती सुंदर दिसतो! आपला अहंकार देखील 'दादां'च्या अहंकारासारखा सुंदर वाटला पाहिजे. तेव्हा आपली स्थिती काही वेगळीच असेल.

## क्रमिक आणि अक्रम मार्गामधील अहंकार

'क्रमिक मार्ग' म्हणजे काय? तर अहंकार शुद्ध करा. अहंकार विभाविक झाला आहे. त्याला शुद्ध करायचा आहे. क्रमाक्रमाने तो अहंकार शुद्ध करत जायचे. आणि जेव्हा संपूर्ण शुद्ध होतो तेव्हा थोडेसे काम होते. विभाविक अहंकारामध्ये मान येतो, दंभ येतो, घमेंड येते. हे त्या अहंकाराचे वेगवेगळे प्रकार. तो करत असेल शंभर रुपयांची नोकरी, पण लांब कोट घालून शेठ बनून फिरतो, तेव्हा लोक म्हणतात, 'कसा ढोंगीपणे फिरतो आहे.' हे कसे? कोल्हा जेव्हा वाघाचे कातडे पांघरून फिरतो तेव्हा त्याला ढोंगी म्हणतात, तसे हे आहे. जो घमेंडी असतो तो कोणाचेच ऐकत नाही. प्रत्येक गोष्टीत म्हणतो, 'त्यात काय आहे? त्यात काय विशेष?' अशी सगळ्या गोष्टीत घमेंड करतो. त्याच्या बायकोला जर

विचारले तर ती म्हणेल, 'यांना काहीही समजत नाही.' विभाविक अहंकार तऱ्हेतऱ्हेचे असतात, ते सगळे सतत धुवावे लागतात! क्रमिक मार्गात खूप अडचणी येतात. रस्त्यात जर एखादा कॅन्टीनवाला (कुसंगी) भेटला तरी गडबड होते. आपल्या अक्रम मार्गात तर कसलाच धोका नाही. एकदम सुरक्षित मार्ग आहे हा. चुकून जरी कॅन्टीनवाला समोर आला तरी त्याचा आपल्याला काहीच त्रास होत नाही, उलट तोच गोंधळून जाईल!

या अक्रम मार्गात जो अहंकार असतो तो निकाली (संपत चाललेला) अहंकार असतो, डिस्चार्ज होत असलेला अहंकार असतो. याउलट क्रमिक मार्गात जो अहंकार आहे त्यात 'मला करायचे आहे, मला याचा त्याग करायचा आहे' असे वाटत राहते. त्यामुळे क्रमिक मार्गातील अहंकार, ती कर्मचेतना आहे, त्यामुळे नवीन कर्मे चार्ज होत राहतात. आणि या अक्रम मार्गात अहंकार ही कर्मफळचेतना आहे. पण ती नैमित्तिक आहे. क्रमिक मार्गात अहंकार कर्मबंधन घडवितो, कारण तिथे आता हा त्याग केला, अजून हे करायचे आहे, असे चालूच राहते. आता जो त्याग केला तो तर पूर्वीच्या अहंकारामुळे केला, आणि परत आता नवीन कर्मे बांधणे चालूच आहे. 'ज्ञानी पुरुष' तर ज्यामुळे कर्मबंधन होत असते त्यालाच पूर्णपणे उडवून टाकतात. हे तर किती सोपे आहे! सरळ आहे! सहज आहे! आणि त्या क्रमिक मार्गात गेला ना, तर प्रथम केस कापून मुंडन करतात! इथे तसे नाही. इथे केस वगैरे सगळे चालते.

या अहंकारामुळेच सगळे बिघडले आहे, बाकी काहीच नाही. ज्ञानींच्या आधीन राहिले तर सुटका होईल. शहाणा अहंकार स्वत:ची हुशारी चालवीत नाही, याउलट वेडा अहंकार सर्व उकरून काढतो! म्हणून ही गोष्ट समजून घेतली पाहिजे, किंवा मग ज्ञानी पुरुषांच्या आधीन राहिले पाहिजे. वेड्या अहंकारात कुणाच्या आधीन राहण्याची शक्ती नसते. तीस दिवस आधीन राहील आणि एकतिसाव्या दिवशी सगळे उडवून देईल. म्हणजेच ह्या वृत्ती कधी पालटतील ते सांगता येणार नाही. जेवढा अहंकाराचा रोग मोठा तितक्याच अडचणी जास्त. आधीनतेशिवाय दुसरा मार्गच नाही ना!

आमच्याकडून 'ज्ञान' प्राप्त केल्यानंतर देखील सगळ्यांच्याकडे अहंकार असतो, पण तो 'निकाली अहंकार' असतो. 'निकाली अहंकार' म्हणजे कसा? जिकडे वळवाल तिकडे तो वळतो. वेडेपणा करत नाही.

## वेडा अहंकार

या वेड्या अहंकाराला विचारा, 'तुला कधी मान मिळाला आहे? कुठे शाबासकी मिळाली आहे? कसला स्वाद आला आहे? कशासाठी एवढा अहंकार करत आहेस? तुला कुठे तेराशे राण्या आहेत? तुझे कोठे बाग-बगीचे आहेत? तरी पण एवढा गाजाबाजा कसला? असे काय तुझ्याजवळ आहे की तू असा वेडेपणा करीत आहेस? हे चक्रम अहंकारा, तू तर वेडा आहेस!' त्याला असे म्हटले तर त्याला समजेल.

हा तर म्हणेल 'मी कोणीतरी (विशेष) आहे.' पण तू कशात आहेस? या अहंकारामुळेच तर तू दु:खी झालास. जर आपण पाहिले तर आपल्याला समजेल की अगदी पहिल्या आण्यापासून (आणा = लग्न झाल्यानंतर मुलीला पहिल्यांदा माहेरी आणणे) ते अगदी बाराव्या आण्यापर्यंत या अहंकाराने केवळ दु:खच दु:ख दिले आहे! हा तर वेडा अहंकार आहे, याला लोक मान्य करीत नाहीत आणि अहंकार स्वत: मात्र 'मी कोणीतरी आहे' असेच मानत असतो. याला वेडा अहंकार, कुरूप अहंकार असे म्हणतात. चक्रवर्तींना पण अहंकार असतो पण तो वाकवावा तसा वाकतो. लोकांना असा अहंकार मान्य असतो. याला शहाणा अहंकार म्हणतात आणि हा तर फक्त वेडाच अहंकार आहे. त्या वेड्या अहंकाराला आपण विचारावे की, तुम्ही कुठल्या कोपऱ्यात शांतपणे झोपून राहिले होते? जगात कोणी तुम्हाला 'या, या, तुमच्याशिवाय आम्हाला करमतच नाही!' असे म्हणतात का? उलट लोक तर म्हणतात, 'तुम्ही आल्यामुळे तर पूर्वी जो उजेड होता तोही आता अंधारला!' असे अपमान सोसले आहेत! मोजता येणार नाही इतके अपमान झाले आहेत! मग असला अहंकार काय कामाचा? हा तर कुरूप अहंकार, त्याचे रक्षण का करावे, त्याची बाजू का घ्यावी?

अहंकार सुंदर असला पाहिजे. लोकांना आवडेल असा पाहिजे. हवा तसा वळवता आला पाहिजे. या अहंकाराला विचारा, तुमचे वहीखाते दाखवा की तुम्हाला कुठे मान मिळाला आहे? कुठे अपमान झाला आहे? तुम्ही कोण कोणते सुख दिले? लोकांमध्ये तुमची किंमत कोणा कोणाकडे होती? भावाकडे, वडिलांकडे? जर त्याची किंमत पाहायला गेलो ना, चार आण्याइतकीही नसते. चार जणांच्या हृदयात तुम्ही स्थान मिळवले असते तरी खूप चांगले झाले असते. मग त्या अहंकाराला वेडा अहंकार न म्हणता सुंदर अहंकार म्हटले असते. उलट हा तर जिथे जाईल तिथे लोक मनात म्हणतात 'हा इथून लवकर गेला तर बरे.' म्हणजे हा कुरूप अहंकार आहे! लोक उघड बोलत नाहीत पण मनात म्हणतात, 'आपल्याला काय? तो त्याच्या पापानेच मरेल.' सगळे स्वार्थी असतात. आपापल्या स्वार्थातच बुडालेले असतात. फक्त 'ज्ञानी पुरुषच' तोंडावर खरे खरे सांगतात!

ज्या अहंकारामुळे पहिल्या वेळी फुले मिळाली, दुसऱ्या-तिसऱ्या, अशा प्रत्येक वेळी सतत फुलेच मिळत राहिली तर आपण म्हणू की हा शहाणा अहंकार आहे. पण इथे तर कदाचित पहिल्या वेळी फुले मिळतात, दुसऱ्या, तिसऱ्या आणि आठव्या वेळी तर 'यू...गेट आऊट, युजलेस,' ('मूर्खा, चालता हो येथून') असे ऐकायची वेळ येते. असला अहंकार काय कामाचा?

आपली पोजीशन (प्रतिष्ठा) कमी होईल असे समजून तो कोणाबरोबर फिरत नाही. त्याला वाटते की त्यामुळे त्याची किंमत कमी होईल. हा तर वेडा अहंकार म्हणायचा. आम्हाला देखील ज्ञान होण्यापूर्वी अहंकार होता. पण तो शहाणा अहंकार होता. चार-पाच जणांच्या हृदयात मला स्थान होते. आणि चार गाड्या तर घराजवळ उभ्या असत. तरी पण तो अहंकार आम्हाला खटकत असे. आम्हाला असे वाटे की 'हा अहंकार गेला तर आम्हाला साऱ्या जगाचे राज्य मिळेल!' अहंकार सुंदर असला पाहिजे. जर देह सुंदर असेल आणि अहंकार कुरूप असेल तर त्याचा काय उपयोग? देह कुरूप असला तरी चालेल पण

अहंकार कुरूप नसावा. कित्येक लोक कुरूप दिसतात पण त्यांचा अहंकार इतका सुंदर असतो की लोक त्यांना 'या साहेब, या साहेब' असे म्हणतात.

हा अहंकार कशासाठी? त्याला जिवंतच का ठेवायचा? ज्याच्यामुळे अनंत जन्मात संकटेच संकटे मिळाली आहेत तो तर पक्का शत्रु आहे. साऱ्या दुनियेचे साम्राज्य सोडून 'हे माझे, हे तुझे', असे कशासाठी?

ह्या अहंकाराला वेडे बोलले जाते. रस्त्यात सापडला तरी याला उचलून घेऊ नये! आत्म्यातच राहिले पाहिजे. आत्मा बनूनच राहिले पाहिजे. आणि वेडा अहंकार परत उभा राहिला तर त्याला थोबाडीत मारून हाकलून दिले पाहिजे.

## जिथे आत्मज्ञान असते तिथे घमेंड नसते

कवीने लिहिले आहे,

*'आत्मज्ञान सरळ सीधुं, सहज थये छके नही.'*

(वीतरागींचे आत्मज्ञान सरळ आणि साधे आहे, सहजस्थिती उत्पन्न करणारे आहे त्यामुळे त्याची घमेंड येत नाही.)

वीतरागींचे आत्मज्ञान जर सहजपणे झाले असेल, खरे ज्ञान झाले असेल, तर घमेंड येत नाही. वीतरागींनी दिलेला आत्मा, तो जर प्रकट झाला तर घमेंड होत नाही! दुसऱ्या कोणी दिलेल्या आत्म्याने तर घमेंड वाढते. आणि 'मी आहे, मी आहे' याची नशा चढते. रात्री झोपेत देखील ती नशा उतरत नाही! म्हणूनच भगवंतांनी म्हटले आहे, 'ज्या ज्ञानामुळे घमेंड येते, जी शास्त्रे शिकल्यामुळे घमेंड वाढते ते अज्ञान आहे.' प्रत्येक व्यक्तीचे आत्मज्ञान वेगवेगळे असते पण फक्त वीतराग भगवंतांचे ज्ञान असे असते की ज्यामुळे नशा चढत नाही. वीतरागांची वाणी नशा उतरविते. बाकी सगळे म्हणतात, 'असे करा, तसे करा. वैराग्य करा, तप करा, त्याग करा.' या सर्व गोष्टींनी फक्त नशाच चढते. ह्या गोष्टी तर देवगती मिळण्यासाठी कामी येतात, मोक्षासाठी नाही. आमच्या वाणीने

नशा उतरते आणि आमच्या पायाचा अंगठा हा जगात इगोइजम (अहंकार) विरघळविण्यासाठी एकमात्र सॉल्वेन्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** इगोइजम विरघळू शकतो?

**दादाश्री :** हो, आमची वाणीच अशी आहे की त्यामुळे इगोइजम विरघळून जातो. या वाणीमुळे तर क्रोध, मान, माया, लोभ सगळेच विरघळतात. अहमदाबादात असताना एक शेठजी आले होते. ते म्हणाले, 'माझा क्रोध घेऊन टाका.' तर आम्ही तो घेऊन टाकला! 'ज्ञानी पुरुषां'जवळ अशा सर्व गोष्टी असतात की ज्यामुळे सर्व काही विरघळू शकते.

क्रोध, मान, माया, लोभ हे सर्व कशाच्या आधारावर उभे आहेत? लोक म्हणतात ना, 'मला राग येत आहे.' आता हे लोक 'मला राग येत आहे' असे म्हणून त्या रागाला आधार देतात म्हणून या गोष्टी टिकून आहेत. 'ज्ञानी पुरुष' हा आधारच काढून टाकतात. मग या सगळ्या गोष्टी विरघळतात. हळूहळू क्रोध कमी करायला गेला तर तो कमी होत नाही आणि तसे कदाचित झाले तर क्रोध कमी होईल आणि मान वाढेल! म्हणजेच हे कसे आहे की स्वत:चे बिलकुल भान नाही आणि सगळे काही डोक्यावर घेऊन फिरतात! सगळा व्यवहार स्वत:च्या भानाशिवायच चालू आहे. किंचितही भान नसते.

## सुखी होण्याच्या तीन किल्ल्या

थोडक्यात सांगायचे तर 'मी चंदुलाल आहे' हा आरोपित भाव, हाच अहंकार भाव आहे. जर सांसारिक सुख हवे असेल तर या अहंकाराचा पॉजिटिव्ह (सकारात्मक) वापर कर, यात नेगेटिव्ह घालू नकोस. आणि तुला दु:खच हवे असेल तर नेगेटिव्ह अहंकार ठेव आणि सुख-दु:खांचे मिश्रण हवे असेल तर दोन्ही एकत्र ठेव! आणि जर मोक्ष हवा असेल तर मात्र या आरोपित भावातून मुक्त हो, स्वभाव-भावात ये. या तीन वाक्यांवर सारे जग चालले आहे, ही तीन वाक्ये समजून घे. आणि त्यानुसार करायला लाग, मग त्यातच सर्व धर्म आले!

म्हणजे ही तीनच वाक्ये आहेत : 1) सुखी होण्यासाठी पॉजिटिव्ह अहंकार, आपल्यापासून कोणालाही किंचितमात्र दु:ख न होवो असा अहंकार म्हणजे पॉजिटिव्ह अहंकार. 2) दु:खी होण्यासाठी नेगेटिव्ह अहंकार. स्वत:चा थोडा जरी अपमान झाला तरी मनात शत्रुत्व राखतो आणि त्या व्यक्तीची पोलिसात खोटी तक्रार करतो की, 'या माणसाने घरात तेलाचे डबे जमा करून ठेवले आहेत.' अरे, तुझ्या शत्रुत्वामुळे तू असे केलेस? त्याला कशाला पोलिसांकडून पकडविले? बदला घेण्यासाठी! हा नाकारात्मक नेगेटिव्ह अहंकार. 3) मोक्ष मिळवायचा असेल तर आरोपित भावातून मुक्त हो.

नेगेटिव्ह अहंकार हा फार वाईट अहंकार आहे. कोणाला तुरुंगात टाकण्याच्या मागे लागतो, तेव्हाच स्वत:च्या तुरुंगवासाची तयारी करून ठेवतो! आपण असे वागले पाहिजे की जे काही निमित्त वाट्याला येईल ते जमा करून घ्यावे. कारण आपल्या मागील चुका आहेत म्हणून आपल्याला जर कोणी शिव्या दिल्या तर आपण त्या जमा करून घ्याव्यात आणि पुन्हा त्याच्याशी व्यापार करू नये. समोरच्या व्यक्तीने दिलेली शिवी गोड लागत असेल तर त्याला परत दोन शिव्या दे, आणि व्यापार चालू ठेव. पण जर समोरच्या माणसाची शिवी गोड लागत नसेल तर त्या व्यक्तीबरोबरचा व्यापार बंद कर.

आपल्याला जर असे वाटत असेल की 'या साहेब, या साहेब' असे बोलण्यामुळे एखाद्या व्यक्तीशी होणारा व्यवहार चांगला होईल, चांगला प्रतिसाद मिळेल तर तसे करा. आप्तवाणी – 1 मध्ये सांगितले आहे त्यानुसार विहिरीत प्रोजेक्ट करावा. विहिरीत डोकावून म्हणायचे की, 'तू चोर आहेस' तर विहीर म्हणेल, 'तू चोर आहेस' आणि जर तसे ऐकायला आवडत नसेल तर विहिरीत डोकावून 'तू राजा आहेस, तू राजा आहेस' असे बोल ना! मग विहीर पण म्हणेल, 'तू राजा आहेस, तू राजा आहेस.' जग सुद्धा असेच आहे!

तुझा कोणीही *उपरी* (वरिष्ठ) नाही. कोणाला जर गॅरंटी बाँडवर लिहून हवे असेल तर मी लिहून देतो की 'तुझ्यावर कोणीही *उपरी*

नाही, तसेच तुझा कोणी अंडरहॅन्ड (कनिष्ठ) ही नाही.' कोणीही कोणाचा *उपरी* नाही. कुणाही जीवाच्या जीवनात किंचितदेखील ढवळाढवळ करू शकेल असे कोणीही अजून जन्माला आलेले नाही! तरी पण हे जग, एखाद्या कोड्यासारखे झाले आहे! तुझा *उपरी* कोण आहे? तर तुझे ब्लंडर्स आणि मिस्टेकस्, हे दोनच तुझे *उपरी* आहेत. या ब्लंडर्स कोणत्या? जिथे स्वतः नाही तिथे आरोप करतो की 'मी चंदुलाल आहे' हेच सर्वात मोठे ब्लंडर आहे. ते ब्लंडर निघून गेले की मग शिल्लक काय राहिल्या? कुणी शिव्या दिल्या तर आपल्याला हे लगेच समजेल ना की ही आपली पूर्वीची चूक आहे. म्हणून आपण त्याचा समभावाने निकाल (शेवट) करावा.

फर्स्ट क्लास चहा करून दिला असेल पण त्या अगोदर मिठाई खाऊन मग चहा प्यायलो तर काय होणार? चहा अगोड लागणार ना? अरे, चहात साखर कमी नव्हती, तू अगोदर मिठाई खाल्ली होती, त्याचा परिणाम म्हणून चहा अगोड लागला. म्हणजे या पूर्वीच्या परिणामांतून कोणीच मुक्त होऊ शकत नाही. पण याचे कुणाला भानच नाही ना!

❖❖❖❖❖

## अणुव्रत-महाव्रत

**दादाश्री :** तुम्ही कोण आहात?

**प्रश्नकर्ता :** मी जैन आहे.

**दादाश्री :** जैन आहात तर तुम्हाला आता जैनांबद्दल जाणण्याचे काही शिल्लक राहिले नाही ना?

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत देह आहे तोपर्यंत काही ना काही जाणण्याचे शिल्लक असेलच ना?

**दादाश्री :** या मोक्षमार्गावर तुम्ही किती मैल चाललात आणि अजून किती मैल चालायचे शिल्लक आहेत, याची आपल्याला जाणीव असतेच ना? थोडे तरी मैल तुम्ही चालला आहात म्हणजेच थोडे मैल कमी झाले असतीलच ना?

**प्रश्नकर्ता :** हो, कमी झाले असतील.

**दादाश्री :** किती मैल कमी झाले असतील?

**प्रश्नकर्ता :** ते मी कसे सांगणार? मी तर अज्ञानी आहे. मला कसे समजणार?

**दादाश्री :** जितकी महाव्रते तुम्ही आचरलीत, तेवढे मैल तुम्ही ओलांडलेत. महाव्रते असतात किंवा अणुव्रते असतात. समजा महाव्रत नाही पण एखादे अणुव्रत मनापासून केले असेल तरी तेवढे मैल चाललेले

आहात. मनापासून अणुव्रतात असेल तर तेवढे मैल पार केले, कारण चोरी न करण्याचे अणुव्रत घेतले असेल तर एका बाजूला लोभ पण असतो, म्हणजे गरज पण आहे आणि दुसऱ्या बाजूने अणुव्रताचे पालन करतो, म्हणजे अणुव्रताचे पालन करता करता लोभही जपला गेला ना! जेवढे अणुव्रत पाळले तितके मैल पार केले.

'आमच्यात' सर्व महाव्रते असतात. 'आम्ही' खातो, पितो, संसारात वावरतो, तरीही आमच्यात पाच महाव्रते पूर्णपणे असतात. जितकी अणुव्रते वर्तनात असतील तितके मैल पार केले आणि संपूर्ण महाव्रतांचे पालन करणे जमत नाही तोपर्यंत त्या दिशेने चालावेच लागेल ना? आणि तेव्हाच आत्म्याचे ओझरते दर्शन होईल. आत्म्याची झलक मात्र पाच महाव्रते पूर्ण झाली तरच मिळेल. जेव्हा पाच महाव्रते पूर्ण होतील, तेव्हा फक्त प्रत्याख्यानी कषाय शिल्लक राहतात. जेव्हा बाकी सर्व कषाय मंद होतात, संपतात तेव्हा त्या अवस्थेला भगवंतानी प्रत्याख्यान आवरण असे म्हटले आहे. आपण त्याला काय म्हणतो? तर 'मन, वचन आणि काया यांच्या सवयींचा स्वभाव' असे म्हणतो. तो जितका विलय झाला तितका स्वभाव कमी झाला आणि बाकीचा शिल्लक राहिला. या 'प्रत्याख्यान आवरणासाठी' असे म्हटले जाते की 'प्रत्याख्यान खूप केले तरी तो स्वभाव जात नाही, म्हणजे त्याचे आवरण अजून शिल्लक आहे. त्यामुळे त्यासाठी पुन्हा पुन्हा प्रत्याख्यान करावेच लागेल.' असे एक किंवा दोन दोष शिल्लक असतील पण सगळ्या आयुष्याचे दोष तर नसतीलच ना? 'समकित' ही फार वेगळी गोष्ट आहे. तप, त्याग यात 'समकित' असे काही नसतेच. 'समकित' तर या महाव्रतात आहे, महाव्रत वर्तत असते तेव्हाच.

आता हे सगळे त्यागी लोक व्रतांचे पालन करीत नाहीत का? करतात, पण त्यांचा मनावर ताबा कुठे असतो? तो नसतो त्यामुळे त्यांचे 'कषाय' उघड उघडच दिसतात. जेव्हा आपल्याला कषाय उघडपणे दिसत नसतील तेव्हा आपण समजायचे की आता हा 'प्रत्याख्यानावरणात' आहे! प्रत्याख्यानावरण म्हणजे कषाय उघडपणे न दिसणे. कषाय इतके

अधिक मंद झालेले असतात की ते असून देखील (दुसऱ्यांना) दिसत नाहीत. पण त्याचा स्वत: वर परिणाम जाणवतो. म्हणजे स्वत:मध्ये कषाय असतातच. त्याचे फळ त्याला स्वत:ला मिळते पण ते इतरांना दिसत नाही!

त्यागी लोकांचे कषाय बाहेर उघडपणे दिसतात, असे होता कामा नये. पण उघडपणे दिसतात यावरून असे कळते की ते महाव्रतांचे पालन तर करीत नाहीतच, पण अणुव्रताचे सुद्धा पालन करीत नाहीत! कारण अणुव्रताचे कसे असते? तर आचार्य महाराजांशी खोटे बोलू शकत नाही. पण इथे तर शिष्य महाराजांशी खोटे बोलतो आणि महाराजही शिष्यांशी खोटे बोलतात, तर मग सत्याचे अणुव्रत कुठे राहिले? महाव्रते तर वीतरागीच पाळू शकतात. परंतु सध्या अणुव्रत पाळायला तरी कुणाला जमते? वीतराग म्हणतात, 'तुझे नुकसान तुझ्यापाशी, आमचे तर नुकसान होणार नाही.' वीतरागींचे नुकसान होणे कसे काय शक्य आहे? जे भगवंतांचे ऐकत नाहीत त्यांचेच नुकसान होणार. म्हणून तर सगळ्यांचे चेहरे एरंडेल प्यायल्यासारखे दिसतात ना? कुठे गेला त्यांचा आनंद? आत्मा आहे तर आनंद पण असायलाच हवा ना?

इथे आम्ही कोणाची निंदा करत नाही, आपल्या येथे निंदा नसतेच. आम्ही फक्त सविस्तर समजावून सांगतो, खरी गोष्ट समजावतो, जो कोणी आमच्याकडून समजून घेईल आणि म्हणेल, 'तुमचे म्हणणे बरोबर आहे.' त्याचे काम होऊन जाईल. त्याला मोक्षमार्ग लवकर मिळेल. पण जर तो म्हणेल, 'तुमचा मार्ग, तुमचे म्हणणे चुकीचे आहे,' तर मग त्याचे भटकणे चालूच राहील! आम्हाला काय? तुला जर चार शिव्या द्यायच्या असतील तर दे, आमची हरकत नाही. आमचे म्हणणे पटत नसेल तर तू बोल, आम्ही कोण हरकत घेणारे? पण आम्हाला खरे तेच सांगावेसे वाटते की, 'तुम्ही मोठा धोका पत्करत आहात. अहो, तुम्ही पुढे गेलात तर मोठ्या खाईत पडाल.' म्हणून आम्हाला सावध करावेसे वाटते, तुम्हाला पटले तर ऐका, नाही तर चार शिव्या देत तुमच्या मार्गाने चालत राहा.

आता वीतरागी असे बोलत नसत! पण आम्ही खटपटे आहोत म्हणून सांगतो, 'पुढे जाऊ नका. खाईत पडाल.' आता वीतरागी आम्हाला म्हणतात, 'तुम्हाला काय त्रास होत आहे?' तर आम्हाला वाटते की 'हा खाईत पडला तर मग याला कोण सावरणार?' आमचा भाव, आमची इच्छाच अशी आहे की कोणीच खाईत पडू नये आणि त्यांना काही तरी मार्ग सापडावा. आम्हाला मोक्षमार्ग सापडला आहे तर आम्ही तुम्हालाही बरोबर घेऊन जाऊ. तुमच्याशी अर्धा तास बसू, बोलू पण मग तुम्हाला आमच्या बरोबरच घेऊन जाऊ.

भगवंतांनी काय म्हटले आहे, 'सर्व जग मोक्षमार्गाकडेच चालले आहे!' म्हणजेच कोणीही चुकीच्या मार्गावर नाही.' पण आम्हाला वाटते की मोक्षमार्गावर जाण्यासाठी, म्हणजे अहमदाबादला जाण्यासाठी तुम्ही इथून मुंबई-बंगलोर गाडीत बसला तर तुमची काय दशा होईल? स्टेशन येईल पण कुठले? तर बंगलोर. मग अहमदाबाद कधी येणार? तर म्हणतील 'अहमदाबाद इकडे नाही, तिकडे आहे!' म्हणजेच या प्रकारे मोक्षमार्गावर उलट मार्गाने चालले आहेत. मोक्षमार्ग असा नसतो. मोक्षमार्गात तर कष्टच नसतात. जिथे कष्ट आहेत तिथे मोक्ष नाही आणि जिथे मोक्ष आहे तिथे कष्ट नाहीत! कष्टाला भगवंतांनी हट्टाग्रह म्हटले आहे. सध्या या मोक्षमार्गात जाणारे लोक सांगतात, कष्ट तर भगवंतांनी पण केले होते. अहो, भगवंतांना का बदनाम करता? तुम्हाला जर कष्ट करायचे असतील तर करा ना! पण यात भगवंतांची बदनामी कशासाठी? भगवंत असे कसे असतील? हे दादा किंचितदेखील कष्ट करीत नाहीत मग महावीर भगवंत कशासाठी कष्ट करत असतील? ज्ञानींना कष्ट होतच नाहीत. हे म्हणतात, 'भगवंतांनी त्याग केला होता.' अहो, भगवंतांनी 30 वर्ष वय असताना मुलीचा जन्म झाल्यानंतर त्याग केला होता, आणि तोसुद्धा पत्नी आणि मुलीचा तिरस्कार करून त्याग केला नव्हता. मोठ्या भावाची आज्ञा घेण्यासाठी महावीर जेव्हा गेले तेव्हा भाऊ म्हणाला, 'दोन वर्षांनी दीक्षा घ्या.' महावीर दोन वर्षे थांबले आणि त्यानंतर त्यांनी त्याग अंगिकारला. तोसुद्धा पत्नीने राजीखुशीने संमती दिल्यानंतरच घेतला. भगवंतानी त्याग केला नव्हता. त्याच्यांकडून ते

सहज घडून आले! कारण महावीर भगवंत ‘महाव्रतात स्थिर होते. महाव्रत म्हणजे जे (सहज) वर्तत असते, त्याग केला असेल त्याला तर व्रत देखील म्हणता येणार नाही! त्याग करणे आणि ‘त्याग वर्तणे’ यात फरक आहे. ज्याला त्याग वर्तत असतो त्याला मी कोणत्या गोष्टींचा त्याग केला आहे हे लक्षातही राहत नाही.

त्याग करणारे त्यागी सगळे मोजून सांगतात, ‘तीन मुले, पत्नी, मोठमोठे बंगले, घरे, अगणित संपत्ति सोडून आलो आहोत.’ असे सगळे त्यांच्या लक्षातच असते, ते विसरत नाहीत आणि त्याग वर्तले असे कोणाबद्दल म्हणायचे? जे अगदी सहजपणे विसरतात त्यांच्याबद्दल! याला भगवंतांनी व्रत असे म्हटले आहे, त्याग म्हटलेले नाही. म्हणून अणुव्रत आणि महाव्रत, त्यात देखील जैन लोकांसाठी अणुव्रताचा सल्ला दिलेला आहे. ‘जितके सहजपणे वर्तत असते तितके अणुव्रतात आलेच म्हणायचे.’ त्यागाची नशा येते आणि ‘मी असा असा त्याग केला, तसा तसा त्याग केला.’ हे सतत त्यांना आठवत राहते. ही गोष्ट नीट समजून घेतली तर उलगडा होईल.‘आम्हाला’ काहीच आठवत नसते. रुपये तर आठवतच नाहीत. लक्ष्मीचा आणि विषयांचा विचारही आम्हाला शिवत नाही. पण लोकांचा याच्यावर विश्वास कसा बसणार?

हा हिशोबच वेगळा आहे! तुझ्या गुणाकारातील एक रक्कम परमनन्ट आहे आणि या रकमेला तू टेम्परारी रकमेने गुणाकार करायला जातोस ना! या उलट आमच्या ह्या दोन्ही रकमा परमनन्ट आहेत. त्यामुळे आमचे गुणाकारच होत राहतात. आणि तू गुणाकार करायला जातोस तेव्हा टेम्पररी रक्कम उडून जाते. त्यामुळे तुझा गुणाकार कधीच पूर्ण होणार नाही, तेव्हा आता सरळ हो ना!

महाव्रत म्हणजे काय ते तुम्हाला आता कळले का? जे सहज वर्तत असते ते महाव्रत. म्हणजे त्याची आठवण सुद्धा राहत नाही, सहज त्याग. जर तुम्हाला विडीचा त्याग वर्तत असेल तर तुम्हाला विडीची आठवणच येणार नाही की मी विडीचा त्याग केला आहे. आणि ज्याने विडीचा त्याग केला असेल त्याला तर ‘मी विडी सोडली आहे’ हे

आठवत राहते. म्हणजे जो त्याग वर्तत असेल त्याची गोष्टच वेगळी! त्या त्यागाचा अहंकार होत नाही. पण काही जण त्यागाचा वेडा अहंकार बाळगतात. अरे, त्याग सहज वर्तत असेल तर सरळ वाग ना! त्याचा बडेजाब कशाला? त्याचा अहंकार कशासाठी? वर्तत असलेला त्याग सर्वात श्रेष्ठ म्हणायचा. जितके लफडे कमी, तेवढ्या उपाधी पण कमी ना! आणि आपला मोक्षमार्ग कसा आहे? अक्रम मार्ग आहे. त्यामुळे अगोदरची जी लफडी आहेत ती तशीच राहू द्यायची नवीन मात्र निर्माण करायची नाहीत. जुनी सर्व संपवायची आणि ती सुद्धा आपोआप निघत जातील, तेव्हा संपतील.

एका जैन महाराजांनी एक नवीन शोध लावला. ते म्हणाले, 'अक्रमचा अर्थ तर अक्करमी (दुर्भागी) म्हणायचा ना?' हो, शोध तर उत्तमच लावला. शेवटी ते वैज्ञानिकाचेच काम आहे ना? एवढा मोठा शोध दुसरा कसा लावील? अहो पण 'अक्करमी' म्हणजे तर ज्यांची कर्मे बांधली जात नाहीत, असे ते आम्हाला म्हणतात. मग या अर्थी ते आम्हाला अक्करमी म्हणतात ते बरोबरच आहे ना? ते थोडेच शिव्या देत आहेत?

हे सगळे पंचमहाव्रतधारी आरोपित भाववाले आहेत. ही पंचमहाव्रते खरी आहेत की आरोपित भावावर उभी आहेत असा विचारच त्यांनी केलेला नाही! तुम्ही स्वत:च जर अजून आरोपित भावात आहात तर मग महाव्रते पण आरोपितच असणार ना! असे म्हटले तर ते म्हणतात, 'आम्ही तर असा विचारच केला नव्हता.' तुम्ही जरी असा विचार केला नसेल पण त्यामुळे तुम्ही महावीर भगवंतांना फसवू शकणार नाही. आणि हा मोक्षमार्ग सुद्धा फसेल असा नाही! भगवंत असे थोडेच फसतील? काही लोक दावा करतात की 'आम्ही पंचमहाव्रतधारी आहोत,' लोक पण ते खरे मानतात, कारण लोकांचे लक्ष फक्त पैसे मिळविण्यात आणि विषयांमध्ये आहे. इतर गोष्टींशी त्यांना काहीच देणेघेणे नाही. मग तिथे महाव्रत आहे, अणुव्रत आहे की आरोपित भाव आहे, यातले त्यांना काहीच समजत नाही. आपल्यासारख्यांना समजते, पण आपण बोलत नाही. कारण लोकांच्या विरोधात बोलणे हा देखील गुन्हा आहे.

लोकांच्या विरूद्ध म्हणजे काय? तर जिथे जसा व्यवहार चालत असेल त्याहून विरूद्ध व्यवहार. समजा चोरांचे गाव आहे तिथे आम्ही सांगितले, 'पंच नेमा.' असे बोलणे हा अशा ठिकाणी गुन्हाच होईल ना? चोरांच्या गावात तुमचा खिसा कापला गेला तर तुम्ही म्हणाल, 'माझा खिसा कापला गेला.' मग लोक म्हणतील,. 'पंच बसवा.' पण पंच पण त्याच गावचे ना? म्हणजे ते पण चोरच ना? म्हणून लोकविरूद्ध बोलू नये. परंतु जर आपल्याला कोणी विचारले तर सांगायचे की, 'हे सगळे आरोपित पंचमहाव्रतधारी आहेत. जसे हे महावीर लगेच मोक्ष देऊ शकतात तसे फळ हे पंचमहाव्रतधारी देऊ शकतात का (!)' पण जर काहीच मिळत नसेल आणि सडके गहू मिळत असतील तर ते तरी घेऊन ये ना? कसली तरी पोळी खायला हवीच ना? नाही तर आपण जगणार कसे? म्हणून हे सगळे सडके गहू खातात. कारण दुसरा मार्गच नाही, खावेच लागतात!

हे पंचमहाव्रतधारी आरोपित भाववाले आहेत हे माहीतच नव्हते ना? 'ज्ञानी पुरुष' जेव्हा असे विवेचन करतात तेव्हाच कळते. भगवंतांनी 'आरोपित भाव ठेवून पंचमहाव्रतधारी बनू नका,' असे बजावले होते. फक्त तीर्थंकरांची मूर्ती आणि शास्त्र आरोपित भावे ठेवा. आरोपित भाव ठेवून पंचमहाव्रतधारी या शब्दाचा अपमान करू नका. त्याऐवजी 'आम्ही परिग्रहाचा त्याग केला आहे' असे म्हणा. आणि अन्य सर्व त्यागाचे अभ्यासी आहोत असे म्हणा, त्याला व्रत म्हणता येणार नाही! परिग्रहाचे महाव्रत हे तर अत्यंत अत्यंत उच्च प्रतीचे महाव्रत आहे! 'दादा' अपरिग्रही आहेत. ते संपूर्णपणे अपरिग्रही आहेत. एकही परिग्रह त्यांच्या ध्यानात नसतो. एखादी गोष्ट हरवली आहे की जागेवर आहे असे पण त्यांच्या ध्यानात नसते. आणि यांना तर चारच परिग्रह असतात, दोन कपडे असतात, भिक्षेसाठी लोटा असतो, एक माळ आणि एक चिमटा असतो. पण तरी त्यातला एक लोटा फुटला की हाहाकार उडतो! तो जाग्यावर सापडला नाही तर आरडाओरडा होतो. 'लोटा कुठे गेला?' म्हणजे एवढासाच परिग्रह आहे तरी पण सतत ध्यानात असते आणि आमच्याकडे परिग्रह आहे पण आमच्या ध्यानातच नसते, म्हणून आम्हाला अपरिग्रही

म्हणतात. आपल्या महात्म्यांना 'शुद्धात्मा' सतत लक्षात असतो म्हणून ते परिग्रह घेतात, देतात तरी पण त्यांना अपरिग्रही म्हणता येते. कारण त्यांना लक्ष्य परिग्रहाचे नसते, लक्ष्य शुद्धात्म्याचे असते. एक तर स्वरूपाचे लक्ष्य सतत असते किंवा संसाराचे लक्ष्य तरी सतत असते. यातले काही तरी एकच असू शकते, 'स्वरूपात' असेल तर संसारात राहणार नाही आणि संसारात असेल तर 'स्वरूपात' असणार नाही, असे हे विज्ञान आहे.

जगात काही लोक स्थूल चोरी (वस्तूंची चोरी) करत नाहीत. याला भगवंत काय म्हणतात? त्याग म्हणत नाहीत, म्हणजे त्यांनी स्थूल चोरीचा त्याग केला आहे असे म्हणता येणार नाही. भगवंत म्हणतात, ते तर तुझे व्रत झाले. वर्तते ते व्रत. ज्याच्यात 'मी पणा' नाही आणि मी त्याग करत आहे असे भान नाही, सहजच वर्तत असते ते व्रत. जैन लोकांनाच भगवंतांनी अणुव्रत का सांगितले आहे? अन्य लोकात, फॉरेनच्या लोकातही अणुव्रत असते आणि इतर धर्मात सुद्धा अणुव्रत असते. पण त्यावर वीतराग भगवंतांची मोहर (मान्यता) नाही. 'वीतराग भगवंतानी सांगितलेले हे व्रत आहे' असे भान झाल्यावर ते व्रत त्यांना वर्तत असते म्हणून त्याला अणुव्रत म्हणतात आणि ते वीतराग भगवंतांना मान्य आहे. वास्तवात तो पण चोरी करत नाही, पण तो सहज भावाने चोरी करत नाही. आणि इथे तर 'माझ्याकडून चोरी न होवो' असे सहज भावाने वर्तत असते, तरी पण त्याला अणुव्रत का म्हणतात? कारण हा स्थूल चोरी करत नाही पण मनातून खूप चोऱ्या करतो, म्हणून अणुव्रत म्हटले गेले आहे, आणि महाव्रत कशाला म्हणतात? मन-वचन-काया या तिन्हीपासून चोरी होत नाही, याला महाव्रत म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** इच्छा नसताना संयोगवश (परिस्थितीवश) चोरी झाली तर?

**दादाश्री :** संयोगवश चोरी झाली तर त्याला खूप मोठा गुन्हा केला असे मानले जात नाही. संयोगवश जे घडले त्याचे जे बाह्यफळ त्याला मिळाले, त्याला बक्षीस म्हणायचे. बाह्यफळ तर मिळतेच. एखादा खूपच पुण्यवान असेल त्याला एखादे वेळी बाह्यफळ मिळत नाही. नाही

तर ज्याने आयुष्यात एकदाही चोरी केलेली नाही, त्याने जर परिस्थितीवश एखादी चोरी केली तरी तो बिचारा पकडला जातो. जेव्हा बाह्यफळ मिळते तेव्हा त्याची नियतच खराब होती असे सिद्ध होते! तरीही संयोगवश एखाद्या व्यक्तीकडून एखादा गुन्हा घडला तर 'आम्ही' त्याला गुन्हेगार मानतच नाही. हे संयोगाधीन झाले आहे. याउलट जाणूनबुजून केले तर मात्र ते 'स्वभावातच' आहे. 'स्वभाव' आणि 'संयोगाधीन' यात खूप फरक आहे. ज्याच्या स्वभावातच 'चोरी करणे असे आहे' त्याची तर नजरच तिथे फिरत असते, आणि काहीतरी चोरल्याशिवाय त्याला राहवत नाही. तो आपल्याबरोबर बोलत असतो पण त्याची नजर 'काय उचलू, कुठून उचलू' याच्यातच गुंतलेली असते. याउलट संयोगवश चोरी करणाऱ्याला गुन्हेगार म्हणता येत नाही. संयोगवश तर राजालाही चोरी करावी लागते. व्रत आणि महाव्रत यातला फरक समजला ना तुला? पांढरे कपडे घातले म्हणजे व्रत म्हणत नाहीत. मन-वचन-कायेनी चोरी केली नाही तर त्याला अस्तेय महाव्रत म्हणतात: मग तो साधू असो की गृहस्थ असो, म्हणजे त्यागी असो की गृहस्थ लिंग असो ते सर्व संसारीच आहेत.

चांगल्या उच्च वर्णीय जातीत चोरी करीत नाहीत, दगा-फटका करत नाहीत पण असे लोक लहानसहान गोष्टीत खूप खोटे बोलतात, मोठ्या गोष्टीत बोलत नसतील, पण आजकाल तर सर्व बिघडले आहे ना? महाव्रते पण बिघडली आहेत, सडली आहेत! आणि अणुव्रते पण सडली आहेत! एकेकाळी या खूप चांगल्या गोष्टी होत्या पण आता बिघडल्या आहेत, मग काय करणार? तरी पण ते सर्व संयोगाधीन आहे. सध्या सगळा हिंदुस्तानच बिघडला आहे ना! नाही तर हिंदुस्तान असा असूच शकत नाही, आणि आज बिघडला आहे, ते सुद्धा संयोगवश बिघडला आहे, त्यामुळे कोणालाही गुन्हेगार मानता येणार नाही.

❖❖❖❖❖

# आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान

आलोचना म्हणजे आपल्या हातून ज्या चुका घडल्या त्याचे आप्तजनांसमोर, 'ज्ञानी पुरुषांजवळ' जसे झाले तसे वर्णन करणे! आलोचना केल्यामुळे सगळे दोष नष्ट होतात, फक्त आलोचनामुळे मोक्ष आहे. एका माणसाने खिसा कापला, आणि त्याने माझ्याजवळ येऊन आलोचना केली आणि 'मी' त्याच्यासाठी विधी केला तर सगळा दोष जाईल. त्या गुन्ह्याचे ओझे पूर्ण हलके होईल! ज्याच्यावर संपूर्ण विश्वास असेल त्याच्याकडे आलोचना करू शकतो. नाही तर हे जग तर दुरुपयोग करेल असे आहे. आपल्यावर जर कोणी विश्वास ठेवला असेल तर त्याला 100 टक्के विश्वास होईल असे वागायला हवे. त्याचा विश्वासघात करता कामा नये. खरे म्हणजे, आलोचना 'आप्तजनांपाशी', 'ज्ञानी पुरुषां'पाशीच करायची असते. भगवंतांनी आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान यांना खूप महत्त्व दिले आहे.

प्रत्याख्यान म्हणजे एकदा झालेला दोष पुन्हा होऊ नये यासाठी दृढ निर्णय-निश्चय करणे.

पंधरा वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. मामाच्या बोळीत, व्हरांड्यात बसून आम्ही 5-6 जण गप्पा मारत होतो. एवढ्यात सुमारे 78 वर्षाचे वृद्ध गृहस्थ हातात एक डबी घेऊन घाई-घाईने जैनमंदिराकडे निघाले होते. त्यांना मी विचारले, 'काका, अशा घाईने कुठे चालला आहात?' तेव्हा ते म्हणाले, 'भाऊ, पडकमणु करायला.' मी त्यांना विचारले, 'पडकमणु म्हणजे काय?' तेव्हा ते म्हणाले, 'थांबा, मी उद्या महाराजांना विचारून तुम्हाला सांगतो!'

भगवंताना माहीत होते की पुढे खूप विचित्र काळ येणार आहे. अशा परिस्थितीत टिकाव धरण्यासाठी भगवंतांनी आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान, अशी मोठी शस्त्रे आपल्याला दिली आहेत.

प्रतिक्रमण म्हणजे काय?

संसारात जे काही होत असते ते क्रमण आहे. सहज प्रकारे होत असेल तोपर्यंत ते क्रमण असते परंतु जर एक्सेस (अति) झाले तर त्याला अतिक्रमण म्हणतात आणि जर त्यातून सुटायचे असेल तर ज्या बाबतीत अतिक्रमण झाले असेल त्याचे प्रतिक्रमण करावेच लागते. म्हणजे (दोष) धुवावा लागतो, तर ते साफ होईल.

पूर्वजन्मात जे चित्रण केले होते, 'अमुक अमुक माणसाला चार थोबाडीत मारायच्या आहेत.' त्यामुळे या जन्मात जेव्हा ते प्रत्यक्षात येते, तेव्हा चार थोबाडीत मारल्या जातात. याला अतिक्रमण म्हणतात, म्हणून याचे प्रतिक्रमण करणे आवश्यक आहे. समोरच्या व्यक्तीच्या शुद्धात्म्याला आठवून, त्याच्या निमित्ताने प्रतिक्रमण केले पाहिजे. भगवंत म्हणतात, 'अतिक्रमणाचे प्रतिक्रमण कराल तेव्हाच तुम्हाला मोक्ष मिळू शकेल.'

काही दुराचरण घडले तर त्याला अतिक्रमण म्हणतात. जे वाईट कृत्य घडले त्याला डाग म्हणतात, तो मनाला टोचत राहील, तो डाग धुण्यासाठी प्रतिक्रमण करावे लागतात. कोणाच्या बाबतीत अतिक्रमण घडले तर पूर्ण दिवस त्याच्या नावाने प्रतिक्रमण करावे लागेल तरच तुम्ही सुटू शकाल. जर दोघांनी समोरासमोर एकमेकांचे प्रतिक्रमण केले तर लवकर सुटका होईल. तुम्ही पाच हजार वेळा प्रतिक्रमण कराल आणि त्यानेही पाच हजार वेळा प्रतिक्रमण केले तर लवकर सुटका होईल. परंतु जर समोरच्या व्यक्तीने प्रतिक्रमण केले नाही आणि जर तुला सुटायचेच असेल तर तुला दहा हजार वेळा प्रतिक्रमण करावे लागेल. तर तू सुटशील. पण तरी वन साइडेड – एकाच बाजूने प्रतिक्रमण झाल्यामुळे तुझ्या निमित्ताने समोरच्या व्यक्तीला दु:ख वाटत राहणार. पण तरीही तू केलेल्या प्रतिक्रमणामुळे समोरच्या व्यक्तीचे भाव बदलतील,

म्हणजे स्वत:लाही चांगले भाव होतील आणि समोरच्या व्यक्तीलाही चांगले भाव होतील. कारण प्रतिक्रमणात एवढी शक्ती असते की वाघसुद्धा कुत्र्यासारखा होतो. प्रतिक्रमण कधी उपयोगी पडते? जेव्हा अतिक्रमणामुळे वाईट परिणाम घडले असतील तेव्हाच उपयोगी पडते. वाघ आपल्या गुहेत असेल आणि तू तुझ्या घरी असशील आणि तेव्हा जर प्रतिक्रमण केलेस तर ते फार उपयोगी पडणार नाही. परंतु जेव्हा वाघ समोर येऊन 'खाऊ का? खाऊ का?' असे म्हणत असेल आणि त्यावेळी जर प्रतिक्रमण केलेस तर उत्तम फळ मिळेल! वाघ लगेचच बकरीसारखा होऊन जाईल!

आजकाल जे प्रतिक्रमण केले जातात ते तर बहुतांशी द्रव्य प्रतिक्रमण होत असतात. द्रव्य प्रतिक्रमण म्हणजे कपडे तर धुतले गेले पण स्वत:चे (आत्म्याचे) काहीच झाले नाही! समजा चंदुलाल दहा वेळा म्हणाले, 'चंदुलाल, वरण-भात खा, वरण-भात खा,' म्हणजे जेवण झाले का? नाही, त्यामुळे काहीच निष्पन्न झाले नाही. द्रव्य प्रतिक्रमण कशाला म्हणतात ते मी तुम्हाला समजावतो. 'महावीर भगवंतांनी 501 कंपनीचा साबणाचा बार आणला, तो 12 इंच लांब, 2 इंच रुंद आणि 1 इंच जाड होता. मग भगवंतांनी मळलेले कपडे आणले, ते पाण्यात बुडवले आणि मग त्यांना साबण लावला आणि नंतर पाण्यात धुतले.' भगवंतानी त्यांच्या कपड्यांचा मळ ज्या पद्धतीने धुतला त्या पद्धतीने वर्षातून एकदा एक तास (फक्त) बोलून वर्णन करून तुझ्या कपड्यांचा मळ कसा जाईल? अरे, भगवंतांचा मळ वेगळा, त्यांची धुवायची पद्धत पण वेगळी, आणि तुझा मळ वेगळा म्हणून धुण्याची पद्धत पण वेगळी असते. भगवंतांची पद्धत नुसती गात राहिल्याने तू कसा स्वच्छ होशील? तू तर घाण्याच्या बैलासारखा घाणीमध्येच राहिलास! तुझे प्रतिक्रमण तर जेव्हा जेव्हा तुझ्याकडून अतिक्रमण झाले असेल तेव्हा तेव्हा ऑन दी मोमेंट-तत्क्षणी प्रतिक्रमण केले गेले तर ते अतिक्रमण धुतले जाईल. आणि हा तर वर्षातून किंवा सहा महिन्यातून एकदा प्रतिक्रमण करतो, तर केव्हा केव्हा अतिक्रमण झाले ते थोडेच लक्षात राहणार? अलीकडचा काळ तर इतका विचित्र आहे की एका तासापूर्वी काय खाल्ले तेही

लक्षात राहत नाही, मग कधी अतिक्रमण केले ते कसे लक्षात राहील? प्रतिक्रमण तर लगेचच त्याचक्षणी केले पाहिजे, उधार चालणार नाही, कॅश पाहिजे!

कपड्यांवर चहा सांडला तर कसा ताबडतोब धुवायला जातोस? आणि जेव्हा तुझ्यावर–'स्वत:'वर मळ बसतो तेव्हा मात्र हात जोडून गप्प बसतोस? चहा सांडणे, हे आपल्या हातात नाही पण मग तो कपडा धुवायला तर हवा ना? तसेच अतिक्रमणाचा मळ बसतो, तेव्हा त्यालाही ताबडतोब प्रतिक्रमण करून धुतला पाहिजे ना?

आम्ही तर कितीतरी जन्मांपासून प्रतिक्रमण करत आलो आहोत, तेव्हा कुठे आता आमचे कपडे स्वच्छ झाले आहेत आणि आता आम्ही तुमचे कपडे पण स्वच्छ करून देतो!

या प्रमाणे दोन प्रकारचे आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान आहेत. एक व्यावहारिक, जे सगळे साधू महाराज वगैरे करतात ते. त्याने (कर्मबंधनाच्या) गाठी थोड्या सैल होतात: पण चूक झाल्यानंतर लगेच प्रतिक्रमण केले तर त्याचे फळ उच्च प्रतीचे मिळते. दुसरा प्रकार म्हणजे निश्चयाचे प्रतिक्रमण, की जे स्वरूप ज्ञान प्राप्त झालेले महात्मा करतात ते प्रतिक्रमण.

## अहाहा! गौतम स्वामींनी कलेले प्रतिक्रमण

भगवंतांच्या काळात काय असे प्रतिक्रमण असायचे? त्यांच्या काळाची तर गोष्टच वेगळी! भगवंतांचे श्रावक, आनंद श्रावक यांना अवधि ज्ञान प्राप्त झाले होते. गौतम स्वामी जेव्हा तिथे पोहोचले तेव्हा त्यांना आनंद श्रावकांनी सांगितले, 'मला अवधि ज्ञान प्राप्त झाले आहे!'

गौतम स्वामींना ते खरे वाटले नाही. ते आनंद श्रावकाला म्हणाले, 'हे विधान खोटे आहे, म्हणून तुम्ही त्याचे प्रतिक्रमण करा.' आनंद श्रावक म्हणाले, 'खऱ्याचे करू की खोट्याचे करू?' गौतम स्वामी म्हणाले. 'प्रतिक्रमण खोट्याचेच करतात, खऱ्याचे नाही.' मग आनंद श्रावक म्हणाले, 'जर खऱ्याचे प्रतिक्रमण करायचे नसेल तर मी प्रतिक्रमण

करण्यासाठी अधिकारी नाही.' तेव्हा गौतम स्वामी महावीर भगवंतांकडे गेले आणि त्यांना विचारले, 'आनंद श्रावक प्रतिक्रमण करण्यासाठी अधिकारी आहेत की नाही? भगवंत म्हणाले, 'आनंद श्रावक खरे बोलत आहेत. त्यांना अवधि ज्ञान प्रकट झाले आहे, म्हणून तुम्ही जा आणि आनंद श्रावकांचे प्रतिक्रमण करा.' मग गौतम स्वामी धावत धावत आनंद श्रावकांकडे आले आणि त्यांनी आनंद श्रावकांचे प्रतिक्रमण केले.

व्यवहार शोभेल असा नसेल तर तिथे प्रतिक्रमण करावे लागते.

**प्रश्नकर्ता :** दादा, आम्ही जैन आहोत म्हणून सामायिक, प्रतिक्रमण आम्हाला माहीत आहे, पण आम्ही ते करू शकत नाही, असे का होत असते?

**दादाश्री :** या जगात ज्याचे पालन करता येते त्याला ज्ञान म्हणतात, आणि ज्याचे पालन करू शकत नाही ते अज्ञान आहे. 'सामायिक आम्हाला समजते पण तरीही आम्ही करू शकत नाही.' असे तुम्ही म्हणता, त्याबद्दल भगवंत काय म्हणतात की, 'ही तर आमची थट्टा झाली.' एक विषाची बाटली आणि दुसरी (तशीच दिसणारी) बाटली, दोन्ही बाटल्या जवळजवळ ठेवलेल्या असतील पण त्यापैकी एकात विष आहे हे माहीत नसेल, जाणत नसेल तर विषाची बाटली उचलेल. परंतु इथे तर माहीत असूनसुद्धा होत नाही असे म्हणतात. हा तर खोटा बहाणा आहे. लोक अज्ञानालाच ज्ञान म्हणतात. जर जाणत असेल तर कोणी विहीरीत पडणारच नाही ना? आणि हे तर जाणतात तरी करत नाहीत, म्हणजे ते ज्ञानच अज्ञान आहे! जाणण्याचे फळ विरती (थांबणे) आहे. एखाद्या मुलाने विचारले, 'विष म्हणजे काय?' तर त्याला आपण सांगतो, 'ते खाल्ले तर माणूस मरतो.' मग मुलगा पुन्हा विचारील, 'मरतो, म्हणजे काय?' मग आपण त्याला समजावतो, 'शेजारी नाही का, ते काका वारले होते. विष खाल्ले तर तसे होते.' मग मुलाला नीट समजते. त्याला कळते की हे विष आहे, हे खाता कामा नये, त्यानंतर विषाप्रती त्याला विरती राहते. जाणण्याचे फळ म्हणजे विरती, विरती म्हणजे थांबणे.

## रोख प्रतिक्रमण केल्यानेच समाधान

एक ताई म्हणतात, 'आम्ही प्रतिक्रमण करायला बसलो की कोणीतरी मागून ठोसा मारतो, पण तुमच्याकडे असे होत नसेल ना?' तेव्हा आम्ही त्यांना म्हटले, 'नाही, आमच्याकडे असे होत नाही. आमच्याकडे खरे खरे प्रतिक्रमण, अगदी महावीर भगवंताना अभिप्रेत होते तसे प्रतिक्रमण होतात. अन्य लोक तर मागधी भाषेत बोलत राहतात. हे कसे आहे ते मी तुम्हाला सांगतो. समजा इथे एक फ्रेंच माणूस बसला आहे आणि मी गुजरातीत बोलत राहिलो तर तो नक्की (खोटे-खोटे) हसेल, पण त्याला यातला एकही शब्द समजणार नाही. महावीरांना असे सांगायचे नव्हते, त्यांनी तर बरोबरच सांगितले होते पण लोकांनी ते आपापल्या भाषेत समजून घेतले! मग काय होणार? 'त्यांनी सांगितले की तुम्ही तुमच्या भाषेत यथार्थपणे समजून घ्या.' इथे तर काय म्हणतात, 501 कंपनीचा साबण आणून लाव, पण तो फक्त गातच राहील. साबण वापरून कोणी कपडे धुणारच नाही आणि वरती म्हणणार, 'मी प्रतिक्रमण' केले, आणि मग बाहेर जाऊन नुसत्या खोड्या करणार! प्रतिक्रमण कॅश-रोख असले पाहिजे. अतिक्रमण झाले की लगेच प्रतिक्रमण! कॅश! देहाची क्रिया रोख असते. जसे ब्रश केले, चहाबरोबर नाश्ता केला, हे सगळे रोख केले! तशीच वाणीची क्रिया रोख असते आणि मनाची क्रिया पण रोख असते. तसेच अतिक्रमण झाले तर त्याचे प्रतिक्रमण पण ताबडतोब रोख, ऑन दी मोमेंट व्हायला हवे. जसजसे प्रतिक्रमण रोख होऊ लागतील तसतसे आत शुद्ध होत जाईल. अतिक्रमणासमोर रोख प्रतिक्रमण केले तर मन, वाणी चोख (शुद्ध) होऊ लागतील!

लोकांना अतिक्रमणही समजत नाही आणि प्रतिक्रमणही समजत नाही. सर्व दोषांचे सामूहिक 'मिच्छामि दुक्कडम्' वर्षातून एकदाच करतात. त्यांना मिच्छामिचा अर्थही माहीत नाही आणि दुक्कडम्चाही अर्थ माहीत नाही!!

आजकाल लोक प्रतिक्रमण करतात ते मागधी भाषेत करतात. महाराज वाचतात आणि सगळे ऐकतात, मग चित्त एकाग्र कसे होणार?

कसे आहे की एखादी गोष्ट समजली तर रुची उत्पन्न होते. इथे समजतच नाही आणि मग लोक उगाचच खोड्या काढतात. भगवंतांनी असे चाळे (नक्कल) करायला सांगितले नव्हते. भगवंत म्हणाले होते, 'ठोकर लागली तर लगेच समजा की काहीतरी चूक झाली आहे. तेव्हा ताबडतोब गुरुकडे जा आणि आलोचना करा. आणि मग गुरूंच्या साक्षीने किंवा आमच्या साक्षीने प्रतिक्रमण करा.' हे प्रत्यक्ष करायचे असते. कपड्यावर डाग पडला तर ताबडतोब धुवून स्वच्छ करायचा असतो. तसेच प्रतिक्रमण पण ताबडतोब केले तरच स्वच्छ होईल. उलट लोक कसे असतात? कपड्यांवर चहाचा डाग पडला तर लगेच धावतपळत जाऊन डाग धुवून टाकतात. पण यांच्या मनावर तर अनंत जन्मांचे डाग पडले आहेत ते धुवायची कोणालाच काळजी नाही! प्रतिक्रमण म्हणजे रोकड व्यापार असावा, उधारी नको. हे तर रोज प्रतिक्रमण करतात पण कपडे स्वच्छ होतच नाहीत, असे का होते? तुझा साबण खोटा आहे, कपडे खोटे आहेत की पाणीच गढूळ आहे? नाही तर रोज कपडे धुवून देखील स्वच्छ का होत नाहीत? इथे तर कोणाला स्वत:चे दोषच दिसत नाहीत. दोष दिसलेच नाहीत तर प्रतिक्रमण कसे होतील? आपले महात्मा रोज दोनशे-पाचशे वेळा प्रतिक्रमण करतात, आणि दोष धुवून टाकतात. पाच लाख दोष शिल्लक असतील तरी मोक्षाला जाण्यासाठी दोनच तास पुरेसे आहेत आणि या लोकांना विचारले तर म्हणतील, 'एक-दोन दोषच शिल्लक असतील!'

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करण्यासाठी एखाद्या धार्मिक ठिकाणी जाणे आवश्यक आहे असे म्हणतात? हे खरे आहे का?

**दादाश्री :** प्रतिक्रमण तर चहा पितांना देखील करता येते, अंघोळ करता करता सुद्धा करता येते. जिथे देहधर्म आहे, मनोधर्म आहे, बुद्धीधर्म आहे अशा स्थितीत योग्य स्थान पाहणे आवश्यक आहे, पण आपला 'आत्मधर्म' आहे. म्हणून देहधर्म वगैरे पाहण्याची गरज नाही. आपण कुठेही प्रतिक्रमण करू शकतो.

काही जण अंघोळ करण्याच्या धर्मालाच धर्म मानतात! त्यांचा

धर्म अंघोळीच्या पुढे जातच नाही. ज्यांना देहधर्म असतो त्यांच्याकडे मोहाचे परमाणू भरपूर असतात आणि त्यांना जर कोणी शिव्या दिल्या तर त्यांना शिव्या देणारा माणूस पूर्ण दोषी दिसतो. त्यात जर कोणी एखादा प्रगत असेल तर तो म्हणेल, 'माझ्या कर्मांचाच दोष आहे.' हे जे कोणी निंदा करत आहेत ते माझे कपडे धुवत आहेत असे मानून तो समाधान मानतो आणि त्याची पुढे आणखी प्रगती होते. सर्व जगाची पद्धत निमित्तालाच दोषी मानण्याची आहे, निमित्तालाच चावा घालतात. याउलट इथे आपल्याकडे 'जो भोगतो त्याचीच चूक' हा नियम आहे.

## प्रतिक्रमणाचे परिणाम ते कसे?

**प्रश्नकर्ता :** आम्हाला जर कोणाबद्दल आसक्ती असेल तर त्याचे प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** त्या समोरच्या व्यक्तीचे नाव घेऊन त्याच्या शुद्धात्म्याला आठवून, 'दादाजींना' आठवून त्या आसक्तीसाठी प्रतिक्रमण केले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** समोरची व्यक्ती जर आपल्यामुळे दु:खी होत असेल तर काय करायला पाहिजे?

**दादाश्री :** अशा वेळी देखील आपण प्रतिक्रमण करायला हवे. आपण पूर्वी केव्हातरी चूक केलेली असणार म्हणून त्यांना आपल्यामुळे दु:ख होते, खुपते. चुकीमुळेच बंधन झाले आहे. बंधन रागाचे असो किंवा द्वेषाचे असो किंवा कसलेही असो, त्याचे प्रतिक्रमण केले पाहिजे. समोरची व्यक्ती जर नम्र आणि सरळ असेल तर समोरासमोर जाऊन माफी मागितली पाहिजे. नाही तर मनातल्या मनात माफी मागितली तरी हिशोब साफ होऊ शकतो.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्याने समोरच्या व्यक्तीचे मन पूर्ण बदलेल का?

**दादाश्री :** जर एखाद्या बाहेरच्या अनोळखी व्यक्तीला उद्देशून प्रतिक्रमण केले तर ती व्यक्ती आश्चर्यचकीत होईल. त्याला लगेचच

तुमच्याबद्दल आकर्षण निर्माण होईल! या प्रतिक्रमणामुळे समोरच्या व्यक्तीची वृत्ती एकदम शांत होऊन जाते. मात्र घरातील व्यक्तींसाठी निरंतर प्रतिक्रमण करावे लागते.

**प्रश्नकर्ता :** मृत व्यक्तीची आठवण झाली तर त्या मृत व्यक्तीसाठी पण प्रतिक्रमण करावे लागते का?

**दादाश्री :** आठवण मृत व्यक्तीची पण येते आणि जिवंत व्यक्तीची पण येते. ज्याची आठवण येईल त्या व्यक्तीसाठी प्रतिक्रमण करावे लागते, कारण आपल्याला माहीतच आहे की खरे तर 'तो' अजूनही जिवंतच आहे, मरत नाही. हे त्याच्या आत्म्यासाठीही हितकर आहे आणि आपण प्रतिक्रमण करतो त्यामुळे आपणही त्याच्या बंधनातून मुक्त होऊ शकतो.

**प्रश्नकर्ता :** मृत व्यक्तीसाठी प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** मन-वचन-वाणी-काया, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्म मृत व्यक्तीचे नाव तथा त्याच्या नावाची सर्व माया यापासून भिन्न अशा त्याच्या शुद्धात्म्याची आठवण करायची, आणि मग 'मी अशा अशा चुका केल्या आहेत', त्या चुका आठवायच्या (ही आलोचना), त्या चुकांसाठी मला पश्चाताप होत आहे, आणि त्यासाठी मला क्षमा करा (हे प्रतिक्रमण), अशा चुका मी पुन्हा करणार नाही अशा दृढ निश्चय मी करतो (हे प्रत्याख्यान). 'आपण' स्वतः 'चंदुलाल'चे ज्ञाता-दृष्टा राहून जाणायचे की, चंदुलालने किती वेळा प्रतिक्रमण केले आणि किती छान केले!

जिथे वारंवार प्रतिक्रमण केले जाते तिथे आत्मा शुद्धच असतो. आपण तर दुसऱ्यांच्यात शुद्धात्मा पाहतो, प्रतिक्रमण करतो आणि स्वतःचा शुद्धात्मा तर लक्षात असतोच. ही व्यावहारिक क्रिया नाही. यामुळे मग बाकीचे सर्व देखील शुद्ध होत जाते. हे पुद्‌गल काय म्हणते? ते म्हणते, 'तुम्ही तर शुद्ध झाला आहातच, आता आम्हालाही शुद्ध करा.' जेव्हा हे अशुद्ध झालेले पुद्‌गल परमाणू निघतात तेव्हा जर प्रतिक्रमण केले तर त्यामुळे ते शुद्ध होतात.

स्थूल आणि सूक्ष्म चुका प्रतिक्रमणामुळे धुतल्या जातात आणि सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम चुका मात्र 'पाहिल्याने' निघून जातात. हा मार्गच आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यानाचा आहे, आणि ते सुद्धा घडताक्षणीच एकदम रोख हवे. साधे पान मिळवायला देखील दोन आणे कॅश द्यावे लागतात. तसेच प्रतिक्रमण कॅश हवे, उधारीने मोक्ष मिळणार नाही.

मनाने, वाणीने आणि देहाने केलेल्या सर्व अतिक्रमणासाठी प्रतिक्रमण करावे लागतात. हे आमचे मुखारविंद धारण करून आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान केलेत तर इतके छान धुतले जाईल की पुन्हा तसे अतिक्रमण होणारच नाही. आमच्या हजेरीनेच सर्व धुतले जाईल.

अतिक्रमण ही सर्वात मोठी हिंसा आहे. त्यासाठी प्रतिक्रमण आवश्यकच आहे. दिसणाऱ्या स्थूल हिंसेचा परिणाम होईल किंवा होणार नाही, कारण कर्मबंधन तर आतील मशीनरी जशी फिरत असेल त्यानुसार होईल. परंतु आंतरिक हिंसा, सूक्ष्म हिंसा निश्चितच धुवायला हवी. अतिक्रमण म्हणजे हिंसाच. पण आजकालच्या लोकांना हिंसा म्हणजे काय तेच कळत नाही, मग प्रतिक्रमण काय करणार? कसे करणार? जर स्थूल हिंसेची गणना हिंसेत केली गेली असती तर भरत राजा कधीच मोक्षाला जाऊ शकले नसते. त्यांनी तर कितीतरी सैनिकांना मारले! स्थूल हिंसा बाधक नाही, सूक्ष्म हिंसाच बाधक आहे.

आमच्या या महात्म्यांच्या हातात आम्ही अतिशय वेगळ्या प्रकारची वस्तू दिली आहे! अत्यंत आश्चर्यकारक! जगातील लोकांना हे मान्य करावे लागेल की हे भांडताना दिसतात तरी आत त्यांचे समकित जात नाही. ('रियल' आणि 'रिलेटिव्ह') या दोन्ही क्षेत्रातील धारा वेगवेगळ्याच वाहत असतात.

तुमच्यात तर दोन्ही धारा एकत्रच वाहत आहेत. आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान यांच्याशिवाय दोन्ही धारा वेगळ्या होऊच शकत नाहीत. आणि 'या सर्वांना' तर निरंतर आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान चालू असते. म्हणजे कसे? बाहेरची क्रिया सुरू असते

आणि आत सतत प्रत्याख्यान पण सुरू असते. असे सतत होत राहिले पाहिजे. तुम्ही आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करता ना?

**प्रश्नकर्ता :** होय, संवत्सरीचे प्रतिक्रमण करतो.

**दादाश्री :** प्रतिक्रमण कसे केले पाहिजे ते मी तुम्हाला समजावतो. तुमचे आता कोणी गुरु आहेत का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तुमचे कोणाशी भांडण झाले तर ते उदयकर्म आहे, प्राकृत भाव आहे. अशा वेळी ताबडतोब ज्यांना गुरु मानले त्यांचे स्मरण करून ज्याच्याबरोबर भांडण झाले आहे त्याच्या शुद्धात्म्याला स्मरून त्वरित प्रतिक्रमण करायचे. अतिक्रमण म्हणजे एक प्रकारचा हल्लाच आहे. तुमचे शेठजींबरोबर अतिक्रमण झाले तर तिथे देखील गुरूंचे स्मरण करून आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान केले तर सगळा दोष नष्ट होतो. त्यामुळे काय होते? शेठजींबरोबर जे अतिक्रमण झाले होते त्याची पक्की गाठ बसत नाही. ती गाठ सैल पडते! म्हणजे पुढच्या जन्मी त्या गाठीला जरासा हात लावताच ती सहज सुटून जाईल! डोक्यावर कोणी तरी गुरु तर हवे ना? आलोचना करण्यासाठी कोणी तरी हवेच ना? प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान हाच मुक्त होण्याचा मार्ग आहे, दुसरा कुठला मार्गच नाही. अतिक्रमण आणि आक्रमण हे बंधनाचेच मार्ग आहेत. जेव्हा अधिक आणि उणे सारखेच असतील तेव्हाच बेरीज शून्य येईल ना! प्रतिक्रमण तर, डाग लागल्यावर लगेच धुवून टाकले तरच त्याला प्रतिक्रमण म्हणता येईल. जैनांमध्ये आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान सतत चालू असतात. जैन कोणाला म्हणायचे? तर जो रोज पाचशे-पाचशे वेळा प्रतिक्रमण करतो तो जैन.

निरंतर प्रतिक्रमण करून अगदी गाढ राग-द्वेषाला धुवून-धुवून पातळ करून टाकायचे. समोरचा वाकडा वागतो तर ती आपलीच चूक आहे, आपण ती चूक धुतलेली नाही आणि धुतली असेल तर व्यवस्थित पुरुषार्थ करून धुतलेली नाही, जेव्हा जेव्हा वेळ मिळेल तेव्हा तेव्हा

गाढ ऋणानुबंध असलेल्या व्यक्तींसाठी सतत प्रतिक्रमण करून धुवत राहायचे. अशा व्यक्ती जास्त नसतात, पाच किंवा दहा जणांशीच असे गाढ ऋणानुबंध असतात, आणि त्यांचेच वारंवार प्रतिक्रमण करायचे असतात. त्या चिकटपणालाच सतत धूत राहायचे असते. आपले कोणा-कोणाशी देणेघेणे आहे ते शोधून काढायचे. नवीन एखादा संबंध उत्पन्न झाला तर लगेच समजून येते, पण जे जुने आहेत त्यांना शोधून काढायचे आहे. जे-जे सर्वात जवळचे ऋणानुबंधी आहेत तिथेच सर्वात जास्त चिकटपणा असतो. स्फोट कुठे होतो? तर जिथे जास्त चिकटपणा असतो तिथेच वारंवार स्फोट होतो.

डायरेक्ट मिश्रचेतनाशी (जिवंत व्यक्तीशी) अतिक्रमण झाले असेल तर ताबडतोब प्रतिक्रमण करा. जर जेवायला कमी वाढले तर जेवणाऱ्याला दु:ख वाटते, हे इनडायरेक्ट (अप्रत्यक्ष) अतिक्रमण आहे, त्यालाही प्रतिक्रमण करून धुवून टाकावे लागते. ही बटाट्याची भाजी चेतन नाही पण ती भाजी वाढणारा चेतन आहे, त्यामुळे त्याचा चेतनाशी संबंध येतो. कोणी बटाटा खात नसेल आणि चुकून त्याला बटाट्याची भाजी वाढली तर त्याला दु:ख होईल, पण हे जर लक्षात राहिले नाही, तर त्यास 'उपयोग' चुकला असे म्हणतात, आणि उपयोग चुकला यासाठी प्रतिक्रमण केले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** कंटाळा येतो त्याला काय म्हणायचे? तो *प्रमाद* (तन्मयता, अजागृती) आहे का?

**दादाश्री :** नाही, तो *प्रमाद* नाही, त्याला अरुची म्हणता येईल. ज्या गोष्टी आवश्यक आहेत अशा गोष्टींची अरुची वाटत असेल तर त्याचे पण प्रतिक्रमण करावे लागते!

**प्रश्नकर्ता :** दादा, कितीतरी दोष समजून येत नाहीत, असे का होते?

**दादाश्री :** लोभ आणि माया आहे ते या दोषांना समजू देत नाही, पण मान आणि क्रोध असेल तर दोष लगेच दिसतात. अरे, दुसरे लोक सुद्धा त्या दोषांना दाखवून देतात.

ज्ञानी पुरुषांच्या दर्शनाने कपटाचा पडदा सरकतो आणि सगळे स्पष्ट दिसू लागते.

आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान होतात त्यामुळे भरलेली कोठी रिकामी होत जाते. विषयांची आठवण होत असेल तर आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान केल्याने विषय आठवणारच नाहीत. हा तर पूर्वीचा कोठीत भरलेला माल आहे ना! तो माल जसाजसा बाहेर येतो तशीतशी त्याची आठवण येते आणि त्या त्या वेळी आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान केले तर माल कमी कमी होत जातो आणि अखेरीस कोठी पूर्ण रिकामी झाल्याशिवाय दुसरा मार्गच नसतो.

**प्रश्नकर्ता :** दादा, मला घरात तऱ्हे तऱ्हेच्या वस्तू आणण्याचा मोह आहे. साड्या खरेदी करायचा मोह आहे. त्या सर्वांचे प्रतिक्रमण कसे करायचे?

**दादाश्री :** ते सगळे नोकर्म म्हटले जातात. जर 'तू चंदु' आहेस तर ते तुझे आहेत, नाही तर तुझे नाहीत. जर या मोहामुळे मूर्च्छा उत्पन्न होत असेल तर तिथे प्रतिक्रमण केले पाहिजे. तो माल देखील कोठीत भरलेला आहे म्हणून प्रतिक्रमण करावे लागतात. कोठीतून जो जो माल बाहेर पडेल त्या सर्वांचे आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान करावे लागतात. ते सुद्धा तुम्हाला करावयाचे नाही, तर ते 'चंदु'कडून करवून घ्यायचे. जो खातो तो गुन्हेगार. आपण खात नाही, आपण तर 'शुद्धात्मा' आहोत, मग प्रतिक्रमण कसले करायचे?

जसेजसे आत्म्याचे 'ज्ञाता-दृष्टा' पण कमी होत जाते तसेतसे शौर्य कमी होत जाते परंतु जसेजसे आत्म्याचे ज्ञाता-दृष्टापण वाढत जाते, तसेतसे शौर्य वाढत जाते.

प्रतिक्रमण सुरू झाले म्हणजे चौथे गुणस्थानक सुरू झाले.

जितक्या वेळा अतिक्रमण आणि आक्रमण केले, तितक्या वेळा त्यासाठी तुम्ही आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करा.सदाचार, दुराचार या आपल्या हातातील गोष्टी नसतात, त्या दुसऱ्याच गोष्टींवर

अवलंबून असतात. पण दुराचार होतो तेव्हा अतिक्रमण आणि आक्रमण होते, त्याचे प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान केले पाहिजे.

## आक्रमण आणि अतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** आक्रमण आणि अतिक्रमण यात काय फरक आहे?

**दादाश्री :** दोघांत खूप फरक आहे. अतिक्रमणाचा दोष इतका जास्त नाही. आक्रमणाचा दोष भयंकर आहे. मनात उलटसुलट विचार येतात ते म्हणजे अतिक्रमण, पण 'तुला सरळ करीन, माझे जे काय व्हायचे ते होईल, पण प्रथम तुला पाहून घेईन.' असे सगळे भाव हे आक्रमक भाव आहेत. स्वरूपज्ञानाची प्राप्ती झाल्यावर आक्रमक भाव राहत नाहीत, तरी पण अतिक्रमणे मात्र होत राहतात. जे साधारणपणे असायला हवे त्यापेक्षा विशेष असेल, जास्त असेल तर ते अतिक्रमण आहे. आक्रमक भाव गेला म्हणजे वीतरागतेत आला. आक्रमक भाव आणि अतिक्रमण भाव यात खूप फरक आहे, स्वरूपज्ञान प्राप्त झाल्यानंतर एखाद्या व्यक्तीसाठी अभाव वाटत राहतो आणि आत वादळ उमटल्यासारखे वाटते पण तरीही त्यात आक्रमक भाव नसतो! अशा अभावभावामुळे आक्रमण होत नाही पण अतिक्रमण मात्र होते. म्हणून त्याचे प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करणे आवश्यक आहे. एकाच व्यक्तीसाठी असे अतिक्रमण, असे अभाव-भाव, हजार-हजार वेळाही येऊ शकतात आणि त्यासाठी हजार हजार वेळा आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान केले तरच अशा कठीण अतिक्रमणातून सुटता येईल. या ज्ञानानंतर आपल्यात कणाएवढा देखील अभाव-भाव राहता कामा नये. आता आपल्याला नवीन लढाई करायची नाही आणि जुनी लढाई संपवून टाकायची आहे!

## सामूहिक प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** सामूहिक (जाथु) प्रतिक्रमण कशाला म्हणतात?

**दादाश्री :** सामूहिक प्रतिक्रमण कशाला म्हणतात? तर जे निरंतर आठवत असतात त्यांच्यासाठी. एखादी व्यक्ती वारंवार आठवत असेल तर अशा वेळी सामूहिक प्रतिक्रमण करायला हवे. सामूहिक म्हणजे

निरंतर. स्मृती म्हणजे राग–द्वेष यांचा आरसा आहे. त्यासाठी कधी कधीच प्रतिक्रमण करावे लागते. पण सामूहिकमध्ये तर जितक्या वेळा आठवण येईल तितक्या वेळा त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल.

ज्या व्यक्तीबरोबर आपला गुंता निर्माण झाला असेल अशी व्यक्ती जरी मरण पावली असेल तरी त्याला आठवून केलेला गुंता सोडवायचा, जेणे करून सर्व स्वच्छ होऊन गुंता सुटेल. आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करून अशा गाठी सोडवायच्या आहेत. जर एखाद्या मांजराला मारले असेल तर दोघांच्याही आत्म्यांनी त्याची नोंद ठेवलेली असते. (नोंद – अत्यंत राग–द्वेषसहित दीर्घकाळापर्यंत गोष्टी लक्षात ठेवणे) मांजर मनात शत्रुत्व ठेवल्याखेरीज राहणार नाही, म्हणून आपण त्या मांजरासाठी आलोचना–प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करावे. ज्ञानी पुरुषांची जी जी वाक्ये तुमच्यात 'फिट' बसतात त्यांना 'अनुभव ज्ञान' असे म्हणतात आणि तेच मोक्षाला घेऊन जाते!

तंत दोन प्रकारे असतात. एक लवकर सुटणारा आणि दुसरा लवकर न सुटणारा असा तंत. दुसरा तंत दीर्घकाळापर्यंत चालू राहतो. अशा दुसऱ्या तंतासाठीही अनेकदा आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करून घ्यावे. एखाद्या व्यक्तीबद्दल मनात खूप वाईट विचार आले तर आपण म्हटले पाहिजे, 'ते तर खूप चांगले गृहस्थ आहेत, खूप चांगले गृहस्थ आहेत.' असे बोलल्यामुळे त्या व्यक्तीवर परिणाम होतो. बाकी, त्या व्यक्तीकडे पाहून ते कसे आहेत याचा विचार करू नये. आपण तर त्यांना चांगलेच म्हणायचे. एक वेळा, दोन वेळा, तीन वेळा, असे केल्याने त्या व्यक्तीत निश्चितच बदल होईल. हे सगळे अनुभव ज्ञान आहे. आम्ही ज्या रस्त्याने चाललो आहोत त्याच रस्त्याने आम्ही तुम्हाला घेऊन चाललो आहोत.

## 'सॉरी' म्हणजे प्रतिक्रमण?

**प्रशनकर्ता :** थँक्यू आणि सॉरी हे शब्द प्रतिक्रमणासारखे आहेत का?

**दादाश्री :** नाही. म्हशीने खुश होऊन डोके हालविले तर त्याला

थँक्यू असे मानता येईल. ही गोष्ट फॉरेनर्ससाठी ठीक आहे. पण प्रतिक्रमण, प्रत्याख्यान या शब्दांना योग्य प्रतिशब्द त्या भाषेत मिळणार नाहीत. तरी पण आपण सॉरी बोलतो ते व्यवहारात बोलत असतो.

ज्यांचा रात्रंदिवस आत्म्यामध्येच उपयोग असतो ते म्हणजे सत्पुरुष. परंतु इथे तर कोणाचा तपात, तर कोणाचा प्रतिक्रमणात उपयोग असतो. भगवंत काय म्हणाले होते की, 'प्रतिक्रमण आपल्या भाषेतच करावे, तेच तुला पुढील मार्ग दाखवील.' पण लोक प्रतिक्रमणाचा अर्थ काय समजतात? समजा सांताक्रुजचा बोर्ड लावला असेल आणि त्या रस्त्याने जायचे असेल पण लोक आपले दादरला बसूनच 'वे टू सांताक्रुज, वे टू सांताक्रुज' (सांताक्रुजचा रस्ता) असे बोलत राहतात. मग सांताक्रुज जाणे तर दूरच राहिले, उलट 'मी सांताक्रुजला जाण्याचा प्रयत्न करीत आहे' अशी त्याला नशा चढते!

अनंत जन्म झाले, पण प्रतिक्रमण म्हणजे काय हे माणसाला नीट समजलेच नाही, मागे वळून कधी पाहिलेच नाही आणि न समजताच महावीर भगवंतांचे प्रतिक्रमण गात राहतात, हीच पद्धत झाली आहे.

## अतिक्रमणाचे डाग प्रतिक्रमणाने जातात

**दादाश्री :** तुमच्या कपड्यावर जर चहा सांडून डाग पडले तर तुम्ही काय करता?

**प्रश्नकर्ता :** ताबडतोब धुवून टाकतो.

**दादाश्री :** त्यावेळी तुम्ही किती दक्ष असता? कारण तुम्हाला वाटते की (उशीर झाला तर) डाग कायम राहील, म्हणून तुम्ही लगेच धुवून टाकता. पण 'आत' डाग पडतो तो मात्र तुमच्या लक्षात पण येत नाही! अतिक्रमण म्हणजे डाग पडणे आणि प्रतिक्रमण म्हणजे डाग काढणे. ज्याला डाग पडत नाहीत त्याला प्रतिक्रमण करायची गरज नाही, 'ज्ञानी पुरुषां'ना प्रतिक्रमण करायची गरज नसते.

हे सगळे लोक चहाचा डाग पडला तर लगेच धुवून टाकतात.

त्यात बिलकुल कच्चे पडत नाहीत. अशा बाबतीत ज्ञानी पुरुष जरा कच्चे पडतात. परंतु ज्ञानी पुरुष आत पडलेल्या डागांबद्दल बिलकुल कच्चे पडत नाहीत! 'ज्ञानी पुरुषांना' डाग पडतच नाहीत कारण ते स्वत: गाऊन दुसऱ्यांना डाग गायला सांगतात. याउलट इतर सर्व दुसऱ्यांना गायला सांगतात पण स्वत: मात्र गात नाहीत. त्यामुळे त्यांचे डाग राहतात! आता चहाचे डाग पडले तर ते डाग कसे धुवायचे हे जर माहीत नसले तर काय होईल? जर दुधात बुडवले तर दुधाचे डाग पडतील आणि मग तेलात बुडवून धुवायला गेला तर डाग एकदम कायमचा पक्का बसून जाईल! सध्या जगात सर्व लोक प्रतिक्रमण कसे करतात? तर द्रव्य आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करतात. भाव आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान तर कोणी करतच नाही! हो, चहाचा डाग पडला तर मात्र लगेच प्रतिक्रमण करतात. प्रतिक्रमण तर, डाग पडल्याबरोबर लगचेच स्वत: धुवून टाकले तरच प्रतिक्रमण केले असे म्हणता येईल. ही माणसे तर आत पडलेला डाग लगेच धुतच नाहीत, त्याला पक्का होऊ देतात. नंतर धुवायला जातात तर तो डाग थोडाच तुमची धुवायची वाट पाहत बसणार आहे? नाही, तो डाग तर एकदम कायमचा पक्का होऊन बसतो!

कोणाशी आवाज चढवून बोललो आणि त्यामुळे त्याला दु:ख झाले तर आतून प्रतिक्रमण केले पाहिजे, कारण ते अतिक्रमण झाले आणि म्हणून त्या अतिक्रणाचे प्रतिक्रमण करावेच लागते.

## प्रतिक्रमणाचा यथार्थ विधी

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणात काय करायचे असते?

**दादाश्री :** मन-वचन-काया यांचा योग, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्म, चंदुलाल आणि चंदुलालच्या नावाची सर्व माया, यांच्याहून पूर्णपणे भिन्न अशा 'शुद्धात्म्याला' आठवून म्हणायचे की, 'हे शुद्धात्मा भगवान! माझ्याकडून ओरडून बोलले गेले, ही चूक झाली त्यासाठी मी माफी मागत आहे, आणि अशी चूक मी पुन्हा करणार नाही असा निश्चय करतो. पुन्हा अशी चूक होऊ नये यासाठी आपण मला शक्ती

द्या.' 'शुद्धात्म्याची' आठवण केली किंवा 'दादांची' आठवण केली आणि 'ही चूक झाली' असे म्हटले तर ती आलोचना झाली, आणि ती चूक धुवून टाकायची, म्हणजे प्रतिक्रमण झाले आणि अशी चूक पुन्हा करणार नाही असा निश्चय केला म्हणजे ते प्रत्याख्यान झाले! समोरच्या व्यक्तीचे नुकसान होईल असे करणे किंवा त्याला आपल्याकडून दु:ख होणे या सर्व गोष्टी म्हणजे अतिक्रमण आणि त्यासाठी ताबडतोब आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान केले पाहिजे.

हा तर एकदम सोपा मार्ग आहे. या किल्ल्यांनी ताबडतोब सर्व कुलुपे उघडतात! कोणत्याही काळात असा संयोग जुळेल असे नाही. हा तर अक्रम मार्ग आहे! अपवादात्मक आहे! आणि अकरावे आश्चर्य आहे!! तेव्हा आपले (मोक्षाचे) कार्य आटपून घ्या. या प्रतिक्रमणामुळे आयुष्य पण सुंदर व्यतीत होते आणि मोक्षालाही जाता येते!

महावीर भगवंतांनी असे म्हटले आहे की, 'तुम्ही जर खूप मोठे व्यापारी असाल तर दिवसा केलेल्या अतिक्रमणांसाठी रात्री प्रतिक्रमण करा. याला 'रायशी' प्रतिक्रमण असे म्हटले आहे आणि रात्री केलेल्या अतिक्रमणांसाठी दिवसा प्रतिक्रमण करा, याला 'देवशी' प्रतिक्रमण असे म्हटले आहे. हा अक्रम मार्ग आहे, म्हणून ज्ञान प्राप्तीनंतर प्रतिक्रमण करावे लागतात, नाही तर ज्ञान प्राप्ती नंतर प्रतिक्रमण करायचे नसतात. स्वरूपाचे ज्ञान प्राप्त केले पण आतमध्ये जुन्या मालाचा स्टॉक शिल्लक आहे म्हणून अतिक्रमण होतच राहते आणि त्यासाठी पुन्हा पुन्हा प्रतिक्रमण करावे लागते. प्रतिक्रमण आपल्याला म्हणजे 'शुद्धात्म्याला' करायचे नसतात, तर ते या मन-वचन-काया यांच्याकडून करून घ्यायचे असतात. 'मी करत आहे' हा भाव निघून गेल्यामुळे आपण स्वरूपाने शुद्धच आहोत, म्हणून 'आपल्याला' प्रतिक्रमण करावे लागत नाही. शुद्धात्म्याने स्वत: जर प्रतिक्रमण केले तर विषारी होईल. 'स्वत:' 'शुद्धात्मा' प्रतिक्रमण करत नाही, पण मन-वचन-काया यांच्याकडून करवून घेतो. हा अक्रम मार्ग आहे. त्यामुळे प्रथम स्वरूप ज्ञानात बसून मग मागील सर्व देणी चुकवावी लागतात. याउलट क्रमिक मार्गात देणी चुकवत चुकवत ज्ञानात येतात.

❖❖❖❖❖

# योगेश्वर श्रीकृष्ण

**प्रश्नकर्ता :** स्वधर्म म्हणजे काय? आपल्या वैष्णवात असे म्हणतात ना की, स्वधर्मात राहा आणि परधर्मात जाऊ नका!

**दादाश्री :** 'स्वधर्म' या शब्दाचा अर्थच आपल्या लोकांना कळला नाही! वैष्णव धर्म म्हणजे स्वधर्म आणि शैव धर्म किंवा जैन धर्म म्हणजे परधर्म, असा याचा अर्थ लोक समजतात. श्रीकृष्ण भगवंतानी म्हटले आहे, 'परधर्मो भयावह' यामुळे लोक समजले वैष्णव धर्माव्यातिरिक्त अन्य कुठल्याही धर्माचे पालन केले तर ते भीतीदायक आहे. याच तऱ्हेने इतर धर्माचे लोक देखील परधर्म म्हणजे दुसरा धर्म भीतीदायक आहे असे मानतात. परंतु कुणालाही स्वधर्म किंवा परधर्म म्हणजे काय ते समजलेलेच नाही. परधर्म म्हणजे देहाचा धर्म आणि स्वधर्म म्हणजे आत्म्याचा धर्म, 'स्वत:चा' धर्म. या देहाला आपण धुतो, अंघोळ घालतो, त्याच्याकडून एकादशी करवून घेतो, ह्या सगळ्या गोष्टी म्हणजे देहधर्म आहेत, परधर्म आहेत. यात आत्म्याचा एकही धर्म नाही, स्वधर्म नाही. आत्मा हेच आपले स्वरूप आहे. श्रीकृष्णानी म्हटले आहे, 'स्वरूपाच्या धर्माचे पालन करणे तोच स्वधर्म आहे.' आणि ही जी एकादशी करतात किंवा असे काही करतात तो तर परका धर्म आहे, त्यात स्वधर्म नाही.

'स्वत:चा आत्माच श्रीकृष्ण आहे' ही समज आली, त्याची ओळख झाली तरच स्वधर्माचे पालन केले जाणे शक्य आहे. ज्याला आतल्या कृष्णाची ओळख झाली तोच सच्चा वैष्णव म्हणायचा. आज

तर कोणीच सच्चा वैष्णव बनू शकला नाही! 'वैष्णव जन तो तेने रे कहिये....' या व्याख्येनुसारही आज एकही वैष्णव झाला नाही!

लोक असे म्हणतात की, 'आम्ही श्रीकृष्ण भगवंताच्या धर्माचे पालन करतो,' पण श्रीकृष्ण भगवंत तर मला रोज सांगतात, 'यातील एकही माझा खरा भक्त नाही. मी जे सांगतो, माझ्या त्या आज्ञेचा एक दिवसच काय एक तासदेखील ते पालन करीत नाहीत.'

## श्रीकृष्णांची आज्ञा

कृष्ण भगवंत सांगतात :

*'जीव तू शीदने शोचना करे, कृष्णने करवुं होय ते करे.'*

(जीवा तू उगीचच कशाला काळजी करतोस, कृष्णाला जे करायचे ते तो करील.)

पण हे वैष्णव काय म्हणतात? 'कृष्ण भगवंत तर असे म्हणतात. पण काळजी केल्याशिवाय आपले काम कसे भागेल? काळजी तर करावीच लागेल ना?' बघा, हे आले मोठे चालविणारे!

श्रीकृष्णानी तर खूप सांगितले आहे. 'प्राप्त आहे त्याला भोग अप्राप्ताची काळजी करू नकोस.' आता हे जेवणाचे ताट समोर आलेले आहे, हा प्राप्त संयोग आहे, त्याचा उपभोग घेण्याऐवजी शेठजी गेलेले असतात कारखान्यात, आणि इथे मात्र त्यांचे शरीरच जेवण करत असते. आता अशा वेळी श्रीकृष्ण तरी काय करणार? श्रीकृष्ण म्हणतात, 'एकीकडे हे मला पाळण्यात बसवतात, आणि दुसरीकडे माझ्या जीभेवर पाय ठेवतात. हे सगळे लोक! माझ्या एकाही शब्दाचे पालन करीत नाहीत.' तुम्हाला काय वाटते? मी बरोबर बोलत आहे ना? तुम्हीच सांगा, तुम्ही काळजी करता की नाही करत?

**प्रश्नकर्ता :** काळजी तर रात्रंदिवस करतो. पण आम्हाला काळजी करायची नसते तरी पण ती होते, तर यासाठी काय उपाय करायला हवा?

**दादाश्री :** यामुळे श्रीकृष्णाच्या आज्ञेचे उल्लंघन होत आहे, पण

त्याचबरोबर त्याच्यावर एक उपायही आहे. तुम्ही रोज सकाळी भगवंतांच्या फोटोसमोर हात जोडून पाच वेळा म्हणा, 'हे भगवंत, तुम्ही सांगता की एकही काळजी करू नकोस. कारण करणे-करविणे हे सर्व तुमच्या हातात आहे तरी पण माझ्याकडून काळजी केली जाते, तेव्हा मी काय करू? माझी तर अशी तीव्र इच्छा आहे की मी एकही काळजी करू नये. म्हणून हे भगवंता, तुम्ही काही तरी कृपा करा. अशी शक्ती द्या की ज्यामुळे मला पुन्हा काळजी होणार नाही.' असे म्हणून देखील जरी पुन्हा काळजी होत राहिली तर पुन्हा भगवंतांपाशी अशी प्रार्थना करा. सतत असे करत राहा, मग अजिबात काळजी होणार नाही. अर्थात असे आपण श्रीकृष्णांशी नाते जोडले! जा आता, आम्हाला आठवून आमचे नाव घेऊन कृष्ण भगवंतांना रोज सकाळी पाच वेळा म्हणा. आणि तरी पण काळजी वाटत राहिली तर मग माझ्याकडे या. आपली दानत चोख असेल, कृष्णाचे आपण खरेखुरे भक्त असू तर काळजी कशाला वाटेल? श्रीकृष्णांना साफ साफ सांगून टाकायला काय त्रास आहे? खरी भावना असलेला भक्त तर भगवंताना शिव्या देखील देऊ शकतो. भगवंतांना शिव्या कोण देऊ शकतो? जो खरा पुरुष असेल तोच भगवंताना शिव्या देऊ शकतो! यात घाबरायचा प्रश्न येतोच कुठे? भगवंतांना सरळ सांगू शकतो, 'आम्हाला काळजी करायची इच्छा नाही, आमची इच्छा तर तुमच्या आज्ञेतच राहण्याची आहे, तरी काळजी होते, मग आम्ही काय करू? आम्ही तर तुमच्या शरणी आहोत आणि तुम्हाला शिव्या ही देऊ.'

असे आम्ही एका व्यक्तीला शिकविले होते, ते गृहस्थ अगदी ठाम पक्के निघाले. त्यांनी सतत आठ दिवस असे केले आणि नवव्या दिवशी येऊन त्यांनी आम्हाला सांगितले, 'दादा, भगवंत माझ्यावर प्रसन्न झाले, आता मला अजिबात काळजी वाटत नाही.' 'ज्ञानी पुरुषां'च्या वचनांमध्ये वचनबळ असते, त्याचे जर पालन केले तर मग कामच झाले! एक ताई औरंगाबादला आल्या होत्या, त्यांनी आमचे दर्शन घेतले, आणि दोन मिनिटांपर्यंत 'श्रीकृष्ण शरणं मम' असे त्या म्हणाल्या आणि लगेच त्यांना साक्षात् श्रीकृष्ण भगवंतांचे दर्शन झाले!

कृष्णाची गोपीभावाने भक्ती करावी, पण गोपीभाव येणार कुठून?

श्रीकृष्णाची ओळख झाल्याशिवाय गोपी होणार कसे आणि गोपीभाव येणार कसा? श्रीकृष्णाची दोन रूपे आहेत : एक बाळकृष्णाचे आणि दुसरे योगेश्वर श्रीकृष्णाचे. योगेश्वर श्रीकृष्णाला कोणीच ओळखू शकत नाही. म्हणून लोक बाळकृष्णाच्या भक्तीत गुंतले. त्यात प्रसाद, खेळणी, पाळणा वगैरे असते पण त्यातून काय मिळणार? 'पुष्टिधर्म' हे तर बालमंदिर आहे, हा बाळकृष्णाचा धर्म आहे. खरा धर्म हा तर योगेश्वर कृष्णाचा आहे. बाळकृष्ण धर्म तर बालमंदिर आहे. जितकी पाटीची लांबी असेल तिथपर्यंत 1 ते 10 आकडे लिहायचे, एवढेच. धर्म तर योगेश्वर कृष्णांचा असावा. योगेश्वर कृष्णाचा धर्म म्हणजे ज्ञानमंदिर आहे. मोक्ष हवा असेल तर योगेश्वर कृष्णाची भक्ती करा आणि संसारात राहायचे असेल तर बाळकृष्णाची भक्ती करा. श्रीकृष्ण तर नराचे नारायण झाले होते, ज्ञानी होते. आता देवळात देव आहेतच कुठे? दहा हजार वर्षांपूर्वी एका पुस्तकात लिहिले गेले होते की कलियुगात भगवंत जन्माला येतील, ते अनंत प्रकारच्या अनंत कला जाणणारे असतील! नाही तर कलियुगातील माणसे सरळ होणार नाहीत, म्हणून भगवंत स्वत: आले आहेत. येथे तर जैन, वैष्णव, मुस्लिम, ख्रिश्चन सगळ्या धर्मांचा संगम आहे. 'आम्ही' संगमेश्वर भगवान आहोत. इथे श्रीकृष्णवाल्यांना श्रीकृष्ण भेटतात आणि खुदावाल्यांना खुदा भेटतात. कित्येक लोक आमच्याकडून श्रीकृष्णाचे दर्शन करून गेले आहेत. इथे निष्पक्षपाती धर्म आहे.

म्हणजे हे कसे आहे की एक खड्डा खणतो आणि दुसरा खड्डा भरतो. एका जन्मात तो हिंदूच्या घरी जन्माला येतो तेव्हा तो मशीद तोडतो आणि परत दुसऱ्या जन्मात तो मुसलमानाच्या घरी जन्माला येतो तेव्हा देऊळ तोडतो, अशा प्रकारे सगळ्या जन्मात त्याची तोडफोडच चालू आहे. वैष्णवांच्या घरी जन्माला आला की तो जैन लोकांची निंदा करतो आणि जैन लोकांच्या घरी जन्माला आला की वैष्णवांची निंदा करतो. तीर्थंकर, राम, कृष्ण, सहजानंद, क्राईस्ट, पैगंबर आणि झरतुष्ट जे जे कोणी होऊन गेले आहेत, लोक ज्यांना पूजतात त्या सर्वांना आपण व्यवहाराने मान्य करायला हवे आणि जर त्यांना ओळखता आले, तर ते सर्व 'एक'च आहेत आणि जर ओळखता आले नाही, तर 'अनेक'

आहेत. आमच्या इथे सर्व धर्मांचा संगम आहे. आमच्यात आणि इतर कुठल्याही भगवंतात भेद नाही. लाखो ज्ञानींचे मत एकच असते आणि एका अज्ञानीची लाखो मते असतात.

पाच हजार वर्षांपूर्वी कालिया नावाच्या नागाची गोष्ट एक रूपक म्हणून ठेवली होती. पण कालिया नागाला वश करणारे, ते कृष्ण नव्हते. तू सारखा चिडतोस, रागावतोस तोच नाग आहे. कालिया नागाला वश करणे हे तर गारुड्याचे काम होते. तिथे कृष्णाचे काय काम? आणि श्रीकृष्णाला स्वत: नागाला वश करण्याची काय गरज होती? त्यांना काय गारुडी मिळत नव्हता? पण खरी गोष्ट कोणी समजूनच घेत नाहीत आणि ह्या रूपककथेलाच लोक खरे मानतात. जिथे जिथे कालियादमन झाले तिथे तिथे कृष्ण आहे. या कालियादमनामध्ये नाग म्हणजे क्रोध. जेव्हा क्रोधाला वश केले असेल तेव्हा कृष्ण होता येते. जो कर्माला कृश करतो तो कृष्ण!

एक जण मला म्हणाला, 'श्रीकृष्ण भगवंत आईच्या पोटी जन्मले नव्हते ना?' मी त्याला म्हटले, 'मग काय श्रीकृष्ण आकाशातून टपकले होते का? सर्वच देहधारी व्यक्तींना आईच्या पोटीच जन्म घ्यावा लागतो. श्रीकृष्ण तर देवकीच्या पोटी जन्मलेले होते.'

श्रीकृष्ण भगवंतानी *'नियाणां'* केला होता. *नियाणां* म्हणजे काय? आपल्याकडील एखाद्या वस्तूच्या बदल्यात दुसऱ्या एखाद्या वस्तूची इच्छा करणे. वस्तूच्या बदल्यात वस्तूची कामना करणे. स्वत:चे सर्व पुण्य एखादी (विशेष) गोष्ट मिळवण्यासाठी खर्च करणे, याला *नियाणां* म्हणतात. श्रीकृष्ण पूर्व जन्मात एक वाणी होते, त्यावेळी त्यांना अनेक ठिकाणी तिरस्कार मिळाला, मग ते साधू बनले. त्यांनी खूप तप केले, त्याग केला. त्या सर्वांच्या बदल्यात त्यांनी एकच इच्छा धरली. कुठली इच्छा? मोक्षाची की दुसरी एखादी? त्यांची अशी इच्छा होती की साऱ्या जगाने त्यांची पूजा करावी. म्हणून त्यांचे सारे पुण्य या पूजा करावी या इच्छेच्या *नियाण्यात* खर्च झाले. आता त्यांच्या *नियाण्याला* पाच हजार वर्षे पूर्ण होत आहेत.

## पुष्टिमार्ग म्हणजे काय?

वल्लभाचार्यांनी पुष्टिमार्ग सुरू केला. पाचशे वर्षांपूर्वी मुसलमानांचा कहर माजला होता. त्यामुळे हिंदू स्त्रिया घराबाहेर किंवा देवळात जाऊ शकत नसत. हिंदू धर्म संपेल अशा स्थितीत होता. त्यावेळी वल्लभाचार्यांनी काळानुरूप हिंदू धर्माला पुष्टि दिली. घरात बसूनही भक्ती करता येईल असा मार्ग दिला. पण तो धर्म त्या काळापुरताच होता. म्हणून तो धर्म 500 वर्षांपर्यंतच टिकेल असे ते स्वतःच सांगून गेले आहेत आणि आता ती पाचशे वर्षे पूर्ण होत आहेत. आता आत्मधर्म प्रकाशात येईल.

कविराजांनी म्हटले आहे,

*'मुरलीना पडघे झूमी जमुना बोली!*
*श्रीकृष्णना प्रकाशक आवी गया छे.'*

(मुरलीच्या आवाजाने आनंदून यमुना (नदी) म्हणाली 'श्रीकृष्णाला प्रकाशित करणारे आता अवतरले आहेत.')

श्रीकृष्ण खूपच अद्‌भुत पुरुष होते, वासुदेव होते आणि पुढच्या चौवीशीत ते तीर्थंकर बनतील. श्रीकृष्ण तर नैष्ठिक ब्रह्मचारी होते.

**प्रश्नकर्ता :** नैष्ठिक ब्रह्मचारी म्हणजे काय?

**दादाश्री :** ज्यांच्या भावात निरंतर ब्रह्मचर्याचीच निष्ठा आहे, त्यांना नैष्ठिक ब्रह्मचारी असे म्हणतात! अब्रह्मचर्य डिस्चार्ज होत चालले आहे, आणि अखंड ब्रह्मचर्य चार्ज होत आहे! श्रीकृष्ण भगवंतांना सोळाशे राण्या होत्या पण तरी ते नैष्ठिक ब्रह्मचारी होते. हे कसे शक्य आहे ते मी तुम्हाला सांगतो. एक माणूस चोरी करतो पण त्याच्या मनात सतत असा भाव असतो की, 'चोरी करायची नाही.' याला नैष्ठिक अचौर्य असे म्हणतात. 'चार्ज काय होत आहे' हाच त्याचा पुढचा हिशोब आहे! एक माणूस दान देत आहे आणि त्याच्या मनात मात्र 'यांच्याकडून कसे हिसकावून घेऊ' असा भाव असेल तर ते दान मानले जाणार नाही. या इंद्रियांनी जे प्रत्यक्ष दिसते त्याला नवीन कर्मबंधनाचे कारण मानले जात

नाही, पण आत जो नवीन हिशोब बांधत आहे, आत जे चार्ज होत आहे, त्याला कर्मबंधनाचे कारण मानले जाते.

**प्रश्नकर्ता :** तर मग कृष्ण भगवंतांना चारित्र्यवान का म्हटले जाते?

**दादाश्री :** ते नैष्ठिक ब्रह्मचारी होते. पण त्यांच्या चारित्र्याला दुष्चारित्र्य म्हटल्यामुळे त्यांची निंदा झाली आहे. श्रीकृष्ण वासुदेव होते. वासुदेव याचा अर्थ काय? तर जे सर्व गोष्टींचे भोक्ता असतात पण तरी मोक्षाचे अधिकारी असतात, अत्यंत आश्चर्यकारक पुरुष असतात!

## खरा ब्रह्मसंबंध

**प्रश्नकर्ता :** हा जो ब्रह्मसंबंध करवितात म्हणजे काय?

**दादाश्री :** जेव्हा ब्रह्मरस टपकतो तेव्हा ध्यास लागतो आणि तेव्हा ब्रह्मसंबंध जुळतो. 'स्वत:चे स्वरूप' जाणले की खरा ब्रह्मसंबंध झाला असे म्हणतात. क्षणभरदेखील स्वरूपाचा विसर पडत नाही तोच ब्रह्मसंबंध. त्यानंतर क्षणभरही काळजी होत नाही. 'आम्ही' हे 'स्वरूपाचे ज्ञान' देतो, तेव्हा तुम्हाला शुद्धात्म्याचे लक्ष्य निरंतर राहते. यालाच तुम्ही खरा ब्रह्मसंबंध प्राप्त केला असे म्हणता येईल! नाही तर 'गुरुंचा गंडा' वगैरे फार साध्या गोष्टी आहेत. सध्या खरा ब्रह्मसंबंध कोणत्याही मार्गात राहिला नाही. अरे, ज्यांना स्वत:लाच ब्रह्मसंबंध लाभलेला नाही ते दुसऱ्यांना ब्रह्मसंबंध कसा काय मिळवून देतील? वल्लभाचार्यांनी तर वेदांत मार्गाला सुंदर पुष्टी दिली होती. वल्लभाचार्यांच्या काळात लोकांचे आचरण कसे होते? लोक महाराजांचे दर्शन करीत आणि महाराज लोकांच्या शुद्धात्म्याचे दर्शन करीत. पण काल विचित्र आल्यामुळे सगळे काही बदलले आहे. सध्या लोक महाराजांचे दर्शन घ्यायला येतात अशा वेळी महाराजांनी जर लोकांच्या शुद्धात्म्याचे दर्शन केले नाही तर महाराज स्वत:च लुटले जातील! (भयंकर दोष लागेल) पण ही गोष्ट कोणाला समजणार? आता तो काळ संपत आला आहे. आता सर्व रिलेटिव्ह धर्म फार उच्च पातळी वर येतील. आम्ही अपसेट झालेल्या या सर्व रिलेटिव्ह धर्माला पुन्हा अपसेट करून टाकू, त्यामुळे काय होईल? सर्व काही पुन्हा सेटअप होईल!

## कृष्णाचा साक्षात्कार

**प्रश्नकर्ता :** मीरेला, नरसी मेहतांना कृष्णाचा साक्षात्कार झाला होता तो कसा?

**दादाश्री :** मीराबाई आणि नरसी मेहतांना दिसला तो कृष्ण नाही, त्याला पाहणारा तो (खरा) कृष्ण आहे! जो म्हणतो, 'मला आत कृष्ण दिसतो ते तर फक्त दृश्य आहे.' त्या दृश्याला पाहणारा दृष्टा, तोच खरा कृष्ण आहे आणि अशा खऱ्या कृष्णाचा साक्षात्कार तर फक्त 'ज्ञानी पुरुष'च घडवू शकतात. त्या काळी 'ज्ञानी पुरुष' नव्हते म्हणून मीराबाई, नरसी मेहता यांना खरा साक्षात्कार झाला होता असे म्हणता येत नाही; पण मीराबाई, नरसी मेहता, कबीर, अखा, ज्ञानदेव, तुकाराम वगैरे सर्व भक्त आजही येथेच आहेत. यातील कोणीही मोक्षाला गेले नाहीत, आता या काळात आमच्याकडून 'स्वरूपाचे ज्ञान' प्राप्त करून गेले आहेत!

जोपर्यंत तू भक्त आहेस तोपर्यंत भगवंत तुझ्यापासून वेगळे आहेत. जेव्हा भक्त आणि भगवंत एकच होतील तेव्हाच कार्य सिद्ध झाले असे म्हणता येईल. श्रीकृष्णाला तर कोणीच ओळखू शकले नाही. कोणी कृष्णाला बांसरीवाला बनवले, तर कोणी गोपीवाला बनवले. कोणीही फोटो विकतो, आपण ते घेतो आणि त्या फोटोची पूजा करतो. हा सगळा व्यापार आहे! श्रीकृष्ण असे नाहीत, तुम्ही जशी कल्पना करता तसे ते नाहीत. लोक तर बाळकृष्णाचीच भक्ती करतात. कोणीच ज्ञानवृद्ध अशा योगेश्वर कृष्णाची भक्ती करीत नाहीत. बाळकृष्णाला लोक पाळण्यात बसवतात. कृष्ण भगवंत म्हणतात, 'लोक उलटेच वागतात, दर वर्षी माझ्या जन्मदिनाला उपाशी राहतात आणि दुसऱ्या दिवशी मेवामिठाई खातात. असे माझेच भक्त माझ्या विरोधात वागतात. मला मुरलीवाला बनवितात, कपटी म्हणतात, लीला करतो असे म्हणतात, माझ्या बाबतीत जितके उलटे करता येईल तेवढे करतात.' मूर्ताचे दर्शन केल्याने मूर्त बनून जातो आणि अमूर्ताची भजना केल्याने अमूर्त होता येते, त्यानेच मोक्ष प्राप्त होतो. स्वरूपात रममाण होणे हेच चारित्र्य आहे. शुद्ध दशेमुळे अभेदता वाटते. 'आत्मवत् सर्वभूतेषु' असे वाटते, ते निव्वळ

शुद्ध आहे. सर्वात आत्माच दिसतो. ज्ञान, दर्शन, चारित्र्य आणि सुख उत्पन्न झाले हीच ज्योती आहे, हा दिवा म्हणजे ज्योती नव्हे. ज्ञाता-दृष्टा तोच कृष्ण, दृश्य तो कृष्ण नाही.

## मर्यादा पुरुषोत्तम आणि पूर्ण पुरुषोत्तम

**प्रश्नकर्ता :** रामाला मर्यादा पुरुषोत्तम आणि श्रीकृष्णाला पूर्ण पुरुषोत्तम म्हणतात, ते खरे आहे?

**दादाश्री :** खरे म्हणजे, श्रीकृष्णांना पूर्ण पुरुषोत्तम म्हणता येणार नाही, कारण रामाला मोक्ष मिळाला आहे, राम परमात्मा झाले आहेत. कृष्णांना परमात्मा म्हणता येणार नाही, भगवंत म्हणता येईल. अजून त्यांना मोक्ष मिळालेला नाही. येणाऱ्या चौवीशीत तीर्थंकर होऊन मोक्षात जातील. पण मग श्रीकृष्णांना पूर्ण पुरुषोत्तम का म्हटले आहे? तर प्रकटचे महात्म्य गाण्यासाठी. जे मोक्षाला गेलेले आहेत ते आपल्याला काहीच मदत करू शकत नाहीत. अजून ब्रह्मांडात जे हजर आहेत, त्यांची भेट झाली तर आपले साध्य पूर्ण होईल. देवकी, बलराम आणि श्रीकृष्ण, या एकाच कुटुंबातील तिन्ही तीर्थंकर होणार आहेत. त्यांचे चुलतभाऊ नेमिनाथ भगवंत हे बावीसावे तीर्थंकर होते, त्यांचे सगळे कुटुंब सावळेच होते! पण त्यांच्या घराण्यात कमालीचे पुरुष होऊन गेले!

## गीतेचे रहस्य, इथे दोनच शब्दात

**प्रश्नकर्ता :** श्रीकृष्ण भगवंतांनी अर्जुनाला महाभारताचे युद्ध लढण्यास का सांगितले?

**दादाश्री :** भगवंतांना त्यावेळी तसे बोलण्याचे निमित्त होते. अर्जुनाला मोह उत्पन्न झाला होता, क्षत्रिय धर्म असून देखील तो मूर्च्छित झाला होता. म्हणून ती मूर्च्छा दूर करण्यासाठी श्रीकृष्ण भगवंतानी अर्जुनाला सावध केले आणि म्हटले, 'तू मूर्च्छेतून बाहेर ये, तू तुझ्या धर्मात ये. कर्माचा कर्ता किंवा अकर्ता तू बनू नकोस.' श्रीकृष्णांना 'व्यवस्थित शक्तीची' माहिती होती आणि 'व्यवस्थित शक्तीच्या' नियमात

जे होते तेवढेच ते बोलले, पण सामान्य लोकांना हे समजत नाही म्हणून ते म्हणतात, 'भगवंत ज्ञानी असून देखील त्यांनी अर्जुनाला 'या सर्वांना तू मारून टाक' असे का सांगितले?' हा तर कृष्णांचा 'ऑन द मोमेन्ट' – त्या क्षणापुरता उपदेश होता, नेहमीसाठी हा उपदेश केला नव्हता की 'मारलेच पाहिजे.' अर्जुनाला सगळे नातेवाईक पाहून मोह झाला होता. श्रीकृष्ण भगवंताना माहीत होते की थोड्याच वेळात हा मोह दूर होणार आहे म्हणून नैमित्तीक रीत्या श्रीकृष्ण असे बोलले. त्यांनी अर्जुनाला सांगितले, 'तू क्षत्रिय आहेस, तुझ्यातील क्षत्रियाचे परमाणू तुला लढविल्याखेरीज राहणार नाहीत, ज्ञानामुळे आम्हाला हे दिसत आहे की हे तुझे 'व्यवस्थितच' आहे. म्हणून तू खोट्या मोहाला बळी पडू नकोस. 'मारण्यासाठी' मोह सोडून कृती कर, खोटा अहंकार बाळगू नकोस.'

श्रीकृष्णांनी नेमिनाथ भगंवतांकडून दिव्यचक्षु प्राप्त केले होते, त्यानंतर त्यांनी हा गीतेचा उपदेश दिला होता.

गीतेत श्रीकृष्णांना फक्त दोनच शब्द सांगायचे आहेत. पण ते दोन शब्द लोकांना समजतील असे नाहीत, म्हणून गीतेला एवढे मोठे स्वरूप द्यावे लागले आणि ते स्वरूप समजावून सांगण्यासाठी अनेकांना विवेचन करावे लागले. कृष्ण भगवंतानी स्वतःच असे म्हटले आहे, 'मी जे गीतेत सांगू इच्छित आहे, त्याचा स्थूल अर्थ हजारातील एका व्यक्तीला समजेल. अशा स्थूल अर्थ समजणाऱ्या हजारांपैकी एकाला त्या गीतेचा सूक्ष्म अर्थ कळेल. अशा एक हजार सूक्ष्म अर्थ समजणाऱ्या व्यक्तींपैकी एकाला सूक्ष्मतर अर्थ समजेल आणि अशा एक हजार सूक्ष्मतम अर्थ समजणाऱ्यांपैकी एकालाच सूक्ष्मतम अर्थ म्हणजेच माझा आशय समजेल!' फक्त तोच कृष्ण भगवंताना काय सांगायचे आहे ते समजू शकेल. आता या साडे तीन अब्जाच्या वस्तीत कृष्ण भगवंतांना समजण्यासाठी कोणाचा नंबर लागेल? श्रीकृष्ण जे सांगू इच्छित होते ते फक्त दोन शब्दात सांगू इच्छित होते, आणि ते तर जो व्यक्ती स्वतः श्रीकृष्ण झाला असेल तोच समजू शकेल आणि सांगू शकेल. यात इतर कोणाचे कामच नाही. आज 'आम्ही' स्वतः श्रीकृष्ण इथे आलो आहोत, तुला जे कार्य साध्य करायचे असेल

ते साध्य करून घे. कृष्ण काय सांगू इच्छितात? एखादी व्यक्ती मरण पावली तर म्हणतात ना की, 'आतून (शरीरातून) निघून गेले.' म्हणजे काय? तर जो निघून गेला तो 'माल' आहे आणि इथे जे मागे राहिले आहे तो फक्त 'खोका' (पॅकिंग) आहे. या चर्मचक्षूंना दिसते ते फक्त पॅकिंग आहे आणि आत 'माल' आहे, 'मटिरियल' आहे. देर आर व्हरायटीज ऑफ पॅकिंग्स् (पॅकिंगचे खूप प्रकार आहेत.) कोणी आंब्याचे पॅकिंग, कोणी गाढवाचे पॅकिंग तर कोणी पुरुषाचे किंवा 'स्त्री'चे पॅकिंग आहे. पण आत 'माल' शुद्ध आहे आणि एकसारखा आहे. पॅकिंग कसे का असेना, खराब असो, सडलेले असो पण (सच्चा) व्यापारी पॅकिंगची फिकीर करत नाही तर आतला 'माल' बरोबर आहे की नाही ते पाहून घेतो, त्याचप्रमाणे आपणही फक्त आतील 'मालाचे' दर्शन करून घ्यावे.

श्रीकृष्ण म्हणतात, 'पॅकिंगच्या 'आत जो माल आहे' तोच मी स्वत: आहे, तोच कृष्ण आहे, त्याला ओळख तर तुझे (मोक्षाचे) काम होईल. नाही तर लाखो जन्म गीतेचे श्लोक गात बसलास तरी तुझी सुटका होणार नाही!' 'पॅकिंग' आणि 'माल' या दोनच शब्दात श्रीकृष्णाला जे सांगायचे आहे ते सर्व सार सामावले आहे. आणि हे बुद्धिमान् लोक गीतेचा अर्थ सांगत बसतात, त्यावर अनेक पुस्तके लिहितात! मुळात यांना अर्थच सांगता येत नाही आणि मोठी-मोठी विवेचने करून, टीका करून सार काढायला जातात; पण हे सर्व तर स्वत:च्या स्वच्छंदीपणाने कीर्ती मिळविण्यासाठी करतात! नाही तर श्रीकृष्णांचा 'अंतर-आशय' मात्र दोनच शब्दात सामावतो.

मुलगा जर हॉस्टेलमध्ये शिकत असेल तर वडील त्याला कडक शब्दात पत्र लिहितात, 'तू नीट अभ्यास करत नाहीस, माझे पैसे वाया दवडत आहेस, सारखा सिनेमा-नाटक पाहत राहतोस, स्वत: काहीच करत नाहीस.' तेव्हा मुलगा काय करतो? वडिलांचे पत्र मित्राला दाखवतो आणि म्हणतो, 'बघ ना, माझे बाबा कसे आहेत? जंगली आहेत, क्रोधी आहेत, लोभी आहेत, आणि कंजूष आहेत.' मुलगा असे का म्हणतो? कारण त्याला वडिलांचे बोलणे समजतच नाही. वडिलांच्या सांगण्याचा अंतरआशय त्याला

कळतच नाही. वडील आणि मुलगा यांच्या वयात फक्त 25 वर्षाचे अंतर आहे, तरी पण मुलाला वडिलांच्या बोलण्याचा आशय समजत नाही. तर मग श्रीकृष्ण होऊन गेले त्याला तर 5000 वर्षे होऊन गेली, तर 5000 वर्षे इतक्या प्रचंड कालावधीनंतर श्रीकृष्णांना काय म्हणायचे आहे ते कोणाला कसे समजेल? त्यांचा अंतरआशय कोण उलगडून सांगेल? जे 'स्वत:च' श्रीकृष्ण झाले आहेत, तेच तो अर्थ सांगू शकतील. महावीर भगवंतांना जाऊनही 2500 वर्षे होऊन गेली आहेत. त्यांचा अंतरआशय कोणाला कळेल? जे स्वत:च महावीर झाले आहेत तेच तो अर्थ सांगू शकतील.

पूर्वीच्या काळात 25 वर्षांचे अंतर असेल तरी वडिलांच्या बोलण्याचा आशय मुलाला समजत असे, पण आज 25 वर्षाच्या अंतरात मुलाला वडिलांच्या बोलण्याचा आशय समजत नाही. मग श्रीकृष्णाचे बोलणे समजण्याची गोष्ट तर दूरच राहिली. आता गीतेबद्दल खूप लिहिले जाते. पण लिहिणाऱ्याला त्यातले कणभरही समजलेले नसते. हे म्हणजे, 'आंधळ्याला आंधळा भेटला, पोत्यात तीळाला तीळ मिळाले, तेव्हा तीळही राहिले नाही आणि घाणीही राहिली नाही!' (सगळे आंधळेच एकत्र जमले तर ते तीळाचे तेल काढू शकणार नाहीत) यासारखे म्हणायचे. हो, पण ते चुकीचे नाही, खरेच आहे, पण पहिल्या इयत्तेतील गुरुजींच्यासारखे आहे, आणि त्या दृष्टीने ठीक आहे. पण येथे आमच्याकडे कशी गोष्ट असते? कॉलेजच्या शेवटच्या वर्षाची गोष्ट असते. आणि तिथे पहिल्या इयत्तेसारखे गीतेचे विवेचन केले जाते. फक्त ज्ञानी पुरुषांकडूनच सर्व शास्त्रांची यथार्थ गोष्ट समजू शकते.

## अर्जुनाला झालेले विराट दर्शन

**प्रश्नकर्ता :** श्रीकृष्ण भगवंतांनी अर्जुनाला विश्वदर्शन घडविले होते, म्हणजे काय केले होते?

**दादाश्री :** ते विश्वदर्शन म्हणजे आत्मज्ञान नव्हे. हजारो लोक जन्माला येतात, मरतात, पुन्हा जन्माला येतात, असे कालचक्र सतत चालत असते, म्हणून कोणी मारणारा नाही, कोणी वाचविणारा पण नाही. म्हणून

हे अर्जुना, तू मारणार आहेस असा तुला जो मोह आहे तो चुकीचा आहे, तो सोड. आणि यासाठी श्रीकृष्णांनी अर्जुनाला भयंकर रौद्रस्वरूप दाखविले होते, सगळ्यांना मृत दाखविले होते. असे विराट स्वरूप अर्जुनाला दाखविले. एकदा तर अर्जुन फार घाबरला. मग त्यातून त्याला समज आली आणि तो युद्धाला तयार झाला. नंतर श्रीकृष्णांनी अर्जुनाला सौम्यरूप दाखविले. या प्रकारे श्रीकृष्णांना जे दिसले होते ते त्यांनी अर्जुनाला दाखविले. या विराट स्वरूपालाच आपण 'व्यवस्थित' असे म्हणतो.

खिसा कापला गेला तरी पण ते 'व्यवस्थित', मग त्याचा काहीच परिणाम होत नाही, पुढची वासना निर्माण होत नाही. मोह उत्पन्न होत नाही. आतून प्रेरणा झाली की चालायला लागायचे. ही सगळी तर मशीनरी आहे, 'व्यवस्थित शक्ती' चालवेल तशी ती चालते.

## सुदर्शन चक्र

**प्रश्नकर्ता :** श्रीकृष्णाकडे सुदर्शन चक्र होते ते काय होते?

**दादाश्री :** नेमिनाथ भगवंतांनी त्यांना जे सम्यक् दर्शन दिले ते! सुदर्शन म्हणजे सम्यक् दर्शन, त्याचे मग लोकांनी चक्राचे चित्र काढले! लोक असे समजू लागले की हे चक्र लोकांना कापून टाकते!

एका महाराजांनी मला विचारले, 'मी ऐकले आहे की तुम्ही एका तासात दिव्यचक्षु देता, ते केवढे असतात?' मी सांगितले, 'बैलगाडीच्या चाकाएवढे.' आता त्यांना काय सांगणार? श्रीकृष्णानी अर्जुनाला गीतेचा उपदेश देते वेळी जे दिव्यचक्षु फक्त पाच मिनिटांसाठीच दिले होते ते दिव्यचक्षु आम्ही तुम्हाला एका तासात कायमचे–परमनन्ट देतो, त्यामुळे तुम्हाला 'आत्मवत् सर्वभूतेषु' असे दिसते. 'ज्ञानी पुरुष तुमच्या अनंतजन्मांच्या पापांची गुंडाळी करून जाळून टाकतात.' असे श्रीकृष्णानी सांगितले आहे. फक्त पापेच जाळून टाकतात असे नाही, तर त्याचबरोबर ते तुम्हाला दिव्यचक्षु देतात आणि 'स्वरूपाचे' 'लक्ष्य' बसवून देतात! या अक्रममार्गातील 'न भूतो न भविष्यति' असे 'ज्ञानी पुरुष' प्रत्यक्ष प्रकट आहेत, ते हजर आहेत तोपर्यंत तुमचे मोक्षाचे ध्येय साध्य करून घ्या!

## वेद, तीन गुणांतच आहेत

श्रीकृष्ण भगवंतानी गीतेत सांगितले आहे की, 'वेद तीन गुणांच्या बाहेर जात नाहीत, वेद त्रिगुणांनाच (सत्व, रज आणि तम) प्रकाशमान करतात.' श्रीकृष्णांनी नेमिनाथ भगवंतांना भेटल्यानंतर गीता सांगितली, त्यापूर्वी ते वेदांती होते. त्यांनी गीतेमध्ये म्हटले आहे, 'त्रैगुण्य विषयो वेदो निस्त्रैय गुण्यो भवार्जुन!' हे महावाक्य ते बोलले आहेत. 'आत्मा जाणण्यासाठी त्रिगुणांच्या पलीकडे जावे लागेल, असे म्हटले आहे.' वेदांतापलीकडे जावे लागेल, असे म्हटले आहे. ते म्हणाले, 'अर्जुन! आत्मा जाणण्यासाठी तू त्रिगुणांच्या पलीकडे जा.' त्रिगुण कोणते? सत्व, रज आणि तम. वेद फक्त या तीन गुणांचेच शास्त्र सांगतात, म्हणून तू त्यांच्या पलीकडे गेलास तरच तुला आत्मज्ञान होईल. शिवाय हे तीन गुण द्वंद्वात्मक आहेत. म्हणून तू त्रिगुणात्मकच्या पलीकडे जाऊन द्वंद्वातीत हो आणि आत्म्याला समज! आत्मा जाणण्यासाठी श्रीकृष्णांनी वेदांताच्या पलीकडे जाण्यास सांगितले आहे. पण लोकांना हे समजत नाही. चारी वेद सांगून झाल्यावर वेद स्वतःच काय म्हणतात, 'दिस इज नॉट दॅट, दिस इज नॉट दॅट' तुला जो आत्मा हवा आहे तो ह्यात नाही. 'न इति, न इति,' म्हणून जर तुला आत्मा हवा असेल तर 'गो टु ज्ञानी' ('ज्ञानी पुरुषां'कडे जा).

श्रीकृष्ण भगवंतानी म्हटले आहे – 'हे जग ईश्वराने बनविलेले नाही, ते स्वभाविक रूपाने बनलेले आहे!'

## खरा संन्यास आणि निष्काम कर्म

श्रीकृष्ण भगवंतानी मोक्षासाठी दोन मार्ग सांगितले आहेत: एक संन्यास आणि दुसरा निष्काम योग.

संन्यास शब्द फार मोठा-उच्च आहे, पण कोणी त्याचा अर्थ समजून घेत नाही. भगवी वस्त्रे घालणाऱ्या सर्वांना लोक संन्यासी म्हणू लागले! संन्यास याचा अर्थ न्यास, आत्म्याला मन-वचन-काया या सर्वांपासून खेचून आत्म्यात ठेवणे, याला संन्यास म्हणतात. जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' आत्म्याचे ज्ञान देत नाहीत तोपर्यंत कोणीही संन्यासी बनूच शकत नाही. जो शेतात

गेला आहे तो घरात नसतो आणि जो घरी आहे तो शेतात नसतो. त्याच प्रकारे जो धर्म संन्यासी आहे तो सतत आत्म्यातच स्थित असतो.

निष्काम कर्मयोगाबद्दल लोक म्हणतात, 'काम कर पण फळाची आशा धरू नकोस' अहो, फळाच्या आशेशिवाय जीवजंतुदेखील घराच्या बाहेर जात नाहीत. फळाची आशा ठेवल्याशिवाय कोणीच काम करत नाही. चपलांच्या आशेशिवाय कुणी चांभाराकडे जातो का? फळाच्या आशेशिवाय तर कोणीच काम करत नाही. 'आज बाजारात भाजी मिळणार नाही', असे कळले तर कोणी भाजी घ्यायला जाणारच नाही. तरी पण असे म्हणावे लागते की, 'फळाची आशा न ठेवता तू काम कर.' यामुळे काम करते वेळी हे वाक्य बोचत असते की भगवंतांनी तर फळाची आशा न ठेवता काम करण्यास सांगितले आहे, त्यामुळे त्याचे फळ चांगले येते. फळाची आशा न ठेवता काम केले तर लोकांची प्रगती होईल, पण श्रीकृष्ण काय म्हणतात ते लोकांना समजलेले नाही. भगवंतानी म्हटले आहे, 'जर तू भाजी घ्यायला गेलास तर भाजीची आशा ठेव, पण भाजी घेतल्यानंतर जर ती कडू निघाली तर जी भाजी घेतली गेली तेच तुझे फळ होते. त्यात फळाची आशा धरू नकोस. म्हणजेच राग–द्वेष करू नकोस. जे घडले ते मान्य कर.' जर खिसा कापला गेला तर मन:शांती बाळग, शोक करत बसू नकोस. समता ठेव, राग–द्वेष करू नकोस. घरून साडी आणण्यासाठी बाहेर पडले तर साडीची आशा तर असणारच, पण खरेदी केल्यानंतर साडी खराब निघाली तर डिप्रेस (निराश) होऊ नकोस. साडी कशीही निघो, जशी निघाली तशी निघाली, त्यात फळाची आशा धरू नकोस. राग–द्वेष करू नकोस. असे श्रीकृष्णांना सांगायचे आहे. चपलांच्या आशेशिवाय चांभारकडे कोण जाणार? चांभाराकडे जावे पण चांगली की वाईट, प्रिय की अप्रिय अशी आशा धरू नकोस. म्हणजेच प्रिय किंवा अप्रिय याची आशा न बाळगणे, तेच निष्काम कर्म.

भगवंतानी गीतेत सांगितले आहे, 'अभ्यास करा.' पण आता लोकांनी इतका अधिक अभ्यास केला की त्याचा आता अध्यास झाला. अध्यास सोडण्यासाठी श्रीकृष्णानी अभ्यास करायला सांगितले, पण अभ्यासाचाच आता अध्यास झाला!

श्रीकृष्णांच्या एकाही शब्दाचा अर्थ आज कोणी जाणत नाही. सर्व क्रिया करताना 'मी करत आहे' असे भान नसणे यालाच संन्यस्त योग म्हणतात आणि अशा व्यक्तीलाच संन्यासी म्हणतात! आजकालच्या संन्यासी लोकांमध्ये एक थेंब पण संन्यस्त वृत्ती नाही. आत्मा आत्म्यातच ठेवणे म्हणजे संन्यस्त योग! संपूर्ण संन्यासी म्हणजे धर्म संन्यास. तर इथे हा आपला अंतिम संन्यास आहे, इथे आत्मा आत्म्यात राहतो, आत्मा शुद्धात्म्यातच वर्तती. आपला हा असा अलौकिक धर्म आहे! इतर लौकिक धर्मात तर आत्म्यातून संन्यस्त घेऊन देहात टाकतात!

श्रीकृष्ण भगवंतानी सांगितले आहे की हे तीन गुण ज्याच्याजवळ आहेत तोच खरा संन्यासी. मग तो गृहस्थ असो, त्यागी असो किंवा अन्य कोणी असो :

1. कर्तृत्वाचा अभिमान नसतो.
2. कसलीही आसक्ती नसते.
3. त्यांना कसलीही कामना नसते.

आसक्ती हा तर देहाचा गुण आहे. तो कसा? तर लोहचुंबक आणि टाचणी यात जसा संबंध आहे तसाच. देहाला फीट बसतील (जुळतील) अशा परमाणूंकडे देह ओढला जातो. यात आत्म्याचे काहीच घेणेदेणे नसते. लोक मात्र भ्रांतीमुळे 'मी ओढला गेलो' असे मानतात. आपल्याला तर देहाने आसक्ती आहे आणि आत्म्याने अनासक्त आहोत. आत्मा ओढला जात नाही. आत्मा ज्या गोष्टीत तन्मयाकार होत नाही त्या गोष्टींचा त्याग वर्तत आहे असे म्हटले जाते. कर्तृत्वाचा अभिमान हीच आसक्ती आहे.

स्वरूपाची प्राप्ती झाल्यावर तुमच्या मनाचे परिणाम जरी कितीही उसळत असतील तरी पण तुमच्यावर त्याचा इफेक्ट होत नाही. 'ज्ञानी'मध्ये आणि तुमच्यामध्ये फरक किती? तर 'उपाधी' एवढा. ज्ञानींना कसली उपाधी नसते, तुम्हाला मात्र उपाधींचा त्रास होतो!

❖❖❖❖❖

# स्थितप्रज्ञ की स्थितअज्ञ

एक महापंडित आमची परीक्षा घेण्यासाठी आले होते, त्यांनी विचारले, 'स्थितप्रज्ञ दशा म्हणजे काय?' मी त्यांना समजावले, 'तुम्ही स्वत: स्थितअज्ञ स्थितीत आहात! तुम्ही या किनाऱ्यावर आहात तर स्थितप्रज्ञ दशेच्या समोरचा किनारा कसा असेल ते आता तुम्हीच ओळखा.' मी त्यांना आणखी म्हटले, 'तुम्हाला गोड वाटेल असे बोलू की कडू बोलले तरी चालेल? तुम्ही स्थितअज्ञ दशेत आहात, पांडित्याच्या नशेने फिरत आहात यापेक्षा दारूची नशा बरी, कारण पाणी ओतल्यावर ती उतरते. तुम्ही तर कायम धुंदीतच असता. झोपेत देखील तुमची ही नशा जात नाही. 'आमचे' पाच मिनिटे दर्शन घेतले तरी तुमचे जन्मोजन्मीचे कल्याण होईल असे आहे. इथे तुम्हाला सर्व भगवंतांचे दर्शन होऊ शकेल, तुम्हाला ज्या भगवंतांचे दर्शन करायचे असेल ते तुम्ही करा.'

स्थितप्रज्ञ दशा ही अनुभव दशा नाही. 'हा आत्मा आहे आणि इतरांहून तो पर आहे' अशा शब्दांनी भेद करणे सुरू झाले की स्थितप्रज्ञ दशा सुरू होते आणि तेव्हापासून ते थेट आत्म्याच्या प्रत्यक्ष अनुभव येईपर्यंत जी दशा असते तिला स्थितप्रज्ञ दशा असे म्हणतात! श्रीकृष्ण भगवंतानी जो मार्ग दाखविला तो स्थितप्रज्ञ दशेपर्यंत जातो, पण त्यापुढेही अजून खूप जायचे आहे! आम्ही तुम्हाला स्वरूपाचे ज्ञान देतो तेव्हा तुम्ही स्थितप्रज्ञ दशेहून अधिक उच्च दशेत असता. स्थितप्रज्ञ दशा आणि आत्मा जाणणे यात खूप फरक आहे. स्थितप्रज्ञ म्हणजे प्रज्ञेत स्थित होणे, पण ती रिलेटिव्ह प्रज्ञा आहे, त्यानंतर त्याला अजून आत्मज्ञान प्राप्त

करायचे बाकी आहे आणि आपल्याकडे जी प्रज्ञा आहे ती आत्मा प्राप्त झाल्यानंतरची आहे, त्यामुळे राग-द्वेष न करता समभावाने प्रश्न सुटतात! स्थितप्रज्ञ दशा म्हणजे तो शुद्ध झालेल्या बुद्धीने आत्म्याचे गुणधर्म जाणतो आणि ओळखतो, पण यात अनुभूती येत नाही. स्थितप्रज्ञ दशेमुळे जगाला आणि सर्व तत्त्वांना जाणतो, ओळखतो याला 'शुद्ध समकित' असे म्हणतात, आम्ही जे स्वरूपाचे ज्ञान देतो त्यामुळे आत्म्याचा प्रत्यक्ष अनुभव येतो. याला 'परमार्थ समकित' असे म्हणतात. त्यामुळे जगाला आणि जगातील सर्व तत्त्वांना पाहता येते, ओळखता येते आणि त्याचा अनुभवही घेता येतो.

स्थितप्रज्ञ दशेमुळे व्यक्ती इमोशनल होत नाही. मोशनमध्ये राहतो ती स्थितप्रज्ञदशा, पण स्थितप्रज्ञ दशेतून समाधी उत्पन्न होत नाही. ज्ञानाशिवाय समाधी उत्पन्न होत नाही. भ्रांती गेली तरच समाधी उत्पन्न होते!

गीतेमध्ये श्रीकृष्ण अंतिम स्टेशन कशाला म्हणतात? गीतेमध्ये स्थितप्रज्ञ दशा हेच अंतिम स्टेशन आहे. 'ही स्थितप्रज्ञ दशा प्राप्त कर' असे ते सांगतात, पण लोकांना त्यांना विचारावे लागले, 'स्थितप्रज्ञ व्यक्ती काय खातात? काय पितात?' तेव्हा श्रीकृष्णांना सांगावे लागले, 'जे प्रज्ञेत स्थिर झाले आहेत ते असार एका बाजूला ठेवतात आणि फक्त सार ग्रहण करतात, ती स्थितप्रज्ञ दशा!' आणि तुमची ही शुद्धात्म दशा तर त्याहून खूप उच्च दशा आहे. श्रीकृष्णांनी लिहिले आहे ना, की 'तू वीतराग झालास तर निर्भय होशील.'

## प्रज्ञाशक्ती

दोन प्रकारच्या शक्ती आहेत. आत्म्याचे स्वरूप तर सर्वच ठिकाणी सारखे आहे. जैनांमध्ये, मजुरांमध्ये सगळ्यांचेच आत्मे एकाच स्वरूपाचे आहेत. पण तरीही फक्त दोन प्रकारच्या शक्ती उत्पन्न होतात. फक्त अज्ञानाचेच संयोग जुळले तर 'अज्ञाशक्ती' उत्पन्न होते. त्याला अज्ञानब्रह्म असे म्हणतात, त्यातून जग निर्माण होते. ही अज्ञाशक्ती शेवटपर्यंत

संसाराच्या बाहेर पडू देत नाही, पूर्ण संसारकाळ संपेपर्यंत, अनंत काळापर्यंत अज्ञाशक्तीच सगळे चालविते. जेव्हा 'ज्ञानी पुरुषां'चा संयोग लाभतो तेव्हा ते ज्ञान देतात, त्यानंतर मग प्रज्ञाशक्ती उत्पन्न होते. याला 'प्रज्ञानब्रह्म' असे म्हणतात. प्रज्ञा, ही अज्ञान संयोगांचा वियोग करवून (अज्ञानाचे) विसर्जन करते, आणि सतत मोक्षाकडे, मुक्तीकडे प्रयाण करविते. 'ज्ञानी पुरुष' भेटल्याशिवाय प्रज्ञा उत्पन्न होऊच शकत नाही. प्रज्ञाधारी व्यक्तीला ब्रह्मशक्ती उत्पन्न झाल्यावर अज्ञाशक्तीचा नाश होतो, त्यानंतर प्रकृतीशक्ती सर्व चालवून घेते.

प्रज्ञाशक्तीचा स्वभाव कसा आहे? कुठूनही, कसेही करून संसार व्यवहार सोडवत सोडवत मोक्षाला नेणे हा तिचा स्वभाव आहे. आणि अज्ञाशक्ती सतत काय प्रयत्न करत असते? ती संसाराच्या बाहेर जाऊच देत नाही. यात आत्म्याला काहीच करावे लागत नाही, अज्ञाशक्ती किंवा प्रज्ञाशक्ती ही आपली स्वत:ची शक्ती नसते तर सायन्टिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्मुळे निर्माण होते. 'ज्ञानी पुरुषांचा' अंतिम संयोग लाभला आणि ज्ञानप्राप्ती झाली की प्रज्ञा उत्पन्न होते आणि ती आतून सतत वारंवार सावधान करत राहते, आपल्याला असे वाटू लागते 'की आत हे नवीन कोण शिरले आहे?' आम्ही शुद्धात्मा देतो, तेव्हा तुमच्या आत प्रज्ञेला बसवून देतो. भरत राजाला जसे दर पंधरा मिनिटांनी त्याचे नोकर 'भरत सावध हो, सावध हो,' असे सावध करीत असत. तशीच प्रज्ञा तुम्हाला सतत सावध करीत राहते. आजकाल तुम्ही 150–200 रुपयांची नोकरी करता त्यामुळे 24 तास, तीन नोकर ठेवणे तुम्हाला कसे परवडेल? म्हणून आम्ही तुमच्या आतच चोवीस तासांचा नोकर बसवून देतो, ती प्रज्ञाच तुम्हाला क्षणोक्षणी सावध करीत राहते. बाहेरची एखादी फाइल हजर झाली की ताबडतोब प्रज्ञा पण हजर होते आणि ज्ञान वाक्यांची आठवण करून देत जागृत करते आणि आलेल्या फाइलीचा समभावाने निकाल करवून देते.

प्रज्ञा ही तर आत्म्याचेच एक अंग आहे. ती आत्म्याचे आणि बाहेरचे संधान करवून देते. शुद्धात्मा तर शुद्धच आहे पण प्रज्ञा काय

करते? तर व्यवहाराला व्यवहारात ठेवते, आणि तहेवाराला तहेवारात ठेवते आणि स्वत:ला शुद्धात्म्यात ठेवते. प्रज्ञा निरंतर संसारातून बाहेर काढत राहते आणि मोक्षाकडे घेऊन जाते. आत्म्याचे अनंत प्रदेश आहेत त्या सगळ्यांवर आवरणे आहेत. तुम्हाला ज्ञान दिले गेले आहे त्यामुळे रोज थोडीथोडी आवरणे तुटत जातात आणि तसातसा प्रकाश वाढत जातो, (स्वत:चे) दोष दिसू लागतात आणि जेवढे दोष दिसतात तेवढे पळून जातात. हा तर दोषांनी पूर्णपणे भरलेला पुतळा आहे आणि हे सगळे दोष संपल्यावर मोक्ष मिळतो! ज्ञान मिळाल्यावर तुम्ही आणि चंदुभाई वेगळे होतात, नंतर प्रज्ञेमुळे चंदुभाईचे दोष दिसू लागतात. जेवढे दोष दिसतात तेवढे दोष निघून जातात. ज्ञान नव्हते तेव्हा फक्त दोषच ग्रहण केले जात होते, घ्यायचे नव्हते तरी ते घुसत होते, आता ज्ञान मिळाल्यानंतर दोष सुटत जातात आणि जेवढेजेवढे दोष निघून जातात त्या त्या प्रमाणात तुम्ही 'वीतराग' होत जाता! अंतिमत: परमात्म स्वरूप व्हायचे आहे पण आत्मस्वरूप प्राप्त झाल्याशिवाय खरी समजशक्ती येत नाही. वीतराग भगवंत आत्मस्वरूप झाले होते आणि म्हणून समजून-उमजून दोषांचा निकाल लावला आणि मोक्षाला गेले!

केवलज्ञानाच्या अंशाच्या भागाला प्रज्ञा म्हणतात. एकेका आत्म्यात संपूर्ण ब्रह्मांड प्रकाशित करण्याची शक्ती असते! या खोक्यातून (देहातून) निरावरण होऊन बाहेर पडला तर प्रत्येक आत्म्यात सर्व ब्रह्मांड प्रकाशित करण्याची शक्ती आहे! म्हणून तर या वेदांती लोकांनी म्हटले आहे, 'आत्मा सर्वव्यापी आहे.' सर्वव्यापी, पण कशा प्रकारे? आत्म्याचा प्रकाश पूर्णरूपाने सर्वव्यापी आहे आणि तो संपूर्ण प्रकाश पसरल्यावर आत्मा इथे खिचडी खायला का बसून राहील? तो मग सिद्धक्षेत्री जाऊन पोहोचतो!

स्वत: मध्ये स्वत:ची पूर्ण ब्रह्मांडाला प्रकाशित करण्याची जी स्वसंवेदनशक्ती आहे तिला केवलज्ञान म्हणतात. आम्ही ज्ञान दिल्यानंतर रात्री जी अनुभवास येते ती स्वसंवेदनशक्ती आहे. देह आहे म्हणून त्याच्या अनुषंगाने स्वसंवेदन सांगत आहोत, नाही तर वेदना नसतेच ना!

जे परके आहे त्याला कधीही आपले मानू देत नाही आणि जे आपले आहे त्याला कधीच परके मानू देत नाही, असे जी करते ती प्रज्ञा! सत्संगामुळे प्रज्ञाशक्ती उमलत जाते. जर किंचितमात्रही परकी गोष्ट ती आपली मानली नाही, तर तो परमात्माच आहे. 'स्वतःचे' आणि 'परके' यांना वेगवेगळे ठेवण्याचे श्रद्धेत आहे, परंतु वर्तनात नाही, ती प्रज्ञा आहे. अशी श्रद्धा तीच प्रज्ञा आहे आणि वर्तन तोच आत्मा आहे, तेच चारित्र्य आहे. वर्तन म्हणजे आत्मा आणि अनात्मा यांना एकाकार होऊ न देणे, ते.

कर्मबंधन कशामुळे होते? अज्ञानामुळे, आणि मोक्ष कशामुळे होतो? प्रज्ञेमुळे. आत्मा प्राप्त झाल्यानंतर प्रज्ञा उत्पन्न होते आणि ती 'रियल' आणि 'रिलेटिव्ह' दोघांना सांभाळते. अज्ञा काय म्हणते? 'मी केले, मी भोगले'; याउलट प्रज्ञा काय म्हणते? ती म्हणते, 'मी कर्ता नाही! कोणी शिवी दिली तरी पण तो कर्ता नाही.' प्रज्ञा उत्पन्न झाल्यानंतर राग- द्वेष नष्ट करता येतात. आत्म्याला काहीच करावे लागत नाही. हा 'अज्ञा' शब्द आम्हाला आतून स्फुरला आहे, आम्ही हा नवीन शब्द वापरला आहे. प्रज्ञा म्हणजे काय ते समजून देण्यासाठी आम्ही अज्ञा शब्द वापरला. प्रज्ञा म्हणजे काय ते समजून देण्यासाठी आम्हाला हा अज्ञा शब्द वापरावा लागला, कारण जो प्रज्ञेला समजतो त्यालाच 'अज्ञा' म्हणजे काय ते समजेल. क्रमिक मार्गात अहंकाराला शुद्ध करत-करत पुढे जायचे असते, तिथे सगळे मनाने करावे लागते; आणि या 'अक्रम' मार्गात प्रज्ञादशेने सगळे होत असते. आत्म्याच्या प्रज्ञा ह्या भागामुळे सर्व काही होते. अज्ञाभागामुळे प्रवेश झाला आणि प्रज्ञाभागामुळे सुटका होते. कोणत्या भागामुळे प्रवेश झाला हे एकदा कळले की मग सुटण्याचा मार्ग पण मिळतो. जी शक्ती तुला संसारात वारंवार अडचणी निर्माण करते तिला ओळख की मग प्रज्ञाशक्तीला ओळखता येईल. अज्ञसंज्ञा ही 84 लक्ष योनींमध्ये भटकवणारी गोष्ट आहे. कार्यरूपात स्थित अज्ञदशेमुळे संसार उत्पन्न होतो आणि कार्यरूपात स्थित प्रज्ञेमुळे संसाराचा विलय होतो. आत्मा प्राप्त झाल्यानंतर बुद्धीचा आधार तुटतो आणि

प्रज्ञाधारी बनतो. जेव्हा ज्ञान 'टॉप'वर येते तेव्हा प्रज्ञाधारी म्हटले जाते आणि ते आत्मज्ञान डायरेक्ट आमच्याकडून मिळते!

या दोन शक्तीपैकी दुसरी शक्ती, अज्ञाशक्ती ही तर आपण स्वत:च 'मी कर्ता आहे' असा अहंकार करून ओढून घेतली आहे. ही अज्ञाशक्ती प्रत्येकाची स्वतंत्र असते, प्रत्येक जीवाला असते आणि सगळ्या अज्ञाशक्ती एकत्र आल्या की त्यातून 'व्यवस्थित शक्ती' उत्पन्न होते. प्रत्येकांत अज्ञाशक्ती असते, प्रत्येकाच्या कपाळावर रेग्युलेटर ऑफ द वर्ल्ड हे असतेच. म्हणून त्यासोबतच सर्व कामे होत राहतील, म्हणजे त्यासाठी तुम्हाला काही करावे लागेल असे नाही, व्यवहार आपलेआपण चालू राहील. माणसाच्या डोळ्यात प्रकाश कशामुळे येतो आणि कशामुळे जातो हे कुणाला समजते? डॉक्टर तर फक्त निमित्तच असतात, ते थोडेच वाचवितात? जर डॉक्टर वाचविणारा असेल तर त्याची आई मृत्यू पावली, वडील मृत्यू पावले, मग त्यांना वाचवायचे होते ना! हे जग 'व्यवस्थित शक्तीच्या' आधाराने चालते आणि तुमचा व्यवहार सुद्धा त्याच शक्तीने चालत राहिल.

अज्ञाशक्तीमुळेच जगाची अधिकरण क्रिया होत राहते आणि क्रमिक मार्गात ती शेवटपर्यंत चालू असते, आणि शेवटी जेव्हा प्रज्ञाशक्ती उत्पन्न होते तेव्हा अज्ञाशक्ती निरोप घेते आणि मग ती प्रज्ञाच थेट मोक्षापर्यंत घेऊन जाते. इथे अक्रम मार्गात ज्ञान मिळाल्याबरोबरच प्रज्ञा उत्पन्न होते, मग तुम्हाला काही करावे लागत नाही. प्रज्ञाच सगळे काही करत राहते. ही प्रज्ञा कशामुळे उत्पन्न होते? तर सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्च्या आधाराने! असे एविडेन्सेस् उत्पन्न झाले तर सिद्ध भगवंतांना देखील प्रज्ञा उत्पन्न होईल. पण त्यांच्या बाबतीत असे एविडेन्सेस् उत्पन्न होतच नाहीत. आणि इथे तर समसरण मार्ग आहे त्यामुळे सतत संयोगाच्या धक्क्याने अज्ञाशक्ती उत्पन्न होते आणि जर कधी 'ज्ञानी पुरुषां'च्या भेटीचा योग जुळला तर प्रज्ञाशक्ती उत्पन्न होते आणि अज्ञाशक्ती निरोप घेते.

❖❖❖❖❖

# वेदांत

समकित प्राप्त करण्याचे दोन मार्ग आहेत: वेदांतमार्ग आणि जैनमार्ग. भगवंतानी म्हटले आहे, 'वेदांत मार्गाने गेलास तरी समकित प्राप्त होईल आणि जैन मार्गाने गेलास तरी समकित प्राप्त होईल.' पण वेदांतमार्गी लोकांना सांगितले, 'तुम्ही जैन शास्त्रे वाचा!' आणि जैन लोकांना सांगितले, 'तुम्ही वेदांत शास्त्रे वाचा!'

**प्रश्नकर्ता :** सगळ्या धर्मांचे लोक कधी एक होऊ शकतील का?

**दादाश्री :** नाही, या 360 डिग्री असतात, त्या सर्व डिग्री कधी एक होऊ शकतील का? नाही. ह्या सर्व वेगळ्यावेगळ्या डेव्हलपमेंट्स आहेत आणि त्या राहणारच.

**प्रश्नकर्ता :** जैन आणि वैष्णव म्हणजे काय?

**दादाश्री :** वैष्णव बिलो नॉर्मल (सामान्य सीमेच्या थोडे खाली) असतात आणि जैन आणि वेदांती अबॉव नॉर्मल (सामान्य सीमेच्या थोडे वरती) असतात. वीट असते ती एकदम कच्ची पण चालत नाही आणि जास्त पक्की-जळलेली पण चालत नाही, योग्य तऱ्हेने भाजलेली वीटच लागते. त्याचप्रमाणे धर्मात आणि जीवनात सगळ्यांनी नॉर्मालिटीत (सर्वसामान्य) स्थितीतच यावे लागेल.

एखाद्या व्यक्तीने जर भगवंताना विचारले की, 'आम्ही जैन धर्माचे पालन करतो, मग आम्हाला मोक्ष मिळेल का?' तर भगवंत म्हणतील

'तुझे जैन परमाणू असोत किंवा वेदांत परमाणू असोत, जे परमाणू असतील ते, पण ते सर्व परमाणू संपतील तेव्हा मोक्ष होईल!' जैनांना जैनांचे आणि वेदांतींना वेदांताचे सर्वच परमाणू संपवावे लागतील, तेव्हा मोक्ष मिळेल!

जिथे पाप आणि पुण्य दोन्हीही 'हेय' आहेत, अशा मार्गाला भगवंतानी मोक्षमार्ग म्हटले आणि बाकीचे सर्व अन्य मार्ग आहेत असे म्हटले. अन्य सर्व व्यवहार मार्ग 'आहेत, ज्यात पाप-पुण्य उपादेय आहेत तो व्यवहार मार्ग आहे.

## अज्ञानामुळेच मोक्ष थांबला आहे

जैनांमध्ये सांगितले गेले की 'राग-द्वेष आणि अज्ञान काढून टाक' आणि वेदांमध्येही सांगितले गेले की 'मल, विक्षेप आणि अज्ञान काढून टाक.' म्हणजे या दोन्हींमध्ये अज्ञान कॉमन आहे, मुख्य आहे. जर ज्ञानींकडून 'ज्ञान' मिळाले तर सर्व अज्ञान निघून जाईल!

जैन सांगतात 'उपयोग ठेवा.' आणि वेदांत सांगतात 'साक्षीभाव ठेवा.' साक्षीभावात राहण्याचा तो प्रयत्न करतो पण लग्नप्रसंगी तर साक्षीभावात राहता येत नाही! हे सगळे तर उपचार आहेत. जोपर्यंत ज्ञानी पुरुष भेटत नाहीत तोपर्यंत काहीतरी औषध लावावे लागेलच ना? उपचार करायला हवेतच ना? आणि ज्ञानी पुरुष लाभले की मग कामच झाले समजा!

आत जे विराजमान आहेत ते 'शुद्धात्मा' भगवान आहेत. त्यांनी मला योग जुळवून दिला आहे. त्यांचे काम 'योगक्षेम' करून देण्याचे आहे. आता त्यांनी तुम्हाला योग जुळवून दिला आहे म्हणून तर तुमची 'आमच्याशी' भेट झाली आहे. अत्यंत दुर्लभ अशा ज्ञानी पुरुषांशी भेट झाली आहे, तेव्हा आता 'ज्ञानी पुरुष' तुमचे 'क्षेम' (कल्याण) करतील. 'ज्ञानी' हवे ते करू शकतात! 'योग' झाला म्हणजे काम झाले. 'शुद्धात्मा' योग मिळवून देतात तिथे जर अतिशहाणपणा करून बुद्धी चालवाल तर वाट लागेल ना? हा स्वच्छंदीपणाचा रोग क्रॉनिक झाला आहे! स्वच्छंदी

म्हणजे दीड शहाणा. जर मला दादरला जायचे असेल तर मला प्रथम दादरचे ज्ञान असले पाहिजे आणि जर तिथले घर सापडत नसेल तर तेथील एखाद्या जाणकाराला मी विचारले पाहिजे. त्याचप्रमाणे मोक्षाला जाण्यासाठी एखाद्या जाणकाराला विचारले पाहिजे. भीमाने तर एका तांब्याला गुरु केले, त्या तांब्यावर 'ॐ नमः शिवाय' लिहिले आणि शिव प्रकट झाले. तो तर भीम! त्याला सहज सगळ्यांवर अभाव होत असे! त्यामुळे तुला ज्याच्याबद्दल किंचितही अभाव होणार नाही अशा व्यक्तीला गुरु कर आणि पुढे चालत राह. माथी *उपरी* असावा त्यामुळे मग स्वच्छंदीपणा येणार नाही.

**प्रश्नकर्ता :** शास्त्रांमध्ये 'तुं ही, तुं ही' ('तूच आहेस, तूच आहेस') असे लिहिले आहे त्याचा अर्थ काय?

**दादाश्री :** क्रमिक मार्गात 'तुं ही, तुं ही' हे पोहोचण्याचे साधन आहे. (आत्म्याला उद्देशून) 'तूच सगळीकडे आहेस, मी तर कुठेच नाही' असे म्हटले आहे. तरी पण 'तुं ही, तुं ही' मध्ये आत्म्याबद्दल भेद राहतोच. श्रद्धा आणि ज्ञानाने ऐक्य असते परंतु चारित्र्याने भेद राहतो. 'हुं ही, हुं ही' ('मीच आहे, मीच आहे') असे म्हणतो. 'तू' आणि 'मी' असा भेद केला तर अंतिम स्टेशन कसे मिळणार? जसे 'भक्त' आणि 'ईश्वर', तसेच 'मी' आणि 'तू' वेगळे आहोत असा भेद राहिला तर मग आपले काम पूर्ण कसे होणार? तरी पण त्यांना जर कोणी 'ज्ञानी पुरुष' भेटले तर त्यांचे (मोक्षाचे) काम होईल.

## शक्तीपात

**प्रश्नकर्ता :** 'शक्तीपात' याचा अर्थ काय?

**दादाश्री :** समजा, तुमच्या वाटेत एक सहा फूट रुंदीचा ओढा आहे, तुम्हाला बूट काढायला कठीण जात आहे म्हणून तुम्ही तिथेच उभे राहता. दोन चार लोक तर तुमच्या देखतच त्या ओढ्यावरून उडी मारून पलीकडे जातात पण तुमचे मन तुम्हाला मागे खेचते, मग आम्ही म्हटले, 'अरे चंदुलाल, उभा का राहिलास, मार उडी' मग तुम्ही लगेच

उडी मारता. हे शक्तीपाताचे उदाहरण आहे. शक्तीपात आणि मोक्ष यांचा काहीही संबंध नाही. हा पौद्‌गलिक शक्तीपात आहे. हा वाढतो आणि कमी होतो. देणाऱ्याची शक्ती कमी होते आणि घेण्याऱ्याची वाढते.

**प्रश्नकर्ता :** टाळूला जीभ लावून अमृत प्यायला सांगतात ते काय आहे ?

**दादाश्री :** हा हठाग्रही लोकांचा मार्ग आहे. ज्यांना त्रास सोसण्याची सवय झाली आहे अशा लोकांनी हा मार्ग अनुसरायला हरकत नाही. पण तुला याची काय गरज? जीभ आणि टाळू दोन्ही पुद्‌गल आहेत. त्यातून रस येईल तोही पुद्‌गल आहे, तो आत्मा नाही. ते मेहनतीचे फळ आहे. आइस्क्रीम बनवणारे त्या मशीनचे हॅन्डल मारतात तेव्हा त्यांना मेहनतीचे फळ-आइस्क्रीम खाण्याच्या रूपाने मिळते ना? या जगातील बहुतेक साधू-संन्यासी सगळ्यांच्या आत सतत विषाचे थेंब पडत असतात, आणि त्यांची वाणी पण सतत विषारी असते. 'आम्ही जेव्हा त्यांना 'स्वरूपाचे' ज्ञान देतो तेव्हापासून सतत अमृताचे थेंब ठिपकू लागतात!' हे कसे आहे? इतर कुठला चांगला रस्ता सापडला नाही म्हणून या चिखलात पडले. आत्मा ज्ञानस्वरूप असतो. ज्ञान-दर्शन-चारित्र्य आणि तप हा मोक्षाचा मार्ग आहे, या खेरीज बाकीचे सर्व अन्य मार्ग आहेत, मोक्षाचे नाहीत. नाही तर जीभ टाळूला कशाला लावावी लागेल? हे असे सर्व का करावे लागते? बाहेर खूप उकाडा आहे, मग तलावात बुडी मारून फक्त डोके बाहेर काढून बसण्यासारखे आहे! पण आत्मा जाणल्याशिवाय मार्ग निघेल असे नाही! जोपर्यंत ज्ञान मिळत नाही तोपर्यंत कुठे तरी कोपऱ्यात बसून राहायला हवे ना! पण हा सर्व हठाग्रहीचा मार्ग आहे, हा मोक्षाचा मार्ग नाही. वीतरागींचा मार्ग नाही.

बरेच लोक 'अहं ब्रह्मास्मि' असे बोलत राहतात, पण त्यामुळे तर उलट भ्रम वाढला आहे. कारण ब्रह्म काय आहे ते समजल्याशिवाय 'अहम् ब्रह्मास्मि' असे म्हणून काय फायदा? या हिंदुस्तानात कुठले दुकान चालत नाही? ह्या जगात सगळी दुकाने चालतात. दोन हजार वर्षांपूर्वी असा धर्म निघाला होता की कर्ज काढून तूप प्या, लुटालूट

करा तरी हरकत नाही! असे सांगणाऱ्यांचे दुकान पण चालले! ह्या जगात सगळीच दुकाने चालतात!

हिंदुस्तानात वेगवेगळे देव आणि देवी पूजल्या जातात ते का? कारण प्रत्येकाचा दृष्टीकोन वेगळा असतो, बुद्धी आणि समज यात फरक असतो. मनुष्यांत चौदा लाख स्तर असतात, प्रत्येक स्तराच्या मनुष्याचे डेव्हलपमेंट वेगवेगळे असते आणि प्रत्येकाला आपापल्या डेव्हलपमेंट प्रमाणे धर्म आणि देवी-देवता मिळतात. धर्मात भेद कशासाठी आहेत? तर कित्येक लोक पुनर्जन्म मानतात, कित्येक मानत नाहीत. प्रत्येक मनुष्य वेगवेगळ्या डिग्रीवर असतो आणि त्याप्रमाणे त्याची मते असतात.

## आत्मज्ञान, हेच बिंदु-संयुक्तम्

**प्रश्नकर्ता :** हिंदू लोक जेव्हा संकटात सापडतात तेव्हा तऱ्हेतऱ्हेचे नवस बोलतात, तर ते योग्य आहे का?

**दादाश्री :** ज्यांची अशा गोष्टींवर श्रद्धा आहे त्यांच्यासाठी त्या ठीक आहेत. ज्यांची श्रद्धा नाही, त्यांच्यात मारूनमुटकून श्रद्धा बसवता येत नाही. पूर्वजन्मींचे काही निमित्त, पूर्वीचे काही कनेक्शन (संबंध) असेल तर त्या निमित्ताद्वारे कार्य होते. म्हणून नवस करणाऱ्यांची निंदा करू नये.

कविराजांनी लिहिले आहे,

*'बिंदु संयुक्तम् ॐकार नुं लक्ष्य,*
*प्रत्यक्ष कल्पवृक्ष मोक्षार्थी आतम.'*

कल्पवृक्ष कधी म्हटले जाते? जेव्हा मोक्षाला जायची वेळ येते तेव्हा बिंदु संयुक्त ॐकार हे लक्ष्य बसते. 'शुद्धात्म्या'चे लक्ष्य बसले म्हणजे मोक्षाला जाण्याची तयारी झाली. बरेच जण म्हणतात, 'आम्ही कपाळावरील बिंदूचे ध्यान करतो, पण त्यामुळे तर एकाग्रता वाढते. जोपर्यंत ॐ काय आहे हे समजणार नाही तोपर्यंत काहीच निष्पन्न होणार नाही. त्यासाठी प्रत्यक्ष ॐ पाहिजे, म्हणजे 'ज्ञानी पुरुष' पाहिजे.

शिवाय नुसत्या ॐ ने भागणार नाही, 'बिंदु संयुक्तम्' म्हणजे मी शुद्धात्मा आहे याचे ज्ञान पाहिजे, ते लक्ष्य बसले की 'ॐकार बिंदु संयुक्तम् असे म्हटले जाते. तेव्हा मोक्ष होतो!

'ॐकार बिंदु संयुक्तम् नित्यम् ध्यायन्ति योगिन:' जे मोक्षमार्गी योगी असत ते कायम ध्यान करीत असत. पूर्वीच्या काळी क्रमिक मार्गात असे होते. आता या काळात 'अक्रम मार्गात' 'ॐकार बिंदु संयुक्तम्'चे ध्यान इथे सुरू झाले आहे.

वेदांताने जीव, ईश्वर आणि परमेश्वर, अशे तीन भाग केले आहेत. ईश्वराची शक्ती कशी आहे? तर अर्ध्या परमात्म्यासारखी आहे! मनुष्य जन्म लाभला म्हणजे ईश्वरासारखा झाला असे म्हणता येते. हे माणूसपण म्हणजे ऐश्वर्य आहे! या जन्मात सर्व गायी, म्हशी आपल्यासाठी दूध देतात. झाडे फळे देतात आणि हे असे ऐश्वर्य इथेच गमावतो त्याला माणूस कसे म्हणायचे? माणूसपणात तर 'स्वत:ला' परमेश्वर बनायचे आहे, परमात्मा बनायचे आहे! याउलट लोक या जन्मात पाशवता आणि आर्तध्यान, रौद्रध्यान करीत बसतात! इथे या जन्मात तर मोक्षाचा मार्ग शोधायला हवा, त्याऐवजी लोक संसाराचा रोगच वाढवीत बसतात आणि वर मी जाणतो या धुंदीतच वावरत असतात. जर खरेच ('ज्ञान') जाणले तर 'संसाररोग' कमी होईल आणि प्रकाश लाभेल. मग त्यामुळे कुठेच ठोकर लागणार नाही. जर जाणलेच नाहीस तर मग कशाची धुंदी घेऊन फिरतोस?

## वेदशास्त्र हे फक्त साधन स्वरूप

एक माणूस आमच्याकडे आला आणि म्हणू लागला, 'मी चारही वेद वाचले आहेत, आणि ते आता मला धारण झाले आहेत.' तेव्हा मी त्याला म्हटले, ''चार वेद शेवटी स्वत:च काय म्हणतात? 'दिस इज नॉट दॅट.' तू जो आत्मा शोधत आहेस तो या वेदात सामावत नाही, या वेदात नाही म्हणून (आत्मा जाणण्यासाठी) गो टु ज्ञानी (ज्ञानी पुरुषांकडे जा).'' 'आम्ही' म्हणतो, 'आमच्याकडे या, आम्ही तुम्हाला एका

तासातच 'दिस इज दॅट' काय ते सांगतो.' वेद तर फक्त मार्गदर्शन करतात, ते तर सांगतात, 'या या ठिकाणी गिरगाव आहे.' पण अशा मार्गदर्शनाने आत्मा मिळत नाही, त्यासाठी 'ज्ञानी पुरुषांची' भेट आवश्यक आहे. डॉक्टरला विचारल्याशिवाय औषधांचे प्रिस्क्रिप्शन बनवत नाही, कारण त्याला मृत्यूची भीती आहे; आणि जिथे अनंत जन्म–मरणाची भीती आहे तिथे मात्र तो स्वतःच औषध बनवितो, आणि 'ज्ञानी पुरुषांना' न विचारताच पितो सुद्धा! शास्त्र तर शस्त्र असतात, ती जर वापरता आली नाहीत तर तू मरशील!

जैन मत आणि वेदांत मत दोन्ही एकत्र केव्हा होतात? तर 'आत्मज्ञाना'पुढे. आत्मज्ञान होईपर्यंत दोघांचे विचार वेगळे असतात; पण आत्मज्ञानापुढे दोघांची सहमती होते, सगळे एक होतात.

## ब्रह्मनिष्ठ तर ज्ञानीच बनवितात

स्वतः परमात्मा आहे परंतु जोपर्यंत ते पद प्राप्त होत नाही तोपर्यंत 'आम्ही वैष्णव आहोत,' 'आम्ही जैन आहोत' असे करत राहतात. वैष्णव लोक हृदयात श्रीकृष्णाची धारणा करतात, पण जोपर्यंत मूळ वस्तू प्राप्त होत नाही तोपर्यंत ही फक्त धारणा आहे असे म्हटले जाते. मूळ वस्तू म्हणजे स्वतःचे स्वरूप, ती प्राप्त झाली म्हणजे ब्रह्माशी संबंध झाला, म्हणजे ब्रह्मसंबंध झाला. ब्रह्मसंबंध कशाला म्हणतात? एकदा ध्यास लागला की मग कधीही विसर पडत नाही, तो ब्रह्मसंबंध. अर्थात आत्म्याशी संबंध जोडणे म्हणजेच ब्रह्मसंबंध स्थापणे. ज्ञानी पुरुष जगातून तुमची निष्ठा उचलून ब्रह्ममध्ये बसवतात. तुम्हाला ब्रह्मनिष्ठ बनवितात! यात आत्मा आणि अनात्मा यांना गुणधर्मांच्या आधारे वेगळे करायचे आहे. अनंत जन्मांपासून आत्मा आणि अनात्मा भ्रांतिमुळे जोडले गेले आहेत. 'ज्ञानी पुरुष' तुमची पापे जाळून टाकतात म्हणून तर तुम्हाला तुमच्या 'स्वरूपाचे' सतत लक्ष्य राहते, त्याशिवाय हे कसे काय होईल?

जर तुम्हाला कोणी विचारले की, 'तुमचा धर्म कोणता?' तर त्यांना सांगा, 'आमचा धर्म स्व–धर्म आहे.' आत्मा म्हणजे 'स्व' आहे आणि आत्मा जाणल्यानंतर स्वधर्म सुरू होतो.

'जिन'ला जाणले की जैन बनतो, नाही तर केवळ जैन हे तर वंशागत आहे. वैष्णव देखील वंशागत आहे, पण 'आमची' वाणी जो तासभर ऐकले तोच खरा जैन आणि तोच खरा वैष्णव म्हणायचा.

अनेक जन्म घेऊन सुद्धा वैधव्य येईल, म्हणून आमच्याबरोबर ब्रह्माचा संबंध जोडून घ्या, अन्यथा मृत्यूच्या वेळी तुमच्याबरोबर कोणीही येणार नाही. बाकी, हा संसार म्हणजे केवळ दगा फटकाच आहे! म्हणून आमच्याशी संबंध जोडा, याचेच नाव ब्रह्मसंबंध आणि हा संबंध असा असतो की तोडू म्हटले तरी तो तुटत नाही. संसार म्हणजे वैधव्य आणि दु:ख यांचा संग्रह आहे, त्यात सुख कुठून असणार? मोह असतो म्हणून तो जरा चांगला वाटतो पण मोह संपला तर संसार विषासारखा कडू वाटेल, केवळ मोहामुळे तो कडू वाटत नाही.

आमच्याबरोबर ब्रह्मसंबंध जोडा, तर आपले कल्याण होईल. हा जो देह दिसत आहे तो केवळ बुडबुडा आहे, पण या देहाच्या आत 'दादा भगवान' बसले आहेत तोपर्यंत तुमचे काम उरकून घ्या. दहा लाख वर्षांनी 'हा' अवतार प्रकट झाला आहे, संसारात राहूनही मोक्ष मिळेल. हा बुडबुडा फुटला की मग आतील 'दादा भगवानां'चे दर्शन होणार नाही, म्हणून हा बुडबुडा फुटण्यापूर्वी दर्शन करून घ्या.

ब्रह्मसंबंध म्हणजे जिथे ब्रह्म प्रकट झाले आहे त्यांच्या चरणाच्या अंगठ्याला स्पर्श करून संबंध जोडणे, हाच खरा ब्रह्मसंबंध. असा खरा ब्रह्मसंबंध जोडून देणारे क्वचितच कधी भेटतात.

दहा लाख वर्षांपूर्वी सगळे धर्म अस्ताव्यस्त झाले होते. त्यावेळी केसरियाजीमध्ये असलेले 'दादा भगवान ऋषभदेव' सर्व धर्मांचे मूळ, ते आदिम भगवान पहिले भगवंत आहेत. आणि आता दहा लाख वर्षानंतर आज हे 'दादा भगवान' आले आहेत! त्यांचे दर्शन घ्या आणि तुमचे मोक्षाचे काम करून घ्या. प्रत्यक्ष भगवंत आले आहेत. त्यांचा हा देह म्हणजे मंदिर आहे. त्या मंदिराचा नाश व्हायच्या आत या मंदिरात प्रकट झालेल्या 'दादा भगवान' यांचे दर्शन घ्या. असा घट्ट ब्रह्मसंबंध बांधा

की 'झाडे-झुडपे, पशु-पक्षी' या सगळ्यात भगवंत दिसेल. कच्चा संबंध बांधलात तर दिवस बदलणार नाहीत. म्हणून पक्का संबंध बांधून घ्या. कविराजांनी गाइले आहे,

*''मन-वचन-कायाथी तद्दन जुदो एवो 'हुं' ब्रह्मसंबंधवाळो छुं.''*

(मन-वचन-काया याहून पूर्ण वेगळा असा मी ब्रह्मसंबंधवाला आहे.)

सांसारिक व्यवहारात अब्रू जपली जाईल असा हा मंत्र आहे! या मंत्रामुळे ब्रह्माची पुष्टी होत राहील आणि तुम्ही ब्रह्मनिष्ठ व्हाल. सतत ज्ञानी पुरुषांचा ध्यास लागतो तोच ब्रह्मसंबंध. मायेबरोबर अनेक जन्म मैत्री केली. तिला अनेक वेळा दूर ढकलले तरी पण ती पुन्हा पुन्हा येतच राहिली, पण एकदा ब्रह्मसंबंध जुळला की ती पळ काढते. मोहाच्या बाजारात चुकूनही घुसू नये. लग्नप्रसंगी मोह आणि माया यांचा बाजारच भरलेला असतो. माया आणि तिची मुले आपली अब्रू काढतात आणि भगवंत आपली अब्रू जपतात. आमच्या आश्रयाला आलेल्या कोणालाही कुणी त्रास देऊ शकत नाही. समजा, एखाद्याची कलेक्टरशी ओळख आहे तर अशा व्यक्तीच्या वाटेस कोणी जात नाही, म्हणतात, 'नको बाबा, यांची तर कलेक्टरशी ओळख आहे.' त्याचप्रमाणे तुमची आता 'दादा भगवान' की ज्यांना तिन्ही लोकांचे नाथ वश आहेत, यांच्याशी ओळख झाली आहे. मग तुम्हाला कोण त्रास देणार?

आमचे नाव सांगा आणि आमची किल्ली घेऊन जा. मग 'रणछोडजी' (श्रीकृष्ण) सुद्धा तुमच्याशी बोलतील. आमचे नाव 'रणछोडजींना' सांगा, की ते लगेच तुमच्याशी बोलू लागतील!

कविराजांनी दादांसाठी ही पदे रचली आहे ना की,

1) *कल्पे कल्पे जन्मे छे ते कल्पातीत सत्पुरुष.*<br>
*श्री रणछोडरायनुं हृदयकमळ 'हुं' ज छुं.*<br>
*परात्पर पुरुष गीता गायक 'हुं' ज छुं.*

(प्रत्येक कल्पात (अर्ध काळचक्रात) अवतरतात असे कल्पातीत सत्पुरुष 'दादा भगवान' की जे श्रीकृष्णाचे हृदयकमळ आहेत आणि गीता गाणारे मूळ पुरुष पण तेच आहेत.)

2) *मुरलीना पडघे झूमी जमना बोली,*
*श्रीकृष्णना प्रकाशक आवी गया छे.*

(मुरलीच्या आवाजाने आनंदून यमुना (नदी) म्हणाली, श्रीकृष्णाला प्रकाशित करणारे आता अवतरले आहेत.)

'वैष्णव जन तो तेने रे कहिये'.....या व्याख्येनुसार एकपण वैष्णव आज सापडत नाही. मर्यादा म्हणजे अंशधर्म, मर्यादित धर्म. एवढा मर्यादित धर्म जरी पाळला तरी खूप चांगले, पण इथे तर लोक सतत भांडतानाच दिसतात.

एकादशी कशाला म्हणतात? पाच कर्मेंद्रियें, पाच ज्ञानेंद्रिये आणि अकरावे मन, अशा अकरा गोष्टी या दिवशी ताब्यात ठेवायच्या असतात! पण इथे तर उपास चालू असताना देखील पत्नी पतीला रागावते आणि म्हणते, 'तुम्ही हेच आणले नाही, तेच आणले नाही!' अशाला एकादशी केली असे म्हणता येईल का? अशा एकादशीपासून कोणताही धर्म साध्य होत नाही. आमच्या आज्ञेत राहून एक जरी एकादशी केलीत तर दुसरी करण्याची गरजच उरणार नाही.

❖❖❖❖❖

## द्वैताद्वैत

**प्रश्नकर्ता :** जगात आत्मा 'अद्वैत' आहे असे काही लोक म्हणतात, ते खरे आहे का?

**दादाश्री :** ते तसे म्हणतात, पण खरे म्हणजे अजून अद्वैत दृष्टीच उत्पन्न झालेली नाही आणि अशा स्थितीत आत्म्याला अद्वैत म्हणणे हा गुन्हा आहे. आत्मा ही गोष्टच खूप वेगळी आहे. लोक अद्वैतभाव उत्पन्न करतात पण जेव्हा कोणी मारतो किंवा खिसा कापतो तेव्हा अद्वैतभाव कुठे जातो? तेव्हा खरे समजते की त्यांनी आत्मा प्राप्त केलेला आहे की नाही? ज्याला आत्मा प्राप्त झालेला आहे अशा व्यक्तीत निर्भयता आणि स्वातंत्र्य उत्पन्न होते. तरीही अद्वैतभाव म्हणजे रिलेटिव्ह आत्मा प्राप्त झाला असे म्हटले जाते. असे लोक तर हिंदुस्तानात खूप आहेत. अशी माणसे वेगवेगळ्या पक्षात पडली आहेत. जैन द्वैत पक्षात आणि वेदांती अद्वैत पक्षात पडले आहेत. ते म्हणतात, 'मी आत्माच आहे, मी शुद्धच आहे.' अहो, मग देवळात कशासाठी जाता? (शास्त्रांची) पुस्तके का वाचता? हे वेदांती लोक एकांतिक अद्वैतात गुंतले आहेत. आणि जैन लोक एकांतिक द्वैतात पडले आहेत! 'मी केले तरच होणार ना? मी रागावलो म्हणून मला भोगावे लागत आहे.' अशा अनेक वेगवेगळ्या विचारांची भुते लोकांना चिकटली आहेत! त्यातही लोकांनी विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत अशी आणखी वेगवेगळी दुकाने उघडली आहेत. अद्वैतवाले जेव्हा आम्हाला भेटायला येतात तेव्हा मला त्यांना सांगावे लागते, 'तुम्ही अद्वैतवाले आहात ना? मग इथे काय जाणण्यासाठी आला आहात?'

तर ते म्हणतात, 'आत्मा जाणण्यासाठी' मी त्यांना म्हणालो, 'अद्वैतवाल्यांना आत्मा जाणून घ्यायचे शिल्लक राहिलेले नसते. तुम्हाला हे अद्वैताचे स्टेशन कसे काय मिळाले? कोणत्या गुरुनी तुम्हाला असे शिकवले?'

तर ते मला म्हणतात, 'दादा, तुम्ही द्वैतात का राहता?' मी त्यांना विचारले, अद्वैत तुम्हाला समजते का? जरा नीट समजून घ्या. आत्मा द्वैतस्वरूपही नाही आणि अद्वैतस्वरूपही नाही, आत्मा तर द्वैताद्वैत स्वरूप आहे.' जर तो द्वैतस्वरूप झाला तर त्याला अद्वैताचा विकल्प येत राहतो आणि जर तो अद्वैतस्वरूप झाला तर त्याला द्वैताचा विकल्प येत राहतो. 'हे द्वैत आले आणि हे अद्वैत आले' असे होत राहते. आत्मा तर द्वैत-अद्वैत याच्याही पलिकडे आहे. तरीही व्यावहारिक बोलायचे झाले तर मी म्हणेन, 'आत्मा द्वैताद्वैत आहे, एकपक्षी नाही; रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंटने पाहिले तर द्वैत आहे आणि रियल व्ह्यू पॉइंटने पाहिले तर अद्वैत आहे. 'दादा' जेव्हा बोलत असतात तेव्हा ते द्वैतभावात असतात. म्हणून जेव्हा द्वैत असेल तेव्हाच अद्वैत असू शकते, आणि अद्वैत असेल तेव्हाच द्वैत असू शकते, कारण दोन्ही गोष्टी रिलेटिव्ह आहेत. जोपर्यंत आत्मा जाणला नाही, तोपर्यंत फक्त अद्वैताचे दुकान उघडले, तर ठारच व्हाल. म्हणून जरा विचार करा. द्वैतामध्येच गुंतलात तरी द्वंद्व उभे राहील आणि अद्वैतामध्येच गुंतलात तरी द्वंद्व उभे राहील. जर द्वैताद्वैतात आलात तर मात्र द्वंद उभे राहणार नाही. सिद्धगतीत जातात तेव्हा विशेषणच नसते, निर्विशेष! द्वैताद्वैत स्थिती कधीपर्यंत? तर शरीर आहे तोपर्यंत!

जर फक्त अद्वैत मानले तर मात्र एकांतिक झाला, म्हणजे मिथ्यात्वी झाला आणि जर फक्त द्वैत मानले तरीही मिथ्यात्वी झाला, असे एकांतिक होता कामा नये. म्हणून द्वैताद्वैत असायला हवे. अनेकांत असायला हवे. वीतराग भगवंत अनेकांतिक होते. एकांतिक म्हणजे आग्रही झाला. आणि मोक्षमार्ग तर निराग्रहींचा आहे.

त्या अद्वैतवाल्यांना मी विचारले, 'तुम्ही लग्न नाही केलेत?' तेव्हा ते म्हणाले, 'मी विवाहित आहे पण तिला नांदवीत नाही. पत्नीला सोडून दिले?' असे कोणते गुरु तुम्हाला भेटले? 'लग्न केल्यानंतर अद्वैती

झालात? असे कसे झालात?' खरा अद्वैती कोण? पत्नी आहे, मुले आहेत पण कोणाला अजिबात दुखवीत नाही. अशी ज्याची वागणूक आहे, तर ती एका खऱ्या 'द्वैताद्वैती'ची लक्षणे आहेत. हे फक्त अद्वैताच्याच गुहेत कसे काय शिरले? अशा स्थितीत पोहोचलात तर मेलेच समजा! असे खरे खरे सांगणारा तुम्हाला कोणी मिळणार नाही, कारण आम्हाला किंचितही स्वार्थ नाही. स्वार्थ नसलेलाच तुम्हाला 'नग्न सत्य' सांगू शकतो. बाकी सर्वजण तुम्हाला स्वार्थापोटी 'बापजी, बापजी' म्हणतील.

अद्वैत तत्त्व हे त्याग करत करत अहंकाराला अद्वैत करते. म्हणजे अद्वैत तत्त्व असे आहे की ते द्वैतातून अद्वैतात येते, म्हणजेच तोपर्यंत 'मी' हा असतोच. जोपर्यंत स्वत:च्या स्वरूपाचे भान होत नाही तोपर्यंत ही सारी वाणी मायावी आहे. लोकांना खूप चांगली वाटते. पण या सर्व पायऱ्या आहेत. जोपर्यंत स्वरूपाचे भान होत नाही, तोपर्यंत याची गरज आहे. पण स्वरूपाचे भान तर शेवटी 'ज्ञानी पुरुषांची' भेट होईल आणि त्यांची कृपा होईल तेव्हाच होऊ शकते, एरवी नाही!

## अनेकांतवादातून मोक्ष

वेदांती काय म्हणतात? 'आत्मा निर्मळ आहे आम्ही अद्वैत आहोत.' त्यांनी आग्रहाने आत्म्याला अद्वैत असे म्हटले आहे, पण हे यथार्थ नाही. जैन लोक आग्रहाने आत्म्याला 'कर्ता आणि भोक्ता' मानतात पण तीही खरी गोष्ट नाही, निराग्रही असायला हवे. आत्मा द्वैताद्वैत आहे. अद्वैतामार्गे मोक्ष आहे असे म्हणून एकसुद्धा विकल्प कमी होणार नाही. कारण तुम्ही द्वैतातून पुढे जातच नाही. अद्वैतवाल्यांना द्वैताच्या पलिकडे जायला हवे आणि द्वैतवाल्यांना अद्वैताच्या पलिकडे जायला हवे, तेव्हाच द्वैताद्वैत होता येईल. द्वैत आणि अद्वैत असे दोन्ही पंख एकदम असतील तरच उडता येईल, एका पंखाने उडता येणार नाही. भगवंतांची वाणी अशी स्याद्वादी असते की त्यामुळे एकाही जीवाचे प्रमाण दुखावले जात नाही. द्वैताद्वैत एकाच वेळी कसे असू शकते? तर 'होम डिपार्टमेंट'मध्ये आम्ही अद्वैत आहोत आणि 'फॉरेन डिपार्टमेंट'मध्ये आम्ही द्वैत आहोत, म्हणून द्वैताद्वैत म्हटले आहे. जोपर्यंत शरीर आहे,

संसाराची अपेक्षा शिल्लक आहे, तोपर्यंत द्वैताद्वैत आहे. जर संसाराची अपेक्षा नसेल तर मग द्वैताद्वैताची गरज राहत नाही.

केवळ द्वैताने किंवा केवळ अद्वैताने मोक्ष मिळेल असे मानून चालत राहिलात तर मग एक पण विकल्प जाणार नाही. या अद्वैताच्या मागे लागून लोक भटकत राहतात. कुठल्याच विकल्पातून बाहेर पडत नाहीत. अद्वैत, द्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, अशी निरनिराळी दुकाने उघडून बसले आहेत लोक! त्यांचे गुरु आणि त्या गुरुंचे गुरु सर्वच भटकत आहेत. फक्त 'ज्ञानी पुरुष' दुकान उघडत नाहीत, कारण ते द्वैताद्वैत आहेत. जोपर्यंत मोक्ष प्राप्त झालेला नाही तोपर्यंत आत्मा कसा आहे? तर आत्मा द्वैताद्वैत आहे. आपण जर अद्वैतवाल्याला विचारले, 'तू कोण आहेस?' तर तो सांगेल की, 'मी अमुक अमुक आचार्य आहे.' इथे तर सगळेच आचार्य होऊन बसले आहेत आणि आपापली दुकाने उघडून बसले आहेत. फक्त द्वैत शब्द कुठेही जोडता येणार नाही आणि फक्त अद्वैत शब्द पण जोडता येणार नाही. यांना तर द्वैत आणि अद्वैत कुठल्याच शब्दाचा अर्थ कळत नाही आणि मग द्वैत किंवा अद्वैत यातल्या एका दुकानात जाऊन बसतात! जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत शुद्धात्मा हा द्वैताद्वैत आहे. फक्त अद्वैत कोणी बनूच शकत नाही. अद्वैत हा विकल्प आहे आणि द्वैत हा त्याचा आधार आहे. कसे कसे आश्चर्यजनक वीतराग भगवंत होऊन गेले आहेत! द्वंद्वाच्या समुद्रात, अद्वैताचे रक्षण करण्यासाठी समोरच्या व्यक्तीशी वाद-विवाद करणे यालाच म्हणतात द्वैत!

अद्वैताला भगवंतांनी विधुर म्हटले आहे आणि द्वैताला विवाहित म्हटले आहे. भगवंत तर द्वैताद्वैत आहेत. तू द्वंद्वातीत झालास तर सुटका होईल. हा संसार कोणालाच सोडत नाही. या संसारात पांडवांना प्रचंड त्रास सहन करावा लागला. प्रभू श्रीराम जंगलात गेले तिथेही त्यांच्या पत्नीला कोणीतरी उचलून नेले! संसार हा असा आहे!

वीतराग भगवंत म्हणतात, 'हे चंदुभाऊ आहेतही आणि नाहीतही. अस्ति, नास्ति - आहेतही आणि नाहीतही. स्वरूपाचे भान नसेल तर ते चंदुभाई आहेत आणि स्वरूपाचे भान झाले तर ते चंदुभाई नाहीत.'

जग पूर्णपणे एकांतिक आहे, जग एक बाजू निश्चितच करून टाकते की हे असेच असते. 'ज्ञानी पुरुष' मात्र अन्-एकांतिक (अनेकांतिक) असतात, अगदीच निराळे असतात!

या जगात विषालाही फक्त एकच गुण नसतो आणि अमृतालाही फक्त एकच गुण नसतो, सर्वच द्विगुणवाले असतात. म्हणून कोणाबद्दलही एकांतिक बोलू नये. 'हे डॉक्टर वाईट आहेत' असे बोलू नये. किंवा सगळे डॉक्टर चांगले आहेत असे पण बोलू नये. आपण व्ह्यू पॉइंट लक्षात ठेवून बोलले पाहिजे की हे ह्या दृष्टीने अशा प्रकारचे आहेत आणि त्या दृष्टीने तशा प्रकारचे आहेत, असे बोलले पाहिजे. विषात देखील काही चांगले गुण असतात. काही ठराविक प्रमाणात जर विष खाल्ले तर सगळे रोग बरे होतात. आणि त्याहून जास्त प्रमाणात विष खाल्ले तरच मात्र मृत्यू येतो.

माणूस जन्माला आल्यापासून मृत्यूपर्यंत सगळेच अनिवार्य आहे. पूर्ण जगच अनिवार्य आहे, द्वितीयम नाही पण तृतीयम् आहे. कारण ते परिणाम आहे. पण साऱ्या जगाला वाटते की सगळे काही ऐच्छिक (मर्जीनुसार) आहे. अद्वैत म्हणजे एक बाजू आणि द्वैत म्हणजे दुसरी बाजू आणि हे तर तिसरेच! जेव्हा व्यक्ती द्वैतात असते तोपर्यंत ती सरळ असते. द्वैताद्वैतमध्ये असते तेव्हा ती आत्म्यामध्ये असते आणि जिथे तृतीयम् असते तिथे फक्त संसार असतो! ज्ञेय-ज्ञाता हा संबंध द्वैत आहे, स्वत: स्वत:साठी अद्वैत आहे. म्हणजे आत्मा द्वैताद्वैत आहे. बाकी सगळेच तृतीयम्! ऐच्छिकला तृतीयम् म्हणत नाहीत. अनिवार्य मात्र पूर्ण तृतीयम् आहे.

❖❖❖❖❖

# वीतराग मार्ग

कवींनी म्हटले आहे,

*'जेनां वाणी, वर्तन ने विनय छे मनोहर प्रेमात्मा.'*

(दादा भगवान यांची वाणी, वर्तन आणि विनय मनोहर आहेत, ते प्रेमात्मा आहेत.)

वाणी मनोहर असावी, वर्तन मनोहर असावे, विनय मनोहर असावा. वीतरागींचा मार्ग विनयाचा आहे, परम विनय बाळगला तरच मोक्ष मिळतो. इतर काहीही शिकण्याची गरज नाही. शिकणारे तर शिकून शिकून थकले आहेत. वीतरागांच्या मार्गात परम विनय याचीच आवश्यकता आहे. त्यांना आणखी काहीच नको असते.

वीतरागींनी सर्व जगासाठी एकच धर्म पाहिला, तो म्हणजे वीतरागधर्म, आणि वीतराग धर्मानेच मोक्ष मिळतो. म्हणून वीतरागता प्राप्त करा. आज पाहिले तर एका जैन धर्मातच किती वेगवेगळे पंथ झाले आहेत. आपला मार्ग जैनही नाही, वैष्णवही नाही, स्वामीनारायण पण नाही तर आपला मार्ग वीतराग मार्ग आहे!

क्रोध-मान-माया आणि लोभ गेले तर समजा की वीतरागधर्म प्राप्त झाला, हीच खूण आहे वीतराग धर्म मिळाल्याची. कोणी विचारले, 'यांचा ताप उतरला आहे की नाही?' तेव्हा आपण म्हणतो, 'थर्मामीटर लावा आणि पाहा. जर थर्मामीटर 98 डिग्री दाखवीत असेल तर ताप

नाही आणि 99 डिग्री दाखवीत असेल तर नॉर्मलच्या (सर्वसाधारणच्या) वरती ताप आहे आणि 97 डिग्री दाखवीत असेल तर नॉर्मलच्या खाली ताप आहे.' असा थर्मामीटर लावून ताप पाहायला पाहिजे.' वीतराग काय म्हणतात? 'ज्यांचे क्रोध, मान, माया, लोभ निघून गेले आहेत त्यांना वीतराग मार्ग प्राप्त झाला आहे आणि ज्यांचे क्रोध, मान, माया आणि लोभ अजूनही कायम आहेत, जराही कमी झाले नाहीत, एक अंश पण कमी झाले नाहीत त्यांना वीतराग धर्म प्राप्त झाला आहे असे कसे म्हणता येईल?' जैन धर्म तर पूर्वी प्राप्त झालेलाच आहे, अरे, अनंत जन्मात जैन धर्म प्राप्त झाला आहे, फक्त एकाच जन्मात थोडेच जैन धर्म प्राप्त झाला आहे? पण वीतराग धर्म अजून कुठल्याच जन्मात प्राप्त झालेला नाही!

वीतराग भगवंत एकदम वेगळेच होते. वीतागांना वीतराग मार्गात जे काही करावे लागले होते ते आजच्या काळातील लोकांच्या लक्षातही नाही, त्यांना त्याची कल्पना पण करता येणार नाही, त्यांना जे आवडत नसे तेच नेमके आज लोक करतात. त्यांना काय आवडत नव्हते? ते म्हणत, 'भाऊ, तू एकाच पक्षात पडू नकोस. तू तप करत असशील तर तपोगच्छी बनू नकोस.' वीतराग म्हणतात, 'एकाच गच्छात पडू नका.' तो तर घराचा एक कोपरा आहे. घराचा एकच कोपरा साफ करत राहिला तर काय पूर्ण घर साफ होईल? शुद्धी होईल का? नाही होणार. म्हणून भगवंत म्हणाले, 'सगळे कोपरे साफ कर.' तुझे बाकीचे कोपरे साफ करायला काही भगवंत येणार नाहीत. हे लोक तर फक्त तपाच्याच मागे लागतात किंवा कोणी त्यागाच्या मागे लागतात आणि कोणी फक्त शास्त्र वाचण्याच्या मागे लागतात.

कबीरजी म्हणतात : *'पुस्तक पढ पढ जग मुआ, पंडित भया न कोय'* कबीरांना पुस्तक वाचून वाचून पंडित झालेला कोणी दिसला नाही. पुस्तके वाचून माणूस पुस्तकासारखा होतो. ज्याची आराधना करतो त्याच्यासारखा होतो, हा आत्म्याचा स्वभाव आहे. वीतराग भगवंतांची आराधना केली तर वीतराग होऊन जातो. म्हणूनच वीतराग भगवंतांची

आराधना करा, तरच मोक्ष प्राप्त करता येईल. मोक्षाचा हाच एकमेव मार्ग आहे. इतर अनंत मार्गांपैकी फक्त हा मार्गच, वीतरागांची ही एकमेव छोटीशी पायवाटच तुम्हाला मोक्षाला घेऊन जाईल. या पायवाटेवरून मोठ्या मुश्कीलीने एखादी व्यक्ती जाऊ शकते, तेही कधीतरीच! बाकी अन्य सर्व मार्ग तर आहेतच, अन्य मार्ग अनंत आहेत पण ते चार गतीत भटकवणारे मार्ग आहेत. देवगतीत किंवा अन्य गतीत भटकत ठेवणारे मार्ग आहेत. आणि ते मग एवढ्यानेच संतुष्ट होतात आणि म्हणतात, 'आम्हाला तर बरेच काही समजते, आम्ही बरेच काही प्राप्त केले आहे.'

## ज्ञानींच्या मागे मागे चाला...

वीतराग भगवंत म्हणतात, 'मोक्षासाठी काहीच करण्यासारखे नाही, फक्त ज्ञानींच्या मागे मागे चाला.' त्यांच्या पाठी सिगारेट ओढली तर चालेल का? 'हो चालेल. त्यांच्या हजेरीत सिगारेट ओढलीत तरी चालेल पण त्यांच्या मागे राहा. त्यांचा हात सोडू नका.' असे म्हणतात. 'ज्ञानी' कोणाला म्हणायचे? ज्यांना या जगात जाणण्यासारखे काहीच शिल्लक नाही ते 'ज्ञानी.' ज्यांना अजून जाणण्याचे बाकी आहे त्यांना आपण ज्ञानी म्हणतो आणि मग आपण जेव्हा त्यांना प्रश्न विचारतो, तेव्हा ते अडचणीत सापडतात. अशावेळी हे साहेब काय करतात? आतल्या आत गोंधळतात आणि आपल्याला शास्त्रांतील शब्द दाखवितात. अहो, ह्या शास्त्रांचे आम्ही काय करू? शास्त्रांतील शब्द आम्हाला का दाखवता? तुम्ही आतून बोला ना! या शास्त्रांना का मध्येमध्ये आणता? शास्त्र फक्त बोर्ड (पाटी) आहेत. स्टेशनवर उतरण्यासाठी लावलेले बोर्ड आहेत. बोर्डाची सारखी सारखी गरज असते का? त्याची गरज अगदी क्वचित लागते. कुठले स्टेशन आहे ते जाणण्यासाठीच फक्त गरज असते. कुणी विचारले 'अहो, कुठले स्टेशन आले आहे?' तर म्हणतील, 'हा बोर्ड दादर स्टेशन दाखवीत आहे.' ही शास्त्रे म्हणजे दादर आहेत. शास्त्रे स्वत: काय म्हणतात? 'गो टु ज्ञानी' ('ज्ञानी कडे जा.') शास्त्रे फक्त खूण दाखवितात.

जर संसारातील एखाद्या उलट्या मार्गाची गरज असेल, विषयी जगातील सुखांची गरज असेल, तुला अहंकाराचे सुख भोगायचे असेल,

तर भगवंत म्हणतात, 'शास्त्र वाच, तप कर, त्याग कर, जप कर. तुला जे योग्य वाटेल असा कुठला तरी जप-तपाचा मार्ग निवड. एक विषय निवड. त्या विषयाचे फळ तुला मिळेल. देवगती मिळेल किंवा मनुष्यगतीतही चांगला जन्म मिळेल, हे मिळेल, ते मिळेल.' भगवंतांच्या विषयांची आराधना केली तर त्याचे काहीतरी फळ मिळणारच ना? भगवंतानी मोक्षासाठी निर्विषयी मार्ग सांगितला आहे! त्यामध्ये जप, तप, त्याग किंवा कोणत्याही बाहेरच्या विषयाला स्थान नाही.

वीतराग म्हणजे अत्यंत समजदार व्यक्ती. मोक्षाचा अगदी सरळ, अगदीच सोपा मार्ग वीतरागांनी दिलेला आहे. इतर सर्वांनी मोक्षाचा मार्ग खूप गुंतागुंत करून, भुल-भुलैय्याच्या रूपाने सांगितला आहे. त्याला भुल-भुलैय्या का म्हणायचे? कारण त्या मार्गात एकदा शिरले की त्यातून बाहेर पडता येत नाही. आपण त्या मार्गातच अडकून पडतो. वीतराग भगवंतांच्या मार्गात अजिबात पोल (घोटाळा) नाही. कारण वीतराग भगवंत तर संपूर्ण शुद्ध होते. त्यांना काहीही नको होते! त्यांच्यात प्रपंच नव्हता, आसक्ती नव्हती, कुठल्याही प्रकारची इच्छा नव्हती, असे होते वीतराग भगवंत!

## इच्छा कोणाला होते?

खरे म्हणजे कोणालाच इच्छा नाही. जे जे आत्म स्वरूपात आहेत त्यांना इच्छा नाही. ही तर फक्त भ्रांती उत्पन्न झाली आहे. सध्या जैन धर्माने आत्म्याला इच्छावान् ठरवून टाकले आहे. आत्मा जर इच्छावान् असेल तर तो भिकारीच आहे. आत्मा इच्छा करतच नाही. आत्मा तर परमात्मा आहे, त्याला इच्छा कशी काय असू शकेल? आत्मा तर अगदी प्रथमपासूनच वीतराग आहे. केवळ भ्रांतिमुळे इच्छा निर्माण झाली आहे. अहंकाराला इच्छा निर्माण झाली आहे. जेव्हा अहंकार नसेल तेव्हा इच्छाही नसेल. ही तर अहंकाराची इच्छा आहे. आत्म्याला इच्छा कशी काय असेल? मग एक साधारण व्यक्ती आणि आत्म्यात फरक तो काय राहिला? आत्मा स्वत: परमात्मा आहे आणि त्याला कुठल्याच गोष्टीची गरज नाही. पूर्वीही नव्हती, आजही नाही आणि भविष्यातही

नसेल. हा तर स्वतःच अडकलेला आहे. जर अहंकार गेला, अहंकाराचा विलय झाला तर मग काही उरतच नाही, इच्छा नसेल तर मोक्षच आहे. सध्या जैन मार्गात किंवा इतर सर्व मार्गात असे म्हणतात, 'आत्म्याला तर इच्छा आहे ना?' अहो, आत्म्याला जर इच्छा असती तर मग त्याला आत्मा म्हणायचाच कसा? तुम्ही जर आत्म्याला इच्छावान् म्हणत असाल तर तुम्ही त्या द्रव्याला ओळखलेच नाही! पितळ आणि सोने यातील फरक तुम्हाला समजतच नाही. तुम्ही पितळेलाच सोने म्हणत आहात. सोने तर त्याच्या स्वतःच्या गुणधर्मात आहे, परमात्मस्वरूपातच आहे. अगदी आतासुद्धा आत्मा परमात्मास्वरूपातच आहे. त्याचे परमात्मास्वरूप तो कधीच विसरलेला नाही. भले ही तो जंजाळात अडकला आहे, पण या जंजाळात सुद्धा तो विसरला नाही. जंजाळामुळे त्याच्या ज्ञानावर आवरण आले आहे. दुसरे काहीच झाले नाही. ज्ञान आणि दर्शन यांच्यावर आवरण आले आहे. परंतु त्यात आत्म्याचे काहीच नुकसान नाही. ज्याला हा अहंकार आहे त्याचे नुकसान आहे, आत्म्याचे काय नुकसान? आत्म्याला तर आत परमानंद आहे. स्वतः अनंत सुखाचे धाम आहे. रात्री झोपल्यावर वेड्या माणसाला देखील सुख वाटते. चांगली गाढ झोप लागली तरी त्याला त्याचा (आत्म्याचा) थोडा आभास होतो की, 'अरेच्या, हे सुख तर आतच आहे! कारण रात्री कुठलेही विषय नव्हते. झोपेत कुठल्याही विषयाचे सुख घेतले नाही, असाच गाढ झोपला होता, तर मग कशामुळे सुख वाटत आहे? कारण तेव्हा ती सर्व मशीनरी बंद झाली होती. अहंकार बंद झाला होता. अहंकार रूपी मशीनरी बंद झाली की लगेच सुख उत्पन्न होते. आणि मग त्याला वाटते खूप छान झोप लागली होती! खूप छान झोप लागली होती!'

## अगदी खरी इच्छा कशी असते?

**दादाश्री :** मोक्षाची इच्छा आहे की दुसऱ्या एखाद्या गावाला जायची इच्छा आहे? इच्छा कुठल्या बाजूला आहे?

**प्रश्नकर्ता :** मुक्तीशिवाय दुसरे काहीही नको.

**दादाश्री :** मोक्षाची इच्छा आहे पण त्याबरोबरच दुसरी इच्छा दिसत असेल तर आपल्याला समजते की अजून एखादी इच्छा आत शिल्लक आहे, ती मग कधीतरी डोके वर काढते. समजा, आपल्या घरात दोन माणसे आहेत. तर सामान्यपणे रोज एकच दिसतो पण कधीतरी दुसरा दिसला तर दुसरे कोणीतरी आहे असे आपल्या लक्षात येतेच ना? मग तुम्हाला आत असे दुसरे कोणी दिसते का?

**प्रश्नकर्ता :** हो, कधी कधी दिसते.

**दादाश्री :** एक जण आहे की दोघे आहेत?

**प्रश्नकर्ता :** माहीत नाही.

**दादाश्री :** ती माहिती करून घ्यावी लागेल. असे आहे की ज्याला फक्त मोक्षाचीच तीव्र इच्छा असेल त्याला कोणीही अडवू शकत नाही. अशी खरी इच्छा असलेल्या व्यक्तीस कोणीच अडवू शकत नाही! 'ज्ञानी' त्याच्या घरी जातील! तो म्हणेल 'मला ज्ञानींची काय गरज? त्यासाठी तर मला त्यांना भेटायला जावे लागेल ना?' अरे नाही, तुझी इच्छाच ज्ञानींना तुझ्याकडे घेऊन येईल. 'ज्ञानी' हे साधन आहेत, केवळ मोक्षाशिवाय दुसरे काहीही नको, अशी ज्याची खरी इच्छा आहे त्याच्याकडे सर्व गोष्टी आपोआपच येतात. पण ज्यांना दुसरी इच्छा आहे, आतमध्ये पोल (घोटाळा) आहे, त्यांचे काहीही होऊ शकत नाही. ती पोल जेव्हा समोर येते, तेव्हा कळते! वीतराग म्हणतात, जे आमच्यासारखे पक्के आहेत ज्यांना कुठलीही इच्छा नाही त्यांना त्रास देणारा या जगात कोणीच नाही. त्रास द्यायला आलाच तर तो पुद्‌गलाला देईल, पण आत्म्याला कोण त्रास देऊ शकेल? हे लोक तर पुद्‌गलाचे व्यापारी आहेत. त्यांना तो व्यापार खुशाल करू दे. पौद्‌गलिक व्यापार आहे ना शेवटी? जास्तीतजास्त काय होईल? फार तर कोणाचे तरी पुद्‌गल घेऊन जातील. पण इथे तर ज्या वर तुमची मालकी नव्हती, जे तुमचे नव्हतेच, ते घेऊन जात आहेत ना! ज्याला मोक्षाची इच्छा आहे तो पुद्‌गलाचा मालक होतच नाही. जो पुद्‌गलाचा मालक आहे, त्याला अर्थातच मोक्षाची इच्छा नसते.

## अमूर्ताचे दर्शन, कल्याणकारी!

कवीराजांनी लिहिले आहे,

*'मूर्ती अमूर्तना दर्शन पामे ज्यां,*
*मंदिरना घंटनाद वागी गया छे.'*

(जेव्हा मूर्तीला (देहाला) अमूर्ताचे दर्शन घडते, तेव्हा मंदिरात मुक्तीच्या घंटा वाजू लागतात)

मूर्तीला अमूर्ताचे दर्शन होते. त्यानंतर मोक्षाला जाण्याचे घंटानाद होतात. अमूर्ताचे दर्शन कधीच झाले नाही, जर झाले असते तर मोक्षाचे घंटानाद सगळ्या 'देवळातून' झाले असते. ही गोष्ट तुमच्या लक्षात आली की मूर्तीने जर अमूर्ताचे दर्शन केले तर कल्याण होईल? मनुष्य (रूपी) मूर्ती असेल तेव्हाच तर अमूर्ताचे दर्शन होते! जर मूर्तीला अमूर्ताचे दर्शन झाले तर समजा की मंदिराचे घंटानाद पूर्ण झाले. तिथे मग कामच पूर्ण झाले. 'ज्ञानी पुरुष' जड आणि चेतन यांचे विभाजन करून सारे तांबे वेगळे करतात. त्यांच्या हातात आले तर ते ताबडतोब सांगतात, 'हे शुद्ध आहे आणि हे अशुद्ध आहे.' इथे थोडासुद्धा मळ चालत नाही. मोक्षाला जायचे असेल तर थोडासुद्धा मळ चालत नाही, त्याला सोने म्हणतच नाहीत. भगवंत म्हणतात, '2 टक्के मळ असेल तरी ते सोने नाही. आम्हाला 100 टक्के शुद्ध सोने हवे. शुद्ध उपयोग असलेले सोने! इथे दुसरे काहीच चालणार नाही. थोडीदेखील गडबड चालणार नाही.' सोन्यात जरासा फरक असेल तर? तरीसुद्धा नाही, फरक असेल तर भेसळयुक्तच म्हणायचे, तेव्हा सरळ सोनाराकडे जा. इथे तर वीतरागांचे काम, 'शुद्ध उपयोग' असलेले सोने असावे. तिथे नव्याण्णव टक्के चालणार नाही, पूर्ण शंभर टक्के असावे.

## वीतराग म्हणजे अस्सल पक्के

वीतराग म्हणजे काही कच्चे (साधे भोळे) नसतात. सगळे कच्चे असतील, पण वीतराग भगवंतांसारखे पक्के कोणीही नसतात, अस्सल पक्के! सगळ्या जगातील अक्कलवान् लोक त्यांना काय म्हणत? भोळे,

म्हणत असत. या वीतरागांचा जेव्हा जन्म झाला तेव्हा त्यांचे मित्र त्यांना 'हे तर भोळे आहेत, मूर्ख आहेत.' असे म्हणत. अरे, तू मूर्ख आहेस, तुझा बाप मूर्ख आहे आणि तुझे आजोबा मूर्ख आहेत. वीतरागांना कोणी मूर्ख बनवूच शकत नाही, इतके ते शहाणे–समंजस असतात. ते स्वत:चा मार्ग सोडत नाहीत. ते स्वत: फसून घेतील, पण मार्ग सोडणार नाहीत. ते म्हणतील, 'मी जर फसून घेतले नाही, तर ते मला माझ्या मार्गावर चालू देणार नाहीत.' पण समोरच्याला काय वाटते की हे कच्चे आहेत. अहो, ते कच्चे नाहीतच, ते तर पूर्ण पक्के आहेत. जे स्वत:ची फसवणूक करून घेतात, जाणूनबुजून फसवणूक करून घेतात, त्यांच्याइतके हुशार जगात कोणीच नाहीत. जाणूनबुजून स्वत:ची फसवणूक करून घेणारे वीतराग झालेले.

म्हणून अजूनही ज्यांना वीतराग व्हायचे असेल त्यांनी जाणूनबुजून स्वत:ची फसवणूक करून घेतली पाहिजे. अजाणतेपणी तर सगळे जगच फसत असते. साधू, संन्यासी, बुवा, सगळेच फसत असतात. पण जाणूबुजून फसणारे तर फक्त हे वीतरागच! लहानपणापासूनच ते जाणूनबुजून सगळीकडून स्वत:ची फसवणूक करून घेतात. आणि एवढेच नाही तर फसविणाऱ्याला असे वाटूही देत नाहीत की तू मला फसविले आहेस, नाही तर माझ्या डोळ्यातून तुला ते कळेल. डोळ्यातून पण ते तसे कळू देऊ देत नाहीत, वीतराग असे हुशार असतात! ते जाणतात की यांचा व्यापार तर पुद्‌गलाचाच आहे. त्यांना बिचाऱ्यांना माझे पुद्‌गल हवे आहे आणि मला तर हे पुद्‌गल देऊनच टाकायचे आहे! लोभी असेल त्याला ते लोभ घेऊ देतात, मानी असेल त्याला ते मान देऊनही समाधान करतात पण स्वत:चा मार्ग मात्र सोडत नाहीत. स्वत:चा जो मूळ मार्ग त्यांना प्राप्त झाला आहे तो ते सोडत नाहीत. वीतराग असे शहाणे–समंजस होते. आजदेखील जे या मार्गाने जातील त्यांना मोक्ष मिळविण्यात कसलीच अडचण येणार नाही. ज्ञानी पुरुषांचा हा देह आज दिसत आहे पण उद्या हा बुडबुडा जेव्हा फुटेल तेव्हा काय मोक्षमार्ग बंद होईल का? 'नाही, पण अट मात्र एवढीच की ज्याला मोक्ष मिळविण्याच्या इच्छेव्यतिरिक्त दुसरी कुठलीही इच्छा नाही, आणि

त्यासाठी जो जाणूनबुजून फसून घ्यायला तयार आहे, अशी काही लक्षणे त्याच्यामध्ये असतील तर त्याचा मोक्ष कोणीच अडवू शकणार नाही. तो तर एकटाच, ज्ञानी पुरुषांशिवायही दोन जन्म घेऊन सरळ मोक्षाला जाईल!'

## अन्य मार्गात कशी दैना

वीतराग मार्ग हा असा आहे! आज त्या मार्गाला कुंठित करून टाकला आहे. लोकांना क्रियाकांडातच गुंतवून ठेवले आहे. त्या क्रियाकांडात टाकणारे दुसरे कोणी नाही, स्वतःच्या कर्मामुळे ते त्यात पडले आहेत आणि जे त्यात पडतात आणि गुंततात ते त्यांच्याच कर्मामुळे दुःख भोगतात. प्रत्येक जण आपल्याच कर्माची फळे भोगतो, त्यात दुसऱ्या कोणाचा दोष नाही. स्वतःच्या कर्मामुळेच अधिकाधिक अडकत जातो. घाण्याचा जो बैल असतो, त्याला संध्याकाळी वाटते की मी आज चाळीस मैल चाललो पण जेव्हा त्याच्या डोळ्यावरची पट्टी काढली जाते तेव्हा त्याला दिसते की आपण त्याच घाणीमध्ये आहोत! याच तऱ्हेने हे लोक चालत असतात! अनंत, लाखो मैल चाललेत, पण घाण्याच्या बैलासारखे तिथल्या तिथेच आहेत! आणि तिथेच असते तरी चांगले म्हणायचे.घाण्याचा बैल तर आहे तिथेच राहतो, पण ही माणसे मात्र दोन पायातून चार पायात–मनुष्ययोनीतून पशुयोनीत जातील. म्हणून मला आरोळी ठोकून सांगावेसे वाटते, 'बाबांनो, जरा सावध व्हा, थोडे तरी सावध व्हा! मोक्षाचे राहू द्या, पण काही चांगली गती तर मिळवा!' आणि सध्या या भरतक्षेत्रात चांगली गती मिळवून देखील काय फायदा? आता तर लवकरच सहावा *आरा* (कालचक्राचा बारावा भाग) येणार आहे! तेव्हा आता चांगली गती मिळून भरतक्षेत्राबाहेर जाता येईल, क्षेत्र परिवर्तन होऊ शकेल असे काही तरी कर! वीतरागांच्या मार्गात सर्व साधने आहेत. आज महावीरांचा, श्रीकृष्णांचा, वेदांताचा, सर्व धर्मातील सर्व शास्त्रांचा पूर्ण आधार आहे. सहावा आरा सुरू झाला की मग कुठल्याच धर्माचा आणि शास्त्रांचा आधार राहणार नाही. सर्व काही संपेल. अठरा हजार वर्षानंतर सर्व पूर्ण संपणार आहे असे वीतरागांनीच वर्णन केलेले आहे, मला काहीच सांगायची गरज नाही. त्यांनी

सांगितलेलेच मी सांगत आहे. ही माझी गोष्ट नाही, माझी गोष्ट तर 'ही' की जी आपोआपच माझ्या तोंडून बाहेर पडत असते. पण ही तर वीतरागांनी सांगितलेलीच गोष्ट आहे. 'भाऊ, जरा समजावे तर लागेलच ना? समजल्याशिवाय कसे चालेल?'

तुम्ही कधी जाणूनबुजून फसून घेतले आहे का? जाणूनबुजून फसून घेणे हे तर या दूषमकाळाचे सर्वात मोठे महाव्रत आहे असे म्हणता येईल. या काळात असे दुसरे कुठले महाव्रत नाही! खरा मार्ग सापडायलाच हवा ना!

**प्रश्नकर्ता :** लोक क्रियेला जास्त महत्त्व देतात असे दिसते.

**दादाश्री :** त्यांना योग्य मार्ग सापडलेला नाही म्हणून ते असे करतात. पण क्रिया (जप-तप वगैरे) केल्या तरी हरकत नाही. त्या क्रियांचे पण काहीतरी फळ मिळेलच. कोणी जायफळाचे बी पेरले तर जायफळ येईल. त्याचा श्रीखंड किंवा खीर करायला उपयोग होईल. पण काहीतरी पेरले असेल तरच फळ येईल. म्हणजे ते चुकीचे नाही. पण त्यांच्यात ही सर्व 'ट्रिक ध्याने' (लबाडी) उत्पन्न झाली आहेत. ब्रेन टॉनिकवाली अशी ही ध्याने उत्पन्न झाली आहेत. ती पूर्णपणे अहितकारी आहेत. त्यांनी डबल ट्रिक वापरायला सुरुवात केली. हिऱ्यांच्या व्यापारात भेसळ करता येत नाही तेव्हा त्यांनी काय केले? एका ऐवजी दुसरा माल देऊ लागले! त्यापेक्षा तर भेसळ करणारे बरे की त्यांनी मूळ वस्तूतच थोडी भेसळ केली. आणि हे तर चक्क एका वस्तूऐवजी दुसरीच वस्तू देतात! आता यावर काय उपाय? आम्ही कुणा व्यक्तीबद्दल बोलत नाही. कोणी समजदार असेल तर त्यांना कळवा की 'ज्ञानी पुरुष' तुम्हाला सावध व्हायला सांगत आहेत. या अशा ब्रेन टॉनिकपासून सावध होऊ शकलात तर व्हा. चांगली गोष्ट आहे. कारण यात दुसरे काही नाही पण हे हार्ड रौद्रध्यान आहे. लाकडात पण सॉफ्ट (मऊ) लाकूड आणि हार्ड (कडक) लाकूड असे दोन प्रकार असतात. हार्ड लाकडावर रंधा मारला तर रंधाच मोडतो! लाकूड सॉफ्ट असेल तर त्यातून आगकाडी पण बनू शकते. आणि हे तर हार्ड लाकडासारखे हार्ड रौद्रध्यान आहे.

## संकल्प-विकल्प कशाला म्हणतात?

'माझे', असा आरोप जिथे-जिथे केला ते सर्व संकल्प आणि 'मी' चा जिथे-जिथे आरोप केला ते सर्व विकल्प. संकल्प-विकल्पाला आणि आरोपित भावाला भगवंतानी अशा प्रकारे वीतराग भाषेत सांगितले आहे, पण भगवंतांनी लोकभाषा नाकारलेली नाही. कारण लोकभाषा पण असायला हवी. लोकभाषेला नाकारले तर गोंधळ निर्माण होईल, लोकांना काहीच समजणार नाही. तुम्हाला लोकभाषा समजून घ्यायची आहे की वीतराग भाषा?

**प्रश्नकर्ता :** वीतराग भाषा.

**दादाश्री :** 'ही' वीतराग भाषा आहे, म्हणजे आपल्यातून 'मी चंदुभाऊ आहे.' ही मान्यता निघून गेली की सगळे काही गेले, 'मी पणा' संपून गेला की आपोआपच हा पोशाख 'माझा' आहे हे पण संपले. चंदुभाऊचा 'मी पणा' संपला की 'माझे' हे सुद्धा संपेल, म्हणजेच संकल्प पण संपेल. मनात जे (मी आणि माझे) असे चालू असते त्याला वीतरागांनी अध्यवसान असे म्हटले आहे. वीतरागांनी त्यांच्या भाषेत वेगळे लिहिले आहे पण ती भाषा समजेल तर तिचा उपयोग होईल ना? रत्नपारखी एकाच प्रकारचे असतात का? इथे मुंबईतील रत्नपारखी जो हिरा एक लाखाला घेतात तो हिरा ते मद्रासवाल्याला सव्वा लाखाला विकतात. कारण मद्रासचे रत्नपारखी श्रेष्ठ असतात. मद्रासवाला परत तोच हिरा पॅरिसवाल्याला अडीच लाखाला विकतो. जास्त पैसे देतो तो खरा रत्नपारखी म्हणावा. जास्त किंमत देऊन महाग घेतो तोच खरा रत्नपारखी. मूर्ख माणूस जास्त पैसे देत नाही, कमी पैसे देण्याचाच प्रयत्न करतो. तो म्हणतो, पाचशेत दिलात तरच मी घेईन, नाही तर जा. खरा रत्नपारखी असे करत नाही.

## चुका संपवायच्या तोच वीतराग मार्ग

वीतरागांचा मार्ग म्हणजेच चुका संपवायच्या. कसेही करून चुका संपविणे आणि लोकभाषेतून वीतराग भाषेत येणे. वीतरागांचा मार्ग एकदम

सरळ आहे. जर 'ज्ञानी पुरुष' भेटले तर कष्ट करावेच लागत नाहीत. कष्टाने कधी कोणाचा मोक्ष झाला नाही आणि होणारही नाही. जर कष्ट केल्याने मोक्ष मिळत असेल तर लोक क्रिया करून खूप कष्ट करतात आणि मजूर लोक विटा उचलण्याचे खूप कष्ट करतात. दोन्हीही कष्टच आहेत ना! पण असे कष्ट करून कधी कोणाचाही मोक्ष झाला नाही. वीतरागतेमुळेच मोक्ष झाला आहे. तुम्ही ज्या अवस्थेत अडकलेले असाल, कष्ट करण्याच्या अवस्थेत अडकलेले असाल तरीही वीतरागता असेल आणि एखाद्या शांत जागी शांत अवस्थेत बसलेले असाल तरीही वीतरागता असेल तरच मोक्ष मिळेल. एकांतात बसून राहिल्याने काही होणार नाही, किंवा कष्ट करत राहिल्यानेही काही निष्पन्न होणार नाही. वीतरागतेमुळेच मोक्ष मिळतो आणि ती वीतरागता केव्हा येते? तर संकल्प-विकल्प गेल्यानंतरच वीतरागता येते. संकल्प-विकल्प कुठे संपतात? 'ज्ञानी पुरुषां'कडे संपतात. त्यांच्या कृपेचा वर्षाव झाला तर कृपेमुळे कृपापात्र ठरतो आणि तेव्हा संकल्प-विकल्प जातात. नाही तर करोडो जन्म ते जात नाहीत. एक विकल्प काढायला गेलास तर दुसरी चार बीजे पडतील, म्हणजे नवीन चार रोपटी उगवतील! एक रोपटे उपटले तर चार उगवतात!

या क्रियांमुळे काय झाले? तर आज लक्ष्मी आली आणि त्याचबरोबर ब्रेन (बुद्धी) तेज झाले. कारण वीतरागांचे शब्द वाचलेत! वीतरागांच्या शब्दांनी क्रिया करू लागले आहेत म्हणून या 'ब्रेन टॉनिक'मुळे ब्रेन चलाख झाले आणि त्यामुळे ट्रिक्स (लबाडी) करायला शिकले, हार्ड ट्रिक्स! बुद्धी आहे पण ती कशासाठी आहे? ट्रिक्स करण्यासाठी की मोक्षाला जाण्यासाठी?

**प्रश्नकर्ता :** मोक्षाला जाण्यासाठी.

**दादाश्री :** बरोबर. बुद्धी लबाडी करण्यासाठी असते का? समोरचा कमी हुशार आहे म्हणून काय त्याला फसवायचे? मग तर त्याला दुष्ट जनावरच म्हणायला पाहिजे. भगवंत काय म्हणतात, असे दुष्ट जनावर पाहिले नव्हते! जगात इतर कुठेच नाही. फक्त ह्या हिंदुस्तानातच आणि आता हिंदुस्तानाचा संसर्ग चीन-वीनमध्ये पण थोडासा झाला आहे. पण

मुळात हा रोग हिंदुस्तानाचा आहे. जसे टी.बी. चा रोग काही देशात असतो ना, तसाच हा एक रोग आहे आणि त्याचे जंतू आहेत, ते जंतू पसरतात. समजा, मी तुमच्याबरोबर दोन-चार वेळा 'ट्रिक' केली तर तुम्हाला वाटते की ट्रिक केल्याशिवाय चालतच नाही. मग अशा प्रकारे जंतूंचा फैलाव सुरू होतो. हा तर भयंकर वाईट रोग आहे! या सारखा दुसरा कोणताही रोग नाही. हार्ड रौद्रध्यान आहे! चार गतीत भटकवत राहील.

असेच सगळ्या मागील जन्मात पण केले आहे, आणि त्याचे हे फळ आहे. लक्ष्मीजींबरोबर पण असेच वर्तन करू लागले आणि तेज बुद्धी वापरून काम करू लागले. मग भगवंत म्हणतात, 'दोन पायाने पडायला होत होते तर आता चार पाय घ्या. आम्हाला असे स्पष्ट सांगावे लागते हे काय चांगले आहे का?' ज्ञानी पुरुषांना तोंडावर सांगावे लागते की 'दोन पायवाल्यांचे चार पाय होतील!' पण सावधान करण्यासाठी लाल झेंडा दाखवीत आहोत की थांबा, गाडी पुढे नेऊ नका, पुढे पूल तुटला आहे. ज्ञानी पुरुषांना करुणा येते! त्यांना द्वेष होत नाही पण करुणा वाटते. इतके वर आला आहात, (मनुष्यजन्मात आहात) वीतरागांपासून मोक्षपद मागू शकता इतकी शक्ती तुमच्यात आहे. पण मार्ग अवरुद्ध झाल्यामुळे असे घडले आहे. मार्ग तर अवरुद्ध होणार, त्यामुळे बसूनही राहावे लागते. तुम्हाला आमचे बोलणे आवडत आहे की कठोर वाटत आहे?

**प्रश्नकर्ता :** नाही, दादा तुम्ही सांगत आहात ते खूप आवडते.

**दादाश्री :** आत जे बसले आहेत ते भगवंत आहेत, आणि 'हे तर पॅकिंग आहे.' पुद्‌गल भगवंत नसते आणि पौद्‌गलिक भाव, ते सुद्धा भगवंत नसतात. भगवंत तर भगवंतच आहेत, ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदी. त्यांच्याजवळ आपल्या सर्व कामना पूर्ण होतात. मोक्षाची कामनासुद्धा पूर्ण होते. जर काही थोड्याफार इच्छा राहिल्या असतील तर त्याही पूर्ण होतात. इच्छा पूर्ण झाल्याशिवाय मोक्षात शिरूच देत नाहीत. ज्याचा चेहरा एरंडेल तेल प्यायलासारखा असतो त्याला शिरूच देत नाहीत. लोकांच्या चेहऱ्यावर एरंडेल दिसते की नाही? तर काय कोणी चेहऱ्याला एरंडेल

लावत असेल? नाही, आतमध्ये क्लेश, बेचैनी-अशांती असते म्हणून चेहरा एरंडेल प्यायल्यासारखा होतो! आणि ती चलाखी? ब्रेनची चलाखी? सामान्य माणसांची तर खिजगणतीच नाही! साधी-सरळ माणसे तर त्यांच्या खिजगणतीतच नसतात ना! किती मोठी चलाखी!

## तरणतारणच वाचवतात

मूळ मोक्षमार्ग ओळखता आला पाहिजे. मोक्षमार्ग देणारे मोक्षदाता आवश्यक आहेत आणि ते तरणतारण असायला हवेत. ते स्वतः तरले असतील तरच ते आपल्याला तारू शकतील. नाही तर जो स्वत:च बुडत असेल तो आपले भले कसे करणार? जे दाता पुरुष असतात, ते मोक्षाचे दान देण्यासाठीच आलेले असतात, घेण्यासाठी आलेले नसतात! जे स्वत:च मोक्षाचे दान घेण्यासाठी आलेले असतील ते आपल्याला काय देणार? दान घेण्यासाठी आलेला कधी दान देतो का? जे मोक्षाचे दान देण्यासाठीच आलेले असतील अशा 'ज्ञानी पुरुषां'कडेच आपले कार्य सिद्ध होईल. मोक्षदाता पुरुष की ज्यांच्याकडे मोक्षाचा साठाच आहे, जे स्वत:च मोक्षस्वरूप झाले आहेत तेच आपल्याला मोक्ष देऊ शकतात.

साऱ्या जगाला वीतरागता कशी समजेल? त्यांना वीतराग मार्ग कसा लाभेल? भले मोक्ष प्राप्त होत नाही, पण वीतराग मार्ग तरी प्राप्त करा. अगदी एकच मैल चाला पण वीतराग मार्गावर चाला. ज्या धर्माला तुम्ही मानत असाल त्या धर्माचे जेवढे वीतराग मैल असतील त्यातला एक मैल तर एक मैल पण वीतराग मैलावर चाला! एवढेच ज्ञानी पुरुष म्हणतात.

ही पुस्तके तर हिऱ्यासारखी आहेत. हिऱ्यांच्या ढिगात खरे हिरे आणि काचेचे नकली हिरे एकत्र असतात, तशी ही शास्त्रे आहेत. एखादा रत्नपारखी असेल तर त्याला त्यातले एखादे पुस्तक ओळखता येईल. पण आजकाल खरे रत्नपारखी उरलेतच कुठे? जे आहेत त्यात क्वचितच कोणी रत्नपारखी असेल. रत्नपारखीपणा शिल्लक उरलेलाच नाही. पूर्णपणे नाहीसा झाला आहे. शास्त्रे काय करतात? शास्त्रे फक्त मार्गदर्शन

करतात की, गो टु ज्ञानी– 'ज्ञानी पुरुषां'कडे जा. कारण आत्मा अवर्णनीय आहे आणि अवक्तव्य आहे. वाणी द्वारे बोलता येईल असा नाही, त्याचे वर्णन करता येईल असे नाही.

## वीतराग धर्म

वीतराग धर्म म्हणजे काय? वीतराग धर्म कशाला म्हणतात? जिथे निर्विवादिता आहे, कोणतेही वाद नाहीत तिथे वीतराग धर्म आहे. वीतराग धर्म असेल तिथे वादावर विवाद होत नाहीत, प्रतिवाद पण होत नाही. आपल्या इथे गेली बारा वर्षे प्रवचने चालू आहेत पण आजपर्यंत इथे कोणी वाद-विवाद केलेला नाही! कारण ही तर स्याद्वाद वाणी! स्याद्वाद वाणीत वाद असेलच कसा? मुस्लिम पण मान्य करतात, युरोपियन पण मान्य करतात, सगळेच जण मान्य करतात. त्याशिवाय त्यांना गत्यंतरच नाही. त्यांनी जर मान्य केले नाही तर आम्ही समजून घेतो की हा त्यांचा आडमुठेपणाच आहे. असे ते मुद्दाम करतात आणि करतीलच. मनुष्यात अहंकार असतो आणि आडमुठेपणा करणे हा तर त्यांचा मूळ स्वभावच असतो ना!

आता वीतराग मार्गाचा उद्धार होऊ लागला आहे. वीतराग स्वत: तर वीतराग होते. पण त्यांच्या मार्गाचा उद्धार व्हायला नको का? बरेच दिवस झाले, किती दिवस त्या मार्गावर धूळ पडून राहील? खरा हिरा कधी ना कधी तरी दिसेलच ना? श्रीकृष्ण भगवंतानी किती सुंदर म्हटले आहे! ते म्हणतात, 'वीतराग मार्ग निर्भय मार्ग आहे, मोक्षाचा मार्ग आहे.'

## जगात सध्या क्रांती काळ

**प्रश्नकर्ता :** लोक आज भारताची संपूर्ण संस्कृती कशी नष्ट करता येईल यामागे लागले आहेत. हा पश्चात्य संस्कृतीचा प्रभाव म्हणायचा.

**दादाश्री :** आपल्याला जी इमारत तोडायची होती तीच आता हे लोक तोडत आहेत. संस्कृतीचा नाश करणारे असे तुम्ही म्हणता, ते

लोक हेच काम करत आहेत. म्हणजे आपल्याला मजूर शोधावे लागणार नाहीत. हे मजूर बाहेरून येत आहेत हे मला खूप पूर्वीपासूनच जाणवले आहे. त्यांना आपण उत्तेजन द्यायला हवे असे नाही, पण आपण (मनात) समजून घ्यायला हवे की फुकटात मजूर मिळत आहेत! तर असे जुने सर्व मोडले जाईल तेव्हाच तर नवीन उभारता येईल.

हे फॉरेनचे लोक तर खूपच सुधारले आहेत(!) इतके सुधारले आहेत की झोपेची गोळी खाल्याशिवाय त्यांना झोपच येत नाही! अहो, तुमची झोप कुठे गेली? त्यापेक्षा आमच्याकडे लोक बरे, त्यांना सहज आरामात झोप लागते. तुम्ही तुमच्या देशात सगळ्या जगाचे सोने आणि संपत्ती गोळा करून बसले आहात तरीही तुम्हाला वीस-वीस झोपेच्या गोळ्या खाव्या लागतात. हे काय चालले आहे? एक फॉरेनचे शास्त्रज्ञ आम्हाला भेटले होते. त्यांच्याशी आम्ही याबद्दल बोललो. तेव्हा त्यांनी विचारले, 'यात आम्ही कुठे चुकत आहोत? आमची काय चूक?' तेव्हा मी त्यांना म्हटले, 'तुमचे हे भौतिक विज्ञान आता नॉर्मलच्या वर गेले आहे, त्यामुळे विषारी झाले आहे. बिलो नॉर्मल इज दी पॉइजन, अबॉव नॉर्मल इज दी पॉइजन, नॉर्मालिटी इज दी रियल लाइफ. (नॉर्मलच्या खाली पण विष आणि नॉर्मलच्या वरती पण विष. नॉर्मल असणे म्हणजे खरे आयुष्य.)'

वीतराग मार्ग असे म्हणतो की, जे काही घडत आहे ते सर्व वीतराग मार्गाला पुष्टी देण्यास कारण होत आहे. सध्या जे काही होत राहिले आहे ते वीतराग मार्गाला पुष्टीच देत आहे.

**प्रश्नकर्ता :** हो, असे घडते तेव्हा आम्हाला विचार येतात आणि मनात उत्कृष्ट भावना होतात.

**दादाश्री :** आम्हाला किंचितदेखील राग-द्वेष होत नाही आमच्या लगेच लक्षात येते की हे लोक काय करत आहेत! उपाश्रयात ते काय करत आहेत? तर वीतराग मार्गाचीच पुष्टी करत आहेत! वीतराग मार्ग कशाला म्हणतात? ज्या मार्गात चंचलता नाश पावते तो वीतराग मार्ग. सात्त्विकतेची एक मर्यादा असते. चंचलता वाढवेल अशी सात्त्विकता

संपली पाहिजे. जी व्यक्ती कमी चंचल असते ती इमोशनल नसते, मोशनमध्ये असते. अशी व्यक्ती संपूर्ण आयुष्यात जेवढी कर्मे बांधील त्याच्यापेक्षा जास्त कर्मे चंचल व्यक्ती फक्त पंधरा मिनिटांत बांधते! म्हणजेच काय सगळीकडे वीतराग-धर्माचेच पोषण चालले आहे. तुम्हाला जे जे उलट दिसत आहे ते तसे नसून त्यामुळे वीतराग धर्माचेच पोषण होत राहिले आहे, सर्वच!

मला हा प्रश्न 1928 सालीच पडला होता. 1928 साली मी एक सिनेमा पाहायला गेलो होतो. तेव्हा 'अरेरे! या सिनेमांमुळे आपल्या संस्कारांचे काय होणार?' आपल्या लोकांचे काय होणार असा विचार मनात आला होता. पण लगेच दुसरा विचार आला की 'आपल्याजवळ याचा काही उपाय आहे का? आपल्या हातात सत्ता आहे का? सत्ता तर आपल्या हातात नाही, मग हा विचार आपल्या कामाचा नाही. सत्ता असेल तर गोष्ट वेगळी पण सत्ता नसताना या विचारात वेळ घालवायचा, डोकेफोड करायची हा अहंकार आहे.' मग दुसरा विचार आला 'हिंदुस्तानचे असेच होणार का?' त्यावेळी आम्हाला ज्ञान नव्हते. ते तर 1958 ला झाले. पण त्यापूर्वी अज्ञान तर होतेच ना? अज्ञान कोणी घेऊन टाकले नव्हते. ज्ञान नव्हते पण अज्ञान तर होतेच ना? पण त्या अज्ञानात मला ही बाजू दिसली की जी वस्तू वाईटाचा प्रसार वेगाने करते तीच वस्तू चांगल्याचा प्रचार पण तसाच वेगाने करू शकेल. म्हणजे चांगल्या गोष्टी पसरविण्यासाठी हे खूप चांगले साधन आहे. असे सगळे विचार मनात आले होते. पण 1958 साली ज्ञान प्रकट झाल्यानंतर याबद्दल कसलेच विचार कधी आले नाहीत.

आज साऱ्या जगात वीतराग धर्मासाठी काम होत आहे. एकाच ठिकाणी नाही तर सर्व जगातच काम होत आहे, हे सगळे वीतराग धर्माला पुष्टी देत आहेत आणि स्वत:चा सत्यानाश करून घेत आहेत!

हे मंत्री आम्हाला विचारायला येतात आणि म्हणतात, 'आता हिंदुस्तानात सगळे बिघडण्याच्या वाटेवर आहे.' मी त्यांना म्हणतो, 'साहेब, तुम्ही घराकडे बघा, तुमचे घर बिघडणार नाही, तुमच्या मुली

बिघडणार नाहीत याची काळजी घ्या.' कारण साहेबांकडे तीन गाड्या असतात. त्यातील एक गाडी साहेब घेऊन निघाले, की एक गाडी घेऊन शेठाणी एकीकडे जाईल आणि मुली दुसरीकडे जातील. अरे, मग सर्व उध्वस्त करून सोडतील! या हिंदुस्तानाला बिघडवणारा अजून कोणी जन्मालाच आलेला नाही. हा वीतरागांचा देश आहे, ॠषीमुनींचा देश आहे. या देशाला कोणी बिघडवू शकत नाही. ज्या देशात श्रीकृष्णासारखे वासुदेव निर्माण झाले, ज्या देशात 24 तीर्थंकर, 12 चक्रवर्ती, 9 वासुदेव आणि 9 प्रतिवासुदेव आणि 9 बलराम निर्माण झाले त्या देशाला काय कमी असेल?

क्रमिक मार्गात नक्कल चालू शकते. पण हा अक्रम मार्ग आहे! इथे दिवा अचानकच प्रकट झाला आहे, म्हणून तू तुझा दिवा पेटवून घे. मग ज्या ज्या गाठी आहेत त्या कशा सोडवायच्या ते मी तुला सांगेन. पण प्रथम तू 'पुरुष' हो. प्रकृतीच्या रूपातच राहून तुझे कल्याण होणार नाही. माणूस कुठल्या रूपाने आहे? जोपर्यंत 'स्वरूपाचे भान' होत नाही तोपर्यंत तो प्रकृतीरूपात आहे. आणि ज्या ज्या क्रिया केल्या जातात, ते सर्व प्रकृतीचे नाच आहेत. प्रकृती नाचत असते आणि तो म्हणतो, 'मी केले.' याला गर्व म्हणतात.

❖❖❖❖❖

# भक्त-भक्ती-भगवान

श्रीकृष्ण भगवंतानी भक्तांचे चार प्रकार सांगितले आहेत. अभक्तांचे प्रकार तर पुष्कळ आहेत! म्हणून आपण इथे फक्त भक्तांचे प्रकार बघू :

(1) आर्तभक्त : हे भक्त फक्त दुःखाच्या वेळीच ईश्वराची आठवण काढतात. सुखाच्या वेळी त्यांना ईश्वराची आठवण होत नाही. स्वतःचे पाय दुखू लागले की, 'अरे देवा! अरे देवा! दया कर, दया कर' असे म्हणतात. तेव्हा देवाला समजते की हा फक्त दुःख झाल्यामुळेच माझी आठवण काढीत आहे. असे भक्त ठिकठिकाणी पाहायला मिळतात.

(2) अर्थार्थी भक्त : हे भक्त स्वार्थी असतात, अर्थात मतलबी असतात. ते देवाजवळ मागणे मागतात. 'देवा, मला मुलगा होऊ दे, तो झाला की मी अमुक अमुक करीन' असे म्हणतात. त्यांना अर्थार्थीचा अर्थच कळत नाही. म्हणून ते म्हणतात, 'मी अर्थार्थी आहे.'

(3) जिज्ञासू भक्त : हे भक्त देवाचे दर्शन घेतात, त्यांना देवाच्या दर्शनाची तीव्र ओढ असते.

(4) ज्ञानी भक्त : हे भक्त म्हणतात, 'मी' आणि ईश्वर एकच आहोत.

भगवंतानी म्हटले आहे की 'ज्ञानी हाच माझा प्रत्यक्ष आत्मा आहे.' ते स्वतःच आपली सर्व पापकर्मे जाळून टाकतात आणि दुसऱ्यांची पापकर्मे पण जाळून टाकतात! 'आम्ही' स्वतः असे 'ज्ञानी पुरुष' आहोत!

तर या चार प्रकारच्या भक्तांपैकी जिज्ञासू भक्तांचे काम होते. या व्यतिरिक्त भक्तांचा पाचवा प्रकार नाही. अभक्त लोक तर साक्षात भगवंत हजर झाला तर त्याची भाजी करून खातील! कारण त्यांनी खूप नवस वगैरे धरलेले असतात, तर त्यातला एकही नवसाला पावत नाही म्हणून भगवंताची भाजी करायला कमी करणार नाहीत!

**प्रश्नकर्ता :** दादा, हे सज्जन तर फार मोठे भक्त आहेत.

**दादाश्री :** कधीपर्यंत भक्त बनून राहायचे? जन्मोजन्मी भक्त राहतो आणि एकाद्या जन्मात जर चूक झाली आणि भक्तांमधूनही कुसंग मिळाला तर? तो त्याला कुसंगात घेऊन जाईल आणि मग तिथेच अडकून बसेल.

जोपर्यंत ज्ञानी भेटत नाहीत तोपर्यंत भक्ती मागितली पाहिजे. आणि ज्ञानी भेटले तर त्यांच्याकडून मोक्ष मागितला पाहिजे. 'ज्ञानी' कायमस्वरूपी समाधान आणू शकतात. भक्ताला भगवंताची आठवण का येते? कारण त्यांना आत्मज्ञान हवे असते. आत्मज्ञान हे तर तुझे स्वत:चेच स्वरूप आहे. पण त्याची तुला जाणीवच नाही. जगात सगळीकडे 'तुंही, तुंही' ('तूच...तूच') असे गातात ते भक्त, आणि भगवंतांना ते वेगळे मानतात. अरे, एकदा तरी 'मीच, मीच' असे गा ना! तरी तुझे कल्याण होईल. 'तूच...तूच' असे म्हणत बसलास तर कधी सुटका होईल? पण लोक 'तूच... तूच' असे का गातात? व्यग्रतेत जो 'तू' होता तो आता फक्त 'तुझ्यामध्ये' एकाग्र झाला आहे. अशा प्रकारे 'तूच तूच...' असे गात बसतोस, पण त्यामुळे काहीही निष्पन होणार नाही. 'मीच...मीच' असे म्हटलेस तरच काम होईल. 'तूच...तूच' म्हणत राहिल्यामुळे 'तू' आणि 'मी' असा भेद राहतो आणि त्यामुळे शेवटपर्यंत 'भक्त' आणि 'भगवंत' वेगळेच राहतात. याउलट 'मीच...मीच' म्हणण्यामुळे अभेदता निर्माण होते. स्वत:च परमात्मस्वरूप होऊन जातो!

काहीजण 'तत्त्वमसि' असे म्हणतात. म्हणजे तो मी आहे. पण 'तो' म्हणजे कोण? तर देव जाणे! 'तो' चे स्वरूप समजलेलेच नाही आणि 'तत्त्वमसि, तत्त्वमसि' असे म्हणत राहिले तर त्याचा काहीच फायदा नाही. जेव्हा सगळीकडे 'मीच...मीच...' दिसू लागेल तेव्हा काम होईल!

भक्तांनी म्हटले आहे, सर्वांमध्ये ईश्वराला पाहा. पण तो तर साइकोलॉजिकल इफेक्ट (मानसिक परिणाम) आहे. सगळ्यात ईश्वर आहे असे पाहायची सवय लागली तर तसे दिसूही लागेल. तरी पण जरा खोड काढली की त्यांचे क्रोध-मान-माया-लोभ उत्पन्न होतात. तुम्हा महात्म्यांना जे प्राप्त झाले आहे त्यातला एक थेंबसुद्धा या भक्तांनी प्राप्त केलेला नाही. हे फार आश्चर्यकारक ज्ञान आहे! हे तर विज्ञान आहे! वैज्ञानिक पद्धतीने तुम्ही आत्मा प्राप्त केला आहे. म्हणून तुम्ही सगळ्यांच्यात आत्मा पाहू शकता. भक्त लोक 'तूच...तूच' असे गातात पण आम्ही तुम्हाला जे ज्ञान दिले आहे, ते ज्ञान 'मी चेच' आहे 'तूच... तूच' मध्ये भक्त आणि भगवंत यांच्यात भेद राहतो. भेदबुद्धी राहत असते यात नवल ते काय? अखा भगत यांनी म्हटले आहे, *'जो तू जीव तो कर्ता हरि, जो तू शिव तो वस्तू खरी.'*

(जर तू जीव आहेस तर कर्ता हरि आहे, आणि जर तू शिव आहेस तर ती गोष्ट खरी आहे.)

जर जीव आणि शीव यातील भेद संपला तर तो परमात्मा होतो, अभेद बुद्धी निर्माण झाली तर कार्य सिद्ध होते.

## व्यवहारात - भक्त आणि ज्ञानी

'तूच...तूच' या वृत्तीमुळे संसार उभा आहे. सगळे मोठमोठे भक्त आरोपित जागी आहेत. त्यामुळे सतत आकुलता-व्याकुलता होत असते. आणि 'स्व' मध्ये राहिलात तर स्वस्थता वाटते. आकुलता-व्याकुलता होत नाही. निराकुलता वाटते. भक्त जेव्हा खुश होतात तेव्हा आनंदाने वेडे होतात आणि दुःखात निराश होतात. अशा भक्तांना लोक लहरी समजतात. ते कधी लहरीपणा करतील ते काही सांगता येत नाही. जेव्हा नरसी मेहतांची बायको मरणासन्न होती तेव्हा त्यांना हरिजनवासातून भजन गाण्यासाठी बोलावणे आले, आणि ते तिथे गेले. संपूर्ण रात्र भजन-कीर्तनात गेली. एक माणूस सकाळी आला आणि म्हणाला, 'मेहतानीजी मरण पावल्या.' तेव्हा मेहता गाऊ लागले,

*'भलुं थयुं भांगी जंजाळ, सुखे भजीशुं श्रीगोपाळ.'*

(बरे झाले जंजाळ सुटले, आता मी सुखाने भगवंतांची भक्ती करीन.)

पण मग लौकिक रिवाज करायचे नाहीत का? करायला हवेत. पण इथे ते भक्त वेड्यासारखे वागतात. याउलट ज्ञानी पुरुष व्यवहारात कुठेही कच्चेपणा करीत नाहीत. लौकिक व्यवहारात सुद्धा ते योग्य ते नाटक करतात. नाटक करण्यास कधीच चुकत नाहीत ते ज्ञानी! जिथे, ज्यावेळी जे नाटक करायला हवे ते आम्ही पूर्ण अभिनयासह करतो. आम्ही कामाला जातो तेव्हा सर्व म्हणतात, 'शेठजी आले, शेठजी आले.' तेव्हा आम्ही शेठ असल्याचे नाटक करतो. जेव्हा मी आजोळी जातो तेव्हा तिथे सगळे म्हणतात 'भाचा आला', तिथे आम्ही भाच्याचे नाटक करतो. ट्रेनमध्ये असताना कोणी विचारले 'तुम्ही कोण?' तर आम्ही म्हणतो मी पॅसेंजर आहे. इथे सत्संगात आलो की ज्ञानी पुरुषाचा अभिनय करतो आणि वरातीत गेलो तर आम्ही वराती बनतो, स्मशानात गेलो तर अर्थीला खांदा देणाऱ्यांपैकी एक होतो. त्या नाटकात आम्ही थोडेही चुकत नाही. अचूक अभिनय करतो. जे अशा नाटकात कमी पडतात ते ज्ञानी नाहीत. ट्रेनमध्ये टी.सी ने तिकिट मागितले तर तिथे आम्ही थोडेच सांगणार, आम्ही 'ज्ञानी पुरुष' आहोत, 'दादा भगवान आहोत' तिथे तर आम्ही पॅसेंजरच ना! आणि जर तिकिट हरवले असेल तर चेकरला आम्ही म्हणतो, 'आम्ही तिकिट काढले होते. पण कुठेतरी पडून गेले, तुम्हाला जो काही दंड लावायचा तो लावून द्या.' या उलट भक्त धुनी असतात. धुनी शब्द 'ध्यानी' या शब्दावरून बनला आहे. ध्यानीचा अपभ्रंश होऊन धुनी शब्द आला! एकाच ठिकाणी ध्यान ते ध्यानी. एकच ध्यान लागले म्हणजे त्याला धुन लागली असे म्हणतात, म्हणजेच तो धुनी बनतो. एखादी अवस्था उत्पन्न झाली की मग त्यातच रमून जातो, त्याला धुनी म्हणतात. धुनी तर 'स्वतःच्या स्वरूपाचे' बनण्यासारखे आहे की ज्यामुळे ध्याता, ध्येय आणि ध्यान एक होतात.

**प्रश्नकर्ता :** ज्यांना आपण विम्जिकल (लहरी) म्हणतो ते धुनी असतात का?

**दादाश्री :** नाही. ते 'धुनी'चे चुलते आहेत. धुनीला पैशांची पर्वा नसते. आमच्याकडे जर धुनी आला तर त्याचे कल्याणच होऊन जाईल. धुनी लोकांना जगातील लोक सुखाने जगू देत नाहीत. ते सारखे त्यांना इकडून-तिकडून त्रास देत राहतात. भक्तांना बिचाऱ्यांना सुख मिळत नाही. लोक त्यांना छळत राहतात. भक्तांना खूप सोसावे लागते. बिचाऱ्या कबीरांचा लोकांनी खूप छळ केला. एकदा दिल्लीत एक तरूण जोडपे मुलाला कडेवर घेऊन फिरत होते. तेव्हा त्यांना बघून कबीरांना खूप दया आली. त्यांना वाटले की हे किती कठीण जीवन जगत आहेत. म्हणून ते एका उंच टेकडीवर चढून मोठ्या आवाजात गाऊ लागले,

*'ऊँचा चढ पुकारियाँ, बूमत मारी बहोत,*
*चेतनहारा चेतजो, सिर पे आयी मौत.'*

(उंच टेकडीवर चढून मी खूप मोठ्याने अनेकदा ओरडत आहे, सावध होणारे सावध व्हा, समोर मृत्यू उभा आहे.)

समोर मृत्यू उभा आहे आणि मुला-बाळांना असे कडेवर उचलून फिरत आहात? तेव्हा ते नवरा-बायको आणि इतर लोक म्हणू लागले, 'हा वेडा काय बडबडतो आहे?' मग सर्वांनी त्यांना खूप बदडले! कबीरजी खरे भक्त होते आणि अगदी चोख माणूस, म्हणून त्यांनी मार पण खूप खाल्ला. असा खरा भक्त तर क्वचितच कुणी असतो.

खरे खरे (नग्न सत्य) बोलू नये. वाणी कशी असावी? हित, मित, प्रिय आणि सत्य-या चार गुणांनी युक्त अशी वाणी असावी.तुमचे बोलणे कितीही खरे असो, पण जर ते ऐकणाऱ्याला प्रिय वाटत नसेल तर ते बोलणे काय कामाचे? तिथे तर ज्ञानींचेच काम. चार गुणाकारयुक्त वाणी फक्त ज्ञानी पुरुषांजवळच असते. ज्ञानींची वाणी केवळ समोरच्या व्यक्तीच्या हितासाठीच असते, स्वत:च्या हितासाठी अजिबात नसते. ज्ञानीपाशी *'पोतापणुं'* (मी आहे आणि माझे आहे असे आरोपण, माझेपण) असे काही नसतेच. जर *'पोतापणुं'* असेल तर ते ज्ञानी नव्हेच.

कबीरजी एके दिवशी संध्याकाळी दिल्लीत फिरत होते, रस्त्यात खूप गर्दी होती. ती पाहून ते म्हणाले,

*'मानूस खोजत मै फिरा, मानूस का बडा सुकाल,*
*जाको देखी दिल ठरे, ताको परियो दुकाल.'*

(माणूस शोधत मी हिंडलो, माणसे तर खूप आहेत, पण ज्याला बघून मन प्रसन्न होईल अशा माणसांचा मात्र दुष्काळ आहे.)

माणसे तर पुष्कळ आहेत पण ज्याला पाहून मन प्रसन्न होईल असा कुणी नसतो ना! असा माणूस समुद्राच्या पुष्ठभागावर थोडाच असेल? तो तर पांच-सहा फूट खोलवरच असणार. वर वर शोधले तर तो कसा सापडणार?

जुन्या काळची गोष्ट आहे, एक राजा होता. तो खूप उदार होता. एके दिवशी तो महालाबाहेर आला आणि त्याने खूप माणसांना पाहिले. त्याने मंत्र्याला विचारले, हे लोक का आले आहेत?' मंत्री म्हणाले, 'हे लोक उपाशी आहेत म्हणून जेवण मागायला आले आहेत.' राजा म्हणाला, 'तर मग ह्या लोकांना रोज जेवण द्या.' हळूहळू ही बातमी एक एक करत अनेक लोकांपर्यंत पोहोचली. रोज लोकांच्या झुंडीच्या झुंडी राजाकडे जेवायला येऊ लागल्या. मंत्री विचारात पडले. 'आता तर आपण अडकलो. रोज हजारो लोक जेवायला आले तर आपल्याला कसे परवडणार?' मग त्याने विचार करून एक युक्ती काढली. त्यासाठी राजाकडून परवानगी मिळविली, त्याने दवंडी पिटली, 'रोज जे भक्त जेवायला येतात, तर राजा उद्या त्यांचे 'भक्त तेल' काढणार आहेत. तेव्हा सर्वांनी जरूर यावे.' मग दुसऱ्या दिवशी फक्त दोनच लोक आले. स्वतःचे तेल काढावयास कोण येणार? जे दोन खरे भक्त होते तेवढेच आले.

ताई, तुम्हाला मोक्ष हवा आहे की आणखी काही हवे आहे?

**प्रश्नकर्ता :** मोक्षाऐवजी भक्ती करायला मिळेल तर चांगले.

**दादाश्री :** तुम्ही सध्या ईश्वराची भक्ती करता, त्या ईश्वराला तुम्ही ओळखता का? तो ईश्वर कुठल्या गल्लीत राहतो? किती उंच आहे? त्याला किती मुले आहेत? त्याने आईचे बारावे केले आहे की नाही, हे सगळे तुम्हाला माहीत आहे का?

**प्रश्नकर्ता :** भक्ती करूनच साक्षात्कार होतो ना?

**दादाश्री :** अनंत जन्मांपासून तुम्ही आहात. कुठल्या जन्मात तुम्ही भक्ती केलेली नाही? अनंत जन्म ईश्वराला न ओळखता तुम्ही त्यांची परोक्ष भक्ती करत आहात. त्याने काहीही प्राप्त होत नाही, आणि सतत यात्रा करत सगळीकडे भटकावे लागते, तर काय ईश्वर तिथे बसून राहिला असेल?

सगळे जग या जाळ्यात अडकले आहे. साधू, संन्यासी सर्वच असे अडकलेले आहेत. असे कित्येक लोक या गल्लीतून त्या गल्लीत भटकत आहेत. कोणी हिमालयात तर कोणी जंगलात भटकत आहेत. पण भगवंत तुम्हाला फक्त ज्ञानी पुरुषांकडेच मिळतील. बाकी कुठेही जा, सगळीकडे गडबड, गडबड आणि गडबडच आहे. मनुष्यजन्मात येऊन ज्ञानीपाशी जाऊन आत्मज्ञान घेतले नाही तर सर्वत्र गडबड गोंधळ आहे. तुम्हाला जे काही विचारायचे आहे ते इथे विचारा, येथे अंतिम स्टेशनाची चर्चा केली जाते.

## भक्ती आणि मुक्ती

**प्रश्नकर्ता :** मुक्ती मिळवण्यासाठी भक्ती करायला पाहिजे का?

**दादाश्री :** भक्ती फक्त मुक्तीमार्गाचे साधन मिळवून देते. भक्ती केल्यामुळे मुक्तीची साधने मिळतात. वीतराग भगवंतांची भक्ती केवळ मुक्तीसाठीच आहे. जो एखाद्या गोष्टीचा भिकारी (तीव्र इच्छूक) असेल, त्याचा सत्संग मोक्षासाठी उपयोगी होत नाही. देवगती मिळवण्यासाठी असा सत्संग उपयोगी होऊ शकतो. पण मोक्षासाठी तर जो कुठल्याही वस्तूचा भिकारी नाही त्याचा सत्संग करायला हवा. भक्ताच्या वाट्याला काय येते? घंटा वाजविणे आणि प्रसाद खाणे. हे तर स्वत:च भगवंताच्या फोटोची भक्ती करतात. हे कसे आहे? तर ज्याची भक्ती करतो तसाच तो बनतो! संगमरवरीच्या दगडाची पूजा केली, भक्ती केली तर संगमरवरासारखे होतो आणि काळ्या दगडाची पूजा केली तर काळा दगड होऊन जातो. फोटोची भक्ती केली तर फोटोसारखा बनतो आणि

जर या 'दादां'ची भक्ती केली तर 'दादां'सारखा होऊन जातो! भक्तीचा स्वभाव कसा आहे? ज्या रूपाची भक्ती करेल तसा तो होणार. भक्ती ही ईश्वर आणि भक्त यांच्यातील संबंध दाखविते. जोपर्यंत ईश्वर आहे तोपर्यंत त्याचे चेले असतात. तोपर्यंत ईश्वर आणि भक्त वेगळे आहेत. आपल्या इथे आपण जे करतो त्याला भक्ती म्हणत नाहीत, त्याला निदिध्यासन असे म्हणतात. निदिध्यासन हे भक्तीपेक्षा उच्च मानले जाते. निदिध्यासनात एकरूपच राहते, ईश्वराशी एकरूपच होतो त्यावेळी. याउलट भक्तीमध्ये तर कितीही जन्म भक्ती करत राहिला तरी काहीही निष्पन्न होणार नाही!

या कॉम्प्युटरला देव मानून त्याला शोधू लागला तर खरा देव कधीच सापडणार नाही. आपल्यापेक्षा जो उच्च आहे त्याची भक्ती कर ना! त्याचे गुण कळाल्याखेरीज भक्ती होतच नाही. पण लोक साधारणपणे भक्ती करतात ती प्राकृतिक गुणांचीच भक्ती आहे, आणि तिथे तर चटक लागल्याशिवाय भक्ती करूच शकत नाही. चटक लागल्याशिवाय भक्ती होऊच शकत नाही.

नाम, स्थापना आणि द्रव्य या तीन गोष्टींच्या गुणाकाराने भक्ती केली जाते. कित्येक लोक स्थापना भक्ती करतात, म्हणजे ईश्वराचा फोटो ठेवतात आणि भक्ती करतात आणि ज्ञानी पुरुषांची भक्ती म्हणजे जेव्हा नाम, स्थापना, द्रव्य आणि भाव या चार गोष्टींच्या गुणाकार होतो तेव्हा होते.

**प्रश्नकर्ता :** भक्ती आणि श्रद्धा यात फरक आहे का?

**दादाश्री :** भक्तीचा अर्थ तुला काय वाटते? मी जेवतो याला तू भक्ती म्हणणार का?

**प्रश्नकर्ता :** नाही, आपण आराधना करतो ती भक्ती ना?

**दादाश्री :** पुस्तक वाचत वाचत ज्यांच्या वाक्यांवर आपली श्रद्धा बसते, त्यांची आपण भक्ती करतो. श्रीकृष्णांच्या वाक्यांवर श्रद्धा बसली तर श्रीकृष्णाची भक्ती होते. ज्यांच्या वाक्याशी ॲडजॅस्टमेंट होते त्यावर श्रद्धा बसते, आणि श्रद्धा बसल्यावर त्यांची भक्ती केली जाते. मग दुसऱ्या

कोणाचे ऐकतो तेव्हा जर त्यांच्या वाक्यांवर श्रद्धा बसली तर आधी ज्यांच्यावर श्रद्धा बसलेली तिथे ॲडजॅस्टमेंट होईनाशी होते, श्रद्धा डगमगायला लागते. मात्र इथे तर निश्चयपूर्वक श्रद्धा आहे, याला प्रतीती म्हणतात.

## आराधना-विराधना

**प्रश्नकर्ता :** आराधना कशाला म्हणतात?

**दादाश्री :** कोणाचे मन दुखावणे म्हणजे विराधना. त्याच्या उलट केले तर त्याला आराधना म्हणतात. जगात साधारणपणे अपराधच होत असतात. आराधना जर उत्तर असेल तर विराधना दक्षिण आहे. आराधना झाली म्हणजे तिथे राधा आली आणि राधा आली म्हणून तिथे श्रीकृष्ण पण असणारच.

**प्रश्नकर्ता :** दादांची निरंतर आठवण येते, त्याला काय म्हणायचे?

**दादाश्री :** त्याला निदिध्यासन म्हणतात. निदिध्यासनामुळे तद्‌रूप होतो. आणि त्यामुळे त्यांच्या सर्व शक्ती स्वत:ला प्राप्त होतात. श्रवण आणि मनन यांच्याद्वारे निदिध्यासन वाढत जाते.

**प्रश्नकर्ता :** अपराध शब्दाची व्याख्या काय?

**दादाश्री :** विराधना इच्छेशिवाय होते तर अपराध इच्छापूर्वक होतो.

**प्रश्नकर्ता :** तो कशा प्रकारे होतो, दादा?

**दादाश्री :** जेव्हा एखादा माणूस हट्टाला पेटतो, तेव्हा तो अपराध करू शकतो. त्याला कळत असते की येथे विराधना करणे योग्य नाही, तरी पण तो विराधना करत राहतो. माहीत असूनसुद्धा विराधना करतो, ते अपराधात मोडते. विराधना करणारा सुटू शकतो पण अपराध करणारा सुटू शकत नाही. ज्याचा अहंकार खूप तीव्र असतो, तो अपराध करून बसतो. अशा वेळी आपण स्वत:लाच सांगायला हवे, 'भाऊ, तू तर एकदम वेडा आहेस, उगीचच पॉवर राखून मिरवतोस. लोकांना तर तू कसा आहेस हे माहीत नाही पण मी तुला पूर्ण ओळखून आहे. तू चक्रम

आहेस.' म्हणजे असा उपाय आपण करायला हवा. अधिक-उणे आपणच करायला हवे. फक्त गुणाकारच करत राहिलो तर आपण कुठे जाऊन पोहोचू. म्हणून आपण भागाकारदेखील केला पाहिजे. अधिक आणि उणे निसर्गाच्या आधीन आहे पण गुणाकार-भागाकार करणे हे आपल्या हातात आहे. अहंकार जर साताने गुणत असेल तर आपण साताने भागले पाहिजे म्हणजे बाकी शून्य राहील.

**प्रश्नकर्ता :** जो अपराध घडून गेला आहे तो कसा काय धुतला जाईल?

**दादाश्री :** ज्ञानी पुरुषांकडे जाऊन जर (पश्चातापाने) डोळ्यात पाणी आले तर अपराध धुतला जातो का?

**प्रश्नकर्ता :** ते कशावर अवलंबून आहे?

**दादाश्री :** त्याची काळजी करू नका. ते सर्व निमित्तावर अवलंबून असते. रडल्यामुळे माणसाला हलके वाटते.

**प्रश्नकर्ता :** अपराध करताना किंचितदेखील विचार येत नाही असे का होते?

**दादाश्री :** तेव्हा अहंकार जणू धबधब्यासारखा कोसळतो म्हणून.

## नियम पाळण्यात कुचराई करू नये

हे महाराज तीन काठ्या ठेवून माळ जपत राहतात. किती जन्म झाले तरी अजूनही तीच लाकडाची माळ घेऊन जप करत बसला आहात? आत चेतन माळ नाही का? येथे तर पळ मणी-मणी आला, पळ मणी-मणी आला, असे करत राहतात. 'अहो, तुम्ही असे का करत आहात?' असे विचारले तर म्हणतील, 'आमचे गुरुदेखील असेच करीत असत, म्हणून आम्ही देखील असेच करत आहोत.'

कोणी असा नियम केला असेल की मी रोज चाळीस वेळा ही माळ जपेन, पण समजा, एखादे दिवशी वेळ नसेल, तर ज्यांच्याकडून

हा नियम घेतला असेल त्यांची माफी मागून त्यांना सांगावे, 'आज तर फक्त पस्तीस वेळाच माळ जपता येईल, तेव्हा पाच वेळेच्या माळेसाठी मला क्षमा करा.' हे केलेले चालेल, पण अशा वेळी हे लोक काय करतात? भराभरा चाळीस मोजतात. अरे, माळ जपायची असेल तर एकानंतर तीन, तीन नंतर सात असे थोडेच चालणार आहे? नाही चालणार. चित्ताला स्थिर करण्यासाठी जपमाळ करण्याची पद्धत सगळ्याच धर्मात आहे. अगदी मुस्लिम लोकांतही आहे. ही माळ कधीपर्यंत जपायची असते? तर जोपर्यंत चित्ताची माळ जपली जात नाही तोपर्यंत. आणि एकदा चित्ताची माळ जपायची सुरू झाली की लाकडाची माळ जपण्याची गरज नाही. तुम्हाला ज्ञान दिल्यानंतर आता 'शुद्धात्म्याची' माळ जपली जात आहे म्हणूनच आता इतर कुठल्या माळेची गरज नाही. आता तर अजपाचा जप सुरू झाला. 'शुद्धात्म्याचा' अजपाजप सुरू झाला की मग कामच झाले! मग प्रकृतीत जो माल भरलेला आहे तो रिकामा करायचा आहे. नाटकातील आपली भूमिका पार पाडायची आहे.

रुपये मोजताना मात्र कधीच घाई करत नाही, एकदम सावधगिरीने मोजतो, पुन्हा पुन्हा मोजतो, आणि जपमाळ मोजताना मात्र बेपर्वाई आढळते. तेव्हा भगवंत म्हणतात, 'माझ्याकडे तर बघ, तुझे बाहेरचे (आचरण) कच्चे असेल तर आतले पण कच्चे राहील. रात्रंदिवस तुला आत संताप होत राहील.'

## अक्रम-मुक्तीनंतर भक्ती

**प्रश्नकर्ता :** संतांनी नेहमी भक्तीच का मागितली? मुक्ती का मागितली नाही?

**दादाश्री :** तसे पाहिले तर भक्ती आणि मुक्ती या दोन्हीमध्ये तसा फार काही फरक नाही. भक्ती म्हणजे आत्ता इथे हे 'महात्मा' 'ज्ञानी पुरुषाची' भक्ती करतात ते, म्हणजे असे की 'ज्ञानी पुरुषां' प्रति परम विनय बाळगतात, त्यांचा *राजीपा* (गुरुजनांची प्रसन्नता) प्राप्त करणे याचे नाव भक्ती. भक्ती म्हणजे ज्ञानीचे पाय चेपणे किंवा त्यांची पूजा

करणे असे नाही. तर त्यांच्याबद्दल परम विनय बाळगणे असा आहे. येथे हे सर्व महात्मा आता मुक्तीच्या शोधात नाहीत. त्यांना एवढेच वाटत आहे की आता फक्त ज्ञानी पुरुषाची भक्तीच करायची आहे. मुक्ती तर 'आम्ही' त्यांना एका तासातच दिलेली आहे. आता तुम्हाला माझ्याकडून मुक्ती मागायची इच्छा होते का?

**प्रश्नकर्ता :** नाही, दादा.

**दादाश्री :** एकदा मुक्ती दिल्यानंतर आता आणखी काय लिहून द्यायचे शिल्लक राहिले आहे? चेक एकदाच लिहून घ्यायचा असतो की, 99,999 रुपये आणि 99 पैसे! मुक्ती तर देऊन झाली आहे, मग आता काय उरले? तर भक्ती. हा 'अक्रम मार्ग' आहे, आणि जगाचा 'क्रमिक मार्ग' आहे. 'क्रमिक मार्ग' म्हणजे प्रथम भक्ती आणि मग मुक्ती. आपल्या या अक्रम मार्गात प्रथम मुक्ती आणि मग भक्ती! हे लोक जर आता मुक्ती मिळवल्याशिवाय भक्ती करायला गेले तर भक्ती होणारच नाही ना! आतमध्ये हजारो प्रकारच्या चिंता, उपाधी होत असतील तर मग भक्ती जमणारच कशी? जर मुक्ती अगोदरच प्राप्त केली असेल तर- इथे जसे सगळे निवांतपणे बसले आहेत ना- तसे बसता आले पाहिजे! हे सगळे इथे निवांत कसे काय बसले आहेत? जसे काही इथून उठायचेच नाही? कारण त्यांच्याजवळ मुक्ती आहे म्हणून! तुम्हाला नीट समजले ना? इथे सर्व खुलासा झाला पाहिजे. 'तुम्ही' आणि 'मी' एकच आहोत, पण तुम्हाला भेद वाटतो, मला भेद वाटत नाही. कारण भेदबुद्धीमुळे भेद दिसतो. 'मी चंदुलाल आहे' ही भेदबुद्धी अजून तुमच्याजवळ आहे ना? तुमची भेदबुद्धी निघून गेली आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही दादा.

**दादाश्री :** म्हणून तर, जोपर्यंत भेदबुद्धी आहे तोपर्यंत भेद वाटणारच. हा वेगळा आणि तो वेगळा. माझी बुद्धी अभेद झाली आहे. तुमचा आत्माच 'मी' आहे, यांचा आत्मा 'मी'च आहे, त्यांचा आत्मा 'मी'च आहे, सगळ्यांमध्ये 'मी'च बसलेलो आहे, मग कोणाबरोबर भानगडच कुठे राहिली?

## ईश्वराचा पत्ता

**दादाश्री :** तुमचे घर कोण चालवते?

**प्रश्नकर्ता :** ईश्वर.

**दादाश्री :** तो ईश्वर कुठल्या गल्लीत राहतो? त्याचा पत्ता सांगा बरे!

**प्रश्नकर्ता :** .....(निरुत्तर)

**दादाश्री :** अशा बिनपत्त्याच्या भक्तीचा काय उपयोग? ईश्वराला पाहिले नसेल तरी चालेल, पण पत्ता तरी माहीत हवा ना? ही तर बिनपत्त्याची गोष्ट झाली! गल्ली नंबर पण माहीत नाही? मग ईश्वर विवाहित असेल की अविवाहित? जर विवाहित असेल तर त्याच्या घरी त्याची म्हातारी आई पण असेल! मग त्याच्या घरी तर कोणाचाही मृत्यू होत नसेल ना? त्याच्या कुटुंबात कितीजण असतील? पण असे काहीच नसते, हे जग मानते ते खरे नाही. 'ज्ञानी पुरुष' सांगतात तेच खरे आहे. कारण 'ज्ञानी पुरुष' सत्य जाणतात. द वर्ल्ड इज द पझल इटसेल्फ (हे जग स्वत:च एक कोडे आहे) हे जग कोणी बनविलेले नाही. स्वत:च उत्पन्न झाले आहे! सोडियम धातू पाण्यात टाकला तर स्फोट होतो, हे विज्ञानाच्या मार्गाने समजावता येते. तसेच हे जग पण वैज्ञानिक पद्धतीनेच उत्पन्न झाले आहे! त्याचप्रमाणे ही सगळी नाती देखील वैज्ञानिक पद्धतीनेच उत्पन्न झालेली आहेत पण हे फक्त ज्ञानामुळेच समजू शकते. ऑल दीज आर टेम्पररी ॲडजस्टमेंट्स (या सर्व तात्पुरत्या तडजोडी आहेत)! विनाशी गोष्टींचा उपभोग घेण्याची इच्छा ही मिथ्या दृष्टी आहे, आणि अविनाशी गोष्टींचा उपभोग घेण्याची इच्छा ही सम्यक दृष्टी आहे. दु:खाचा एक कण देखील नसणे म्हणजे सम्यक दृष्टी.

**प्रश्नकर्ता :** ईश्वर तर कणाकणात आहे ना?

**दादाश्री :** ईश्वर जर कणाकणात असेल तर त्याला शोधण्याची गरज काय? मग 'जड' आणि 'चेतन' यात फरक काय राहिला? सगळीकडेच जर ईश्वर असेल तर संडासला कोठे जायचे? ईश्वर जर

सर्वत्र आहे तर मग या बटाट्यात असला पाहिजे आणि काकडीत पण असला पाहिजे. शरीरात ईश्वर असेल तर मग शरीर तर विनाशी आहे, परंतु ईश्वर अविनाशी आहे.

या लोकांना एवढेही भान नाही की माणसे आणि म्हशी कोण निर्माण करतो? मोठे संत, त्यागी देखील म्हणतात ईश्वराशिवाय हे कोण करणार? ईश्वर काय रिकामा बसला आहे की तो म्हशीच्या पोटात बसून रेडा बनवेल? मग तो एखाद्या कुंभारालाच पाठवेल ना त्या कामासाठी? जर या लोकांना विचारले – 'डोक्यावर हे केस आहेत ते कोणी बनविले?' तर म्हणतील 'मला माहीत नाही.' डॉक्टरांना विचारले, 'टक्कल पडले आहे तर आता परत केस उगवतील का?' तेव्हा डॉक्टर म्हणतील 'नाही, मेंदूत उष्णता खूप वाढली आहे, म्हणून आता केस उगवणार नाहीत'. केस कसे येतात आणि कसे गळतात यातले काहीच कळत नाही. म्हणून आम्ही म्हणतो सायंटिफिक सरकमस्टॅन्शिअल एव्हिडन्स (वैज्ञानिक संयोगिक पुरावे) यामुळे केस येतात. त्याचप्रमाणे हे सर्व शरीर, डोळे–वैगेरे या सगळ्या गोष्टीपण सायंटिफिक सरकमस्टॅन्शिअल एव्हिडन्समुळेच निर्माण होतात. वरती आकाशात कोणाचा बापही हे करायला रिकामा बसलेला नाही. 'बाप' तर इन एव्हरी क्रियेचेर व्हेदर व्हिझिबल ओर नॉन व्हिझिबल (डोळ्यांना दिसणाऱ्या किंवा न दिसणाऱ्या सर्व जीवमात्रात आहे.) तुमच्या आणि माझ्या दरम्यान दुर्बिणीतून सुद्धा दिसणार नाहीत असे असंख्य जीव आहेत त्यामध्ये ईश्वर विराजमान आहे! त्याच्या उपस्थितीमुळेच सगळे चालू आहे, पण ही गोष्ट फक्त ज्ञानामुळेच कळू शकते, बुद्धीमुळे कळेल अशी ही गोष्ट नाही. ते तर जेव्हा 'ज्ञानी पुरुष' ज्ञान देतात तेव्हाच आत्म्याच्या बाबतीत नि:शंक होऊन जातो! नाही तर सतत आत्मा असा असेल, आत्मा तसा असेल अशी शंका वाटत राहते.

भक्ती तर प्रेमदा भक्ती असली पाहिजे! आम्ही जर तुम्हाला म्हटले 'तुम्हाला अजिबात अक्कल नाही' तर तुम्ही म्हटले पाहिजे 'मी जसा आहे तसा, पण शेवटी आहे तर तुमचाच.'

## कीर्तन भक्ती

वीतराग भगवंतांची जेवढी स्तुती करावी तेवढी कमीच आहे. त्यांचे कीर्तन लोकांनी केलेलेच नाही, आणि जी कीर्तने गायली आहेत त्यांचा राग योग्य नाही. वीतराग भगवंतांचे कीर्तन जर योग्य प्रकारे केले असते, तर आज जी दु:खे आहेत ती आलीच नसती. वीतराग भगवंत खूप शहाणे होते! त्यांचा माल तर अति उत्कृष्ट! ते तर म्हणतात. 'सम्यक ज्ञान प्राप्त झालेल्या व्यक्तीपासून ते थेट तीर्थंकरापर्यंत सगळ्यांचे कीर्तन करत रहा.' अहो साहेब, मग अपकीर्तन कोणाचे करू? जे अभव्य आहेत त्यांचे? नाही, अपकीर्तन कोणाचेच करू नकोस, कारण माणसामध्ये ते सामर्थ्यच नाही, म्हणून तसे करू नकोस. अपकीर्तन कशाला करतोस? अपकीर्तन वीतरागांपासून दूर ठेवते. ही तुझ्या आवाक्यातील गोष्टच नाही, उलट त्यामुळे तू दोषात पडशील. जे लोक उलट मार्गाने चालले आहेत त्यांच्यापासून तू दूर हो. त्यांच्याहून वेगळ्या मार्गानेच निघून जा. तेव्हा तो म्हणेल – 'मी काय करू? तो माणूस एवढा वाकडा वागतो की मला त्याचे दोषच दिसतात!' पण तसे करू नये. त्याच्या समोर तुझी काय बिशाद! एखादा स्ट्राँग माणूस असेल आणि तो जर समोरच्या व्यक्तीविरुद्ध बोलला तर चालेल, एखादा जैन व्यक्ती असेल आणि त्याने जर मांसाहाराचे अपकीर्तन केले (विरोधात बोलला) तर त्याला काय त्रास?

## भक्ती आणि ज्ञान

**प्रश्नकर्ता :** दादा, भक्ती आणि ज्ञान, याबद्दल जरा नीट समजावून सांगता का?

**दादाश्री :** भक्तीचे बरेच अर्थ आहेत, एक ते शंभरपर्यंत अर्थ आहेत. आपण फक्त 95 ते 100 या अर्थाचा विचार करू. 'आमचे' निदिध्यासन करणे म्हणजेच भक्ती. लोकांची समज कमी असते म्हणून भक्तीवर जास्त जोर दिला जातो, असे शास्त्रकार सांगतात. फक्त ज्ञान असेल तर लोक (त्याचा) दुरुपयोग करतील आणि कमजोर होतील. त्यांना भयंकर त्रास सोसावा लागेल. तसे होऊ नये या हेतूने भक्तीवर

अधिक जोर दिला आहे. 'ज्ञान' म्हणजे काय? ज्ञान म्हणजेच 'आत्मा' आणि 'मी शुद्धात्मा आहे' हीच अंतिम भक्ती आहे. 'ज्ञानींचे' निदिध्यासन म्हणजेच 'मी शुद्धात्मा आहे' या स्वरूपातील अंतिम भक्ती.

साऱ्या जगाला बाजूला सारून 'ज्ञानी' खेरीज दुसऱ्या कोणाच्याही प्रभावाखाली न येणे याला 'समर्पण भाव' म्हणतात. म्हणजे जे 'ज्ञानी पुरुषाचे' होवो तेच माझे होवो. स्वतःची नाव त्यांच्या नावेपासून वेगळी न होऊ देणे, त्यांच्या नावेशी बांधून ठेवणे, कारण वेगळा झाला तर चुकीच्या मार्गावर जाईल. म्हणून ज्ञानींच्या नावेशी स्वतःची नाव बांधून ठेवणे.

'ज्ञान' हे 'ज्ञान–स्वभावी' आहे असे कधी म्हणायचे? तर शरीरातील जो आत्मा आहे तो 'आत्मा–स्वभावी' राहील तेव्हा. पण याला जर आम्ही भक्ती म्हणू लागलो तर लोक त्याला स्वतःच्या भाषेत समजतील. त्यांच्या नेहमीच्या समजेनुसार स्थूल अर्थ समजतील. स्थूल अर्थ घेऊ नये यासाठी आम्ही 'भक्ती' ऐवजी 'ज्ञाना'वर विशेष भर देत आहोत.

जागृती म्हणजेच ज्ञान. 'मी शुद्धात्मा आहे' याची सतत जाणीव म्हणजे भाव नव्हे तर लक्ष्य आहे. आणि हे लक्ष्य प्राप्त झाल्याशिवाय 'मी शुद्धात्मा आहे' अशी जाणीव सतत होणारच नाही. 'शुद्धात्म्याचे' लक्ष्य होणे ही तर फार मोठी गोष्ट आहे! अतिशय कठीण गोष्ट आहे!! लक्ष्य म्हणजेच जागृती, आणि जागृती म्हणजे ज्ञान, पण ते अंतिम ज्ञान नाही. अंतिम ज्ञान तर आत्म्याचा स्वभावच आहे. केवलज्ञान स्वभावी आत्म्याचे लक्ष्य एकदा प्राप्त झाल्यानंतर त्याच्या जागृतीरूपी ज्ञानात राहणे हीच सगळ्यात उच्च आणि अंतिम भक्ती आहे; पण आम्ही त्याला भक्ती म्हणत नाही, कारण सामान्य लोक भक्तीचा चुकीचा अर्थ घेतात. 'ज्ञानी पुरुषाची' कृपा प्राप्त करणे फार आवश्यक आहे. कृपाभक्ती आवश्यक आहे.

ज्ञानींचा 'प्रतिष्ठित आत्मा' भक्तीत असतो आणि ज्ञान 'ज्ञानात' असते. 'स्वतः' 'शुद्धात्मा स्वरूपात' राहतात आणि 'प्रतिष्ठित आत्म्याकडून 'शुद्धात्म्या'ची आणि या 'दादा भगवानां'ची भक्ती करवून घेतात. ही उच्चतम अंतिम प्रकारची भक्ती आहे!

भगवंत स्वतःच म्हणाले की, 'आम्ही ज्ञानींना वश आहोत!' आणि भक्त म्हणतात की, 'भगवंत आम्हाला वश झालेले आहेत.' तेव्हा भगवंत म्हणतात की, 'नाही, आम्ही स्वतःच ज्ञानींना वश झालो आहोत'. भक्त भोळे भाबडे असतात, भाजी आणायला निघतात आणि वाटेतच कुठे भजन ऐकले की तिथे जाऊन टाळ्या वाजवत बसतात. परंतु भक्तांमध्ये, एक गुण एवढा आहे की बस, त्यांच्यात 'भगवंत, भगवंत' एवढा एकच भाव कायम असतो आणि तो भाव एक ना एक दिवस सत्यभाव प्राप्त करतो, तेव्हा 'ज्ञानी पुरुष' भेटतात. तोपर्यंत तो 'तूच-तूच' असे म्हणत राहतो, आणि 'ज्ञानी पुरुषाची' भेट झाली की मग 'मीच-मीच' असे म्हणू लागतो! जोपर्यंत 'तू' आणि 'मी' वेगळे आहेत तोपर्यंत माया आहे, आणि 'तू' आणि 'मी' यातले अंतर मिटले, 'तुझे' 'माझे' संपले की झाला अभेद! भगवंत म्हणत असतात, 'तू सुद्धा भगवंत आहेस, हे तुझे भगवंत पद तू सांभाळ. पण तू ते सांभाळले नाहीस तर मग काय करणार?' पाच कोटी रुपयांची इस्टेट असणारा मुलगा जर हॉटेलमध्ये कप-बशा विसळू लागला आणि इस्टेट सांभाळणे त्याने सोडून दिले तर आपण काय करणार? मनुष्य 'पूर्ण रूप' होऊ शकतो! फक्त मनुष्यच 'पूर्ण' होऊ शकतो, इतर कोणीही नाही, देवी-देवताही नाही!

भगवान म्हणजे काय? भगवान हे नाम आहे की विशेषण? जर ते नाम असते तर आपल्याला त्यांना भगवानदास असे म्हणावे लागले असते; पण भगवान हे विशेषण आहे. जसे भाग्य शब्दावरून भाग्यवान झाले तसेच भगवत शब्दावरून भगवान शब्द बनला. जी व्यक्ती भगवत गुण प्राप्त करते त्या व्यक्तीला भगवान असे विशेषण लागते.

'अपद' हे मरण पद आहे. 'मी चंदुभाई आहे' हे 'अपद' आहे, अपदात राहून जो भक्ती करतो तो भक्त, आणि 'मी शुद्धात्मा आहे' हे 'स्वपद' आहे. स्वपदात राहून जो 'स्व' ची भक्ती करतो तो 'भगवान' आहे.

हे ए.एम.पटेल स्वतःच्या आतमध्ये प्रकट झालेल्या 'दादाभगवानां'ची रात्रंदिवस भक्ती करतात! आणि हजार-हजार वेळा त्यांना नमस्कार करतात!

जोपर्यंत आत्मा संपूर्ण प्राप्त होत नाही, तोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' तोच माझा आत्मा आणि त्यांची भक्ती म्हणजे माझी स्वत:चीच भक्ती आहे! भक्तीचा स्वभाव कसा आहे? तर ज्या रूपाची भक्ती करतो तसाच तो बनतो. 'ज्ञानी पुरुषाची' भक्ती ही उच्चतम अशी कीर्तनभक्ती आहे. कीर्तनभक्ती कधी उत्पन्न होते? कधीही अपकीर्तीचा विचार मनात येत नाही, कितीही वाईट झाले असले तरीही चांगलेच दिसते. तसे तर 'ज्ञानी पुरुषां'मध्ये काहीच वाईट नसते. कीर्तनभक्ती करण्यात काहीच कष्ट पडत नाहीत! कीर्तनभक्तीमुळे आश्चर्यकारक शक्ती निर्माण होते!

❖❖❖❖❖

# निष्पक्षपाती मोक्षमार्ग

**दादाश्री :** मोक्ष असेल की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, असा विश्वास तर आहे, म्हणून मार्ग पण असेल, आणि त्याचे जाणकारही असतीलच ना!

**दादाश्री :** हो, 'आम्ही' ते जाणकार आहोत. हा सांताक्रूजचा मार्ग दाखविणारे तर मिळतील पण हा मोक्षाचा मार्ग खूपच अरूंद आणि चकवा देणारा आहे, तो मार्ग दाखविणारा मिळणे अतिशय दुर्लभ आहे. तो जर मिळाला तर त्या 'मोक्षदात्याकडून' सरळ 'मोक्षच' मागून घ्यायचा असतो ना! 'दिस इज दि ओन्ली कॅश बँक इन दि वर्ल्ड'! (या जगातील ही एकमेव रोख बँक आहे.)

'आम्ही' एका तासातच तुमच्या हातात रोकडा 'मोक्ष' देतो. 'आम्ही' कुठे तुम्हाला महिनाभर श्रद्धा ठेवा असे सांगतो? 'श्रद्धा ठेवा, श्रद्धा ठेवा' असे जे सांगतात त्यांना तर आपण खडसावले पाहिजे की 'अहो, पण आम्हाला श्रद्धा ठेवायला जमतच नाही ना! तुम्ही काही तरी असे सांगा की ज्यामुळे आम्हाला श्रद्धा वाटेल.' पण काय करणार? दुकानात माल असेल तर ते देतील ना? क्रोधाच्या दुकानात शांतीच्या पुड्या मागितल्या तर मिळतील का?

**प्रश्नकर्ता :** नाही मिळणार.

**दादाश्री :** भगवंतांनी काय म्हटले आहे की, 'मोक्ष फक्त पाव

मैलावरच आहे आणि देवगती कोट्यावधि मैल दूर आहे. फक्त निमित्त मिळाले पाहिजे, त्याशिवाय मोक्ष मिळत नाही. ज्यांचा मोक्ष झालेला आहे तेच मोक्ष देऊ शकतात. लोक तर बायको–मुलांना सोडतात आणि म्हणतात, 'माया, ममता सुटली.' नाही, तू जिथे जाशील तिथे नवी माया–ममता कवटाळशील, ममता तर आत बसल्या–बसल्या वाढतच राहते. ही माया–ममता दूर करणे हे ज्ञानी पुरुषांचे काम आहे. जसे औषध देणे हे डॉक्टरचे काम आहे तसेच! या किराणावाल्याला जर आपण सांगितले, 'हार्ट अटॅक आला आहे, तर औषध दे.' तर तो काय म्हणेल? 'डॉक्टरकडे जा.' या लोकांना भगवंत म्हणजे काय ते समजले नाही आणि जे चोपडण्याचे औषध होते ते पिऊन टाकले! मग काय होईल? मोक्ष स्वत:जवळच आहे, आत्मा स्वत:च मोक्षस्वरूप आहे.

हे मन तऱ्हेतऱ्हेचे दाखवत असते, ते फक्त 'पाहायचे आणि जाणायचे' असते. दाखवणे हा मनाचा धर्म–मनोधर्म आहे, आणि आपला धर्म 'पाहणे आणि जाणणे' हा आहे. परंतु जर त्या गोष्टीतच तन्मयाकार झालो, त्याच्याशी लग्न लावले तर त्रास सुरू होतो. मोक्ष म्हणजे मन–वचन–काया, यापासून मुक्तता, 'स्वत:चे' स्वतंत्र सुख, ज्या सुखावर इतर कुणाच्या आणि स्वत:च्या मन–वचन–कायेचा परिणाम होत नाही! मन–वचन–काया यांचे कसे आहे? की जोपर्यंत 'हे' दुकान आहे तोपर्यंत आपल्या दुकानातील माल दुसऱ्यांच्या दुकानात जातो आणि दुसऱ्यांच्या दुकानातील माल आपल्या दुकानात येतो, असे आहे हे सर्व!

भगवंतानी म्हटले आहे, 'मोक्षाला लायक असे चारित्र्य आजकाल कुठेही शिल्लक नाही. देवगती मिळण्यायोग्य चारित्र्य मात्र आहेत. मोक्षासाठी तर 'भगवंताच्या आज्ञेत' राहिला, म्हणजे आत्मज्ञान प्राप्त झाल्यानंतरचे चारित्र्य, ते चारित्र्य मोक्ष प्राप्त करून देईल.'

## या काळात मोक्ष शक्य आहे का?

**प्रश्नकर्ता :** या काळात मोक्ष शक्य नाही असे म्हटले जाते ते खरे आहे का?

**दादाश्री :** भगवंतांचे शब्द कधीच चुकीचे ठरत नाहीत. पण महावीरांनी काय म्हटले आहे की, 'या काळात या क्षेत्रातून कोणताही जीव मोक्षाला जाऊ शकणार नाही.' याचा अर्थ लोकांनी चुकीचा लावला. कित्येक म्हणू लागले, 'मोक्ष नाहीच.' म्हणून त्या दिशेने जाणेच सोडले आणि लोक सुद्धा त्या चुकीच्या प्रवाहाकडे ओढले गेले! पण आपण प्रवाहाबरोबरच वाहत गेले पाहिजे असे कोणी सांगितले? भगवंत म्हणतात, 'या काळात लाख रुपयांचा चेक मिळत नाही. पण नव्याण्णव हजार नऊशे नव्याण्णव रुपये नव्याण्णव पैशांचा चेक तर मिळू शकतो. अहो, मग या काळात 99,999 रुपये आणि 99 पैसे तर मिळत आहेत ना! उलट सुटे पैसेही मिळाले! कॅन्टीनमध्ये भजी खायला सुटे पैसे उपयोगी पडतील ना? आजकाल तर रुपयाचे सुटे पैसे देण्यासाठी सुद्धा लोक पाच पैसे कमिशन घेतात. 'आम्ही' या काळात नव्याण्णव हजार नऊशे नव्याण्णव रुपये नव्याण्णव पैशांपर्यंतचा चेक देऊ शकतो. आता या लोकांना 'मोक्ष नाही' हे माहीत आहे. पण मोक्षाचा रस्ता कोठपर्यंत चालू आहे ते तरी शोधून काढा! ही गाडी बडोद्यापर्यंत जात नाही पण सरहदपर्यंत जाते असे कळल्यावर त्या गाडीत बसायला नको का? पण इथे तर घरातून बाहेर पडतच नाही, घराचे दरवाजेच बंद करून टाकले! अशी चुकीची समजूत उत्पन्न झाली आहे. यात कुणाचा दोष? 'ज्ञानी पुरुष' फक्त एवढेच सांगू इच्छितात की (एक लाख रुपयांतला) फक्त 'एकच पैसा' कमी आहे.

सहा आऱ्यांपैकी अगदी अस्सल आणि चांगल्यात चांगला काळ म्हणजे हा पाचवा आरा आहे. याला 'भट्टी काळ' असे म्हटले आहे. इथे एका बाजूला भट्टी आहे आणि दुसऱ्या बाजूला सायंटिस्ट आहे. त्यामुळे किती पण भेसळयुक्त सोने असो, सोनार त्यातून शुद्ध सोनेच बाहेर काढील! सहाव्या आऱ्यात सोनारच नसतील आणि फक्त भट्टी असेल. पाचव्या आऱ्यात तर महावीर भगवंतांचा सगळ्यांत मोठा प्रदीर्घ शासन काळ आहे. पूर्वीच्या तीर्थंकर भगवंतांचा शासन काळ तर फक्त भगवंतांच्या निर्वाण काळापर्यंतच राहायचा. याउलट महावीर भगवंतांचा शासन काळ त्यांच्या निर्वाणानंतर 21 हजार वर्षे चालू राहील!

हे लोक म्हणतात, 'मोक्ष बंद झाला आहे.' असे म्हणत राहिले तर त्यांची स्थिती काय होईल? 'मोक्ष बंद आहे.' असे समजून हे लोक दुसऱ्या कामात गुंतले आणि मोक्ष मार्ग एकीकडेच राहिला. हे कसे आहे? समजा या वर्षी पाऊस पडला नाही, दुष्काळ पडला, तर हे लोक म्हणतील, 'आता कधी शेतात पेरणी करूच नका, बिया वाया जातील.' म्हणजे ह्या वर्षी पाऊस पडला नाही म्हणून (आता कधीच पाऊस पडणार नाही) बिया वाया जातील, असे समजून लोक बसून राहतात. अशासारखे हे आहे.

## नॉर्मालिटीने मोक्ष

आमची एकच इच्छा आहे की जगाने मोक्ष मार्गाकडे वळावे. जगाला मोक्ष मार्ग प्राप्त व्हावा! मोक्ष मार्गाच्या बाजूला वळणे कशाला म्हणतात? मोक्ष मार्गाने एखादा मैल चालले तर. सध्या जे धर्म आहेत ते वीतराग मार्गाने चालतच नाहीत. एखादी व्यक्ती 'वीतराग मार्गावर आहे' असे कधी म्हणणार? की जो नॉर्मल वर येतो त्याला. अबॉव नॉर्मल इज दी फीवर, बिलो नॉर्मल इज दी फीवर. (नॉर्मलच्या वरती आणि नॉर्मलच्या खालती दोन्हीकडे तापच आहे.) 97 म्हणजे नॉर्मलच्या खालचा ताप आणि 99 म्हणजे नॉर्मलच्या वरचा ताप. 98 म्हणजे नॉर्मालिटी! अबॉव नॉर्मल आणि बिलो नॉर्मल दोन्हीही फीवरच आहेत. सध्या फक्त डॉक्टरच असे म्हणतात, पण हे सगळ्यांसाठीच आहे. खाण्यात, पिण्यात, झोपण्यात सगळ्या प्रकारात नॉर्मालिटी पाहिजे. तोच वीतराग मार्ग आहे. सध्या सगळीकडे अबॉव नॉर्मल वातावरण झाले आहे, त्यामुळे सगळीकडे विष पसरले आहे. यात कोणाचाच दोष नाही. सर्व कालचक्रात फसले आहेत.

वीतराग मार्ग म्हणजे सर्व प्रकारच्या व्यवहारात नॉर्मल राहणे. हे लोक तपाच्या मार्गाला लागले तर तपोगच्छ बनून जातात. अरे, या गच्छात का अडकलास? या सगळ्या विहीरी आहेत. या विहीरीतून निघाला की त्या विहीरीत जाऊन पडतो. असे एकच कोपरा साफ करत बसतात. तपाचा कोपरा तर फक्त तपाचाच कोपरा साफ करत बसतात.

कित्येक जण त्यागाचा कोपरा तर फक्त त्यागाचाच कोपरा साफ करत राहतात, शास्त्र वाचत बसले तर फक्त शास्त्रच वाचत बसतात! अहो, असे एकाच कोपऱ्याच्या मागे का लागता? मोक्ष हवा असेल तर सगळे कोपरे साफ करावे लागतील! तरी पण कोपरे साफ केले म्हणून त्याचे काहीतरी फळ मिळेलच, पण मोक्षासाठी हे उपयोगी नाही. तुला जर परत चार गतीतच हिंडायचे असेल तर खुशाल एका मागे लाग. परत मनुष्य जन्मच मिळावा, सगळ्या लोकांनी वाहवा करावी, असे हवे असेल तर ते मी तुला येथे देऊ शकतो. पण असे सगळे कुठपर्यंत? जिथे कुठे जाणार, तिथे परत डोकेफोड आहेच, दु:ख आहेच, मग असे काही तरी मागण्यापेक्षा आमच्याकडून थेट मोक्षच घेऊन जा ना! कायमचे समाधान मिळेल असे काहीतरी घेऊन जा येथून!

एकेका भारतीयाकडे जग दणाणून सोडण्याचे सामर्थ्य आहे. आम्ही या भारतीयांना वेगळे का मानतो? कारण भारतीय लोकांकडे 'आत्मिक' शक्ती आहे म्हणून. पण आज ही शक्ती झाकली गेली आहे, अवरुद्ध झाली आहे, ती प्रकट करण्यासाठी निमित्त हवे आहे. 'मोक्षदाता पुरुष' हे निमित्त हवे आहे. ते मिळाले तर शक्ती प्रकट होईल. ज्यांचा कुणीही शत्रू नाही, देवही शत्रू नाही असे 'मोक्षदाता पुरुष' निमित्त म्हणून मिळायला हवेत.

हे तर आम्ही सांगत आहोत की, 'मोक्षमार्ग' उपलब्ध आहे.' मग तू त्या मार्गाने चालू लागशील आणि त्याद्वारे प्रगती पथावर राहू शकशील. मोक्ष प्राप्त करणे हा आत्म्याचा स्वभाव आहे. पुद्‌गल त्याला खाली खेचते पण आत्मा हा चेतन आहे म्हणून शेवटी आत्माच जिंकणार. पुद्‌गलमध्ये चेतन नाही म्हणून त्याच्याकडे कला नसतात आणि चेतन मात्र कला वापरूनही सुटून जातो. ज्याला सुटायचे आहे त्याला कोणी बांधू शकत नाही आणि ज्याला बंधनातच राहायचे आहे त्याला कोणी सोडवू शकत नाही!

'मोक्ष नाही.' असे म्हटले तर सुटणार कसे? अहो, मोक्ष नसेल तर मोक्षाच्या दरवाज्यापर्यंत तरी जाऊ शकता. दरवाजा पारदर्शक आहे

त्यामुळे आतील सर्व महाल पाहू शकता. पण इकडे तर सर्वांनी असा आरडाओरडा केला आहे की 'मोक्ष नाही, मोक्ष नाही.' हे तुम्हाला कोणी सांगितले? असे विचारले तर म्हणतात, 'आमच्या दादागुरुंनी सांगितले.' पण दादागुरु शोधायला गेलो तर सापडतच नाहीत! म्हणजे 'वाऱ्यामुळे कौल घसरले आणि कुत्रा भुंकला', असे हे आहे. एखादा बाहेर पडला आणि त्याने आरडाओरडा केला, 'काय झाले, काय झाले?' तर तो दुसरा थाप मारतो 'इथे चोर दिसला' म्हणून सगळे बोंबाबोंब करत आहेत! अशासारखी गत आहे ही! वास्तवात काहीच नाही, उगाचच खोटी भीती आणि धास्ती! मग काय होणार? या लोकांना भस्मकग्रहाचा परिणाम भोगायचा असेल म्हणूनच असे घडले असेल ना? पण आता हे सर्व संपणार आहे हे निश्चितच आहे.

## कष्टाने मोक्ष मिळतो का?

हे सगळे चतुर्गतीचे मार्ग कष्टाचे आहेत. जो खूप कष्ट करतो तो नरकगतीत जातो, त्याच्यापेक्षा कमी कष्ट करतो तो देवगतीत जातो, त्यापेक्षा कमी कष्ट करतो तो पशुयोनीत जातो. आणि अजिबात कष्ट नाहीत तो मोक्षाचा मार्ग आहे! 'ज्ञानी पुरुष' भेटले की मग कष्ट का करावे लागतील? ते तर ज्ञानी पुरुष स्वत:च करून देतात. हे लोक कष्ट करून वरण–भात, पोळी, भाजी करू शकतात. पण त्यांना स्वत:च आत्मदर्शन करता येत नाही. ते 'ज्ञानी पुरुषच' करवून देतात तेव्हा 'आत्म दर्शन' होते. ज्ञानी पुरुषांनी जर कष्ट करायला सांगितले तर आपण त्यांना सांगितले पाहिजे ना की, 'माझा हातच फ्रॅक्चर झाला आहे तर मी मेहनत कशी करणार?'

जर आपण डॉक्टरांकडे गेलो आणि डॉक्टर म्हणाले की, 'औषध तुम्हीच आणायचे आहे, तुम्हीच कुटायचे आहे, आणि तुम्हीच लावायचे आहे. तर मग आपण डॉक्टरांकडे जायचेच कशाला? आपण स्वत:च नाही का करून घेतले असते? त्याचप्रमाणे ज्ञानी पुरुषांकडे गेल्यानंतर देखील कष्टच करायचे असतील तर मग इथे या सत्संगात यायचेच कशाला? पण ज्ञानी पुरुषांकडे तप, त्याग, कष्ट असे काहीच करायचे

नसते. आणि 'ज्ञानी पुरुषांना' कुठल्याही वस्तूची गरज नसते, ते स्वतःच संपूर्ण ब्रह्मांडाचे स्वामी आहेत, त्यांना कसली गरज! ज्ञानी पुरुष क्षणभरदेखील शरीराचे मालक होत नसतात. जो एक क्षणभरदेखील शरीराचा मालक नसतो तो सर्व ब्रह्मांडाचा मालक बनतो. बाहेर जे गुरु असतात त्यांना अखेर, मानाची स्पृहा असते, कीर्तीची स्पृहा असते. पण ज्ञानींना कसलीही स्पृहा नसते. त्यांना तुम्ही हार घालता त्याची पण त्यांना गरज नसते. उलट त्यांना त्या हाराचे ओझे वाटते. आणि फुलांतील कित्येक जीवजंतू त्यांच्या अंगावर चढतात. त्यांना हे सगळे कशासाठी? हे सगळे तर तुमच्यासाठी आहे. तुम्हाला गरज वाटत असेल तर हार घाला. प्रापंचिक अडचणी असतील तर त्या हार घालण्यामुळे दूर होतील. सुळाचा घाव सुईसारखा वाटतो. आम्ही त्याचे कर्ता नाही, आम्ही फक्त निमित्त आहोत. 'ज्ञानी पुरुषांची' नैमित्तिक पाऊले पडतात आणि तुमच्या जीवनात सगळे काही चांगलेच घडते. 'ज्ञानी पुरुष' म्हणजे ज्यांना कसलीच भीक नसते; लक्ष्मीची, विषयविकाराची, मानाची, कीर्तीची, कसलीच भीक त्यांना नसते!

## मोक्ष म्हणजे काय?

**प्रश्नकर्ता :** जन्म मरणाच्या चक्रातून सुटका यालाच मोक्ष म्हणतात का?

**दादाश्री :** नाही. मोक्षाला जाणे म्हणजे फुल स्टेज-अंतिम पायरी. मोक्ष म्हणजे परमानंद. मोक्षाच्या पुढे दुसरे काहीच नाही. तोच सर्वात शेवटी आहे. त्याच्याही पुढे काही आहे असे जर मानले तर मग त्यांना मोक्ष समजलाच नाही. 'मोक्ष म्हणजे मुक्त भाव' संसारी भावांपासून मुक्ती, तोच परमानंद. हे सांसारिक भाव परमानंदाला अडवतात. सिद्ध भगवंतांचा क्षणभराचा आनंद देखील सगळ्या देवलोकांच्या आनंदापेक्षा अधिक आहे. परमानंद का थांबला आहे? तर केवळ पूर्वीच्या गुन्हेगारी (चुकां)मुळे. ही गुन्हेगारीच स्वतःच्या सुखाला, परमानंदाला येऊ देत नाही. त्याच गुन्हेगारीमुळे परमानंद अनुभवला जात नाही. त्यामुळेच तो थांबला आहे. मुक्तीची चव कोणी चाखलेलीच नाही. ती तर 'ज्ञानी

पुरुषां'जवळ आहे. त्यांची वीतरागता म्हणजेच मुक्ती. मला तर तुम्हा सगळ्यांच्या आत 'मीच आहे' असे जाणवते! 'ज्ञानी पुरुषां'चे दर्शन जरी करता आले तरी मुक्तीसुख अनुभवास येते.

**प्रश्नकर्ता :** दर्शन करणे म्हणजे भावपूर्वक दर्शन करणे असे आहे का?

**दादाश्री :** नाही. भाव नाही. भाव तर तुमच्याजवळ आहेच पण तरी दर्शन करता आले पाहिजे. 'ज्ञानी पुरुषांचे' एक्झॅक्ट दर्शन घेता यायला पाहिजे. जेव्हा कुठलाही अंतराय नसेल तेव्हा असे दर्शन होते आणि असे दर्शन झाले की लगेचच मुक्तीसुख अनुभवले जाते!

**प्रश्नकर्ता :** मोक्षाला जाण्याचा सिक्का कुठला?

**दादाश्री :** सिक्का तर, पक्षात पडलेले आहात की नाहीत हाच मोक्षाचा सिक्का.

या सगळ्या डिग्रीज् आहेत आणि त्या प्रत्येक डिग्रीत परत अनेक डिग्रीज् आहेत. हे सगळे अन्य मार्गावर आहेत. पण मोक्ष मार्गाची एकच पाऊलवाट आहे आणि तीच पाऊलवाट सापडणे फार अवघड आहे. बाकी सगळे मार्ग ऑरनामेंटल मार्ग आहेत. त्या मार्गावर मोठी-मोठी कॅन्टीनस् आहेत, त्यामुळे जरा कॅन्टीन पाहिली की तिकडे धावतात. परंतु मोक्षाची ही वाट ऑरनामेंटल नाही, म्हणून हा मार्ग कळतच नाही.

आपण उकाड्यात बसलो असू आणि अचानक थंड वाऱ्याची झुळूक आली की समजते की जवळच कुठे तरी बर्फ असेल. तसेच येथे आत्म्याचा अस्पष्ट अनुभव येतो, आणि जेव्हापासून हे वेदन सुरू होते तेव्हापासून संसाराचे वेदन बंद होत असते. एकावेळी एकाच ठिकाणी 'वेदन' असू शकते. दोन ठिकाणी 'वेदन' असू शकत नाही. जेव्हापासून आत्म्याचे 'वेदन' होणे सुरू होते त्यालाच आत्म्याचे स्वसंवेदन असे म्हणतात आणि हळूहळू ते वाढत जाऊन 'स्पष्ट' वेदन या स्थितीपर्यंत पोहोचते.

जगातील सर्व विषय जाणले, पण ते सर्व 'अहंकारी ज्ञान' आहे, आणि ते सर्व बुद्धीत सामावते. 'निर्अहंकारी ज्ञान' तेच खरे ज्ञान. निर्अहंकारी ज्ञान हे स्व-पर प्रकाशक आहे आणि ते संपूर्ण ब्रह्मांडाला प्रकाशमान करणारे असे असते! याउलट बुद्धीचे ज्ञान-अहंकारी ज्ञान हे परप्रकाशक आहे, आणि ते मर्यादित आहे आणि अवलंबित आहे. लोक भान नसल्यामुळे 'मी डॉक्टर आहे', मी इंजिनियर आहे' असे अवलंबन धरून बसले आहेत. सगळे जण मोक्षासाठी प्रयत्न करत आहेत पण तो मार्ग सापडत नाही आणि त्यामुळे चर्तुगतीत भटकत राहतात. ज्ञानीच समर्थ पुरुष असतात. ते स्वतः तर तरले आहेत आणि दुसऱ्यांनाही तारतात.

## नियाणां आणि शल्य

अनंत जन्मांपासून मोक्षाची इच्छा आहे पण क्रमिक मार्गात मोक्ष देणारे भेटले तेव्हा *नियाणे* केले त्यामुळे भटकावे लागले! आणि आता ज्यांना हे ज्ञान मिळाले आहे त्यांना जरी *नियाणां* करायचा असेल तरी पण करता येणार नाही, कारण हा अक्रम मार्ग आहे! *'नियाणां'* कोण करतो? तर ज्याला कसले तरी शल्य असते तो करतो. नि:शल्य झाल्यानंतर *नियाणां* कसा होईल? शल्य म्हणजे आत काहीतरी टोचत असते, या गादीवर बसले आणि टोचले तर मग 'दुसरी चांगली गादी आणूया' यासाठी *नियाणां* करतो. *नियाणां* करतो म्हणजे स्वत:जवळ जी पुण्याची पुंजी आहे ती सर्व तो नियाण्यासाठी पणाला लावतो! त्यानंतर ज्या गोष्टीसाठी *नियाणां* केला असेल ती गोष्ट प्राप्त होते.

भगवंतानी तीन प्रकारची शल्ये सांगितली आहेत:
मिथ्यात्व शल्य, निदान शल्य आणि माया शल्य.

या शल्यांमुळे माणूस *नियाणां* करतो. शल्य सगळ्यांमध्येच असतात. नि:शल्य कोणी असू शकत नाही. हा अक्रम मार्ग आहे, त्यामुळे शल्यरहित होऊ शकतो!

या बंधनातून मुक्ती होऊ शकते. वीतराग मोक्ष देऊ शकतात. वीतरागांचे ज्ञान तोच मोक्षाचा मार्ग आहे. अशी समज ज्याला आली

आहे त्याला तर मिथ्यात्व दर्शन, फार उच्च श्रेणीचे दर्शन म्हटले आहे! लोक तर दुसऱ्यांना नावे ठेवतात, म्हणतात 'तुम्ही मिथ्यात्वी आहात!' अरे, तू तरी कुठे समकिती आहेस की तू दुसऱ्यांना मिथ्यात्वी म्हणतोस? तो स्वत:जर समकिती असेल तर कुणाचाच तिरस्कार करणार नाही. आणि जरी एखादा मिथ्यात्वी असला तरी तो दुसऱ्या एखाद्या मिथ्यात्वीचा तिरस्कार करत नाही. 'हा तर मिथ्यात्वी आहे' असे म्हणून जो एखाद्याचा तिरस्कार करतो तो तर 'दुप्पट मिथ्यात्वी' आहे! 'मिथ्यात्वदर्शन' तर स्तुति करण्यायोग्य असे दर्शन आहे. हे दर्शन झाल्यावर व्यक्तीला असे समजते की, 'संसारात सुख नाही तर मोक्षात सुख आहे.' असे भान होते, त्याला मोक्षाची इच्छा होते. त्याला इच्छा तर सम्यक् दर्शनाचीच असते पण मिथ्या दर्शनातून तो अजून पूर्ण सुटलेला नसतो म्हणून भटकत राहतो. तरी देखील त्याची विल पॉवर (इच्छाशक्ती) मोक्षासाठी असते. आणि त्याचे पुद्गल त्याला संसाराकडे ओढणारे असते, तरी पण तो दोघांना एकमेकांपासून दूर ठेवतो.

संपूर्ण मोक्षमार्ग कुठे असतो? ज्यात सामान्य व्यवहाराची थोडी पण उपेक्षा केली जात नाही, तोच संपूर्ण मोक्षमार्ग आहे. जर व्यवहाराची उपेक्षा केलीत तर समोरच्या व्यक्तीची अडचण होईल, त्याला दु:ख होईल, मग तो मोक्षमार्ग नाही. जिथे पूर्ण व्यवहार आणि पूर्ण निश्चय आहे तिथे मोक्षमार्ग आहे! आपल्या येथे तर निश्चय-व्यवहार दोन्हीही पूर्ण आहेत.

मोक्षमार्ग कुठे आहे? जिथे सगळ्या जातींचे लोक बसले असतील तरी पण कोणालाही या वाणीबद्दल विरोध उत्पन्न होत नाही. इथे अडाणी बसला असेल, चोर बसला असेल, युरोपीयन किंवा मुस्लिम बसला असेल तरी पण इथे कोणालाही वाणीबद्दल विरोध नसतो! सगळेच वाणी ऐकतात. असे तर कुठेच होत नाही. फक्त महावीर भगवंतांच्या वेळी होत असे आणि आता येथे होत आहे! महावीर भगवंत निराग्रही होते.

## मोक्षप्राप्तीनंतरची आत्म्याची स्थिती

**प्रश्नकर्ता :** मोक्षप्राप्तीनंतर आत्म्याची कोणती गती होत असते?

**दादाश्री :** मुक्त भाव! सिद्धगती! आत्मा सिद्धक्षेत्रात जातो. तिथे प्रत्येक आत्मा मुक्त असतो आणि ज्ञाता-दृष्टा व परमानंदात राहतो. तुम्ही इथे हात वर केलात तरी सिद्ध भगवंताच्या ज्ञानात ते येते. पण ते त्यात ज्ञेयाकार होत नाहीत, ज्ञानाकारच राहतात. त्यांना कसलेच बंधन होत नसते. आईच्या पोटात बसून पुन्हा वेदना सोसण्याची इच्छा कोणाला होणार? त्या वेदना काय असतात ते फक्त भगवंतच जाणतात. त्या साऱ्या वेदना बेशुद्ध अवस्थेत सोसल्या जातात. मानव जात काही विशिष्ट मर्यादेपर्यंतच दु:ख सोसू शकते. त्यापेक्षा अधिक दु:ख झाले तर ते त्याच्या सहन शक्तीच्या बाहेर जाते आणि माणूस बेशुद्ध पडतो.

**प्रश्नकर्ता :** जो माणूस मरताना देवाचे नाव घेत घेत मरतो, त्याचे काय होते?

**दादाश्री :** जो मनुष्य शुद्धीत राहून मरण पावतो तो पुन्हा मनुष्यजातीत जन्माला येतो आणि जो मरताना बेशुद्ध असतो तो पशुयोनीत जन्माला येतो. त्याचे माणूसपण जाते. एखादा माणूस कुठे जाईल ते मरते वेळी समजते. आणि दुसरे, जेव्हा एखादा माणसाची अंत्ययात्रा सुरू असते तेव्हा जर आसपासचे सज्जन आणि तटस्थ लोक असे म्हणत असतील, 'हे खूप चांगले गृहस्थ होते.' तर आपण समजायचे की मृत व्यक्ती पुन्हा मनुष्यजन्मात येईल, आणि जर ते म्हणाले की 'जाऊ द्या ना आता, आपण कशाला बोलायचे?' असे जर म्हणाले तर समजून जायचे की ही व्यक्ती आता पुन्हा मनुष्यजन्मात येण्याची शक्यता नाही! हे असे इथल्याइथे समजू शकते.

**प्रश्नकर्ता :** मेलेला माणूस पुन्हा जिवंत होतो, असे म्हणतात, तर ते काय आहे?

**दादाश्री :** नाही, आत्मा देहातून गेल्यावर परत त्या देहात येत नाही. परंतु असे होऊ शकते की आत्मा ब्रह्मरंध्रात जाऊन बसला तर नाडी वगैरे बंद पडते आणि आत्मा परत टाळूच्या खाली आला की परत नाडी सुरू होते आणि मग लोकांना वाटते की मृत व्यक्ती जिवंत झाली.

**प्रश्नकर्ता :** या काळात मोक्ष होऊ शकत नाही का?

**दादाश्री :** नाही, 2500 वर्षांपूर्वी मोक्ष होऊ शकत होता. या काळात मोक्ष का बंद आहे? तर आता माणसे इतकी कर्मबंधने घेऊन जन्माला आली आहेत की सायकल, मोटार, बस, विमान आणि ट्रेनमधून फिरतात तरी पण कामे पुरी होत नाहीत. ही माणसे फार गुंतागुंतीची-कॉम्प्लेक्स कर्मे घेऊन जन्माला आली आहेत, म्हणून या काळात इथून मोक्ष होऊ शकत नाही. कुठल्याच काळात माणसाचे असे पूरण (चार्ज) झाले नव्हते जसे ते आजच्या काळात झाले आहे. ती सर्व कर्मे आता गलन (डिस्चार्ज) होत चालली आहेत. एवढी सारी माणसे कुठून आली? यातील पुष्कळ माणसे पशुयोनीचे रिटर्न तिकीट घेऊन जन्माला आली आहेत. 32 मार्कस् मिळाले तर गाढव होतो आणि 33 मार्कस् मिळाले तर मनुष्य होतो. त्यातला 1 मार्क मनुष्य देह धारण करण्यासाठी खर्च झाला. त्यामुळे बाहेरून जरी माणूस दिसला तरी आतमध्ये गुण पशूचेच दडलेले आहेत. असा विचित्र काळ चालू आहे.

मोक्षाचा मार्ग इतका अरुंद आहे की एखादा मनुष्य त्यातून मुश्कीलीने जाऊ शकतो. तरी पण नियमाप्रमाणे प्रतिक्षण 108 जीव मोक्षाला जातात. पण सगळ्या ब्रह्मांडातील जीव लक्षात घेतले तर ही संख्या नगण्यच म्हणावी लागेल ना! आणि या भरत क्षेत्रातून 3-4 लोकच मोक्षाला जातात. पण सध्या या काळात तेही बंद झाले आहे. आणि अजून कालचक्राच्या अशा चार आऱ्यांपर्यंत बंद राहणार.

## ज्ञानी, मोक्ष मार्गाचे नेते

**दादाश्री :** तुम्हाला मोक्षाला जायचे आहे का?

**प्रश्नकर्ता :** मोक्षाला जाण्याचे विचार मनात येतात पण मार्ग सापडत नाही.

**दादाश्री :** 'ज्ञानी पुरुष' इथे आपल्या प्रत्यक्ष समोर आहेत, मग मार्ग पण अवश्य मिळेल. नाही तर पुष्कळ माणसे विचार करतात पण त्यांना मार्ग मिळत नाही आणि ते चुकीच्या रस्त्याने चालू लागतात.

अगदी क्वचितच एखादे 'ज्ञानी पुरुष' प्रकट होतात आणि त्यांच्याकडून ज्ञान मिळाले की आत्मानुभव होतो. मोक्ष तर येथे रोख मिळाला पाहिजे. जर कोणी म्हणाले 'तुमचा देह सुटल्यावर तुम्हाला मोक्ष मिळेल.' तर आपण त्यांना सांगावे, 'नाही, असा उधारीवरचा मोक्ष आम्हाला नको.' मोक्ष तर रोख हवा, इथेच देहासकट मोक्षाचा अनुभव मिळाला पाहिजे. या अक्रम ज्ञानामुळे रोकडा मोक्ष मिळतो आणि अनुभव पण मिळतो.

भगवंत म्हणाले आहेत, 'मोक्षाचा मार्ग मिळाला नाही, तरी अशुभ मार्गाच्या मागे लागू नकोस. शुभ मार्गात रहा.' मोक्ष मार्ग मिळाला की मग शुभ-अशुभ याची गरज उरत नाही. भगवंतांचा मार्ग तर शुद्ध मार्ग आहे, त्या मार्गात शुभ-अशुभ, पाप-पुण्य, असे काही नाही. पाप आणि पुण्य दोन्हीही बेड्या आहेत. जर मोक्षाचा मार्ग सापडला नाही तर मात्र शुभमार्गाला चिकटून रहा. अशुभ मार्गाला लागलास तर अशुभाची फळे तू सहन करू शकणार नाहीस. तू हिंदुस्तानात उच्च जातीत जन्माला आला आहेस, म्हणून साधू-संत यांची सेवा, देवदर्शन, प्रतिक्रमण, सामायिक, उपवास अशा सर्व गोष्टी करत सतत शुभमार्गात रहा. शुभ मार्ग हा क्रिया मार्ग आहे आणि शुभ क्रियांचे फळ पुण्य मिळेल. अशुभ क्रियांचे फळ पाप मिळेल. पुण्यामुळे कधी ना कधी 'ज्ञानी पुरुष' भेटतील आणि 'ज्ञानी पुरुष' तर हवे ते करू शकतात. ते तुला नगद मोक्ष देऊ शकतात, कारण ते 'स्वत:' संपूर्ण अकर्ता आहेत!

## ज्ञान क्रियाभ्याम् मोक्ष

फक्त शुभ क्रिया करून मोक्ष मिळत नाही. त्याने पुण्य मात्र निश्चित मिळते. त्यामुळे येणाऱ्या जन्मात मोटार, बंगला, वैभव असे सर्व मिळते. पण जर तुला मोक्ष हवा असेल तर मात्र भगवंत सांगतात तेच तू कर. भगवंत काय म्हणतात, 'ज्ञानक्रियाभ्याम् मोक्ष!' हे प्रतिक्रमण, सामायिक, वगैरे करतात त्या सर्व अज्ञान-क्रिया आहेत. या बाह्य क्रिया करून मोक्ष मिळत नाही. मोक्ष तर ज्ञानक्रियेने मिळतो. ज्ञानक्रिया म्हणजे, ज्ञाता-दृष्टा रूपात उपयोग राखावा, आणि त्यालाच म्हणतात मोक्ष! ज्ञेयाला जाणणे म्हणजे ज्ञानक्रिया आणि ज्ञेयाला समजणे म्हणजे दर्शन क्रिया.

## बंधन कशामुळे?

तुम्ही बंधनात कशामुळे आहात? क्रियेमुळे? स्त्रीमुळे? तपामुळे? ते तर समजले पाहिजे ना? ते समजले तर त्यातून सुटण्याचा मार्ग मिळेल. केवळ स्वत:च्या स्वरूपाचे अज्ञान एवढे एकच बंधनाचे कारण आहे, त्यामुळेच बंधनात आहात. जो अज्ञानानेच बांधलेला आहे तो बाह्यक्रिया करून कसा सुटणार? बायकोपासून सुटू शकेल का? बायकोला सोडले तर घरापासून सुटू शकेल का? आणि 'परिग्रह' जाळून टाकले तर काय स्वत: सुटेल? अज्ञानामुळे बांधलेला फक्त ज्ञानामुळेच सुटू शकतो. जोपर्यंत मन 'तुझे' आहे तोपर्यंत तू (सगळ्या वस्तू टाकल्यास तरी) परिग्रही आहेस आणि जर 'तू' मनाचा ज्ञाता-दृष्टा असशील तर मग तू अपरिग्रही आहेस. आम्ही परिग्रहांच्या सागरात राहून देखील अपरिग्रही आहोत.

तुम्ही राग-द्वेषाने बांधले गेले आहात का? नाही. केवळ अज्ञानामुळे बांधले गेले आहात. अज्ञान हेच मूळ कारण आहे. वेदांत म्हणतो, 'मल, विक्षेप आणि अज्ञान दूर कर.' जैन शास्त्रे सांगतात, 'राग-द्वेष आणि अज्ञान दूर कर.' दोन्हीमध्ये अज्ञान सामाईक आहे. अज्ञान हेच मूळ रूट कॉज (मूळ कारण) आहे. आणि राग-द्वेष किंवा मल-विक्षेप हे तर अदर कॉजेस (दुय्यम कारणे) आहेत. मूळ कारण दूर झाले की दुय्यम कारणे आपोआपच दूर होतील. मूळ कारण दूर झाले, अज्ञान गेले की पुढील जन्मांचे बीज पडायचेच बंद होऊन जाते. जोपर्यंत अज्ञान आहे तोपर्यंत कर्मबंधन होतच राहते. एखादा जन्म वाया गेला तर हरकत नाही, आपण म्हणू ठीक आहे एक जन्म वाया गेला पण इथे तर 100 जन्मांची बंधने गळ्यात पाडून घेतो, याचीच हरकत आहे.

बंधन कोणाला बरे आवडेल? हा सारा समसरण मार्ग तुरुंगासारखा आहे. सुरुवातीपासून शेवटपर्यंत तुरुंग आहे आणि जेव्हा 'मी मुक्त आहे' अशी जाणीव होते तेव्हा तुरुंगातून सुटका होते. मिथ्या दर्शन गेले आणि सम्यक् दर्शन झाले की सुटका होते! आणि ज्ञानी पुरुषच 'मी मुक्त आहे' याचे भान करवून देतात. 'ज्ञानी पुरुष' कधीच देहात राहत नाहीत.

आज ही साधनेच बंधनरूप झाली आहेत. ही इलेक्ट्रिसिटी, लिफ्ट वगैरे सगळी साधने तयार केली आहेत तीच आता बंधनरूप झाली आहेत. साधने तर स्वतंत्र असली पाहिजेत. अशी साधने की जी आपल्याला स्वतंत्र बनवतील पण येथे तर त्यांनीच आपल्याला परतंत्र केले आहे. तेव्हा आता ही साधने आपोआपच कमी होतील आणि ती कमी व्हायचीच आवश्यकता आहे. मुक्त होण्याची इच्छा असणाऱ्यांना जर खरा मार्ग मिळाला नाही तर मुक्त होण्याची साधनेच त्यांच्यासाठी बंधनरूप होतात. हे लोक मुक्त होण्यासाठी जितकी साधने तयार करतात तीच शेवटी त्यांना बांधतील. कारण ती सत् साधने नाहीत. ती जर सत् साधने असती तर बंधनरूप झाली नसती. खरी साधने नसतील तर आर्तध्यान आणि रौद्रध्यान होतच राहतात.

बंधन तर प्राण्यांनादेखील नको असते. आज आम्ही येत होतो तेव्हा पाहिले तर एका बैलाला काही लोक ट्रकमध्ये चढवीत होते. त्या बैलाला स्वत:च्या भाषेत कळत होते की त्याला पकडून कुठे तरी दुसरीकडे नेले जात आहे, म्हणून तो खूप विरोध करत होता. तो गाडीत न चढण्यासाठी धडपडत होता. तर सुमारे पाचशे लोक ते दृश्य बघायला जमले, जणू काही तिथे मुक्ती-सुख वाटले जात आहे! बंधन तर भयंकर वेदनामय असते. आपल्याला आपले वास्तविक स्वरूप ओळखता आले नाही याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे आपण आज इथे आहोत! जर वास्तविक स्वरूप ओळखता आले असते तर आपण केव्हाच मोक्षाला पोहोचलो असतो!

या मनुष्य जन्मातच आपल्याला मोक्षाचा मार्ग प्राप्त होऊ शकतो. या मनुष्यगतीतून चारही योनीत जाऊ शकतो, आणि मोक्ष सुद्धा या मनुष्यगतीतच शक्य आहे. जो मोक्ष देईल, मुक्ती देईल, तोच धर्म खरा आहे, बाकी सगळे अधर्म आहेत.

भगवंतानी म्हटले आहे 'या काळात मोक्ष बंद आहे, पण मोक्षमार्ग मात्र बंद झालेला नाही, तो चालूच आहे.' लोक समजतात, 'मोक्ष मिळणारच नाही.' म्हणून ते चुकीच्या मार्गाने चालू लागले आहेत. महावीर भगवंतांचा शासनकाळ 21000 वर्षे आहे, जर मोक्षमार्ग बंद

झाला असता तर मग एवढ्या मोठ्या शासनकाळाची गरजच काय आहे? हे समजलेलेच नाही. येथे 'कारण-मोक्ष' होऊ शकतो. या मोक्षमार्गाने 'कार्य-मोक्ष' होऊ शकत नाही पण मोक्ष 99,999 पर्यंत पोहोचतो. लाख पूर्ण होत नाही. मोक्ष दोन प्रकारचे असतात, (1) कार्य-मोक्ष (2) कारण-मोक्ष. या काळात कारण-मोक्ष चालू आहे आणि कार्य-मोक्ष बंद आहे. कारण-मोक्ष झाल्यानंतर अजून एक जन्म घ्यावा लागतो. आम्ही एका तासात 'कारण-मोक्ष' देत आहोत. सध्या अद्‌भुत असा मोक्ष-मार्ग चालू आहे. 'आम्ही' शासनाचे श्रृंगार आहोत.

समकितचा दरवाजा आला की तिथे सगळे धर्म एक होतात. त्या दरवाज्यानंतर मोक्षाचा मोठा दरवाजा येतो. मतभेद मिटले की समकित होते. मतभेद असेपर्यंत समकित होणार नाही. असे भगवंतांनी सांगितले आहे. साधूंनी विषयांवर विजय मिळवला आहे पण विषय तर स्वतंत्र आहेत. अनंत जन्मांपासून मताचा मोह की ज्यामुळे सतत भटकत आहे, तो मोह तर अजून जिवंत आहे. मताचा आग्रह झाला आहे! जे जिंकण्याची गरज नाही, त्याला जिंकतो आणि जे जिंकायचे आहे त्याची तर जाणीवच नाही. या सर्वांनी देखील मोहाला जिंकले आहे पण आपल्या मतांच्या मोहाला मात्र त्यांनी अजून जिंकले नाही! ते मताभिनिवेषी (मताबद्दल आग्रही) झाले आहेत! मताभिनिवेषामुळे जगात पापे टिकून राहिली आहेत. जिथे 'ज्ञानी पुरुष' आणि त्यांचे महात्मा नसतात तिथे मताग्रह निश्चितच असतो, आणि जिथे मताग्रह असतो तिथे शोधून देखील आत्मा सापडत नाही. मताग्रहानेच आत्मा झाकला गेला आहे. मताच्या आग्रहातून कोणीही सुटत नाहीत. भगवंतानी विषयांना मोह म्हटलेले नाही तर मताला मोह म्हटले आहे.

## वीतराग मार्गात विरोधाला जागा नाही

जिथे वीतरागांचा मार्ग असेल तिथे विरोध नसतो.

**प्रश्नकर्ता :** लोक महावीर जयंती साजरी करतात त्याला काही लोक विरोध का करतात?

**दादाश्री :** ज्ञानी कोणत्याच गोष्टीचा विरोध करत नाहीत, चालत्या गाडीला खीळ घालत नाहीत. हे सगळे लोक ज्ञानी थोडेच आहेत? हे सगळे तर मतांध आहेत. मताचे शेपूट धरून ठेवतात, स्वत:च्या अहंकार पोषण्यासाठी! ही सगळी खोटी ममता आहे. म्हणून मग ते पराचा कावळा करतात! वीतराग मार्गाचे आचार्य कसे असतात? त्यांची व्याख्या देतो. कुणाचीही कशीही गोष्ट असो, ते ऐकायला तयार असतात. कोणी जर सुनवायला आले, तर शांतपणे म्हणतील, 'हो, तुम्ही बोला' (ते शांतपणाने ऐकतात.) म्हणजे आमचे बोलणे तुम्हाला अवघड वाटेल पण जर तुम्हाला मोक्षाला जायचे असेल तर आम्हाला एवढे-एवढे, मोठे-मोठे, तोलून-तोलून द्यावे लागेल (कटू, तिखट शब्द ऐकवावे लागतील) आणि जर तुम्हाला मोक्षाला जायचे नसेल, संसारातच राहायचे असेल तर मग आम्ही तुम्हाला फुलांचा हार घालू. आता तुम्हाला काय हवे ते तुम्हीच ठरवा.

तुमचा आडमुठेपणाच मोक्षासाठी बाधक आहे. तेवढीच एक गोष्ट बाधक आहे. बाकी कोणतीही गोष्ट बाधक नाही. विषय सुद्धा बाधक नाहीत. म्हणून साधा सरळ हो. साधू होण्याची आवश्यकता नाही. सरळ होण्याची आवश्यकता आहे. मोक्षाची गल्ली इतकी अरुंद आहे की तिथे जर वेडावाकडा चाललास तर त्यात अडकून पडशील. त्यातून बाहेर पडताच येणार नाही. तिथे साधे-सरळ होणे गरजेचे आहे. तुम्हाला जर खरेच मोक्ष हवा असेल तर माझे कठोर शब्द तुम्हाला ऐकावेच लागतील. तुमचा रोग अनंत काळापासून चालत आला आहे आणि तो आता नाभिपासून ते थेट गळ्यापर्यंत भरला आहे. आता मला ऑपरेशन करून, चिमटा घालून तुमचा रोग बाहेर काढावा लागेल. म्हणून अगोदरच सांगा, 'ऑपरेशन करायचे की नाही? एकदा ऑपरेशन सुरू केले की मग मध्येच ते थांबवता येणार नाही. मग बोंबा मारून चालणार नाही. तुम्हाला काय हवे आहे? मोक्ष हवा आहे की संसाराचे वैभव? जे हवे असेल ते द्यायला आम्ही तयार आहोत.'

**प्रश्नकर्ता :** आम्हाला तर मोक्षच हवा आहे.

**दादाश्री :** तर मग तुम्हाला आमचे शब्द पचवावे लागतील, समजून घ्यावे लागतील. हे वीतराग साधू तर कसे असतात? सगळे जण मतभेदात पडले असतील तर ते मतभेद दूर करतात. संघपति, साधू, संन्यासी, जैन, सगळे एकत्र बसून चर्चा–विचारण करतात. कोणी वृद्ध साधू असतील तर त्यांना खुर्ची देतात आणि तरुण साधू खाली बसले तरी चालेल, एवढे तर करायलाच हवे ना? सगळ्यांनी एकत्र बसून चर्चा केली पाहिजे. वीतराग धर्म कशाला म्हणतात? एखादे महामुनी बसले असतील आणि तिथे जर एखाद्या लहान नवीन शिष्याने जाऊन प्रश्न विचारला आणि महामुनींनी जर त्या प्रश्नाचे उत्तर दिले नाही तर ते मुनीच नाहीत, महामुनीही नाहीत, कोणत्याही कक्षेत नाहीत! समोरचा माणूस कितीही चुकीचे बोलो, तरी पण एकदा त्याचे ऐकतात आणि त्याच्याशी चर्चा–विचारणा करतात. चर्चा केल्याने त्याला काहीतरी समाधान मिळेल. म्हणून भगवंत म्हणतात की कधीही आग्रह–दुराग्रह करू नका, चर्चा–विचारण करा की, आपली काय चूक होत आहे. तुम्ही या दूषमकाळाचे साधू आहात, म्हणून तुम्ही एकटे बसू नका. संघातील सदस्यांना, संघपतीना आपल्याबरोबर बसवा. संघपती जणू 25 वे तीर्थंकर आहेत, असे भगवंतानी म्हटले आहे. काय बरोबर, काय चूक याचा न्याय ती समिती करील. जिथे चूक नसेल तिथे संघपती म्हणतील, 'हे सत्य आहे' कारण आत आत्मा आहे, त्यामुळे त्यांना लगेच समजेल की हेच सत्य आहे, पण सत्य सापडले पाहिजे. असत्य सापडले तर तेही कळेल की हे असत्य आहे. सगळ्यांना बरोबर घेऊन बसण्यात हरकत काय? पण या सगळ्या संप्रदायातील लोक सत्य शोधण्यासाठी, चर्चा–विचारणा करण्यासाठी कधी एकत्र येतात का? सगळ्यांनी एकत्र यायला हवे. नाही तर ते महावीर भगवंताचे विरोधी आहेत असेच म्हणावे लागेल!

वीतराग मार्गात अणुमात्रही आग्रह चालत नाही आणि हे तर दुराग्रही आणि हट्टाग्रही होत चालले आहेत! जे साधू सत्य–असत्य याबद्दल एकत्र बसून चर्चा–विचारणा करू शकत नाहीत ते महावीरांचे साधू नाहीतच. महावीर भगवंतांच्या एका शिष्याने 45 आगम वाचले

असतील आणि दुसऱ्यांने फक्त दोनच आगम वाचले असतील तरीदेखील ते दोघे शिष्य एकत्र बसून चर्चा-विचारणा करतात आणि कोणी कितीही चुका करत असेल पण ते कषाय मात्र नक्कीच करत नाहीत. भांडण न करता सत्याचा शोध घेत राहतात तेच महत्त्वाचे!

कोणी आम्हाला विचारले, 'पटेल, तुम्ही इथे आम्हाला खरी गोष्ट समजवायला याल का?' तर आम्ही तिथे जातो आणि सांगतो की, 'महावीरांना असे सांगायचे होते.' 'आम्ही' तुम्हाला महावीरांचेच शब्द सांगू पण तुम्ही मात्र सरळ राहिले पाहिजे. 'मी आचार्य आहे' असे मनात न ठेवता बसलात तरच! वेगळेपण वाटत नाही तोच महावीर भगवंतांचा मार्ग. इथे तर पाच लोकदेखील एकत्र राहू शकत नाहीत. त्यांच्या-त्यांच्यात भांडणे चालू असतात. बाहेर भांडतात हे तर आम्हाला माहीतच होते पण ते आपआपसात सुद्धा भांडतात!

## नशा नाही तिथे मोक्ष

आम्ही अहमदाबादला गेलो होतो, तिथे एका आचार्य महाराजांची भेट झाली. पर्युषणाचे दिवस होते. हजारो लोक त्यांना नमस्कार करायला येत होते. त्या लोकांनी आमची ओळख करून दिली आणि सांगितले की हे 'ज्ञानी पुरुष' आहेत. तर लगेच आचार्यांनी आमचे दर्शन घेतले आणि आसनावरून उठून ते खाली बसले! आम्ही म्हटले, 'यामुळे तर तुमचे (मोक्षाचे) काम होऊन जाईल. इतक्या सुंदर विनयाने तर तुमचे कार्य सिद्ध होईल.' तेव्हा ते म्हणाले, 'मला आतूनच जाणीव झाली म्हणून मी खाली बसलो.' मग आम्ही त्यांना विचारले, 'शास्त्रे वाचता का?' ते म्हणाले, 'शास्त्रे तर खूप वाचली आहेत.' आम्ही त्यांना म्हटले, 'शास्त्रे तर तुम्ही खूप वाचलीत, पण ती भगवंताच्या आज्ञेपूर्वक वाचलीत की अशीच वाचलीत?' भगवंत काय म्हणतात की 'जर शास्त्रे वाचून नशा वाढत असेल तर ती वाचू नका, नशा सुटत असेल तर वाचा.' नशा वाढत असेल तर ते पुस्तक फेकून द्या. पुस्तकाचे काम नशा वाढविणे हे आहे का? नाही. तो तर स्वत:च्या आतल्या 'बी'चा परिणाम आहे! या बाभळीला काटे आणण्यासाठी काही करावे लागते का? नाही.

तिच्या 'बी'मध्येच तो गुणधर्म आहे, त्यामुळे प्रत्येक फांदीवर काटे येतीलच येतील. नतंर मी आचार्य महाराजांना विचारले, 'ही नशा उतरवणार कशी?' तेव्हा ते म्हणाले, 'या सर्व क्रिया तर आम्ही करतच आहोत ना?' तेव्हा मी त्यांना सांगितले, 'ज्या क्रिया केल्यामुळे नशा वाढते त्या सर्व अज्ञान क्रिया आहेत, भगवंतानी सांगितलेल्या क्रिया नाहीत. भगवंतानी सांगितले त्या क्रिया तर नशा उतरविणाऱ्या आहेत, त्यामुळे नशा चढत नाही!' हे सगळे केले तरी काहीही निष्पन्न होत नाही. शुक्रवार शुक्रवारच राहतो, त्याचा कधी शनिवार होत नाही! निंबोळी पेरली आहे, तर ती फळ देणार.

वीतरागांचा मार्ग सोपा आहे, सरळ आहे आणि सहज आहे, पण लोकांनी त्याला कष्टसाध्य करून टाकला आहे. सध्या जो वीतराग धर्म आहे त्यात जर तथ्य असते तर जग आज एकदम आफरिन झाले असते. पण लोक पाहतात की त्याग करणारा फक्त त्यागाच्या कोपऱ्यात पडलेला असतो आणि फक्त त्यागाचाच कोपरा साफ करत असतो आणि तप करणारा फक्त तपाचाच कोपरा साफ करत असतो! सगळे कोपरे स्वच्छ केले तरच सुटका होईल!

## निर्ममत्व तिथेच मोक्ष

कविराज काय गात आहेत,

*'क्यांय न होजो ममत लगारे!'*

(ममत (आग्रह) अजिबात कुठेही नसावी.)

ममत किती ठिकाणी असते? हा पेला जर कोणी घेऊन जात असेल तर काय ममत ठेवायची नाही? त्याचे असे आहे की पेला घेऊन जाणाऱ्याला म्हणायचे, 'अरे बाबा, तू घेऊन चालला आहेस पण तो तुझा नाही, त्यावर माझे नाव आहे.' मग तो वाचेल आणि म्हणेल, 'हो, तुमचेच नाव आहे, घ्या.' त्याने अशा तऱ्हेने तो पेला दिला तर ठीक आहे, पण नाव वाचून देखील तो म्हणाला, 'नाही, मी देणार नाही.'

तर मग तिथे ममत बाळगायची नाही. ममत म्हणजे काय? तर आग्रह करणे. नाटकी भाषेत म्हणावे लागते, 'बाबा रे, या पेल्यावर माझे नाव आहे' त्याने तो दिला तर ठीक पण जर तो हट्टाने नेऊ लागला तर आपण तो पेला त्याला देऊन टाकावा. तिथे मग ममत ठेवू नये. पण नेऊ लागला तर त्याला चुपचाप नेऊ देतील असे वीतराग नसतात. आणि जे चुपचाप नेऊ देत नाहीत ते 'वीतराग नाहीत' असेही म्हटलेले नाही. नाही तर कधी त्याच्या मुलीला कोणी उचलून घेऊन जाईल, पण तेव्हा तो म्हणेल 'माझी मुलगी आहे, एखाद्या चांगल्या मुलाशी मला तिचे लग्न करून द्यायचे आहे,' असे सगळे म्हणतो. पण ते पूर्णपणे नाटकी असेल तर तो वीतराग आहे. लोक म्हणतात ना, की ममत धरून बसले आहेत. ममतचा अर्थ आग्रह धरणे. वीतराग मार्गात ममत नसते. इतर मार्गात ममत असते. मी एकदाच नाटकीपणे म्हणेन की, 'बाहेर अंधार आहे.' त्यावर तुम्ही म्हणाल, 'नाही, उजेड आहे!' तर मी पुन्हा एकदा म्हणेन 'अहो, जरा बघा ना, अजून अंधारच वाटत आहे.' अशी विनंती करेन, तरी देखील तुम्ही ऐकले नाही तर मग मी माझी ममत धरणार नाही. जर कोणी कोणाचा वरिष्ठ असता तर मी मारून, ठोकून त्याला माझे मत मानावयासच लावले असते. पण इथे तर कोणीच कोणाचा वरिष्ठ नाही.

भगवंतांनी व्यवहार धर्म कशाला म्हटले आहे? बाह्य जगात निश्चय धर्म चालत नाही. तो फक्त आपल्या येथेच आहे. व्यवहार धर्म म्हणजे काय? तर लोकमत. आणि लोकमताच्या विरूद्ध जाणे म्हणजे ममत. इथे प्रत्येक व्यक्ती म्हणेल, 'हा तर संकुचित धर्म आहे.' एक महाराज म्हणतील, 'आज सप्तमी आहे.' आणि दुसरे महाराज म्हणतात, 'अष्टमी आहे.' अशा वेळी तर दोघांनाही अमान्य करायचे. हे सर्व ममत धरून ठेवतात आणि त्याचीच ही भांडणे आहेत. सप्तमी-अष्टमीच्या प्रकाश देणाऱ्या चंद्राला कसलेच भांडण नाही आणि हे लोक मात्र भांडत राहतात!

दृष्टीवादी, कदाग्रही, दुराग्रही आणि अभिनिवेषी हे सर्व आपले काय कल्याण करतील? ते स्वत:चेच कल्याण करत नाहीत ना! हे तर

त्यांना संयोग मिळाला नाही म्हणून. पण यात त्यांचा दोष नाही. इथे मात्र सर्व खुलासे मिळवून घ्यावेत मग सगळी कोडी सुटतील. ही सर्व कोडीच आहेत.

वीतराग काय म्हणतात, लोक काहीही करत असतील तरी तू ते करू नकोस. तू केवळ तुझ्या हिताचेच काम करत रहा. दुसरे लोक गुन्हा करत आहेत, त्यांना तर ते कळत नाही. पण तू तर जैन आहेस, वकील असून 420 कलमाचा (फसवणुकीचा) गुन्हा कसा काय करू शकतोस? वकीलच जर 420 गिरी करायला लागले तर काय होईल? बघा तरी कसे रोग घुसले आहेत ते! जे जैनांच्या घरी जन्माला येतात त्यांना तर वकील म्हणतात. ज्यांना नियम-कायदे माहीत आहेत तेच जर कापड ताणून मोजत असतील तर कसे चालेल?

हा कचरा साफ करण्याचे काम आमच्यावर आले आहे. आम्हाला असे कटु शब्द बोलायला आवडत असेल का? असे शब्द वापरणे आम्हाला शोभते का? ज्यांची वाणी म्हणजे 'साक्षात् सरस्वती' आहे, अशा 'ज्ञानी पुरुषांच्या' वाट्याला असा कचरा साफ करायचा योग आला आहे, आणि तो कचरा निघेलही. या काळात सगळीकडे सडका माल भरला आहे. पण आमची ही वीतराग वाणीच सगळा कचरा साफ करील! आम्हाला स्वत:ला जावे लागणार नाही. आम्ही सांगत आहोत की 2005 साली सगळ्या जगातील लोक हिंदुस्तानाला जगाचे केंद्र मानून इथे धर्म शिकायला येतील! आणि तेव्हा एका केसाएवढाही भ्रष्टाचार राहणार नाही! आणि पूर्वी कधीही लाभले नव्हते असे सतयुगातील सुख लोकांना लाभेल! इतर तीर्थंकरांच्या तुलनेत महावीर भगवंतांचे शासन अगदी अतुलनीय राहील. इतर कुठल्याही तीर्थंकरांचे शासन असे अतुल्य नसेल!

## खरी दीक्षा

**प्रश्नकर्ता :** महाराज म्हणतात, दीक्षेशिवाय मोक्ष नाही. ही गोष्ट खरी आहे का?

**दादाश्री :** हो, ही गोष्ट खरी आहे की दीक्षेशिवाय मोक्ष नाही. पण दीक्षा कशाला म्हणतात? दीक्षेची व्याख्या नीट ठरवायला नको का? कुठल्या प्रकारच्या दीक्षेने मोक्ष मिळतो? दीक्षेशिवाय मोक्ष नाही हे आम्ही मान्य करतो, पण खरी दीक्षा काय हे लोकांना माहीतच नाही. महावीर भगवंतांनी सांगितल्याप्रमाणे दीक्षा फक्त आम्हीच देऊ शकतो.

**प्रश्नकर्ता :** दीक्षा म्हणजे काय?

**दादाश्री :** 'ज्ञानाला' 'ज्ञानात' बसवायचे आणि 'अज्ञानाला' 'अज्ञानात' बसवायचे, याला म्हणतात दीक्षा. फक्त 'दादा'च खरी दीक्षा देऊ शकतात. जो स्वत:च दीक्षित झालेला नाही तो दुसऱ्यांना दीक्षा कशी देणार? आणि म्हणेल 'मी दीक्षा घेतली आहे.' दोन प्रकारचे मोती असतात, एक खरे मोती आणि दुसरे कल्चर्ड मोती. आजकाल तर बनावट मोतीच जास्त चालतात ना? प्रथम कोणाचा जन्म झाला?

**प्रश्नकर्ता :** खऱ्या मोत्यांचा.

**दादाश्री :** म्हणजे खरे मोती होते म्हणून बनावट मोत्यांचा जन्म झाला. त्याचप्रमाणे प्रथम खरी दीक्षा होती, म्हणून या कल्चर्ड दीक्षेचा जन्म झाला ना! आपला हा अक्रम मार्ग आहे म्हणून इथे कोणाचाही तिरस्कार करायचा नाही, बायकोचा, मुलांचा पण तिरस्कार करायचा नाही. उलट पूर्वी रोज बायकोशी भांडण व्हायचे ते देखील आता होत नाही.

भगवंतानी दीक्षा हा शब्द काही चुकीचा वापरलेला नाही, पण दीक्षा म्हणजे नक्की काय ते कळायला पाहिजे ना? भगवंतांच्या वेळी दीक्षा देताना 'असे' (खालील मंत्र) म्हणवून घेत असत. आज पण तेच शब्द वापरतात पण दीक्षा मात्र नकली झाली आहे.

*'एगो मे शाषओ अप्पा, नाण दंस्सण संज्जूओ,*
*शेषामे बाहीराभावा, सव्वे संजोग लख्खणा,*
*संजोग मूला जीवेण, पत्ता दु:खम् परंपरा,*
*तम्हा संजोग संबंधम्, सव्वम् तिवीहेण वोसरायामि!'*

(मी एक शाश्वत आत्मा आहे. ज्ञान-दर्शन संयुक्त असा आत्मा आहे. बाकी सर्व उरतात ते बाह्य भाव आहेत, आणि ते संयोग लक्षणयुक्त आहेत. हे सर्व संयोग जीवांच्या दु:खांच्या परंपरेच्या मुळाशी आहेत. तेव्हा हे सर्व संयोग मी वीतरागींना अर्पण करतो.)

आजकाल तर दीक्षा घेतात आणि लगेच तासाभरात चिडणे सुरू होते. सव्वम् तिवीहेण वोसरीयामि (सर्वस्व अर्पण) केल्यानंतर मग चिडायचे कशासाठी? सगळा कल्चर्ड माल!

अशी दीक्षा तर उलट बंधनातच टाकते. जेव्हा इथे 'आम्ही' दीक्षा देतो, त्या दीक्षेमुळे सांसारिक रोग पूर्णपणे दूर होतात! आम्ही जेव्हा तुमच्या हातात नगद आत्मा देतो, त्याच दिवशी तुम्हाला दीक्षा देतो, दीक्षीत करतो. लोक दीक्षेचा अर्थ आपल्या लोकभाषेत समजतात. पण ती तर दीक्षाच नाही. परंतु जर तुम्ही असे म्हटलेत तर लोकांना ते पटणार नाही. कारण भाषेचा अर्थच हा झाला आहे आणि जिथे जी भाषा चालते, तिथे तीच भाषा वापरावी लागते.

आता तर आठ आण्याचे गहू आणि आठ आण्याचे खडे, असे झाले आहे. अख्खी नाही पण तुकडे केलेली सुपारी मिळते ना, त्याच्यावर काहीतरी चोपडतात त्यामुळे ती गोड लागते. पण ते तर चांगल्या आणि सडक्या सगळ्याच सुपाऱ्या एकत्र करून गोड पाण्यात टाकतात. लोकांना सुपारी खायची आहे की गोड चव चाखायची आहे याचे भानच नाही. गोड चव चाखायची असेल तर सरळ मिठाईच खा ना? गोड चवीसाठी अशी सुपारी कशाला खातोस? सुपारी खायची असेल तर सुपारीच खा. भानच नाही. खरी वस्तू आपल्या हातीच लागू देत नाहीत. हे तर मूर्ख आहेत म्हणून मूर्खांना मूर्ख वस्तू आणि चांगल्यांना चांगल्या वस्तू खायला मिळतात. म्हणून आम्ही म्हणतो की आपण या मूर्खांचे उपकारच मानले पाहिजेत कारण त्यांच्यामुळे आपल्याला चांगल्या वस्तू मिळत आहेत. त्यांना मूर्ख का म्हणायचे? कारण पैसे देऊनही ते मूर्ख वस्तूच घेऊन येतात म्हणून.

## वीतराग भगवंतांच्या सूक्ष्म गोष्टी

आजकाल तर खरी दीक्षा पण उरली नाही आणि खरी महाव्रते पण उरली नाहीत. महाव्रतेच काय, आता खरी अणुव्रते सुद्धा राहिली नाहीत. त्यांच्याऐवजी सगळे नकली घुसले आहे आणि खरे हरवले आहे. 'व्रत' कशाला म्हणायचे? जे वर्तते (सहज आचरणात येते) त्याला व्रत म्हणायचे. त्यामध्ये कुठल्याही गोष्टीची आठवण येत नाही, काय सोडायचे आहे आणि काय सुटले आहे, याची आठवणच येत नाही. 'हे सोडले आणि ते सोडले' हे जर आठवत राहिले तर मग तो मोठा धोका आहे.

अहाहा! कसे ते महावीर भगवंतांचे एक वाक्य! यांना ते समजलेच नाही, शेवटी तोंडावर मुहपत्ति (मुखपट्टी) बांधली. एक नंतर दोन असेल तर ते बरोबर आहे असे आपण म्हणतो, पण ही मुहपत्ति तर, जो अंतिम आध्यात्मिक अवस्थेत पोहोचलेला असेल त्याने हातात एक फडके (कापड) ठेवावे आणि जिथे खूप किडे वगैरे उडत असतील तर त्या फडक्याने आपले तोंड झाकावे. हे कापड त्या जीवांना वाचविण्यासाठी नसते, कारण या जगात कोणीच कोणाला वाचवू शकत नाही. ही मुहपत्ति तर जीवजंतू आपल्या नाकातोंडात घुसू नयेत आणि आपल्या प्रकृतीला अपाय होऊ नये यासाठी ठेवायची असते. मुहपत्ति हे तर अंतिम कारण आहे. त्या अगोदर 'केवल ज्ञानाचे' आणि अशा इतरही अनेक कारणांचे सेवन करणे आवश्यक आहे, परंतु जर अंतिम कारणाचे सेवन प्रथमच केले गेले तर त्याचा काय उपयोग? म्हणजे अशा फार मोठ्या चुका होत आहेत.

क्षणभरदेखील गाफिल राहता कामा नये. गाडी चालविताना लोक गाफिल राहत नाहीत, आणि जिथे अनंत जन्मांच्या भटकंतीचा प्रश्न आहे तिथे मात्र गाफिल राहतात!

भगवंत म्हणाले, 'हे जीवा, बूझ, बूझ. सम्यक् प्रकाराने बूझ!' भगवंतांनी सांगितलेल्या गोष्टींच्या विरोधी गोष्टींपासून मुक्त होईल तेव्हाच मोक्ष मिळू शकेल.

## खरा मार्ग सापडला तरच सुटका होईल

**प्रश्नकर्ता :** नेहमी व्याख्यानाला जायचे हा माझा नियम आहे.

**दादाश्री :** रोजरोज अंघोळ केली तरी शरीराचा मळ जात नसेल तर अशा अंघोळीचा काय उपयोग? रोज व्याख्यानाला जातो पण मनाचा, वाणीचा आणि बुद्धीचा मळ जात नसेल तर त्याचा काय उपयोग? आपली दु:खे कमी होत नसतील तर काय उपयोग? व्याख्यान देणारा कितीही जाणकार असो, पण आपली दु:खे कमी होत नसतील तर सगळे निरुपयोगीच ना? ज्यांच्यामुळे आपली दु:खे कमी होतात अशा लोकांचे दर्शन केले तर ठीक आहे, नाही तर दर्शन करून काय फायदा? समोरच्या व्यक्तीचे पन्नास बंगले असतील पण त्याच्या दर्शनाने आपल्याला झोपडी पण मिळणार नसेल तर त्या दर्शनाचा काय फायदा? ज्या महाराजांचे दर्शन करून आपले दु:ख दूर होत नसेल, तर ते महाराज स्वत: किती दु:खी असतील?

हा घाण्याचा बैल पाहिलात का? त्याच्या डोळ्यावर पट्टी बांधलेली असते. त्याला असे वाटत असते की 'मी खूप चाललो आहे.' पण पट्टी काढली की त्याला कळते की आपण आहोत तिथेच आहोत. हे सगळे जग सुद्धा घाण्याच्या बैलासारखे चालत आहे आणि सगळी मेहनत वाया जात आहे. जोपर्यंत यथार्थ ज्ञान मिळत नाही तोपर्यंत सगळी मेहनत वाया जाते. मला जर स्टेशनचा रस्ताच माहीत नसेल तर मी वाट चुकेन. स्टेशनच्या अंतराच्या चौपट चालून देखील स्टेशनला पोहोचणार नाही. साधे स्टेशनचा रस्ता शोधण्यात एवढी चूक तर मग खरा (मोक्षाचा) रस्ता तो शोधण्यात किती चुका होत असतील? म्हणून नीट चौकशी केली पाहिजे ना! स्वत:चे समाधान होत नसेल तर एक रस्ता सोडून दुसरा रस्ता शोधायला हवा. मोक्षाची एकच पाऊलवाट आहे आणि ती देखील चकवणारी आहे! इतर मार्ग अनेक आहेत पण ते सगळे ऑर्नामेंटल (शोभेचे) आहेत. एखाद्या जाणकार वाटसरूला मोक्षाचा मार्ग विचारला पाहिजे, पण तो सुद्धा पूर्णपणे नि:स्वार्थ वाटसरू असायला हवा.

## धर्मात व्यापार असता कामा नये

जे लोक स्वतः त्याग करतात आणि दुसऱ्यांकडून करवून घेतात ते सगळे अभ्यासी आहेत. गुरु पण त्याग करतात आणि शिष्यांकडून पण त्याग करवून घेतात, तेव्हा आपल्याला समजते की ते विद्यार्थी आहेत. ते जर माळ जपत असतील तर ते शाळेतील विद्यार्थी आहेत असेच आम्ही समजणार ना? त्यांना जर आम्ही विचारले, 'तुमचा अभ्यास संपला ना?' तर ते म्हणतात, अभ्यास तर संपला पण माळ तर जपलीच पाहिजे ना? नाही. मोक्षाला जायचे असेल तर ही लाकडाची माळ आणि मोक्ष यांचे शत्रुत्व आहे. मोक्षासाठी तर स्वरूपाची रममाणता असली पाहिजे. ही तर लाकडाची रममाणता होत आहे, त्याने मोक्ष होणार नाही. हा एक प्रकारचा व्यापारच चालवला आहे. त्यांना सावध करण्यासाठी आम्हाला हे सांगणे भाग आहे. धर्मात व्यापार असता कामा नये, परंतु व्यापारात धर्म असावाच. जिथे धर्मात व्यापार शिरला, पैशांचा व्यवहार शिरला तर समजा हा खरा धर्म नाही, रियल धर्म नाही.

कोणाचा मार्गदर्शनाने चालला तरी मोक्ष मिळू शकेल, पण तसेही करत नाही. स्वतःच्या अकलेनेच चालतो. म्हणून गुरु असावा असे म्हटलेले आहे. पण गुरु ठावठिकाणा नसलेले मिळतात, मार्केट मटिरीयल, मग काय होईल? अशा गुरुंबरोबर करार केला नाही हेच बरे आहे. नाही तर गुरु म्हणतील, 'पाच वर्षांचा करार होता आणि दोन वर्षातच कसे चाललात?' वीतराग मार्ग असा नसतो.

## गुरुकिल्लीशिवाय गुरु कसे?

या जगात खरा गुरु मिळणे खूप कठीण आहे. गुरुला शिष्याचा स्वार्थ आणि शिष्याला गुरुचा स्वार्थ असतोच, म्हणून गुरु आणि शिष्य दोघेही बुडतील. गुरु म्हणजे काय? जड. ते स्वतः पण बुडतात आणि दुसऱ्यांना पण बुडवितात. त्यामुळे असे जे आपणहून गुरु बनून बसले आहेत ते स्वतः पण बुडणार आणि दुसऱ्यांना पण बुडविणार. गुरुकिल्लीशिवाय गुरु होता येत नाही.

**प्रश्नकर्ता :** गुरुकिल्ली म्हणजे काय? शुद्धात्म्याचे लक्ष्य?

**दादाश्री :** नाही. ते जर असेल तर मोक्षच मिळेल. भगवंतांच्या काळात गुरुकिल्ली दिली जात असे. गुरु कोणीही बनू शकतो पण तो विषयांत नि:स्पृह असायला हवा. हे जग तर रोगिष्ट आणि रोगी लोकांनी भरलेले आहे, तेव्हा इथे तर गुरु होण्यापूर्वी प्रथम गुरुकिल्ली हातात असली पाहिजे. आजकाल जे गुरु बनतात, त्यांच्याजवळ दोन-चार शिष्य असतात आणि ते शिष्य त्यांना बापजी बापजी असे करत फिरत असतात, त्यामुळे उलट त्यांची नशा वाढते, अशावेळी जर गुरुकिल्ली असेल तर सर्व नॉर्मल राहते.

गुरुकिल्लीशिवाय कसे काय गुरु होऊन बसले आहेत? जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' गुरुकिल्ली देत नाहीत तोपर्यंत गुरु कसे बनता येईल? 'ज्ञानी पुरुष' 'गुरुत्तम' असतात, म्हणजेच त्यांच्याहून मोठे कोणीच नसते आणि ज्ञानी पुरुष 'लघुत्तम' पुरुष सुद्धा असतात म्हणजे त्यांच्याहून लहान कोणीही नसतो! तुम्ही मला म्हटलेत की, 'तुम्ही आचार्य आहात.' तर आम्ही म्हणू, 'आम्ही त्याहूनही गुरुत्तम आहोत.' आणि जर तुम्ही मला म्हणालात, 'तुम्ही गाढव आहात' तर आम्ही म्हणू 'आम्ही त्याहूनही लघुत्तम आहोत.' अशा 'लघुत्तम' 'गुरुत्तम' ज्ञानी पुरुषांची ओळख कशी होईल? जर ओळख झालीच तर मात्र तुमचे काम पूर्ण होईलच असे समजा!

## स्वच्छंदीपणामुळे अडला मोक्ष

मोक्ष हवा असेल तर अनंतकाळापासून बरोबर असलेला स्वच्छंद नावाचा रोग दूर करावाच लागेल. 'ज्ञानी पुरुष' वीतरागी शब्द बोलतात त्यामुळे समोरच्या व्यक्तीचा हा रोग जातो. म्हणून आम्हाला बोलावे लागते, 'असे कसे रे आहात तुम्ही?' एकदा तरी सरळ व्हा. हे 'मी आहे, मी आहे' काय लावले आहे? कशात आहेस तू? कोणाच्या तरी आधीन रहा ना! जरी वाटेल त्याच्या आधीन राहिलास तरी पण तुझा स्वच्छंदीपणा तर राहणार नाही ना! म्हणून कृपाळूदेवांनी लिहिले आहे,

*‘रोके जीव स्वच्छंद, तो पामे अवश्य मोक्ष!’*

(जर जीवाने स्वच्छंद सोडला तर त्याला निश्चितपणे मोक्ष मिळेल)

आणि पुढे त्यांनी स्वच्छंदीपणा काढून टाकण्यासाठी उपायदेखील सांगितला आहे,

*‘प्रत्यक्ष सद्‌गुरु योगथी स्वच्छंद ते रोकाय,*
*अन्य उपाय कर्या थकी प्राये बमणो थाय.’*

(प्रत्यक्ष सद्‌गुरुची भेट झाली तर स्वच्छंदीपणा संपतो. दुसऱ्या कोणत्याही उपायानी तो कमी होत नाही, तर तो दुप्पट होतो.)

## खरा गुरु आणि खरा शिष्य

आजकालच्या साधू-संतांची समस्या ही आहे की ते कोणाच्याच आधीन नाहीत. जर कोणाच्या आधीन असतील तर गुरु आणि शिष्य दोघांमध्ये क्लेश निर्माण होणार नाही. गुरु शिष्याला आधीन राहिले किंवा शिष्य गुरुंना आधीन राहिले तर समस्या सुटतील. गुरु शिष्याला आधीन राहिले तर त्यात काय हरकत आहे? डोळ्यांनी दिसत नसेल तेव्हा गुरु शिष्यांच्या आधीन राहतातच ना? मग एक जन्म स्वस्थ डोळे असून देखील शिष्याच्या आधीन राहा ना, तर सुटका होईल! गुरुंच्या मनात येते की शिष्य याचा दुरुपयोग करील. अरे, तो कसा काय तुझा दुरुपयोग करणार? शिष्याच्या हातात तरी सत्ता कुठे आहे? तो देखील प्रकृती नाचवील तसाच नाचत आहे ना? तो पण शेवटी एक भोवराच आहे ना? पण आजकाल खरे नि:स्पृह गुरु मिळणे पण दुर्मिळ आहे. गुरु शिष्यांच्या स्वार्थात आणि शिष्य गुरुच्या स्वार्थात असतात. दोघांना स्वार्थाशीच मतलब आहे. कुणालाही मोक्षाची पर्वा नाही. मोक्षाची पर्वा असेल तर त्यांना त्यांच्या बापाची शपथ! शिष्य वाढविण्याची आणि पूजा करून घेण्याचीच कामना आहे. यात शंभरातून दोन-चार अपवाद असतीलही. भगवंत म्हणतात, ‘संसारात सर्व काही करा, खोटे बोला, पण धर्मात चुकीची ‘प्ररूपणा’ करू नका.’ त्यात खूप मोठा धोका आहे.

भगवंतांची अशी वाक्ये लपविली गेली आहेत. कारण त्यांना भीती वाटते की लोकांना कळले तर काय होईल? भगवंतानी तर बरेच काही सांगितले आहे.

वीतरागांच्या काळी आचार्य आणि महाराज किती समजदार असायचे. 80 वर्षांचे आचार्य महाराज असतील आणि त्यांना जर एखाद्या 18 वर्षांच्या नव्यानेच दीक्षा घेतलेल्या शिष्याने विचारले की, 'महाराज, जरा माझे ऐकता का?' तेव्हा आचार्यांना ते जिव्हारी लागायचे की अरे! माझी केवढी अजागृती आहे की या छोट्या शिष्याला असे सांगण्याची पाळी आली! जैन आचार्य नेहमीच समोरच्याचे ऐकतात. अरे, विधर्मीचेही किंचित देखील कषाय न करता शांतपणे ऐकतात. आजकाल तर कुणीच कुणाचे ऐकायला तयार नाहीत!

आचार्य तर कसे असतात? त्यांनी जरा डोळे वटारले तर शंभर शिष्यांना घाम फुटतो. त्यांना रागवावे लागत नाही, नुसते डोळ्यांनीच काम होऊन जाते. आचार्य शीलवान असतात, त्यांचे शीलच काम करत असते. शिष्यांना भीती वाटली पाहिजे पण ती कशी? पोलिसांची भीती नाही तर गुरुंच्या शीलाची भीती वाटली पाहिजे. नुसत्या तिथल्या वाऱ्याचीच भीती वाटते. आमच्याकडे कसलेच नियम नाहीत, तरी पण हे सगळे कसे काय नियमाने वागतात? आमच्या शीलामुळे. वीतरागांच्याकडे कसलेच नियम-कायदे नसतात. ते संपूर्ण निष्पक्षपाती असतात. तुम्हाला जर दोन दिवस उपास करायची इच्छा झाली तर महाराज तुम्हाला दोन दिवस उपवास कर असा आशीर्वाद देतात. मग शिष्याला देखील मनात तसेच वाटते आणि तो मग उपासात कुचराई करत नाही. याला 'वचनबल' असे म्हणतात. सध्या तर शिष्य गुरुंची आज्ञा पाळतात पण मनात त्याविरूद्ध तणतण करीत असतात. खरे गुरु आणि खरे शिष्य यांच्यात प्रेमाचे असे संबंध असतात की गुरु जरी काहीही बोलले तरी शिष्याला ते खूप आवडते.

जिथे 'जैन' आहेत तिथे कषाय नाहीत आणि जिथे कषाय असतात तिथे जैन नाही. कषायरहित राहणे हाच वीतरागींचा मार्ग आहे. मोक्षापूर्वी

जर शेवटचे पंधराच जन्म उरले असतील तर तेव्हापासूनच वीतराग धर्म प्राप्त झाला असे म्हणता येते. 'जिन'चे ऐकतो तो जैन. जैनांमध्ये कुठला करारनामा नसतो, फक्त वचनानेच सारी कामे होतात. सैन्य, पोलिस असे सर्व जैनांसाठी असता कामा नये. जैनांसाठी फक्त टॅक्स असला पाहिजे. पण आता या सर्व गोष्टींचा अंत येईल. या दूषमकाळाचा अंत जवळ आला आहे. सत्ता दूषमकाळाचीच राहील पण आता त्याचा अंत येणार आहे! अजून हा उकाडा पुढील सात वर्षे राहील.

## उकाड्यानंतर धर्मोन्नती

पुष्कळ लोक मला विचारतात, 'दादा, हिंदुस्तानात हे काय चालले आहे? ही भ्रष्टाचाराविरूद्ध क्रांती, रेल्वेचा संप... हे सगळे काय चालू आहे? हे कधी संपेल?' तेव्हा मी त्यांना सांगतो, हे तर बटाटे उकडायला ठेवले आहेत, त्याला पाच मिनिटेच झाली आहेत, अजून जेमतेम सालापर्यंत बटाटा उकडला आहे. तर आता बटाटे पूर्ण उकडल्याशिवाय बाहेर काढले तर काय होईल? ते वाया जातील. त्यापेक्षा त्यांना नीट पूर्ण शिजू द्या. मग छान बटाटेवडे बनतील, ते तुम्ही खा. हिंदुस्तान अजून थोडा उकळणार आहे, पण त्याचा परिणाम खूप सुंदर येईल. येथे 'ज्ञानी पुरुष' आहेत आणि त्यांच्याकडून (आत्मज्ञान प्राप्त करून) 2103 ज्ञानी तयार झाले आहेत, आणि अजून पुष्कळ तिकीटे काढली गेली आहेत. यापूर्वी कधी काळी अवतरले नव्हते ते आज अवतरले आहेत! ते सगळ्याच धर्मांना उंचीवर नेतील. हे सगळेच धर्म अपसेट होऊन गेले आहेत. त्यांना आम्ही पुन्हा अपसेट करून टाकू! मग काय होईल? सर्वकाही सेट अप होऊन जाईल!

## असंसारी कोणास म्हणावे

कित्येक साधू गृहस्थ लोकांचा तिरस्कार करतात आणि म्हणतात, 'तुम्ही तर संसारी आहात, संसारी आहात.' पण हे साधू महाराज! तुम्ही देखील संसारीच आहात, तुम्ही संसारी नाहीत असे कोण म्हणते? तुम्ही त्यागी आहात हे आम्ही मान्य करतो. म्हणजे त्यांनी स्त्रीचा त्याग केला

आहे, कपडे, पोषाख वगैरेचा त्याग केला आहे. हे सगळे आम्हाला माहीत आहे, पण तरीही महाराज संसारी तर आहेतच ना! भगवंतानी जीवराशीचे दोन प्रकार केले आहेत, एक संसारी आणि दुसरे सिद्ध. सिद्ध सोडून इतर सगळे संसारी. भगवंत म्हणतात, 'त्यातील देखील जे कारण सिद्ध झाले आहेत त्यांचा आम्ही स्वीकार करतो आणि त्यांना असंसारी म्हणतो? साधू त्यावर विचारतात, 'हे भगवंत! म्हणजे जे वर गेले ते असंसारी आणि जे इथे मनुष्य योनीत (जिवंत) आहेत ते पण असंसारी?' भगवंत म्हणतात, 'हो, जे कारण सिद्ध झालेले आहेत त्यांना आम्ही असंसारीपद देतो.' तुम्ही म्हणाल 'हे भगवंत कारण सिद्धवाल्यांना तुम्ही हे पद देता, तर इतर लोकांचा काय गुन्हा आहे?' तेव्हा भगवंत समजावून सांगतात, 'कारण सिद्ध याचा अर्थच ते लवकरच सिद्ध होणार आहेत. म्हणून आम्ही त्यांना आतापासूनच या 'सीटचे रिझर्वेशन' करून देत आहोत.' 'भगवंत, मग यांच्यात असा भेद का केला?' भगवंत म्हणतात, 'भेदाचे कारण त्याला आत भेद वर्तत आहे म्हणून.' 'कारण-सिद्धाला' आत भेद वर्तत नसतो, कारण-सिद्धांना तर आत मोक्षच वर्तत असतो. मग ज्यांना मोक्ष वर्तत असतो त्यांना संसारी कसे म्हणायचे?

महावीर भगवंत अतिशय लहान वयात देखील फार शहाणे-समंजस होते. 72व्या वर्षी त्यांचे निर्वाण झाले पण खूपच शहाणे होते! तिसाव्या वर्षी भगवंताचा शहाणपणा आपल्याला आनंद वाटेल असा होता. जेव्हा त्यांनी घर सोडले, खरे म्हणजे घर सोडले नव्हते, ते केवळ संयोगी पुरावे (सरकमस्टेन्शियल एविडन्स) होते. जसे 'आम्ही' आता सांताक्रुजहून दादरला आलो आहोत, याचा अर्थ आम्ही सांताक्रुज सोडले असा होतो का? नाही, तसेच तेही संयोगी पुरावे होते. 'आतून' 'व्यवस्थित शक्ती' जसे मार्गदर्शन करते तसे आपण करत जातो. यात त्यांना स्वत: काहीच करायचे नसते. कर्तापणच राहिलेले नाही. ज्याचे कर्तापण राहिले नाही त्याचे भोक्तापण राहिले नाही! ज्याच्यात कर्तापण नसेल त्याला भोक्तापण देखील राहत नाही.

भगवंतानी जे सांगितले ते शब्द या महाराजांनी धरून ठेवले. ते

म्हणतात, आम्ही जैन साधू आहोत ना? भगवंतानी कारण-सिद्ध कोणाकोणाला म्हटले आहे? साधू, उपाध्याय, आचार्य आणि तीर्थंकर भगवंत या चौघांना भगवंतानी कारण-सिद्ध असे म्हटले आहे. हे दिसण्यात संसारी आहेत असे दिसते. संसारी आहेत असेच वाटते, पण उपभोग घेण्यात फरक आहे. हे चौघे सिद्धांसारखे सुख उपभोगतात आणि तुम्ही संसारी सुख-दुःख भोगत आहात! हे सगळे आचार्य महाराज म्हणतात, 'आम्ही संसारी नाही.' 'महाराज, कोणत्या आधारावर तुम्ही संसारी नाहीत? आम्हाला पुरावा द्या, तर आम्ही मानू. कसोटीवर जर सोने आढळले, अगदी 25 टक्के सोने निघाले तरी आम्ही 100 टक्के सोने आहे असे समजू!' आणखी किती सूट देणार आम्ही? 25 टक्केला 99 टक्के मानायला तयार आहोत. पण असे जेव्हा आम्ही त्यांना समजावून सांगू तेव्हा ते पण कबूल करतील की ते कारण-सिद्ध नाहीत. तुम्ही कुठे सिद्धपदाचा उपभोग घेत आहात? 'तुमचे कषाय तर गेलेले नाहीत. त्यांना विचारा की 'महाराज, तुमच्यात कषाय आहेत का?' तेव्हा तेच सांगतात, 'हो, कषाय तर आहेतच ना.' मग आम्ही त्यांना सांगतो, 'महाराज तुम्ही कारण-सिद्ध नाहीत.' मग महाराजच म्हणतील, 'बरोबर आहे तुमचे, आम्ही संसारी, पूर्णपणे संसारीच आहोत!' आपण सगळ्यांना विचारले तरी सगळे हेच सांगतील की नाही? हो, ना? ते जर नाही म्हणाले तर आपण त्यांना जरा डिवचले की लगेच कळेल. डिवचण्याआधीच ते चिडत असतात, बोलतानाच चिडत असतात! उतावीळ माणसे बोलता बोलता देखील चिडतात.

## उतावळेपणा आणि प्रमाद

संयोग कसेही येवोत, पण तू उतावीळ होऊ नकोस. आत्मा उतावळा नाही. आत्मा, परमात्मा आहे. तिथे घाई करण्याची काय गरज आहे? चहा प्या, नाश्ता करा, बाजा वाजवा, सर्व काही करा, पण इथे तर नुसती घाई, घाई आणि घाईच. या क्रमिक मार्गातील ज्ञानी धड पाणी पण पीऊ देत नाहीत, घशाखाली उतरू देत नाहीत. आपण पाणी पित असू आणि थोडा वेळ लागला तर लगेच ते म्हणतील, 'चालता हो,

चालता हो, *प्रमाद* (तन्मयता, अजागृती) करत आहेस. अरे, यात कसला आला आहे प्रमाद? तो *प्रमाद* ठेवा तुमच्याजवळच, असा मोक्ष आम्हाला नकोच. असा कधी मोक्ष मिळत असेल का? महाराज पाणी देखील नीट पिऊ देत नाहीत, घशाखाली उतरुही देत नाहीत, अशाने मोक्ष कसा काय मिळत असेल? तुम्ही असे पाहिले आहे का? उतावळेपणा पाहिला नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, पाहिला आहे. मी दोन वर्षे महाराजांबरोबर राहिलो आहे, दादाजी.

**दादाश्री :** तिथे *'प्रमाद'* असा एक शब्द वारंवार वापरला जातो आणि तो सगळ्यांच्या मागे घाई-गडबड लावतो. त्यापेक्षा तर *'प्रमाद'* कर ना, म्हणजे मग ही मागे लागलेली घाई-गडबड तरी संपेल. केवढा विरोधाभास आहे इथे? इथे 'हे' विज्ञान, आश्चर्यकारक विज्ञान प्रकट झाले आहे! सगळ्या जगाने तोंडात बोट घालावे असे विज्ञान इथे प्रकट झाले आहे. 'जसे आहे तसे' इथे प्रकट झाले आहे. तसे नसते तर मग इथे पण घाई-गडबड मागे लागली असती. मग दादांनी तुम्हाला इथे चहा-बिहा पण पिऊ दिला नसता. 'अहो, चहा पिऊन झाला की नाही? चला, चला उठा आता टाळ्या वाजवा, भक्तीपद म्हणा.' असे आम्ही केले असते. पण इथे मात्र अशी कसलीच घाई नाही! आत्मा उतावीळ नाही, आत्मा परमात्मा आहे, तो काय असा वेडा आहे का? आपण आत्म्यासारखे झालो तर आत्मा प्राप्त होईल.

आता आमची ही गोष्ट सर्वांना कशी पटणार? मला *'प्रमाद'* हा शब्दच हटवायचा आहे. या लोकांनी *प्रमादी* आत्मा सोडला आणि उतावीळ आत्मा उभा केला! अरे, भाऊ, मग तू मूळ आत्मा कसा काय प्राप्त करणार? आत्मा *प्रमादी* होता, त्याला आता उतावीळ आत्मा बनविला. त्यापेक्षा तर तो *प्रमादी* आत्माच बरा होता. तो कोणाला त्रास तरी देत नव्हता. उतावळेपणामुळे तर कोणाला धक्काही लागू शकतो. याचा अर्थ आम्हाला *प्रमाद* मंजूर आहे असे नाही. पण तुम्ही *प्रमादचा* एवढा द्वेष का करता? आणि 'उतावळेपणा'चा एवढा राग (आसक्ती)

का करता? खरे तर राग-द्वेष सोडायचे आहेत आणि तुम्ही राग-द्वेष करतच राहिलात तर कसे चालेल? हे लोक तर तुम्ही चहा पीत असाल तर धड चहा पिऊ देणार नाहीत. चहात दूध घालण्यापूर्वीच धक्का मारतात, मग यावर काय उपाय? क्रमिक मार्ग हा असा खूप कठीण असतो. कृपाळूदेवांनी प्रभुश्रींना सांगितले, 'संस्कृत शिकून या.' तेव्हा प्रभुश्री म्हणाले, 'आता माझे वय 46 आहे. या वयात मी संस्कृत कसे शिकू? मला ते कसे काय जमेल?' तेव्हा कृपाळूदेव म्हणाले, 'व्हिक्टोरिया राणी सर्व भाषा शिकत आहे. तिचे वय आज 76 वर्षे आहे. पण ती आज या वयात सुद्धा आपल्या भारतीय भाषा शिकत आहे. मग काय तुम्हाला तुमची मातृभाषा पण शिकता येणार नाही? जा, संस्कृत शिकून या.' अशी आज्ञा झाल्यामुळे प्रभुश्रींना संस्कृत भाषा शिकावी लागली. प्रभुश्री सांगायचे, 'मी एका खांबाला पकडून 'गम गच्छति-टू गो, गम गच्छति-टू गो' असे पाठ करीत असे, जेणे करून झोप येऊ नये आणि *प्रमाद* होऊ नये. मग कृपाळूदेवांनी त्यांना 22 पुस्तकांची नावे लिहून दिली. चांगली जाड मोठी-मोठी पुस्तके, आणि सांगितले की 'ही, पुस्तके सतत बरोबर बाळगा आणि मनात काही विचार आला तर लगेच या पुस्तकातून वाचत जा!' तर असा आहे हा क्रमिक मार्ग! कृपाळूदेव ज्ञानी पुरुष होते आणि त्यांचा मार्ग पण खरा आहे, ते या दूषमकाळात खरे ज्ञानी होऊन गेले. पण खरे म्हणजे तो क्रमिक मार्ग खूप म्हणजे खूपच कष्टदायी आहे. याउलट आपला हा अक्रम मार्ग, खूप सरळ मार्ग प्राप्त झाला आहे. तरी लोक या मार्गाची दखल घेत नाहीत. आता खरी वेळ आली आहे. एक मिनिट तर एक मिनिट, पण इथे तर एकेक मिनिट खूप किमती आहे. पुन्हा या 'दादांचे' दर्शन मिळणार नाही. या 'दादांचे' दर्शन तुम्हाला दिवसातून एका मिनिटासाठी पण मिळणार नाही. 'हे' प्रकट विज्ञान ज्या दिवशी जगात प्रकट होईल त्या दिवशी जग स्वत:ला रोखू शकेल का?

दोन प्रकारचे मोक्षमार्ग आहेत : एक चलाख माणसाला मिळालेला मोक्षमार्ग आणि दुसरा आळशी माणसाला मिळालेला ऐषआरामाचा मोक्षमार्ग. जगात चलाख लोकच जास्त असतात. ऐषआरामी लोक कमीच

असतात. खरे म्हणजे ते ऐषआरामी नसतात पण लोक न समजताच असा शब्दप्रयोग करतात. 'हा' पूर्ण वेगळा मार्ग आहे. यात ऐषआराम आहे पण संसारी मोह नसतो. म्हणजे हा आपला ऐषआरामवाल्यांच्या मोक्षमार्ग आहे, आणि दुसरा चलाख लोकांचा मोक्षमार्ग आहे. या दोघांचे मार्ग वेगळे आहेत. ऐषआरामवाला उशीराने निघतो आणि मग जवळचा रस्ता शोधून काढतो! झोपल्याझोपल्या तो पुष्कळ कामे उरकून घेतो. म्हणजे हा आपला लिफ्टमार्ग वेगळ्याच प्रकारचा आहे. तो आता सगळीकडे फुलून आला आहे.

म्हणून कवि म्हणतात, *'ज्ञानी विक्रम टोच ऐश्वर्य हाहाकार!'*

अक्रम ज्ञानी आहेत आणि ते विक्रम शिखरावरती बसले आहेत आणि सगळीकडे खळबळ माजली आहे! जरी ऐषआराम केला असेल पण त्याला मार्ग देखील ऐषआरामाचा मिळाला आहे ना! इथे जर 'आम्ही' तुमच्यामागे *प्रमाद* करू नका, *प्रमाद* करू नका' असे करू लागलो तर काय होईल? नुसती घाई, घाई आणि घाई! खाण्यापिण्यात सुद्धा घाई. कशासाठी घाई करतात? *प्रमाद* घालविण्यासाठी? पण इथे तर *प्रमाद* गेला आणि उतावळेपणा शिरला. शेवटी भूताचा एकच प्रकार! उलट उतावळेपणाचे भूत अधिक वाईट! काही साधू असे असतात की त्यांना जर लाडू खायला बोलविले असेल तर ते तिथे आरामात जातात, त्याच्यांत उतावळेपणा अजिबात नसतो! आणि काही साधू असे असतात की रस्त्यात भेटले आणि त्यांना म्हटले, 'थांबा जरा, मी सूर्यनारायणाचे दर्शन घेऊन येतो.' आपण दर्शन करेपर्यंत तर ते खूप पुढे गेलेले असतात! याचे काय कारण? तर नुसता उतावळेपणा. संडासाला जाताना घाई, लघवीला जाताना घाई, खाताना घाई, पिताना घाई, सतत घाई, घाई आणि घाई! त्यापेक्षा तर लाडू खाऊन, पोटावर शांतपणे हात फिरवले तर आपल्याला त्यांचे दर्शन घ्यावेसे वाटेल. या घाईगडबडवाल्यांचे दर्शन घ्यायची पण इच्छा होत नाही. *प्रमाद* घालवताना घाई शिरली. यापेक्षा तर *प्रमाद* चांगला होता. यापेक्षा तर पूर्वीचे भूत जास्त चांगले होते,

आपल्या ओळखीचे तरी होते! हे तर उतावळेपणाचे नवीनच अनोळखी भूत शिरले! लोकांना *प्रमाद* कळत नाही आणि त्यामुळे भलतेच काही तरी करू लागतात.

या उतावळेपणाचे काय कारण? तर म्हणतात त्यांनी *प्रमाद* सोडला आहे. अहो, देहाचा *प्रमाद* सोडायला सांगितलेलेच नाही. उलट देहाचा *प्रमाद* राहू द्यावा. आरामात पलंगावर बसावे. पलंगाचा कुरकुर आवाज आला तरी बसावे. कुरकुरला तरी तो काही जीव नाही, तो तर पलंग आहे. एखादा जीवजतूं चिरडेल असे वाटले तर मात्र लगेच उठावे. पलंग कुरकुरला, मोडला तर दुसरा आणता येईल. पण हे (क्रमिकवाले) म्हणतील, 'नाही, *प्रमाद* होणार.' म्हणजे बसला तरी निवांत बसत नाही, सतत उतावळेपणा. आणि तुम्ही जर त्यांना काही विचारायला गेलात तर ते लगेच चिडून तुम्हाला 'हट, हट' करतील. हे शोभादायक आहे का? भगवंतांनी असे मुळीच सांगितलेले नाही. वीतराग भगवंत असे असतील का? हे लोक चालततात पण इतके जलद, घटक्याभरात कुठल्या कुठे जाऊन पोहोचतात, महावीर काय असे चालत असतील? ते तर अगदी शांतपणे... सावकाश चालत असत. हा जर आतून आकुळ-व्याकुळ असला तर बाहेरूनसुद्धा आकुळ-व्याकुळ होऊन जातो. आत घाई तर बाहेरही घाई, मग त्याला झाडे वगैरे सर्व हलताना दिसतात हलत नसताना सुद्धा हलताना दिसतात. कारण स्वत:च गडबडलेला आहे.

हे जे काही अवलिया असतात, ते पाहा कसे शांत असतात, त्यांना कसलीच घाई नसते. त्यांना जर आपण म्हटले, 'अहो, आकाश कोसळणार आहे ना?' तर ते म्हणतील, 'नाही साहेब, आकाश कोसळणार नाही, ते तर खुदाने बनवले आहे, ते कसे कोसळेल?' आणि हे लोक मात्र 'मीच केले आणि मलाच भोगावे लागणार' असे म्हणत राहतात. मग जर आकाश कोसळले तर माझे काय होईल? म्हणजे सरळ समज वाकडी झाली म्हणून त्याची फळे कडू आली. नाही तर असे व्हायचे कारणच काय?

हे उतावीळ लोक ज्ञान प्राप्त करतात तरी पण त्यांना 'शुद्ध उपयोग' राहत नाही. त्यांना शुद्ध उपयोग दिला तरी तो त्यांच्याजवळ राहत नाही. कारण उतावीळ आहेत ना! तुम्ही खाता, पिता, हिंडता, फिरता पण ते सर्व उपयोगपूर्वक करता. याउलट उतावीळ माणसाला वाटते की असे वागले तर 'शुद्ध उपयोग' नाहीसा होईल. नाही, 'शुद्ध उपयोग' तर राहीलच. चहा चांगला असो, वाईट असो, कडक असो वा गोड असो, सर्व परिस्थितीत आपला शुद्ध उपयोगच राहतो.

*प्रमाद* मुळेच सगळा घोटाळा झाला आहे. याचा नीट अर्थच कोणाला कळलेला नाही. ही माणसे इतका उतावीळपणा करतात की पहाटे चार वाजता उठतात पण जर महावीर भगवंतांना विचाराल तर ते म्हणतील, 'हे सर्व *प्रमादी* आहेत, पूर्णपणे *प्रमादी* आहेत. त्यांच्यातील *प्रमाद* तीळमात्रदेखील कमी झालेला नाही.'

*प्रमाद* म्हणजे काय? या जगात कोण *प्रमाद* करीत आहे? खरे म्हणजे सगळे जगच *प्रमाद* करत आहेत. हा *प्रमाद* केव्हा संपेल? जेव्हा (मी चंदुलाल आहे) हा आरोपित भाव जाईल तेव्हा *प्रमाद* जाईल. अगोदरच मद वाढला आहे आणि त्यावर परत हा *प्रमाद*. एक तर 'मी चंदुलाल आहे' हा आरोपित भाव आहे, तो मद आहे आणि लग्न प्रसंगी मिरवतात, हा *प्रमाद* आहे. चांगल्या परिस्थितीत सुख उपभोगतो आणि वाईट परिस्थितीत दु:ख भोगतो, हाच *प्रमाद* आहे. आरोपित भावात कायम स्थिर राहणे हा अहंकार आणि आरोपित भावात मौज-मजा करणे हा *प्रमाद*.

आता हे लोक कोणी लवकर उठत नाही तर त्याला *प्रमाद* म्हणतात. पण तो *प्रमाद* नाही, तो तर आळशीपणा आहे. लवकर न उठणे हे आळशी लोकांसाठी व्हिटॅमिन आहे. एक तर उशीरा उठतो आणि गाडी आली की ऐन वेळेला धावतो. म्हणजेच आळशीपणा हे त्या व्यक्तीसाठी व्हिटॅमिन आहे.

आता या साधूंनी *'प्रमाद'चा* अर्थच आपल्या भाषेत लावला आहे,

आणि महावीर भगवंतांनी खरे म्हणजे वेगळेच सांगितले आहे. भगवंतांची भाषाच आपल्यासाठी उपयोगी आहे. 'ज्ञानीं'च्या संज्ञेनुसार चालावे. त्यांचे होकायंत्र बरोबर आहे, त्यांचे ज्ञान खरी उत्तर दिशा दाखविते. इतर लोक उत्तरे ऐवजी दक्षिणेकडे घेऊन जातात. कांटा उत्तर दिशा दाखवितो पण ती दिशा मात्र असते दक्षिण. ज्ञानींबद्दल यथार्थपणे म्हटले आहे,

*'मोक्ष मार्गस्यानेत्तारंय भेत्तारं कर्मभुभृत्ताम्*
*ज्ञातारं-सर्व तत्त्वानाम्, वंदे तद्गुणं लब्धये!'*

(जे मोक्ष मार्गाचे नेते आहेत, जे कर्मरूपी पर्वताला भेदणारे आहेत आणि जे जगातील सर्वच तत्त्वांचे ज्ञानी आहेत, असे ज्यांचे गुण आहेत त्यांना मी नमस्कार करतो, तसे गुण माझ्यात सुद्धा प्रकट होवोत.)

❖❖❖❖❖

## स्व-रममाणता : पर-रममाणता

ज्यांनी नाईलाजाने लग्न केले आहे अशा व्यक्तींसाठी वीतराग भगवंताचे ज्ञान आहे आणि ज्यांनी स्वखुशीने तीन-तीन वेळा सही करून लग्न केले आहे, त्यांना वीतराग भगवंतांचे ज्ञान कसे मिळेल? नाईलाजाने जो लग्न करतो, नाईलाजाने जो खातो, नाईलाजाने जो पितो अशा लोकांसाठी वीतराग भगवंतांचे ज्ञान आहे! नाईलाज हे एक पद आहे, स्टेज आहे, पसंत नाही तरी पण करावे लागते. तुम्हालाही एखादी गोष्ट आवडतच असेल ना? हे तुम्हाला माहीत आहे ना?

**प्रश्नकर्ता :** माझी आवडती गोष्ट आहे हे खरे, पण नक्की कोणती हे मी नीट सांगू शकणार नाही.

**दादाश्री :** पण 'आहे' हे तर नक्की ना? या 'आहे'च्या आधारवर माणूस जगत असतो. माणूस कुठल्या आधारावर जगत असतो? तर, 'आहे' ह्या आधारावर, आणि 'आहे' ह्या आधारावर जगले नाही तर आत्मा प्राप्त होईल! सध्या आत्म्याची रममाणता तर 'आहे' यात आहे. 'आहे' ही रममाणता जर नावडती झाली तर त्याला नक्कीच आत्मा प्राप्त होईल, अन्यथा देहाचे अस्तित्व उरणारच नाही. पण 'आहे' यामध्ये रममाणता आहे. म्हणून आत्मा म्हणतो, 'तुमचे बरोबर आहे. तुम्ही तुमच्या गावात ठीक आहात आणि मी माझ्या गावात ठीक आहे!' म्हणजे कशात तरी रममाण असतो. इतर जागेवर रममाण असतो त्या आधारावर तो जगू शकतो. ज्याला कुठल्याही जागी-एका परमाणूसुद्धा, पुद्‌गलामध्ये

पौद्गलिक रममाणता नसेल त्याला तर आत्मा प्राप्त झाल्याशिवाय राहणारच नाही! आत्म रममाणतेशिवाय आम्ही क्षणभरही राहिलो नाही! 'हा' देह माझा आहे' असे आम्हाला (क्षणभरदेखील) भान नसते, देह हा माझा शेजारी आहे, पहिला शेजारी आहे, असेच वाटते.

जोपर्यंत किंचितमात्रही पौद्गलिक रममाणता असेल तोपर्यंत आत्मा प्राप्त होत नाही. आत्म्याचा आभास होतो पण तद्रुप होता येत नाही. तद्रुप म्हणजे भगवंतांनी जसा आत्मा सांगितला आहे तसा होऊ शकत नाही. तद्रुप आत्मा, तो तर अचल आत्मा आहे! बाकी सर्व चंचल आत्मे आहेत! जोपर्यंत पौद्गलिक रममाणता आहे तोपर्यंत चंचल आत्माच आहे. भगवंतानी म्हटले आहे दोन प्रकारची रममाणता असते. एक 'शुद्ध चेतनाची' रममाणता, जी परमात्म रममाणता म्हटली जाते किंवा दुसरी पुद्गलाची रममाणता, जी खेळण्यांची रममाणता म्हटली जाते, खेळण्यांशी खेळत आहोत असे म्हटले जाईल.

## ही सर्व खेळण्यांचीच रममाणता

हो, लहान मुले देखील खेळण्यांशीच खेळतात ना? दोन वर्षांच्या मुलाची खेळणी पाच वर्षाच्या मुलाला दिली तर तो घेणार का? नाही घेणार. तो म्हणेल 'ही तर लहान मुलांची खेळणी आहेत, माझी नाहीत!' म्हणजेच लहान मुलांच्या खेळण्यांशी मोठा मुलगा खेळत नाही. आणि मोठ्या मुलांच्या खेळण्यांशी लहान मुले खेळत नाहीत. मग पाच वर्षांच्या मुलांची खेळणी अकरा वर्षांचा मुलगा घेणार नाही. तो म्हणेल, 'आम्ही तर क्रिकेट खेळायला जाऊ.' तो मग चौदा वर्षांचा होईपर्यंत त्याला क्रिकेट, फूटबॉल, व्हॉलीबॉल अशी सगळी खेळणी हवीशी वाटतात. नंतर अठरा वर्षांचा झाला की अभ्यास करता करता तो पुस्तकांशी खेळतो. पुस्तके ही सुद्धा खेळणीच नाही का? जी पुस्तके आवडतात त्याला काय म्हणायचे? जिथे आवड आहे तिथे रममाणताच म्हणायची. म्हणून पुस्तके, खेळणी, फूटबॉल, बाहुला-बाहुली, ही सगळी खेळणी आहेत. वीस-बावीस वर्षाचा झाला की तो म्हणतो, 'आता मला ही बाहुली चालणार नाही, मला मोठी जिवंत बाहुली पाहिजे.' तुम्ही जर

त्याला म्हणालात, ‘चांगली, मोठी जपानी बाहुली आणून देतो, साडी घातलेली.’ तर तो म्हणेल, ‘नाही, मला जिवंत बाहुलीच हवी.’ मग तो जिवंत बाहुली घेऊन येतो! आता आपण त्याला विचारले की, आता तुला संतोष वाटला ना? आता आणखी खेळणी नको ना? त्यावर तो म्हणेल, ‘हो, मला आता आणखी काही नको.’ अशीच तीन चार वर्षे गेली की मग लोक विचारू लागतात, ‘लग्न होऊन चार वर्षे झाली, काय आहे? मुलगा की मुलगी? की अजून काहीच नाही? मग पुन्हा वाटू लागते, ‘या खेळण्याची कमतरता आहे.’ नंतर मग या खेळण्याची पण भर पडते.

याउलट दुसरा एखादा मुलगा बावीस वर्षांचा होतो तेव्हा म्हणतो, ‘मला दीक्षा घ्यायची आहे.’ त्याला विचारले, ‘का? तुला जिवंत बाहुली नको का? मग तो म्हणेल, ‘नको, मला असे खेळणे नको. मी तर त्यागी खेळणी शोधीन. जे अशी जिवंत बाहुली वापरत नाहीत ती आता आमची खेळणी!’

काही लोकांची लग्ने होतात, त्यांना मुले होतात, मग त्यांच्या उदयकर्मानुसार नवरा–बायकोची भांडणे होऊ लागतात. म्हणजे आता त्यांना त्यागाचा उदय आला. मग अशी माणसे काय करतात? बायकोकडून जबरदस्तीने लिहून घेतात, ‘मी राजीखुशीने माझ्या पतीला मोक्षाच्या रस्त्याने जाण्यासाठी परवानगी देत आहे.’ बायको–मुलांना रडवून–रडवून असे लिहून घेतात. हे सर्व असेच बायका–मुलांना रडवून–रडवून आले आहेत. कित्येक असे असतात की त्यांनी लग्न केलेच नाही. कित्येक असेही असतात की त्यांचे लग्न जमूच शकले नाही! आणखी काही थोडे असे असतात की त्यांना घरात खाण्या–पिण्याची सोयच नसते. अडाणी, कमी शिकलेले, इतर गोष्टीत देखील बावळट असेही काही लोक असतात, पण त्यांना एवढी अक्कल असते की या संसारात रोजरोज नोकरीला जायचे, रेशन आणायचे, ही उपाधी त्यांना आवडत नाही. ते म्हणतील ‘साधू झालो तर अनवाणी चालावे लागेल, एवढेच दुःख ना! पण लोक आपल्याला बापजी, बापजी तरी म्हणतील! मग त्याला काय

येते, काय समजते, हे कोण विचारतो? म्हणजे कित्येक असेही घुसले आहेत! या सगळ्यात खरे साधू पण असतात पण 5-10 टक्के फक्त! काहीजण कोट्यावधि रुपये सोडून येतात. त्यांना विचारले, 'तुम्हाला पैशांशी खेळायला आवडेल नाही? ऐश्वर्याशी खेळता आवडले नाही? बायकोशी खेळायला आवडले नाही? मग येथे कुठल्या खेळण्याशी खेळायला आला आहात? तर सांगतील आम्हाला समाज कल्याण करायचे आहे. अहो, कोणत्या जन्मात तुम्ही समाजकल्याण केलेले नाही? तुम्ही तुमचे स्वत:चे कल्याण करा ना? तुमचे स्वत:चे कल्याण केल्याशिवाय समाजाचे कल्याण कसे होईल?

आता ही अशी चुकीची समज किती दिवस चालणार? वीतराग भगवंतांची खरी शिकवण समजून घ्यायला हवी ना? परत ते गातात सुद्धा 'पर-रममाणता दूर कर, पर-रममाणता दूर कर' अरे पण पर रममाणता म्हणजे नक्की काय ते तुला समजत नाही का? तु ज्याच्याशी खेळत आहेस तीच पर-रममाणता आहे, मग ती तू कशी दूर करणार? काही लोक म्हणतात, 'समाजकल्याण करत आहोत. जैनांची संख्या वाढवितो.' अरे, जैनांची संख्या वाढो किंवा कमी होवो त्याचा तू का त्रास करून घेतोस? महावीर भगवंतांना पण अशी काळजी नव्हती. मग तू ती का करत आहेस? तुझ्या गुरुंचे गुरु, त्यांचेही गुरु, साऱ्या जगाचे गुरु असे जे महावीर भगवंत त्यांनी सुद्धा जैन लोकांची संख्या वाढावी अशी काळजी केली नाही तर मग तू असा कसा निपजलास की जैनांची संख्या वाढवण्या मागे लागला आहेस? तुझे चित्त भम्रित झाले आहे का? त्याऐवजी संसार करून घरी मुले वाढवली असतीस तर डजन किंवा पाच तरी मुले वाढली असती ना? पण इथे तर मुलांना निर्वंश केले! मग यांना जैन कसे म्हणायचे? सत्य समजावे तर लागेलच ना? कधीपर्यंत असे खोटेनाटे चालेल? सत्य समजले पाहिजे, जाणले पाहिजे तरच आत्मा जाणता येईल. जेव्हा पर-रममाणता संपते तेव्हाच स्व-रममाणता उत्पन्न होते.

रममाणता म्हणजे काय ते आता तुम्हाला समजले ना? शेवटपर्यंत

शास्त्रांशी खेळतात, गुरु शिष्यांशी खेळतात आणि शिष्य गुरुंशी खेळतात. आणि म्हणतात कसे की 'हाच मोक्षाचा रस्ता आहे.' अरे, हा मोक्षाचा रस्ता नाही. साधू, महाराज, आचार्य, सगळे शास्त्रांशीच खेळत बसतात. भगवंतांनी म्हटले, तू शेवटपर्यंत खेळण्यांशीच खेळत आहेस, त्यात तुझे काय कल्याण झाले? 'तू खेळण्यांशीच खेळत बसलास म्हणून मोक्षासाठी गेट आउट.' तेव्हा तो म्हणेल, 'अहो भगवंत, मी तर तुमच्याच शास्त्रांशी, आगमाशी खेळत होतो.' तर भगवंत म्हणतील, गेट आउट, तू खेळण्यांशीच खेळला आहेस. क्षणभरदेखील आत्म्याशी खेळला नाहीस. आम्ही स्व-रममाणता असलेल्यानांच मोक्ष देतो. म्हणूनच आम्ही तुम्हाला पुस्तक धरून बसू नका असे म्हटले आहे.

स्वमध्ये (आत्म्यात) रममाणता कर. ज्याला 'स्व' प्राप्त झाले नाही तो खेळण्याशीच खेळत राहतो. हे सगळे जगातील आचार्य वगैरे आहेत ते सर्वच खेळण्यांशीच खेळत राहतात. आपले इथले महात्माच फक्त आत्म्याशी, 'स्व'शी खेळत आहेत, स्व-रममाणता करत आहेत. आता एवढी सूक्ष्म गोष्ट त्यांना समजतच नाही म्हणून दिवसभर पुस्तके आणि पुस्तकांशीच खेळत बसतात! एखादे पुस्तक सापडले नाही तरी चिडतात. दिवसभर सगळ्यांवर चिडत असतात. सगळ्यांना 'तुम्हाला अक्कल नाही' असे ते म्हणतात, जणू काही हेच फक्त शहाणपणाचे पुतळे! भगवंतांनी पुस्तकात स्पष्ट सांगितले आहे, 'कुणावर चिडू नये, कोणाला दुःखवू नये.' पण हे तर फक्त तेच करतात. पुस्तकात काय असे चिडायला सांगितले आहे का? जर एखादे पुस्तक हरवले, ज्या पुस्तकात कोणावरही चिडू नका असे सांगितले आहे तेच पुस्तक जर हरवले तरी ते चिडतात! हे सगळे खेळण्यांशी खेळत आहेत. मग त्यांनी आरडाओरडा करून काय भले होणार आहे? करोडो जन्म शास्त्रच वाचत आला आहे तरी पण तो शास्त्राच्याच बंधनात अडकून पडतो. संसारात रममाण झाला तर संसाराच्या बंधनात अडकतो. यातून त्यात आणि त्यातून यात (असेच चालू)! पुस्तके (शास्त्र) सुद्धा शेवटी खेळणी आहेत. आत्मा जाणून घेण्यासाठी पुस्तके आहेत, त्यामुळे हेतू चुकीचा नाही पण आत्म्याची रममाणता हीच खरी रममाणता आहे, बाकी सर्व पर-रममाणता.

एक साधू महाराज आले होते. मला म्हणाले, 'आता माझा एक पण परिग्रह राहिलेला नाही. मग माझा मोक्ष होईल ना?' आम्ही त्यांना सांगितले, 'नाही, तुमचा मोक्ष नाही. जोपर्यंत आत्म्याची रममाणता होत नाही तोपर्यंत मोक्ष नाही. ही सर्व तर खेळण्यातील रममाणता आहे. शास्त्र वाचा, कर्मकांड करा, ही सगळी रममाणता आहे. परिग्रह बाधक नाहीत. परिग्रह कितीही असेल, परंतु तो स्वत: जर आत्म्याच्या रममाणतेत असेल तर तो मोक्षच आहे! अपरिग्रहानेच मोक्ष आहे असे एकतर्फी म्हणता येणार नाही.' तुला जर स्व-रममाणता झाली असेल तर मग तू 1300 राण्यांशी लग्न केलेस तरी आमची हरकत नाही, तुझे सामर्थ्य हवे! तुला जर स्व-रममाणता प्राप्त झाली आहे तर मग कसला त्रास? स्व-रममाणता उत्पन्न झाल्यानंतर कुठलाही त्रास स्पर्श करू शकत नाही.

## रममाणताः अवस्थांची आणि अविनाशीची

या अशा सूक्ष्म गोष्टी लोकांना कळत नाहीत. ही 'स्व-रममाणता' आणि ही 'पर-रममाणता' असे काही भानच नाही. दोन प्रकारचे लोक आहेत. एका प्रकारचे लोक अवस्थांमध्ये अडकलेले आहेत, ते मग साधू असो की कोणी संन्यासी असो, आचार्य असो की सूरि असो, सगळेच अवस्थात पडून आहेत आणि दुसऱ्या प्रकारचे लोक की जे स्वरूपात स्थित आहेत. 'दादां'नी ज्यांना 'स्वरूपा'चे ज्ञान दिले आहे ते सगळे 'स्वरूपात' स्थित आहेत.

अवस्था या विनाशी आहेत, पण याचा अर्थ एकदम पंधरा मिनिटात विनाश होतो असे नाही. काही अवस्था तीन तास टिकतात, काही तीन-चार दिवस टिकतात. तारुण्य दहा किंवा पंधरा वर्षे टिकते म्हातारपण वीस वर्षे टिकू शकते. लहानपण, तारुण्य आणि म्हातारपण या तीन मोठ्या अवस्था आहेत. आणि लहानपणात सुद्धा बऱ्याच अवस्था उत्पन्न होतात. लहानपणी दोन वर्षांचा असताना नागडाच फिरत होता, कपडे घालत नसत, तरी ते चालत होते. पाच वर्षांचा झाला की त्याला कपडे वगैरे घालतात तेव्हा तो खेळणी मागतो. मग अकरा वर्षांचा झाला की त्याला पाच वर्षांची मुले खेळतात ती खेळणी दिली तर ती त्याला चालत

नाहीत 'मला तर बॅट आणि बॉलच पाहिजे' असे म्हणतो 'अरे, तू खेळणी का बदललीस?' तर म्हणतो 'माझी अवस्था बदलली आहे, मी आता मोठा नाही का झालो?' अवस्था बदल्यामुळे तो मोठा झाला! असे करत–करत तो शेवटपर्यंत खेळण्यांशीच खेळत राहतो. जो खेळण्यांशी खेळतो तो त्या अवस्थेत मुक्काम करतो आणि जो आत्म्याची रममाणता करतो तो आत्म्यात मुक्काम करतो. अवस्थेत मुक्काम करतो म्हणून अस्वस्थ राहतो, आकुळ–व्याकुळ राहतो. आणि 'आत्म्यात रममाणता केली की स्वस्थ, निराकूळ राहतो! 'ज्ञानी पुरुष' तुम्हाला अवस्थांच्या रममाणतेतून उठवून आत्मरममाणतेत बसवून देतात. मग या अनंत जन्मांपासून होणारी अवस्थांच्या रममाणतेचा अंत येतो आणि निरंतर राहणारी 'आत्म–रममाणता' कायमसाठी उत्पन्न होते. 'ज्ञानी पुरुषां'ना काय अशक्य आहे?

आत्म्याची रममाणता प्राप्त झाली की मग काहीच काम शिल्लक राहत नाही, नाही तर तोपर्यंत खेळण्यांशीच खेळत बसावे लागते ना? कारण तोपर्यंत चित्ताला कशात ठेवायचे? जोपर्यंत स्वरूपाचे भान होत नाही तोपर्यंत चित्त कशात ठेवणार? एक तर त्याला आत ठेवेल, पण त्याला आतल्या 'स्वरूपाचे भान'च नाही म्हणून तो बाहेरच्या खेळण्यांशीच खेळत राहतो. किंवा मग चित्त भटकत राहते. जोपर्यंत तो खेळण्यांशी खेळत राहतो तोपर्यंत तर चित्त स्थिर राहते.

खेळणे कशाला म्हणतात? तर जे हरवले तर द्वेष होतो आणि मिळाले की राग (आसक्ती, मोह) होतो! अशी वस्तू म्हणजे खेळणे. एकदा जर ज्ञानी पुरुषांची भेट झाली आणि त्यांच्याशी तार जुळली, आत्मा प्राप्त झाला, 'स्वरूपाच्या रममाणतेत' आला की मग त्याचे राग–द्वेष संपले आणि तो झाला वीतराग! नाही तर तोपर्यंत फक्त प्रकृतीतच रममाणता! प्रकृतीचे पारायण पूर्ण झाले की झाला वीतराग!

**– जय सच्चिदानंद**

## दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण
9. भावना सुधारे जन्मोजन्म
10. कर्माचे विज्ञान
11. पाप-पुण्य
12. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार
13. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार
14. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य
15. मानव धर्म
16. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
17. सेवा-परोपकार
18. दान
19. त्रिमंत्र
20. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
21. चमत्कार
22. सत्य-असत्याचे रहस्य
23. वाणी, व्यवहारात
24. पैशांचा व्यवहार
25. क्लेश रहित जीवन
26. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
27. प्रेम
28. गुरू-शिष्य
29. अहिंसा
30. आप्तवाणी-1, 2

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
15. दादा भगवान कौन ?
16. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
17. अंत:करण का स्वरूप
18. जगत कर्ता कौन ?
19. त्रिमंत्र
20. भावना से सुधरे जन्मोंजन्म
21. चमत्कार
22. प्रेम
23. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
24. दान
25. मानव धर्म
26. सेवा-परोपकार
27. मृत्यु समय, पहले और पश्चात्
28. निजदोष दर्शन से... निर्दोष
29. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
30. क्लेश रहित जीवन
31. गुरु-शिष्य
32. अहिंसा
33. सत्य-असत्य के रहस्य
34. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
35. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
36. वाणी, व्यवहार में... (सं)
37. कर्म का विज्ञान
38. सहजता
39. आप्तवाणी - 1 से 9
40. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
41. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
42. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
फोन : (079) 39830100, 9328661166/77
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | : 9810098564 | **बेंगलूर** | : 9590979099 |
| **कोलकता** | : 9830080820 | **हैदराबाद** | : 9885058771 |
| **चेन्नई** | : 7200740000 | **पूणे** | : 7218473468 |
| **जयपुर** | : 8890357990 | **जलंधर** | : 9814063043 |
| **भोपाल** | : 6354602399 | **चंडीगढ** | : 9780732237 |
| **इंदौर** | : 6354602400 | **कानपुर** | : 9452525981 |
| **रायपुर** | : 9329644433 | **सांगली** | : 9423870798 |
| **पटना** | : 7352723132 | **भुवनेश्वर** | : 8763073111 |
| **अमरावती** | : 9422915064 | **वाराणसी** | : 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229


**www.dadabhagwan.org**

## याला म्हणतात आप्तवाणी!

आप्तवाणी म्हणजे आप्तपुरुषांची वाणी. एक तर तीर्थंकर भगवंतांना आप्तपुरुष म्हणतात किंवा दुसरे म्हणजे तीर्थंकर भगवंतांचे अनुगामी यांना आप्तपुरुष म्हटले जातात. आप्तपुरुष, जे संसारातही सर्व प्रकारे विश्वास करण्यायोग्य असतात त्यांना आप्तपुरुष म्हणतात! आणि आप्तपुरुषांच्या वाणीला आप्तवाणी म्हणतात. ती वाणी अविरोधाभासी असते, सैद्धांतिक असते. त्यांच्या वाणीची समीक्षा करणे उचित नाही. ते जे काही बोलतात, ते सर्व शास्त्रच असते! ते चोवीस तीर्थंकरांचे आगमच बोलत असतात! जी वाणी अतुलनीय आहे. जी वाणी शास्त्रात लिहिण्यायोग्य आहे, त्याच वाणीमधून ही सर्व पुस्तके छापली जातात.

ही पुस्तके सर्व काही बोलतील, चांगले बोलतील आणि ही पुस्तके बोलतातच! लोकांना मदत करतात. अजून तर बऱ्याच लोकांचे भले होईल, साऱ्या जगाचे कल्याण होईल!

– दादाश्री

आत्मविज्ञानी 'ए.एम.पटेल' यांच्या आत प्रकट झालेल्या

# दादा भगवानना असीम जय जयकार हो

मूल दीपक से प्रकटे दीपमाला

dadabhagwan.org

ISBN 978-81-949363-0-5
9 788194 936305
Printed in India
Price ₹200